Lakshmi Vilas,
Nathan Road, Poona 1.

Dated ~~14-1-1949~~. 20-11-51

My friend,

It gives me great pleasure to send ~~4th~~ four Volumes of my Life-story for your kind perusal at your leisure time. If you will turn your eye to the introduction and review Chapter 27 ( सिंहावलोकन ) page 538 in the fourth Volume, you, I trust, will get a fair idea of my life from my birth upto the present day.

I would also like to draw your kind attention to the foreword written to the Fourth Volume by Mahamahopadhyaya Prof. D. V. Potdar, who was the President of the Historical Conference held quite recently in Delhi.

The first three Volumes were written by the late Mr. V. N. Joshi, late Shaladhikari, Bhor, and the 4th is written by Raosaheb V. G. Ranade, Ex-Dewan of Bhor.

The first 3 bring the story of my life to the year 1939 and the 4th brings the account practically up-to-date 1949.

I hope you will find the Volumes interesting. With kind regards,

Yours sincerely,

[signature]

Raja of Bhor.

*With Best Compliments*

***From***

**His Highness Raja Shrimant**

**SIR RAGHUNATHRAO *Alias* BABASAHEB PANDIT,**

**Pant Sachiv, K. C. I. E.,**

***RAJA OF BHOR***

राजा

# श्रीमंत रघुनाथराव पंडित पंतसचिव

## राजेसाहेब संस्थान भोर

# यांचें चरित्र


लेखक

वासुदेव नारायण जोशी

( माजी शाळाधिकारी, संस्थान भोर )


१९३९

# अर्पणपत्रिका

राजा

**श्रीमंत रघुनाथराव शंकरराव ऊर्फ**

**बाबासाहेब पंडित पंतसचिव**

**राजेसाहेब भोर संस्थान**

यांचे अंगीं असलेल्या

धर्मश्रद्धा, प्रजाहिततत्परता, राजकारणपटुता, औदार्य,

कर्तव्यनिष्ठा, दया, दाक्षिण्य, न्यायनिष्ठुरता,

गुणग्रहणता, वचनासक्ति, समदृष्टि

इत्यादि अनेकविध सद्गुणांवर

लुब्ध होऊन हा ग्रंथ लेखकानें

कृतज्ञतापूर्वक विनम्र भावानें

**श्रीमंत राजेसाहेबांचे चरणीं**

अर्पण केला असे.

# पुरस्कार

भोर संस्थान हें आकारानें आणि उत्पन्नानें लहान असलें तरी मानाच्या दृष्टीनें त्याची जागा फार उंच आहे. किंबहुना ती एका दृष्टीनें इतकी उंच म्हणतां येईल कीं, त्याच्या उंचीला खरोखरीच जोड नाहीं. या म्हणण्यांत वरवर वाचणारास अतिशयोक्ति आढळेल; परंतु जरा संथपणें विचार करणारास या विधानांतील सत्य अगदीं पुरेपूर पटल्याशिवाय राहणार नाहीं. भोरीला आम्ही एवढें उच्च स्थान मनांतून कां देतों म्हणाल तर, ज्या ठिकाणीं श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांनीं आपली पहिली राजधानी स्थापन केली तो राजगड ज्यांच्या हद्दींत आणि हुकमतींत आहे, ज्या रायरेश्वरावर शिवाजी-महाराजांनीं दादाजी लोहकऱ्याचे विद्यमानें हिंदवी स्वराज्याची शपथ घेतली तो श्रीस्वयंभू शंभु ज्यांच्या राज्यांतच मोडतो, छत्रपतींनीं आपले पहिले पहिले पराक्रम ज्या मैदानमाळांवर गाजविले ते मैदानमाळ आणि जेथें प्रथम झेंडे लाविले ते कोंडाणा, तोरणा आणि पुरंदर हे किल्ले ज्या राज्यांत किंवा आज राज्यांत नसले तरी लगतलगत खेटून आहेत, महाराष्ट्राच्या रामदासी प्रबोधसूर्याचीं उज्ज्वल प्रभाकिरणें ज्या घळींतून बाहेर फांकलीं ती शिवथर घळ असलेल्या घळीचा द्वारमंडपाकडील माथा ज्या संस्थानाला पावन करीत आहे, आणि जी गादी ‘ लोकशंकर ’ शंकराजी नारायणांनीं स्थापिली त्या सचिव गादीची परंपरा जेथें अद्यापिहि चालते, त्या भोर संस्थानापेक्षां अधिक भाग्यशाली, अधिक आदरणीय आणि अधिक संस्मरणीय असें कोणतें स्थळ आम्हां महाराष्ट्रीयांना आज उपलब्ध आहे? हीं कारणेंच अशीं आहेत कीं, तीं ऐकतांच कोणीहि चटकन् भोर म्हणतांच वरील स्मरण होऊन आपला माथा तुकविल्याशिवाय खचित राहणार नाहींत.

अशा या मानार्ह भोर संस्थानाचे विद्यमान अधिपति श्रीमंत राजे बाबासाहेब यांचा आणि प्रस्तुत लेखकाचा संबंध शके १८४१ (सन १९१९) सालीं प्रथम आला आणि त्या पहिल्याच भेटींत श्रीमंत बाबासाहेब यांच्या अंगच्या सौजन्याचा या लेखकाला अनुभव आला. भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या मंदिराच्या पूर्व दालनाचे उद्घाटनाचें मंगल कार्य आम्हीं योजिलें

होतें. श्रीमंत बाबासाहेब त्या वेळीं युवराज होते आणि त्यांच्या हस्तें हें मंगल कार्य व्हावें अशी आमची इच्छा होती. त्या निमित्तानें महाबळेश्वरीं वरील प्रथम भेटीचा योग आला. आमच्या एका प्रिय संकल्पित कार्याला श्रीमंतांचा असा सुयोग लाभल्यामुळें श्रीमंतांविषयीं एक प्रेमतंतु आमचे चित्तांत सहजच उद्भवला; आणि तेव्हांपासून आज सुमारें वीस वर्षें हा जडलेला लोभ क्रमाक्रमानें पुष्टावत गेला आहे.

हा आमचा संबंध ध्यानीं आणून, भोरचे माजी विद्याधिकारी श्री. जोशी यांनीं सुमारें चारपांच वर्षांपूर्वीं श्रीमंतांचे चरित्राची रचना करण्याचा संकल्प आम्हांस श्रुत केला. तेव्हां आम्हांला समाधान वाटलें. कारण एक तर श्रीयुत जोशी यांनीं श्रीमंत रावसाहेबांच्या वेळेपासून भोर संस्थानांत तीन तपें सेवा केली व दीर्घ आणि विविध प्रकारचा अनुभव संपादन केला. श्रीमंत बाबा-साहेबांशीं त्यांचा संबंध अगदीं लहानपणापासूनच आला. ते श्रीमंत बाबासाहेबांचे शिक्षकहि होते. पुढें त्यांच्या कारकीर्दींत विद्याधिकारी व खासगी कारभारी म्हणून कार्य करून ते सेवानिवृत्त झाले. असा निकटचा व विश्वासांतला माहितगार गृहस्थच श्रीमंतांसारख्यांचें चरित्र लिहिण्यास अत्यंत लायक होय हें कोणीहि कबूल करील आणि म्हणूनच हें कार्य राजश्री जोशी यांनीं हातीं घेतल्याबद्दल आम्हांस संतोष वाटला.

संकल्पित चरित्राची जुळवाजुळव रा. जोशी यांनीं चारपांच वर्षांत संथपणें केली आणि तें पूर्ण झाल्यावर एक दिवस अचानकपणें त्यांनीं येऊन या चरित्रग्रंथास आम्हीं पुरस्कार जोडावा म्हणून आपला मानस कळविला. नुकतेंच कांहीं दिवसांपूर्वीं खुद्द श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या प्रवासवृत्ताच्या एका खंडास आम्हीं प्रस्तावना लिहून द्यावी असा आपला मानस विदित केला होता, त्यास अनुसरून आम्हीं तें कार्य केलेंहि होतेंच. मागें जो संबंध वर्णन केला तो या रीतीनें दृढ झालाच होता. अर्थात् रा. जोशी यांची सदरील विनंति मान्य करणेंच आम्हांस भाग होतें. अशा रीतीनें हें किंचित् नाजुक परंतु जबाबदारीचें कार्य आम्हीं हातीं घेतलें.

नाजुक आणि जबाबदारीचें म्हणून वर आम्हीं आमच्या प्रस्तुत कार्याचें वर्णन केलें त्याचें थोडें स्पष्टीकरण येथें करणें उचित होईल. विद्यमान राज-

पदस्थ लोकांचीं चरित्रें आणि इतर विद्यमान थोरांचीं चरित्रें यांत एक मोठा भेद असतो. तो लक्षांत घेणाऱ्यांस आमचें हें म्हणणें पटण्यास अडचण पडणार नाहीं. हा भेद असा कीं, राजे किंवा त्यांच्यासारखे जे अधिकारपदस्थ लोक असतात त्यांचे हितसंबंध असेच असतात कीं, त्या सर्वांचें उघड स्पष्टीकरण आणि चर्चा त्यांच्याच विद्यमान काळीं पुष्कळदां मोकळेपणानें करतां येत नाहीं. वास्तविक राजकीय थोर पुढाऱ्यांच्या चरित्रांनाहि हाच नियम लागू पडतो. म्हणूनच कित्येक वेळां असली मंडळी आपल्या कागदपत्रांच्या किंवा आत्मचरित्रादींच्या प्रसिद्धीसंबंधीं " आमच्या मृत्यूनंतर अमुक वर्षांच्या आधीं हें प्रसिद्ध करूं नये " असे निर्बंध घालून ठेवितांना आपणांस आढळून येतात. आपल्या हाताखालीं वागलेल्या लोकांसंबंधानें किंवा आपल्या गुप्त किंवा उघड प्रतिपक्षीयांसंबंधानें खरी वस्तुस्थिति अवेळींच प्रगट झाल्यानें अनेक प्रकरणें नासण्याचा फार संभव असतो. यामुळेंच असे निर्बंध घालण्याची प्रथा आढळते.

या दृष्टीनें आणखी सूक्ष्म विचार केला तर बुद्धीला असें पटेल कीं, थोर अधिकारपदस्थ व्यक्तींचीं चरित्रें लिहिणें, वाचणें आणि समजणें या तिन्ही गोष्टींचें एक विशेष तंत्रच असतें. जितक्या मोकळेपणानें, ज्या खुल्या पद्धतीनें आणि जितक्या निर्भीडपणें लोकपुढाऱ्यांचीं, विद्वानांचीं, साधुपुरुषांचीं चरित्रें लिहिलीं जातात तोच प्रकार वरील पदधारी व्यक्तींसंबंधांत अवलंबितां येत नाहीं. गेल्या महायुद्धाचे वेळीं युद्ध चालू असतांना युद्धयमान राष्ट्रांतर्फे जीं वृत्तें प्रसिद्ध होत असत आणि पुढें कित्येक वर्षांनीं लॉइड जॉर्ज, ॲस्क्विथ, हेग, क्रॉउन प्रिन्स वगैरेंचीं जीं चरित्रें किंवा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाले आहेत तें समग्र वाङ्मय या तंत्राविषयीं भरपूर साक्ष पुरवील.

राजे वगैरे लोकांशीं वागण्याचें आणि बोलण्याचालण्याचेंहि एक तंत्र असतें. थोड्याशा अनुभवानें तें सहज लक्षांत येण्यासारखें असतें. तसेंच उलट इतरांशीं वागण्याचें आणि बोलण्याचालण्याचेंहि एक विशेष तंत्र राजेप्रभृति लोकांस पाळावें लागतें. एकदां या उभयविध तंत्राची योग्य कल्पना व अनुभव अंगीं मुरला म्हणजे असलें वाङ्मय कोणत्या तंत्रानें चालतें हें समजण्यास बिलकुल अडचण पडणार नाहीं. या तंत्राची कांहींशी कल्पना आमच्या इकडील

प्राचीन कवींच्या रचनेंत आढळून येते. त्याची आठवण येथें वाचकांस करून देतों. एका चतुर हिंदुस्थानी शाहीरानें महादजी शिंदे यांच्यासंबंधीं एक कवित्व रचिलेलें नुकतेंच उपलब्ध झालें आहे, त्यांत या शाहीरानें ही चातुरी दाखविली आहे. त्याचा नमुना येथें चुटका म्हणून देतों. महादजी पानिपतावर गेले असतां लंगडे झाले. आतां या शारीरिक व्यंगाविषयीं प्रस्तुत शाहीरानें कसे खुबीनें उद्गार काढले आहेत ते पहा. तो म्हणतो:—

" एकहि पाँवसे सेंधिया साहब,
सागर लूधरि दाबि धऱ्यो है ।।
पूरब पश्चम दख्खन उत्तर,
लंकपती मन माहि डऱ्यो है ।।
दूसरे पाँवको है बसुधाकित,
तूटत टेकत घबराह वराहै ।।
सूरत सातहु द्वीपनमें, जग
जीतनहार ! तुम्ही लंगरार !
तुम्ही लंगरार ! ।। १ ।। "

याचा भावार्थ असा—" शिंदेसाहेब, एक पायानें तुम्ही पृथ्वी पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर चाऱ्ही दिशांस दाबून धरली आहे. आणि त्यामुळें लंकापति रावण मनांत भ्याला आहे. तुमचा दुसरा पाय तुम्ही अर्धवट तुटका-साच टेकावा तसा टेकीत आहां. पण तेवढ्यानें (पृथ्वी धारण करणारा) वराह घाबरून गेला आहे ! तुमची कीर्ति साती द्वीपांत गेली आहे ! असे जगज्जेते लंगडे एक तुम्हीच ! तुम्हीच एक असे लंगडशहा ! ! "

शाहीरानें महादजी लंगडा होता हें सत्य तर येथें सांगितलेंच आहे, पण त्याला गौरवाचा असा खुबीदार उठाव दिला आहे कीं, कोणीहि या प्रशंसेवर खूप व्हावें ! ! लिहिण्याबोलण्याच्या साऱ्या अलंकारी लपेटी अशा कारणानेंच उत्पन्न झाल्या असल्या पाहिजेत. त्या समजण्याची शक्ति म्हणजे रसिकता अंगांत असेल त्याला यांत अडचण काय पडणार ? एकाच गायनाचे ज्याप्रमाणें बहात्तर राग आहेत, एकाच कवितेचे ज्याप्रमाणें शेंकडोशें छंद आहेत त्याप्रमाणें एका लेखनकलेचीं हजार तंत्रें आहेत. चरित्रलेखनाचें एक सामान्य तंत्र आहे. तसेंच चरित्रविषय-प्रसंगानुरोधानें त्या सामान्य तंत्राचे

अनेक विशेष भेद-प्रभेदहि आहेत. आमच्या तर्कशास्त्रांत विशेषांना ‘अनंतत्व’ सांगितलें आहे तें सर्वथा यथार्थ आहे.

प्रस्तुतच्या चरित्राचे लेखक रा. जोशी यांना दरबारी कामाचा व वागणुकीचा दीर्घ अनुभव असल्यानें हें तंत्र त्यांना उत्कृष्टपणें अवगत झालेलें आहे. आणि त्याचा प्रत्यय हें चरित्र वाचणारांसहि आल्यावांचून राहणार नाहीं. तात्पर्य, रा. जोशी यांनीं जें हें चरित्रलेखनाचें कार्य हातीं घेतलें आहे त्या कार्यास ते सर्वथा लायक आहेत असें म्हणण्यास आम्हांस कसलाहि संकोच वाटत नाहीं.

दरबारी तंत्राचा उत्तम परिचय व अनुभव असला तथापि ग्रंथलेखनाचें कार्य तेवढ्यानें कसें साधतां येईल अशी रा. जोशी यांना रास्त शंका होती. परंतु हें चरित्र वाचून पाहतां रा. जोशी यांना लेखनाचेंहि कौशल्य साधलें आहे, असें स्पष्टपणें कबूल केलें पाहिजे. साधाच प्रसंग, परंतु मार्मिक व हलक्या हातानें पण किंचित् खारट-तुरट-तिखट विनोदानें कसा संपादावा याचीं उदाहरणें जोशी यांच्या या चरित्रांत अनेक दाखवितां येतील. रा. जोशी यांची भाषासरणी साधी व सरळ असली तरी प्रसंगानुरोधानें नाजूक व भेदक अशीं उभयविध स्वरूपें तिनें प्रगट केलीं आहेत. यामुळें रा. जोशी यांनीं हातीं घेत-लेल्या कार्यांत त्यांनीं चांगलें यश मिळविलें आहे असें म्हणण्यास चिंता नाहीं.

श्रीमंत राजेसाहेबांचें हें चरित्र त्यांच्या षष्ठ्यब्दपूर्तिप्रसंगानें त्यांस समर्पण करावें, असा रा. जोशी यांचा हेतु होता. परंतु त्या वेळीं एकाएकीं श्रीमंतांची प्रकृति विशेष बिघडली आणि सर्वांचाच विरस झाला. तदुत्तर श्रीमंतांच्या पुढील वाढदिवसाचा सुप्रसंग साधण्याचें ठरवून रा. वासुदेवराव जोशी यांनीं आपला संकल्प श्रीमंतांस कळविला आणि श्रीमंतांनींहि उदारपणें त्यास परवानगी दिली, त्यामुळें हा सुयोग आला.

एवढ्या साठ वर्षांच्या आयुष्यांत श्रीमंतांना बरेवाईट पुष्कळ प्रसंग अनुभवावे लागले. श्रीमंत झाले तरी काय सृष्टिक्रमाच्या चक्रांतून थोडेच सुटतात ! जन्म-जरा-मृत्यु श्रीमंत-गरीब—सर्वांच्याच मागें लागलेले असतात. परंतु आलेल्या संकटप्रसंगांना श्रीमंतांनीं शांतपणें तोंड देऊन आपली जीवन-

यात्रा आजवर कशी सफल केली याचा वृत्तांत हा चरित्रग्रंथ वाचणारास स्पष्टपणें कळून येईल.

या चरित्रग्रंथाचे रा. जोशी यांनीं दोन खंड केलेले आहेत. दोन्ही खंड मिळून सुमारें हजार बाराशें पृष्ठें मजकूर भरतो. पहिल्या खंडांत श्रीमंतांनीं राज्यधुरा शिरीं घेण्यापूर्वींचा वृत्तांत दिला असून दुसऱ्या खंडांत त्यांनीं राज्य-कारभार हातीं घेतल्यापासून झालेल्या सर्व घडामोडींचें सविस्तर वृत्त कथन केलें आहे. श्रीमंतांचें चरित्र यापुढेंहि जें होईल त्याचा आणखी एखादा खंड रा. जोशी यांना पुरा करतां येईल अशी खात्री वाटते. कारण देशी संस्थानांच्या घटनेंत फार मोठी क्रांति होण्याचे योग सन्निकट आलेले आहेत आणि या क्रांति-प्रसंगीं श्रीमंत राजेसाहेबांसारखे प्रगतिप्रिय नृपति प्रजांच्या वाढत्या आकांक्षांना पोषक असें धोरण अंमलांत आणतील हें त्यांच्या अलीकडील धोरणा-वरूनहि स्पष्ट होईल.

ग्रंथाच्या प्रारंभीं रा. जोशी यांनीं भोर संस्थानची थोडी भौगोलिक माहिती दिली आहे आणि नंतर सचिव गादीचे संस्थापक ‘लोकशंकर’ शंकराजी नारायण सचिव व त्यांचे पाठीमागचे पुरुष या सर्वांचा कामापुरता वृत्तांत दिला आहे. पुढें श्रीमंत बाबासाहेबांचें शिक्षण आणि राज्यकारभाराचा पूर्वानुभव येथवरचा वृत्तांत दिला आहे.

श्री. बाबासाहेबांचे वडील कै. श्री. रावसाहेब यांनीं श्रीमंतांच्या शिक्षणाची पुष्कळ काळजी घेतली आणि श्रीमंतांनींहि मेहनतीनें व झटून अभ्यास केला, असें रा. जोशी यांनीं दिलेल्या वृत्तांतावरून दिसतें. या प्रकरणीं श्रीमंतांचे लहानपणचे एक शिक्षक रा. लिमये यांचा एक विस्तृत अहवाल रा. जोशी यांनीं दिला आहे, तो वाचनीय आहे. या अहवालावरून रा. लिमये हे बरेच निःस्पृह शिक्षक होते असें दिसतें. असे कर्तव्यदक्ष शिक्षक श्रीमंतांना मिळाले हें त्यांचें सद्भाग्य आम्ही समजतों. पुढें प्रकृतीच्या प्रति-कूलतेमुळें अधिक अभ्यास श्रीमंतांकडून झाला नाहीं. तथापि विद्येची महती व अभ्यासाची गोडी त्यांस बाळपणापासूनच लागली, हें त्यांच्यासारख्यांवर जी मोठी जबाबदारी येऊन पडते त्या दृष्टीनें फार इष्ट असेंच घडलें. श्रीमंतांनीं जेव्हां मॅट्रिक्युलेशन परीक्षा दिली त्या वेळीं एका प्रसंगीं त्यांनीं जे उद्गार

काढले ते लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. ते म्हणाले:—" जें काय कर्तव्य आहे तें अद्याप पुढेंच आहे. तें मोठ्या नेटानें करून दाखविण्याची माझी उमेद आहे. विद्या हेंच मुख्य धन आहे. " ( पहा, पृ. ८४, खंड १ ला. ) या उद्गारांत श्रीमंतांच्या विद्याभिरुचीचें मूळ आहे. इच्छेप्रमाणें स्वतःच्या हातून जरी मनाजोगता विद्याव्यासंग घडला नाहीं तरी श्रीमंतांनीं निरनिराळ्या शिक्षणसंस्थांस यथाशक्ति देणग्या देऊन, अनेक ग्रंथांच्या प्रकाशनास आर्थिक उत्तेजन देऊन, आणि अलीकडे स्वतः लेखन करून आणि आपल्या सुविद्य चिरंजीवांच्या व स्नुषेच्या लेखनकृतीचें कौतुक करून जें स्तुत्य कार्य केलें आहे त्यावरून, ज्ञानमाहात्म्याची ओळख त्यांनीं कशी जागती ठेविली आहे त्याचा पुरावा आपणांस मिळतो.

लहानपणीं श्रीमंतास जें वळण लागलें त्यावरून तेव्हांपासून ज्ञानलालसेबरोबरच त्यांचे ठायीं धर्मश्रद्धाहि बळावलेली आपणास दिसून येते. एका कौटुंबिक आपत्प्रसंगीं " स्वस्थ ईश्वरचिंतनांत काळ घालवावा " अशी जी विरक्तीची लहर त्यांस उसळून आली असल्याचें दिसतें, तीवरून त्यांच्या मनाची अंतरसाल आध्यात्मिक बनावटीची आहे असें दिसून येतें. अद्यापिहि मन जेव्हां उदास होतें तेव्हां ते भगवद्गीता किंवा गीतारहस्य यांचें मननपूर्वक वाचन करीत असतात, यावरूनहि वरील अनुमानास पुष्टि मिळते.

याप्रमाणें श्रीमंतांची धर्मकर्मश्रद्धा प्रबळ असली तरी, त्यांनीं भर दरबारांत अस्पृश्यांना प्रवेश देऊन आणि अस्पृश्यांवरील गैरमाणुसकीचे निर्बंध दूर करून आपली विचारशक्ति जागती ठेविली आहे, हेंहि निदर्शनास आणून दिलें आहे.

सर्वांना सर्व कळतें परंतु वळत नाहीं, हेंच खरें. मोह कठीण असतो. बापाला, मुलगा शाहणा झाला, आतां त्याच्या हातीं किल्ल्या द्याव्या, असें कधीं वाटतच नाहीं, राजाला प्रजा कधीं शाहणी झाली असें पटत नाहीं. या व्यामोहामुळें पुष्कळ विग्रह उद्भवतात. कै. रावसाहेबांच्या हातून आपल्या सुपुत्रास शिरवळ महालाचा कारभार देण्याच्या कामीं थोडी खळखळ झाली. तथापि मिळेल तेवढा कारभार घ्यावा, त्यांत नव्या नव्या सुधारणा करून दाखवाव्या अशी उमेद श्री. बाबासाहेबांना फार होती. आणि त्यांनीं शिरवळ महालाचे कारभारांत संथपणें

बऱ्याच सुधारणा घडवून आणण्याचा मनापासून प्रयत्न केला. राज्यकारभाराचा हा अनुभव त्यांस पुढें बराच उपयोगी पडला असला तर त्यांत नवल नाहीं.

सन १९२२ सालीं श्रीमंतांस राज्याधिकार प्राप्त झाला. हा काळ हिंदुस्थानांत मोठा प्रगतीचा समजला जातो. श्रीमंतांनीं या आपल्या चिमुकल्या संस्थानांत या काळांत काय प्रगति केली त्याचा वृत्तांत रा. जोशी यांनीं चरित्राच्या दुसऱ्या खंडांत वर्णन केला आहे. श्रीमंतांचा स्वभाव प्रथमपासूनच धिम्मा आहे. त्यामुळें तडकाफडकी, धडाडीनें उड्या मारीत जाणें त्यांना मानवत नाहीं. संथपणें पग निश्चयानें एकेक पाऊल पायरीपायरीनें टाकून सुधारणा करावी हें त्यांस पटतें. आणि आपल्या या मतास अनुसरून जेवढें करतां आलें तेवढें त्यांनीं केलें आहे. भोर संस्थानांत श्रीमंतांच्या कारकीर्दींत पूर्वींपेक्षां पुष्कळ सुधारणा झाल्या आहेत, हें कोणी प्रतिपक्षी टीकाकार देखील नाकारणार नाहींत, असें वाटतें. या सुधारणांचा वृत्तांत रा. जोशी यांनीं विस्तारानें दिला आहे. निराळ्या परिस्थितींतील मंडळीस देशी संस्थानांतील प्रगति पुष्कळ वेळां मंद वाटते. परंतु जुनें एकदम मोडून नवें करणें किंवा होणें वाटतें तितकें सोपें नसतें. काळाचा ओघ जितका बळवान् असेल तितका त्याचा वेग कोणीच थांबवूं शकत नाहीं. संतोषाची गोष्ट ही कीं, काळाच्या ओघास विरोध करण्याची कुप्रवृत्ति श्रीमंतांच्या ठिकाणीं दिसून येत नाहीं. या प्रकरणीं कै. श्री. सयाजीरावमहाराज गायकवाड यांनीं भोरास आल्यावेळीं जें अनुभवज्ञानपूर्ण भाषण केलें ( पृ. ११४ ) त्याचा श्रीमंतांच्या मनावर दृढ परिणाम झाला असावा असें दिसतें. मॉंटेग्यु यांच्या रिपोर्टांतील जो एक सूचक उतारा श्रीमंतांनीं आपल्या वहींत नोंदून ठेविला आहे ( पृ. २४१ ), तो वाचला असतां श्रीमंतांच्या मनाचा कल कसा आहे याची खूण पटेल असें आम्हांस वाटतें.

श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रवासहि बराच केला आहे. प्रवासानें मनुष्याची दृष्टि चौरस होते. आणि अशी दृष्टीची व्यापकता राजे किंवा अधिकारी लोकांचे ठिकाणीं अवश्य असावयास पाहिजे. श्रीमंतांनीं अलीकडे आपलीं प्रवासवृत्तें प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला आहे, तो अभिनंदनीय आहे असाच कोणाचाहि अभिप्राय पडेल.

भोर संस्थान ल्हानगेंच आहे; तथापि, आपल्या उत्पन्नाचे मानानें श्रीमंत बाबासाहेब यांनीं संस्थानांत जशा उदार देणग्या दिल्या आहेत तशा देणग्या त्यांनीं संस्थानाबाहेरील अनेक संस्थांसहि दिल्या आहेत. संस्थानाबाहेर दिल्या जाणाऱ्या देणग्यांवर अलीकडे बरीच टीका झालेली आपण पाहतों. वास्तविक देशी संस्थानें व तदितर भारत यांच्यांत मूळभूत विभक्तपणा नाहीं आणि नसावा, असेंच सर्व सुजाण पुढाऱ्यांचें मत आहे. श्रीमंत राजेसाहेब यांचेंहि मत तसेंच आहे. एका मानपत्रास उत्तर देतांना ते म्हणतात, "शिवाय ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें यांतील प्रजाजनांचे हितसंबंध खरोखर विरोधी किंवा भिन्न नसून परस्परांत पूर्णपणें निगडित झालेले आहेत. यामुळें ब्रिटिश हिंदुस्थानांतील रुग्णालयास किंवा विद्यालयास अथवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या व्यापक उपयुक्त संस्थेस दिलेल्या देणगीचा फायदा संस्थानी प्रजेसहि पर्यायानें किंवा मनांत आणलें तर साक्षात्‌हि घेतां येतो, किंवा मिळत असतो, हें थोडया विचारांतीं आपल्याहि ध्यानांत येणार आहे. उलटपक्षीं संस्थानिकांकडे संस्थानाबाहेरील सार्वजनिक संस्थांनीं मदत मागणें तीहि यथाप्रमाण असावी हेंहि या ठिकाणीं नमूद करणें उचित आहे." श्रीमंतांची ही विचारसरणी समतोल व न्याय्य अशीच आहे. भोरच्या प्रजाजनांना पुण्यासारख्या ठिकाणच्या सार्वजनिक संस्थांचा फायदा मिळतो किंवा घेतां येतो यांत संशय नाहीं. संस्थानाचा पैसा संस्थानावर खर्च व्हावा हें तत्त्व योग्य व न्याय्य आहे यांत तर संशय नाहीं; परंतु योग्य मर्यादा लक्षांत वागवून जर बाहेर मदत केली तर ती आक्षेपार्ह होते असेंहि नाहीं. सारासार विचारानें पाहिलें असतां या प्रकरणीं श्रीमंतांनीं अवलंबिलेलें धोरण योग्य आहे असेंच आम्हांस वाटतें. धारवाडी कांटा किंवा रायचंदी टीप येथें लागू करतां येणार नाहीं.

भोरसारख्या चिमकुल्या संस्थानाच्या राजाच्या चरित्राचा उपयोग तो कोणास व कितीसा असणार आणि त्याचें महत्त्व तें काय असणार अशी शंका कोणी घेतील. या शंकेंत कांहीं तथ्य आहे हें कबूल केलेंच पाहिजे. या चरित्राचा विशेष उपयोग अर्थात् भोर संस्थानचें राजमंडळ व प्रजामंडळ यांस जेवढा आहे तेवढा इतरेजनांस नाहीं हें उघड आहे. आपल्या संस्थानाची व संस्थानाधिपतींची यथार्थ, सविस्तर व सप्रमाण माहिती ग्रंथरूपानें सिद्ध असली

तर तीपासून वरील उभय मंडळांचें एक मोठें कार्य अनयासें होऊन जातें. अशा ग्रंथांच्या वाचनामुळें या मंडळांस नेहमीं लागणारी माहिती सहजासहजीं उपलब्ध होते आणि उभयतांना आपापलीं कर्तव्यें सज्ञानिपणानें पार पाडण्यास त्यायोगें साहाय्यच होतें. मागच्या काळच्या थोर पुरुषांचीं अशीं सप्रमाण चरित्रें जर उपलब्ध असतीं तर त्यामुळें केवढा तरी लाभ पूर्वींच्या काळीं झाला असता व आजच्या काळींहि जें आपणांस अंधारांत व अज्ञानांत चांचपडावें लागतें तसें करावें लागतें ना ! याप्रमाणें या चरित्रग्रंथाचा उपयोग विशेष प्रकारें कसा होऊं शकेल तें सांगितलें. आतां बाहेर जे अभ्यासू जन आहेत त्यांतील छोट्या संस्थानांचे अभ्यासकांस या ग्रंथाचा उपयोग होईल हें सहज आहे. अशा अभ्यासकांस एका सज्जन आणि सत्प्रवृत्त अधिपतीचें चरित्र कळून येईल आणि त्यामुळें संस्थानांतील प्रजा आणि संस्थानांचे अधिकारी यांस मार्गदर्शन करण्याचे कामींहि या ग्रंथाचें साहाय्य होईल इतका या ग्रंथाचा उपयोग व महत्त्व निर्विवाद आहे.

रा. जोशी यांच्या चरित्रग्रंथांत श्री. राजे बाबासाहेबांचें स्वभावचित्र स्वतंत्रपणें रेखाटलेलें आढळणार नाहीं. निरनिराळ्या प्रसंगांच्या निमित्तानें त्यांनीं जें मतप्रदर्शन केलें आहे त्यावरून श्रीमंतांच्या स्वभावाची ठेवण आपणास समजून घेतली पाहिजे. तथापि, श्रीमंतांचे लहानपणचे शिक्षक रा. लिमये, किंवा त्यांचे कॉलेजांतील समकालीन विद्यार्थी प्रो. महादेव रामचंद्र परांजपे यांचे सविस्तर अभिप्राय मिळवून रा. जोशी यांनीं जोडले आहेत ते वाचले असतां आणि जोशी यांनीं प्रसंगानें जे अभिप्राय स्वत. दिग्दर्शित केले आहेत किंवा श्रीमंतांचीं निरनिराळ्या प्रसंगीं झालेलीं भाषणें किंवा व्याख्यानें दाखल केलीं आहेत त्यांचे साहाय्यानें ही उणीव वाचकास सहज भरून काढतां येण्यासारखी आहे.

राजासारख्या थोर पदाधिष्ठित लोकांस फार जपून वागावें लागतें. आपच्यासारख्या मंडळीस जसें मोकळेपणानें आणि खुलासपणें वागतां येईल तें भाग्य भोगण्याचें त्यांच्या नशिबीं नसतें. बाहेरून राजेलोकांचें जीवन म्हणजे ऐषआरामाचें, सत्तेचें आणि वैभवाचें असें दिसतें खरें, पण खरी स्वतंत्रता त्यांस क्वचितच आढळते. राजेलोक कसे बोलतात, कसे चालतात,

याकडे हजारों लोकांचे डोळे लागलेले असतात. तसें आमचें नसतें. बसणें, उठणें, खाणें, बोलणें, लिहिणें यांचें राजेलोकांस सामान्य लोकांप्रमाणें स्वातंत्र्य नसतें. एकपरी तर आम्हांला असें वाटतें कीं, नको तें असलें राजेपण आणि तें बंधनी जीवित ! मोजकें आणि तोलून बोलावयाचें, कोठें कोण काय म्हणेल याचा धाक सदा चित्तांत बाळगावयाचा, असें जीवित नित्यशः कंठणारे राजे होणें ही एक प्रकारें बाहेरून गोड आणि भव्य दिसणारी कैदच नव्हे तर काय? श्रीमंत राजे बाबासाहेबांचा स्वभाव तर आम्हांला वाटतें नुसता धिम्माच नाहीं तर त्याच्यावर धाकाचा प्रभाव फार पडलेला असावा ! कदाचित् त्यांचे वडील कै. रावसाहेब यांच्या कडक शिस्तीचा हा परिणाम असेल. धडाडी आणि धाक यांपैकीं राजांच्या ठिकाणीं काय अपेक्षावें म्हटलें तर दोन्ही गुणांचा योग्य प्रमाणांत मिलाफ जर आढळेल तर सर्वांत उत्तम, असें आम्हांस वाटतें. श्रीमंत बाबासाहेबांची प्रकृतिच मूळची चंद्रशीतळ व सौम्य अशी आहे; तथापि, त्यांचे ठिकाणीं धडाडीपेक्षां धाकच कांहींसा अधिक प्रभावी झालेला दिसतो.

हा चरित्रग्रंथ तयार करण्यास रा. जोशी यांचे परिश्रम जसे कारणीभूत झाले आहेत, तसेंच श्रीमंत बाबासाहेब यांनीं रा. जोशी यांचा हेतु लक्षांत घेऊन त्यांस आपल्या रोजनिशा, भाषणें, व इतर साहित्य यांचा उपयोग करण्याची परवानगी आढेवेढे न घेतां दिली या गोष्टीसहि तें श्रेय दिलें पाहिजे. यामुळेंच हा ग्रंथ इतका विस्तृत व सप्रमाण रचून तयार करतां आला. मार्मिक व अनुभवी लेखक आणि त्यास सहानुभूतिपूर्वक साहाय्य करणारा उदारप्रकृति अधिपति असा सुंदर संयोग झाल्यानें हा विस्तृत ग्रंथ एकंदरीनें वाचनीय झाला आहे आणि म्हणून या उभयतांचे मनापासून आभार मानून हा सप्रेम पुरस्कार येथें संपवितों.

**दत्तो वामन पोतदार**

---

# प्रस्तावना

भोर संस्थानची गादी विभूषित करणारे विद्यमान सुविद्य व प्रागतिक संस्थानाधिपती राजे श्रीमंत रघुनाथराव शंकरराव ऊर्फ बाबासाहेब पंडित पंतसचिव यांचें चरित्र लिहिण्याची कल्पना मला कां व कशी आली हें निवेदन करणें आवश्यक आहे.

सन १८९७ इ. सालीं मीं भोर संस्थानचे नोकरींत शाळाखात्यांत प्रवेश केला. त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब पुणें येथील सरकारी हायस्कूलांत शिकत होते. सन १८९८ इ. सालीं पुण्यास प्लेगच्या सांथीचा रोग उद्‌भवल्यामुळें ते कांहीं महिने भोर हायस्कूलांत शिक्षणाकरितां राहिले. त्या वेळीं ते मॅट्रिकचे वर्गांत होते. ते भोर हायस्कूलांत होते तोंपर्यंत माझा त्यांच्याशीं शिक्षक या नात्यानें प्रथम संबंध आला. हायस्कूलांत असतांना ते इतर मुलांत मिळून मिसळून वागत. आपण राजपुत्र आहोंत याची जाणीव त्यांनीं वर्गांतील मुलांना कधींहि होऊं दिली नाहीं. यामुळें वर्गांतील मुलेंहि त्यांच्याशीं मोकळेपणानें वागत. ते जरी भोर हायस्कूलांत थोडेच महिने होते तरी त्या अवधींत त्यांचे अंगचें सौजन्य दिसून आलें. त्या वेळीं त्यांच्याशीं माझा जो परिचय झाला तो पुढें ते गादीवर येईपर्यंत वाढतच गेला.

सन १९०२ इ. व सन १९११ इ. या दोन सालीं भरलेल्या दिल्ली दरबाराचे वेळीं मीं हल्लींचे राजेसाहेब यांचे वडील कै. हिज हायनेस श्रीमंत शंकरराव ऊर्फ रावसाहेब यांचा प्रायव्हेट सेक्रेटरी म्हणून त्यांचेबरोबर जाऊन काम केलें. श्रीमंत राजेसाहेबहि दोन्ही दरबारांस गेले होते. त्या वेळीं तेथील कामानिमित्त श्रीमंत राजेसाहेबांशीं वारंवार संबंध येत असे. पुढें त्यांनीं विचित्रगड तालुक्याचीं अधिकारसूत्रें हातीं घेतल्यावर भोर येथें श्रीरामक्रीडाभुवन व श्री. सौ. गंगूताईसाहेब वाचनालय या दोन संस्था त्यांच्या आश्रयानें स्थापन झाल्या. या दोन्ही संस्थांच्या चालकांपैकीं मी एक असल्यामुळें श्रीमंत राजेसाहेबांशीं विचारविनिमय करण्याची मला अनेक वेळां संधि मिळाली. सन १९१६ सालीं माझी शाळाधिकाऱ्याचे जागेवर नेमणूक झाली. पुढें दोन वर्षांनीं श्रीमंत राजेसाहेब यांनीं सुधागड तालुक्यांत

दौरा काढिला. त्या वेळीं या तालुक्यांत मीहि शाळातपासणीकरितां गेलों होतों. यामुळें तेथें ठिकठिकाणीं त्यांचेबरोबर फिरण्याचा मला योग आला. त्या तालुक्यांत ते रयतेशीं व प्रतिष्ठित गृहस्थांशीं कशा रीतीनें वागत हें मी पाहत असें.

श्रीमंत राजेसाहेब गादीवर येईपर्यंत वरीलप्रमाणें त्यांचेशीं अनेक कारणांमुळें संबंध येत गेल्यानें त्यांच्या विचारांची, स्वभावाची व इतर गुणांची मला बरीच कल्पना आली.

श्रीमंत राजेसाहेब सन १९२२ इ. सालीं गादीवर आले. नंतर त्यांनीं सन १९२३ सालीं माझ्या कामाशिवाय खाजगी कारभाऱ्याचें काम मजकडे दिलें. खाजगी कारभारी या नात्यानें कार्य करीत असतां कामानिमित्त श्रीमंत राजेसाहेबांशीं नेहमीं संबंध येत असे. संस्थानची ३६ वर्षें नोकरी करून सन १९३३ सालीं मी सेवानिवृत्त झालों. या अवधींत श्रीमंत राजेसाहेबांचें कर्तृत्व, धोरण, कामाची पद्धति, स्वभावविशेष इ. गुणांबद्दल माझें जें मत झालें तें थोडक्यांत देत आहें.

गीतेच्या १६ व्या अध्यायांत दैवी संपत्तीचे गुण पुढील श्लोकांत सांगितले आहेत :

> **अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
> **दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥**
> **अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।**
> **दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥**
> **तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।**
> **भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥**

जो कोणी श्रीमंत राजेसाहेबांचे सहवासांत कांहीं काल घालवून त्यांच्या स्वभावाचें व वर्तनाचें निर्विकार मनानें सूक्ष्म निरीक्षण करील त्यास वरील दैवी संपत्तीचे गुणांपैकीं बरेचसे गुण श्रीमंत राजेसाहेबांचे अंगीं असल्याचें आढळून येईल.

जगांत ईश्वराशिवाय सर्वगुणसंपन्न कोणीहि नाहीं. प्रत्येकांत कांहींना कांहीं दोष असतातच. त्याचप्रमाणें श्रीमंत राजेसाहेबांचे अंगीं मुळींच दोष नाहींत किंवा त्यांचे हातून कधीं चूक होत नाहीं असें नाहीं. परंतु दोष

उपेक्षणीय असले म्हणजे त्यांकडे कोणाचेंहि फारसें लक्ष जात नाहीं. गुण-समुच्चयांत बारीकसारीक दोष लुप्त होऊन जातात. श्रीमंत राजेसाहेबांचे हातून जर एखादी चूक झाली व ती त्यांचे नजरेस कोणीं आणून दिली किंवा त्यांचेच लक्षांत आली तर, वृथा प्रतिष्ठेच्या मोहास बळी न पडतां ती तावडतोब दुरुस्त करण्यास ते कधींहि माघार घेत नाहींत हा त्यांचे अंगचा मोठाच गुण आहे.

जगांत स्थिर असें कांहींच नाहीं. ज्ञानाचे वाढीबरोबर विचारांत व आचारांत फरक पडत जातो. हें तत्त्व ओळखून बदलणाऱ्या परिस्थितीप्रमाणें कसें वागावें याची श्रीमंत राजेसाहेबांना पूर्ण जाणीव आहे. कोणत्याहि गोष्टींत एकदम आमूलाग्र बदल करणें मात्र त्यांना इष्ट वाटत नाहीं. राजकीय, सामाजिक व धार्मिक बाबतींत ते ज्या सुधारणा करीत आहेत त्या उतावीळपणें न करितां विचारपूर्वक करीत असतात. शिवाय बाह्य दडपणामुळें फरक होऊं देणें यांत खरी किंमत नसून स्वबुद्धीनें सर्व साधकबाधक गोष्टींचा पूर्ण विचार करून सुधारणा केल्या तरच खरी प्रगती होते असें त्यांना वाटतें. जुनी व्यवस्था अजिबात नष्ट करून नवीन व्यवस्था निर्माण केली तर ती क्षणभंगुर होते, म्हणून कोणत्याहि बाबतींत एकदम विलक्षण फरक न करतां, जुन्या परिस्थितींत नवीन व इष्ट तत्त्वांच्या अनुरोधानें सुधारणा घडवून आणण्याचा श्रीमंत राजेसाहेबांनीं उपक्रम सुरू ठेविला आहे, यांत त्यांचा सूज्ञपणा दिसून येतो.

कोणत्याहि परिस्थितीचें ग्रहण करण्यास अवश्य असणारी तीव्र बुद्धि त्यांचे ठिकाणीं असून कोणताहि प्रश्न विचाराकरितां त्यांचेपुढें आला असतां गोंधळून न जातां, त्यांतील महत्त्वाचे मुद्यांचें आकलन करून योग्य निर्णय देण्याचें सामर्थ्य त्यांचे अंगीं आहे. प्रत्येक महत्त्वाचे बाबतींत ते आपल्या कार्यकारी मंडळांतील सभासदांचें जेव्हां मत घेतात, तेव्हां प्रत्येक सभासदानें स्वतंत्र विचार करून आपलें मत द्यावें असें ते सांगतात. सर्वांचीं मतें घेऊन नंतर ते आपलें मत बनवून अखेरचा निर्णय देतात. इंग्रज सरकारशीं संबंध येणाऱ्या राजकीय गुंतागुंतीच्या प्रश्नांचा निर्णय करण्याचे प्रसंगीं सल्लागार मंडळींच्या निर्णयापेक्षां श्रीमंत राजेसाहेबांनीं दिलेला निर्णयच संस्थानच्या हिताच्या दृष्टीनें अचूक असल्याचा अनेक वेळां अनुभव आलेला आहे.

उद्दंडांचें उद्दंड ऐकावें । परि तें प्रत्ययें पहावें ॥
खरें खोटें निवडावें । अंतर्यामीं ॥
बहुतांचे बोलीं लागले । ते प्राणी अनुमानीं बुडाले ॥
मुख्य निश्चय चुकले । प्रत्ययाचा ॥

ही समर्थांची शिकवण श्रीमंत राजेसाहेबांचे अंगीं पूर्णपणें बिंबल्याचें दिसून येतें.

श्रीमंत राजेसाहेबांची कृपा संपादन करून आपण वाटेल तसें वर्तन करूं किंवा स्वार्थ साधूं अगर एखाद्याचें नुकसान करूं, अशी कोणालाहि घमेंड बाळगणें शक्य नाहीं. यामुळें श्रीमंत राजेसाहेबांचे बरोबर जे लोक नेहमीं असतात त्यांची मर्जी नेहमीं संपादन केली नाहीं तर कांहीं अपाय घडेल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. आपल्या भोंवतीं असलेल्या प्रत्येक मनुष्याची योग्यता किती आहे हें ओळखून श्रीमंत राजेसाहेब त्यास वागवितात. त्यांना जर अत्यंत कशाची चीड असेल तर ती खोटेपणा, अप्रामाणिकपणा व दुटप्पी वर्तन या गोष्टींची आहे. निर्भीडपणाचा व स्पष्टवक्तेपणाचा त्यांना राग येत नाहीं. त्याचप्रमाणें प्रसंगविशेषीं श्रीमंत राजेसाहेबांशीं जे सकारण विरोध दाखवितात त्यांनाहि श्रीमंत राजेसाहेबांचे हातून आपलें कांहीं विनाकारण नुकसान होईल असें भय वाटत नाहीं.

इतिहास व तत्त्वज्ञान हे श्रीमंत राजेसाहेबांचे आवडीचे विषय आहेत. या विषयांवरील ग्रंथांचें त्यांचें वाचन सुरू असतें. त्यांनीं हिंदुस्थानांत व युरोपांत प्रवास करून आपल्या ज्ञानांत भर घातली आहे. विद्वानांची ओळख करून घेऊन त्यांचेपासून ज्ञान संपादन करण्याची त्यांना हौस आहे. त्यांच्या या ज्ञानलालसेमुळें कोणत्याहि गोष्टीकडे पाहण्याची त्यांची व्यावहारिक दृष्टि व्यापक झाली आहे. जगांत परिपूर्ण व निर्दोष असें कांहींच नाहीं, यामुळें श्रीमंत राजेसाहेबांनीं राज्यकारभारांत जरी पुष्कळ सुधारणा केल्या आहेत तरी आपली राज्यकारभारपद्धति पूर्ण निर्दोष आहे असें त्यांस कधींच वाटत नाहीं. अद्याप राज्यकारभारांत पुष्कळच सुधारणा झाल्या पाहिजेत, याची त्यांना पूर्ण जाणीव आहे व ही गोष्ट ते अनेक वेळां बोलूनहि दाखवितात.

राज्यकारभाराची जबाबदारी संभाळून त्यांनीं लेखनव्यवसायहि बराच केला आहे, हें त्यांनीं लिहिलेलीं प्रवासवर्णनांचीं पुस्तकें वाचल्यास लक्षांत येईल.

त्याचें बीजारोपण, त्यांनीं आपल्या वयाच्या १२ व्या वर्षापासून दैनंदिनी लिहिण्यास सुरुवात केली त्यांत दिसून येणार आहे. लहानपणापासून त्यांनीं केलेल्या सर्व प्रवासांचीं टांचणें ठेवलेलीं आहेत व त्यांचा उपयोग करून त्यांनीं आतांपर्यंत मराठी दोन आणि इंग्रजी एक अशीं तीन प्रवासवर्णनें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत. व तीं पुस्तकें कशा प्रकारचीं आहेत याविषयीं त्यांवर आलेल्या नामवंत साहित्यिकांच्या उत्कृष्ट अभिप्रायांवरून समजून येणार आहे.

मीं ज्या वेळीं संस्थानच्या नोकरींत प्रवेश केला त्या वेळीं श्रीमंत राजे-साहेबांच्या लहानपणापासूनची हकीगत माहित असणारी बरीच वृद्ध मंडळी हयात होती. त्यांचेकडून मला श्रीमंत राजेसाहेबांच्या लहानपणच्या बऱ्याच गंमतीदार गोष्टी कळल्या होत्या, त्यांवरून त्यांचेबद्दल माझे मनांत प्रथमच आदर उत्पन्न झाला व पुढें प्रत्यक्ष अनुभवानंतर तो वाढतच गेला.

सेवानिवृत्त झाल्यावर कांहीं दिवसांनीं श्रीमंत राजेसाहेबांचें चरित्र लिहावें असें माझे मनांत आलें. भोर येथील माझे परम स्नेही कै. रावसाहेब अनंत रामचंद्र जोशी व श्रीयुत विनायक गोविंद ऊर्फ बापूसाहेब रानडे व मी असे तिघेजण नेहमीं फिरावयास जात असूं. एकदां असे फिरावयास गेलों असतां मीं माझ्या मनांत असलेला विचार बोलून दाखविला. तेव्हां कै. रावसाहेब जोशी व श्रीयुत बापूसाहेब रानडे यांना माझा विचार पसंत पडून ते म्हणाले: " तुम्हांला श्रीमंत राजेसाहेबांची लहानपणापासून माहिती आहे, म्हणून मनांत आलेला विचार मनांतच न ठेवितां कृतींत आणा." माझ्या या दोघां स्नेह्यांचें प्रोत्साहन मिळाल्यावर कांहीं महिन्यांनंतर मीं आपला हेतु श्रीमंत राजेसाहेबांना कळविला. माझा विचार त्यांना प्रथम पटला नाहीं. ते म्हणाले: "चरित्र लिहिण्यासारखें माझे हातून अद्याप काय झालें आहे ? माझी कारकीर्द चांगली किंवा वाईट ठरण्याचा काल पुढेंच आहे." त्यानंतर मीं त्यांना सांगितलें कीं, " आपलें म्हणणें आपल्या अंगच्या विनयाला अनुरूप असेंच आहे. तथापि आपण गादीवर येईपर्यंतची आपली लहानपणापासूनची हकीकत फारच थोड्या व्यक्तींना माहीत असेल. ती आपल्या प्रजाजनांस व संस्थानाबाहेरील जनतेसहि माहीत असणें जरूर आहे." तेव्हां श्रीमंत राजेसाहेब म्हणाले, " विचार करून सांगेन."

या गोष्टीस बरेच दिवस झाले तरी श्रीमंत राजेसाहेबांचे मनांत काय आहे हें कळेना; म्हणून मीं पुन्हा त्यांची भेट घेतली व चरित्रलेखनास संमति देण्याबद्दल विनंति केली. तेव्हां त्यांनीं थोड्याशा नाखुषीनेंच संमति दिली. त्या वेळीं त्यांनीं एक गोष्ट मात्र स्पष्टपणें बजावून सांगितली कीं, "कोणत्याहि बाबतींत अतिशयोक्ति न करतां माझेबद्दल जें लोकमत झालें असेल त्यास अनुसरून खऱ्या गोष्टींचेंच कथन करा." त्यांचें म्हणणें मला पटून तें मीं मान्य केलें; व त्याच वेळीं त्यांना विनंति केली कीं, "चरित्रांत गैरसमज होण्यासारखा चुकीचा मजकूर लिहिला जाऊं नये म्हणून, जशीं प्रकरणें लिहून होतील तसतशीं तीं मी आपलेकडे अवलोकनाकरितां पाठवीत जाईन. आपल्या लहानपणच्या व विद्यार्थिदशेंतील ज्या गोष्टी मी लिहिणार आहें त्या खऱ्या कीं खोटया हें आपणांसच माहीत असणार. तेव्हां लिहिलेला मजकूर आपले नजरेखालून गेला म्हणजे चूक राहणार नाहीं." माझ्या ह्या विनंतीस त्यांनीं मान्यता दर्शविली, त्यामुळें चरित्र निर्दोष होईल अशी खात्री वाटूं लागली. इतकी मान्यता मिळविल्यावर त्यांच्या लहानपणापासूनच्या डायऱ्या, खाजगी पत्रव्यवहार, कै. हिज हायनेस श्रीमंत रावसाहेब यांच्या खाजगी दप्तरांतील कागदपत्र, श्रीमंत राजेसाहेब युवराज असतांना त्यांचेकडे शिरवळ तालुक्याचा कारभार होता त्या वेळीं त्यांनीं त्या तालुक्याचे जे वार्षिक रिपोर्ट लिहिले होते ते, संस्थानचे सर्व वार्षिक रिपोर्ट व आणखीहि जरूर लागतील ते कागदपत्र पाहण्याची परवानगी मिळण्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबांस विनंति केली. ती श्रीमंत राजेसाहेबांनीं मान्य केली व पुढें त्या त्या खात्यांचे अधिकाऱ्यांस मला लागतील ते कागदपत्र पाहण्यास देण्याबद्दल हुकूम दिले.

चरित्रलेखनास लागणारी मिळाली तितकी माहिती जमा करून लेखनास सुरुवात केली. श्रीमंत राजेसाहेबांची कारकीर्द लोकांचे नजरेसमोर असल्यामुळें त्यांचें चरित्र थोडक्यांत लिहावें असा प्रथम विचार होता. परंतु हल्लींच्या पिढीच्या दृष्टीपुढें जरी श्रीमंत राजेसाहेबांचा राज्यकारभार असला तरी भावी पिढ्यांना श्रीमंत राजेसाहेबांच्या जीवनयात्रेची व राज्यकारभाराची यथार्थ कल्पना यावी म्हणून आजपर्यंतच्या त्यांच्या आयुष्यांत घडलेल्या सर्व गोष्टींचें सविस्तर वर्णन देण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें चरित्र लिहून तें श्रीमंत राजे-

साहेबांना त्यांचे षष्ट्यब्दपूर्तिसमारंभाचे वेळीं अर्पण करावें असा हेतु होता. परंतु अनेक कारणांमुळें त्या समारंभापर्यंत माझे हातून चरित्रलेखनाचें काम पुरें न झाल्यामुळें माझा हेतू सिद्धीस गेला नाहीं. ही एक इष्टापत्तीच झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण, त्यामुळें नुकताच झालेला श्रीमंत राजेसाहेबांचा षष्ट्यब्दपूर्ति-समारंभ व त्यांत त्यांनीं केलेल्या घोषणेबद्दल त्यांचा ठिकठिकाणीं गौरव करण्यांत आला त्या सर्व समारंभांची सविस्तर हकीकत या पुस्तकांतच घालतां आली. या समारंभांचें वर्णन वाचलें असतां श्रीमंतांचा परिस्थितीस अनुसरून वागण्याचा स्वभाव व त्या स्वभावामुळें आपल्या प्रजाजनांस ते कसे लोकप्रिय झाले आहेत हें वाचकांच्या सहजीं लक्षांत येणार आहे. समारंभानंतर मात्र थोडक्याच दिवसांत मीं हें चरित्र पुरें केलें.

राजकीय, सामाजिक, धार्मिक वगैरे अनेक बाबतींत श्रीमंत राजसाहेबांचे विचार काय आहेत ते कळण्याकरितां त्यांनीं अनेक प्रसंगीं, अनेक विषयांवर जीं भाषणें केलीं आहेत त्यांपैकीं महत्त्वाचीं भाषणें चरित्रांत व परिशिष्टांत समग्र दिलीं आहेत. त्याचप्रमाणें संस्थानाबाहेरील लोकांचें श्रीमंत राजेसाहेबांबद्दल काय मत झालें हें समजण्याकरितां कांहीं विद्वान् पुढाऱ्यांचीं व इतर कांहीं थोर व्यक्तींचीं भाषणें व वृत्तपत्रांतील उतारे व पत्रें दिलीं आहेत.

पूर्वी वृद्धांचेकडून जी माहिती मिळाली ती, मला स्वतःला आलेला अनुभव, कागदपत्रांवरून मिळालेली माहिती, त्याचप्रमाणें संस्थानांतील व संस्थानाबाहेरील सद्गृहस्थांकडून कळलेल्या गोष्टी या सर्वांचे आधारानें हें चरित्र लिहिलें आहे व त्यांत शक्य तों सत्य कथन करण्याचा प्रयत्न केला आहे.

भोर संस्थानचा इतिहास पाहिला तर मूळ संस्थापक श्रीशंकराजी नारायण यांचे मागून जे पुरुष गादीवर आले त्यांत श्रीमंत राजेसाहेबांचे आजे कै. श्रीमंत नानासाहेब गादीवर येईपर्यंत कोणींहि कर्तबगारी दाखविल्याचें आढळून येत नाहीं. श्रीमंत नानासाहेब संस्थानाधिपति झाले तेव्हां संस्थानांत सर्वत्र अव्यवस्था असून संस्थानास बरेंच कर्ज झालें होतें. श्रीमंत नानासाहेब व्यवहारकुशल व कर्तबगार पुरुष होते. त्यांनीं आपल्या अवघ्या १७ वर्षांच्या कारकीर्दींत संस्थान ऋणमुक्त करून राज्यकारभाराच्या सोयीसाठीं ब्रिटिश सरकारप्रमाणें खातीं निर्माण करून संस्थानांत सुधारणेचा पाया घातला. त्यांच्या कारकीर्दीपासून संस्थानास ऊर्जितावस्था येण्यास सुरुवात झाली.

श्रीमंत नानासाहेबांचे मागून श्रीमंत राजेसाहेबांचे वडील श्री. रावसाहेब गादीवर आले. ते अत्यंत करारी, मानी, व्यवहारदक्ष व राजकारणपटु होते. संस्थानास कर्ज असलें म्हणजे संस्थानची कशी हानि होते याचें चित्र त्यांचे डोळ्यांपुढें होतें. दुसऱ्याचे दाराशीं जाण्याचा प्रसंग येऊं नये असें त्यांना वाटत असल्यामुळें त्यांचा स्वभाव अत्यंत काटकसरी बनला होता. त्यांनीं आपल्या ५० वर्षांच्या दीर्घकालीन कारकीर्दींत खालसा मुलखाप्रमाणें राज्यकारभाराच्या सर्व खात्यांत फेरफार करून जुन्या पद्धतीप्रमाणें पुष्कळ सुधारणा केल्या. दळणवळणाच्या सोयी, नवीन इमारती, शिक्षणप्रसार वगैरे अनेक लोकोपयोगी कामें त्यांचे हातून झालीं. दक्षतेनें व काटकसरीनें राज्यकारभार चालवून त्यांनीं संस्थानची सांपत्तिक स्थिति चांगली ठेविली व साम्राज्य-सरकारकडून तोफांचे सलामीचा वैयक्तिक बहुमान संपादन केला. त्यांच्या कारकीर्दीचा एकंदर विचार केला तर ते एक मोठे कर्तृत्ववान् पुरुष होऊन गेले, याविषयीं कोणाचेंहि दुमत होणें शक्य नाहीं. तथापि त्यांचा काटकसरी स्वभाव, जुन्या परंपरेस चिकटून राहण्याची वृत्ति यांचा अनिष्ट परिणाम त्यांच्या कुटुंबीयांवर आणि राज्यकारभारावर झाल्यावांचून राहिला नाहीं; त्याचें स्पष्टीकरण पहिल्या खंडाचें समालोचन आणि दुसऱ्या खंडाचें प्रास्ताविक प्रकरण यांत सविस्तर केलें आहे.

श्रीमंत रावसाहेबांच्या मागून श्रीमंत राजेसाहेब सन १९२२ सालीं गादीवर आले. त्या वेळीं हिंदुस्थानांत उत्पन्न झालेल्या नवीन विचारांच्या, आकांक्षांच्या व लोकशाही तत्त्वांच्या लाटा संस्थानावरहि आदळून संस्थानांत खळबळ उडाली होती. अशा बिकट परिस्थितींत व संक्रमणावस्थेंत श्रीमंत राजेसाहेबांना अधिकारसूत्रें हातीं घेण्याचा प्रसंग आला असतांहि, त्यांनीं बदललेल्या व वरचेवर बदलत जात असलेल्या परिस्थितीस धैर्यानें तोंड देऊन राज्यकारभार प्रगमनशील धोरणानें चालविला आहे. तें त्यांचें धोरण पाहिलें म्हणजे त्यांची कारकीर्द मागील दोन कारकीर्दींपेक्षां सरसच ठरल्यावांचून राहणार नाहीं, असें वाटूं लागतें. एकंदर चरित्रावरून श्रीमंत बाबासाहेबांच्या अंगच्या गुणांचा कसा विकास होत गेला आहे हें उत्कृष्टपणें दिसून येणार आहे.

चरित्रलेखनाची कल्पना कशी आली व ती मूर्त स्वरूपांत कशी आणिली हें वर निवेदन केलेलेंच आहे. आतां या कामीं मला ज्यांची मदत झाली त्यांचे आभार मानणें हें माझें कर्तव्य असल्यामुळें तें करून प्रस्तावना पुरी करतों.

चरित्र लिहिण्यास सुरुवात केली त्या वेळीं माझे मित्र श्रीयुत रघुनाथ केशव देशपांडे, भोर दरबार वकील, यांनीं कांहीं उपयुक्त सूचना केल्या, त्यांचा मला फार उपयोग झाला. 'भाटघर धरण' व 'नरेंद्रमंडळांतील कामगिरी' हीं दोन प्रकरणें लिहितांना कै. अनंत रामचंद्र जोशी, न्यायमंत्री, यांची जर मदत झाली नसती तर तीं दोनहि प्रकरणें लिहिणें मला शक्यच नव्हतें. श्रीयुत विनायक गोविंद रानडे, एम्. ए., एल्एल्. बी., यांचा चरित्र लवकर पुरें करण्याचा माझ्या मागें जर लकडा नसता तर माझ्या हातून हें काम कधीं पुरें झालें असतें हें सांगतां येत नाहीं. श्रीयुत नरहर गोपाळ आंबेकर, बी. ए., एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर, यांनीं वेळोवेळीं दिलेल्या सल्ल्याची मला फारच मदत झाली. भोर हायस्कुलांतील शिक्षक श्रीयुत नारायण महादेव भिडे, बी. ए., यांनीं हस्तलिखितें वाचून पाहून बऱ्याच महत्त्वाच्या सूचना केल्या. हुजूर खाजगी ऑफिसांतील श्रीयुत महादेव रामचंद्र पुरंदरे यांनीं माझ्या सांगण्याप्रमाणें मोठ्या तत्परतेनें श्रीमंत राजेसाहेबांच्या लहानपणापासूनच्या रोजनिशींतील व सरकारी कागदपत्रांतील उतारे काढून त्यांच्या नकला करून दिल्या. त्याच ऑफिसांतील श्रीयुत विनायक बापूराव देशपांडे, श्रीमंतांचे पर्सनल क्लार्क, यांची लिहिण्याचे कामीं मला फारच मदत झाली. दुसऱ्या खंडांतील सत्कारसमारंभ वगैरे कांहीं प्रकरणें त्यांनींच लिहिलीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतकेंच नव्हे, तर चरित्रप्रकाशनाची जबाबदारी त्यांनीं पतकरली यामुळें माझें काम फारच सोपें झालें. हस्तलिखित प्रत त्यांचे स्वाधीन करून मी मोकळा झालों. प्रुफें वगैरे तपासण्याचें किचकट काम त्यांनीं फार दक्षतेनें केलें. त्यांनीं ही सर्व जडजोखीम शिरावर घेतल्यामुळें माझ्या मागचा सर्वच त्रास चुकला. याशिवाय श्रीयुत बळवंत गजानन वाळिंबे व इतर कांहीं स्नेही-मंडळी यांचीहि मला अनेक प्रकारें मदत झाली. वरील सर्व भोरवासीय सद्गृहस्थांची मला जी बहुमोल मदत झाली तिजबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

श्रीमंत राजेसाहेब पुणें हायस्कुलांत व डेक्कन कॉलेजांत शिकत होते त्या वेळीं त्यांच्याबद्दल विद्यार्थिवर्गाचें काय मत बनलें होतें याची माहिती मला पाहिजे होती. तपास करितां पुण्यांतील सुप्रसिद्ध शिक्षण-तज्ज्ञ प्रो. महादेव रामचंद्र परांजपे, एम्.ए., बी.एस्‌सी., हे त्याच वेळीं पुणें हायस्कुलांत व डेक्कन कॉलेजांत शिकत होते असें समजलें. त्यावरून मीं त्यांना पत्र पाठविलें. त्यांनीं उत्तर पाठवून त्यांत श्रीमंत राजेसाहेबांचेविषयीं त्यांचें काय मत झालें होतें तें कळविलें. तें त्यांचें पत्र चरित्रांत दिलें आहे. त्यांनीं पत्र पाठवून श्रीमंत राजेसाहेबांच्या विद्यार्थि-दशेंतील जीवनक्रमावर प्रकाश पाडणारी माहिती दिली याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

पुणें येथील माझे स्नेही श्रीयुत दत्तो वामन पोतदार, बी.ए., यांचा श्रीमंत राजेसाहेबांशीं ते युवराज असल्या वेळेपासून अनेक प्रसंगांनिमित्त संबंध येऊन दृढ परिचय झालेला आहे. भोर संस्थानचीहि त्यांना बरीच माहिती आहे. त्यांनीं या चरित्रास पुरस्कार लिहून देण्याचें कबूल केलें याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

षष्ट्यब्दपूर्तिसमारंभाची सुमंगल संधि हुकली, तेव्हां श्रीमंत राजेसाहेबांच्या १८ व्या वार्षिक राज्यारोहणदिनसमारंभाचे वेळीं तरी हें पुस्तक त्यांना अर्पण करावें असा निश्चय करून चरित्रलेखनाचें काम पुरें केलें. पण २।३ महिन्यांत हें पुस्तक छापून तयार होईल कीं नाहीं अशी शंका आली. परंतु समर्थ भारत प्रेसचे व्यवस्थापक श्रीयुत सदाशिव रामचंद्र सरदेसाई, बी. ए., एल्‌एल्. बी., यांनीं मुदतींत पुस्तक छापून देण्याची हमी घेऊन काम सुबक रीतीनें पुरें करून दिलें याबद्दल त्यांचे आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे.

शेवटीं, सर्वांपेक्षां मुख्य आभार मानावयाचे म्हणजे श्रीमंत राजेसाहेबांचे. त्यांनीं चरित्रलेखनास संमति दिली, चरित्रास लागणारी सामग्री पुरविली, इतकेंच नव्हे, तर माझे विनंतीप्रमाणें कांहीं प्रकरणें वाचून पाहून त्यांत जीं चुकीचीं विधानें लिहिलेलीं त्यांना आढळलीं तीं त्यांनीं माझे नजरेस आणिलीं, त्यामुळें मला तीं दुरुस्त करण्याची संधि मिळाली. त्यांचा आश्रय व सक्रिय सहानुभूति

नसती तर हें पुस्तक अप्रकाशितच राहिलें असतें. हा ग्रंथ त्यांना अर्पण करण्याची मीं इच्छा प्रदर्शित केली तेव्हांहि त्यांनीं उदार अंतःकरणानें मला परवानगी दिली, याबद्दल मला अत्यंत आनंद वाटत आहे. हा ग्रंथ त्यांच्या कृपेचें व सक्रिय सहानुभूतीचेंच फळ आहे. त्यांच्या एकंदर साहाय्याबद्दल मी अत्यंत ऋणी असून शब्दांनीं त्यांचे आभार मानणें माझे शक्तीबाहेर आहे. सर्वशक्तिमान् श्रीरामचंद्रप्रभु श्रीमंत राजेसाहेब व त्यांचे कुटुंबांतील मंडळींस दीर्घ आयुष्य व उत्तम आरोग्य देवो, अशी प्रार्थना करून

**फोडिलें भांडार**
**धन्याचा व्यवहार ।**
**मी तों हमाल**
**भार वाहीं ॥**

या तुकाराममहाराजांच्या उक्तीनें ही प्रस्तावना पुरी करून, आजच्या या १८ व्या राज्यारोहणदिनाच्या मंगल प्रसंगीं श्रीमंत राजेसाहेबांचे चरणीं हा ग्रंथ अर्पण करण्याचा संकल्प श्रीरामचंद्रप्रभूचे कृपेनें पुरा झाला याबद्दल आनंद व्यक्त करतों.

भोर,
ता. १८ ऑगस्ट १९३९

**वासुदेव नारायण जोशी.**

# भोर संस्थान

# भौगोलिक व प्रेक्षणीय स्थळांचें वर्णन

## भौगोलिक वर्णन

भोर संस्थानचे मूळ संपादक ब्रह्मीभूत श्री. शंकराजी नारायण यांचे ताब्यांत जितका प्रदेश होता त्यापैकीं पुढें कांहीं राजकीय कारणांमुळें कमी झाला. संस्थानचे ताब्यांत सांप्रत जो प्रदेश आहे त्यापैकीं बराच मोठा भाग घाटमाथ्यावर असून कांहीं थोडा भाग घाटाखालीं कोंकणांत आहे. घाटमाथ्यावरील प्रदेश पुणें व सातारा जिल्ह्यांनजीक असून कोंकणांतील प्रदेश कुलाबा जिल्ह्यानजीक आहे.

भोर संस्थानचा एकंदर प्रदेश १८° आणि १८°-४५ उत्तर रेखांश व ७३° आणि ७४° – ·१५ पश्चिम अक्षांश यांचे दरम्यान आहे.

राज्यकारभाराचे व्यवस्थेकरितां सर्व प्रदेशाचे पांच विभाग केले आहेत. त्यांस तालुके म्हणतात. त्यांचीं नांवें विचित्रगड, राजगड, प्रचंडगड, पौनमावळ व सुधागड अशीं आहेत. शिरवळ, नसरापूर, वेलें, कोळवण व पाली हीं गांवें अनुक्रमें तालुक्यांच्या ठाण्यांचीं गांवें आहेत. घाटमाथ्यावरील चारहि तालुके घाटमाथ्याला लागून आहेत. त्यांची घाटमाथ्यापासून पूर्वेकडे रुंदी ३५ मैलांपासून १५ मैलांपर्यंत कोठें कमी कोठें जास्ती अशी होत गेली आहे.

भोर संस्थानचें एकंदर क्षेत्रफळ ९१० चौरस मैल आहे. क्षेत्रफळ जरी बरेंच मोठें दिसतें तरी सर्व प्रदेश डोंगराळ असल्यामुळें क्षेत्रफळाचे मानानें उत्पन्न फारच कमी आहे. शिवाय सुधागड व पौनमावळ हे दोन तालुके तुटक असल्यामुळें व प्रदेश डोंगराळ दऱ्याखोऱ्यांनीं भरलेला असल्यामुळें राज्यकारभाराचा खर्च फार येतो. हाच प्रदेश सपाट असता तर उत्पन्न दुपटी-तिपटीनें येऊन राज्यकारभार निम्या खर्चांत चालवितां आला असता. जेथें दोन मामलेदारांत काम भागावयाचें तेथें प्रदेश अडचणींनीं भरलेला असल्यामुळें पांचहि तालुक्यांत पांच मामलेदार, पांच फौजदार वगैरे अधिकारी नेमावे लागतात. सर्व संस्थानांतील दिवाणी काम एका कोर्टापुरतेंच असून लोकांचे सोयीकरितां भोर, पिरंगूट व पाली येथें कोर्टें

ठेवावीं लागत आहेत. एकंदरींत संस्थानचें उत्पन्न थोडें व खर्च फार अशी स्थिति आहे.

सन १९३१ चे खानेसुमारीप्रमाणें भोर संस्थानची लोकसंख्या १,४१,५४६ असून त्यांत ७०,१२२ पुरुष व ७१,४२४ स्त्रिया आहेत. म्हणजे पुरुषांची व स्त्रियांची संख्या जवळ जवळ सारखीच आहे. एकंदरींत लोकसंख्येंत १,२५,५१८ स्पृश्य हिंदू, १३,९१३ अस्पृश्य हिंदू, १,०५८ मुसलमान, २७५ ज्यू, ३ पारशी, ३७ खिश्चन, १ शीख व २४१ जैन आहेत.

संस्थानच्या सर्व प्रदेशापैकीं एक चतुर्थांश भाग मात्र सपाट आहे. बाकी तीन चतुर्थांश भाग डोंगराळ आहे. तीन चतुर्थांश जमीन तांबडी असून बाकी एक चतुर्थांश जमिनीपैकीं कांहीं जमीन काळी व कांहीं तांबूस वाळसर अशी आहे. पाणथळ अशी जमीन फारच थोडी आहे. कोंकण व मावळ भागांत मुख्य पिकें भात, नागली, वरी वगैरे होतात. देश भागांत फारच थोडा प्रदेश आहे. त्यांत ज्वारी, बाजरी, गहूं, हरबरे, वगैरे धान्यें होतात. बागाईत जमीन नाहीं म्हटलें तरी चालेल. शिरवळ तालुक्याचे पूर्व भागांत चारपांच गांवांत बागाईत जमीन असून तींत कांद्याचें पीक चांगलें येतें. याशिवाय बागाईत बहुतेक नाहींच. संस्थानांतून बाहेर जाणारें मुख्य धान्य म्हणजे तांदुळ; बाकीचीं धान्यें बहुतकरून ज्या त्या गांवापुरतींच उत्पन्न होतात. जंगलचें उत्पन्न मुख्यत्वें साग व हिरडा यांचें आहे. तीं मुख्यत्वें सुधागड व घाटमाथ्यावरचे चार तालुके यांमध्यें अनुक्रमें आहेत.

संस्थानचा अगदीं पूर्वेकडील प्रदेश म्हणजे विचित्रगड तालुक्याचा पूर्व भाग. याच भागांत तालुक्याच्या ठाण्याचा गांव शिरवळ हा आहे. या ठिकाणीं वार्षिक पावसाचें सरासरी मान १५″ ते २०″ इंचांपर्यंत असतें. पश्चिमेकडील भागांत पावसाचें मान वाढत जाऊन अगदीं घाटमाथ्यावर १३०″ ते २५०″ इंचांपर्यंत पाऊस पडतो. सुधागड तालुक्यांत १००″ ते १२५″ इंचांपर्यंत पाऊस पडतो. सर्व प्रदेश घाटमाथ्यानजीक असल्यामुळें अवर्षण पडून अजिबात पिकें बुडालीं असें कधींच होत नाहीं. आठ दहा आणे तरी पीक येतें. माणसें व जनावरें अन्नपाण्यावांचून गतप्राण झाल्याचे प्रसंग या संस्थानांत येत नाहींत. साऱ्यांत सूट अगर तहकुबी देण्याचा प्रसंग क्वचितच येतो.

सर्व संस्थानांत एकंदर ५०२ गांवें आहेत. त्यांपैकीं विचित्रगड तालुक्यांत ११२, राजगडांत १२०, प्रचंडगडांत ११५, पौनमावळांत ६६ आणि सुधागडांत ८९ अशीं आहेत. ५०२ गांवांपैकीं सुमारें १०० गांवांत प्रत्येक गांवची लोकसंख्या सुमारें १०० चे आंतच आहे. ४०० पेक्षां जास्त लोकसंख्येचीं गांवें सुमारें ५५ पेक्षां जास्त नाहींत. भोरशिवाय करून मोठ्या वस्तीचे गांव म्हणजे शिरवळ व पाली हेच दोन आहेत. भोर राजधानीचें शहर असूनहि तेथील लोकसंख्या ५१०० पेक्षां जास्त नाहीं. कोणत्याहि शहराची वाढ होण्यास नवीन नवीन उद्योग-धंदे निघून व्यापाराची वाढ व्हावी लागते.

भोर संस्थानच्या प्रदेशाची नैसर्गिक रचना अशी आहे कीं, त्यांत उद्योग-धंद्यांस लागणारा कोणत्याहि प्रकारचा कच्चा माल उत्पन्न होत नाहीं. यामुळें कोणताहि कारखाना काढण्यासारखी भौगोलिक अनुकूल परिस्थिती नाहीं. अर्थात् व्यापाराची वाढ होऊन शहरें वाढण्याचाहि संभव नाहीं. संस्थानच्या प्रजेस निर्वाहाचें मुख्य साधन म्हणजे शेतकी. देशभागांतील सुपीक जमिनीप्रमाणें संस्थानांतील जमिनी सुपीक नाहींत. शेतकऱ्याला जमिनीची मेहनत मशागत करण्यास जवळजवळ वर्षभर राबावें लागतें.

प्रत्येक तालुक्याचे ठाण्याचे ठिकाणीं दवाखाने व पोष्ट ऑफिसें आहेत. भोर व शिरवळ येथें तार ऑफिसहि आहे. दर तालुक्यांत आठवड्यांतून एकदां तालुक्याचे मुख्य ठिकाणीं बाजार भरत असतो. व प्रत्येक ठिकाणचे बाजारचे दिवस निरनिराळे आहेत.

प्रत्येक तालुक्यांत चारशेंपेक्षां जास्त लोकवस्तीचे गांवांत प्राथमिक शाळा आहेत. शिरवळ व पाली येथें मराठी दुय्यम प्रतीच्या शाळा आहेत. सर्व प्राथमिक शाळांतून मोफत शिक्षण दिलें जातें. तालुक्यांतील सर्व शाळा तालुका लोकल बोर्डाचे ताब्यांत आहेत.

भोर संस्थानांत घाटमाथ्यावर पुष्कळ पाऊस पडत असून अनेक खोरीं आहेत. यामुळें धरणें बांधण्यास या प्रदेशांत जागा आहे. या नैसर्गिक भू-रचनेचा फायदा घेऊन ब्रिटिश सरकारनें खडकवासला, भाटघर व वीर येथें धरणें बांधून ब्रिटिश हद्दींतील दुष्काळी भागांत पाणी नेलें आहे. या तीन

धरणांमुळें संस्थानांतील नदीकांठची उत्तम पिकाची सुमारें अठरा चौरस मैल जमीन पाण्यांत बुडून रयतेचें व संस्थानचें नुकसान झालें आहे. या धरणांतील पाण्याचा उपयोग संस्थानच्या प्रजेस होत नाहीं, कारण धरणाच्या कडेच्या जमिनी उंचावर आहेत. संस्थानांत संचय केलेल्या सर्व पाण्याचा उपयोग ब्रिटिश प्रजेलाच होतो. संस्थानास परोपकाराचें काय पुण्य लाभत असेल तेवढाच फायदा. भाटघर धरणाचें काम प्रचंड असून तें भोर संस्थानांत एक प्रेक्षणीय ठिकाण झालें आहे. संस्थानच्या सर्व तालुक्यांत पक्क्या सडका तयार केल्या असल्यामुळें दळणवळणाची सोय चांगली झाली आहे. संस्थानचा प्रदेश डोंगराळ असून पर्जन्य फार असल्यामुळें या सडका चांगल्या स्थितींत ठेवण्यास खर्च पुष्कळ करावा लागतो. संस्थानांतील सर्व सडकांची लांबी एकंदर १०४ मैल आहे.

संस्थानांतील घाटमाथ्यावरील चार तालुक्यांत निरा, गुंजवणी, वेळवंडी, मुठा या नद्या मुख्य असून त्यांना दुसऱ्या लहान लहान नद्या मिळालेल्या आहेत. निरा नदीस वीर येथें, वेळवंडीस भाटघर येथें व मुठेस खडकवासला येथें धरणें बांधलेलीं आहेत. सर्व नद्या घाटमाथ्यावरून निघून पूर्वेकडे वाहत जातात. सुधागड तालुक्यांत अंबा नदी असून ती पश्चिमेकडे वाहत जाऊन नागोठण्याचे खाडीस मिळते.

## प्रेक्षणीय स्थळें

### विचित्रगड तालुका

भोर—संस्थानचें राजधानीचें ठिकाण. हें सचिव घराण्याचे तिसरे पुरुष चिमणाजी नारायण यांनीं सन १७४० मध्यें वसविलें व राजधानी केलें. हें निरा नदीच्या कांठीं आहे. येथें राजवाडा, श्रीभोरेश्वराचें ( शंकराचें ) देऊळ, श्रीमुरलीधराचें देऊळ, निरानदी घाट, निरा नदीवरील लक्ष्मीबाई पूल, किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल, श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय व राजा रघुनाथराव हायस्कूल हीं स्थळें विशेष प्रेक्षणीय आहेत. भोर हें महाड-पंढरपूर, महाड-पुणें या रस्त्यावर वसलेलें आहे. भोरला जवळचीं अशीं एम्. एस्. एम्.चें लोणंद व जी. आय. पी. चें पुणें हीं दोन स्टेशनें अनुक्रमें २५ व ३४ मैलांवर आहेत. भोरास जाण्यास पुण्याहून मोटारचा रस्ता आहे

पुण्याहून कात्रज घाट, नसरापूर, कापूरव्हाळ व भाटघर धरण यांवरून भोरास जावें लागतें. भोर ते भाटघर अंतर फक्त २ मैल आहे. भोराहून महाड ३९ मैल आहे व भोरपासून अंबवडें ९ मैल आहे.

भाटघर धरण अथवा लॉइड डॅम—हें धरण वेळवंडी नदीवर बांधलेलें आहे. धरणाची लांबी ५३३३ फूट, रुंदी तळाशीं १२४ फूट व माथ्यावर १९ फूट व उंची १९० फूट आहे. एकंदर धरण बांधण्यास खर्च रु. १७२ लक्ष झाला आहे. याचा उद्‌घाटन-समारंभ सन १९२८ सालीं झाला व याचें नांव लॉइड धरण असें ठेवलें आहे. हें धरण बांधण्याचे कामीं भोर संस्थानची पुष्कळशी मदत ब्रिटिश सरकारास झाली. त्या मदतीबद्दल संस्थानचा गौरवयुक्त उल्लेख करणारें एक टॅबलेट धरणाच्या उत्तर बाजूच्या मेमोरिअल बिल्डिंगमध्यें लावलेलें आहे.

अंबवडें—या ठिकाणीं संस्थानचे मूळ संपादक ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांची समाधि आहे. हल्लींचे संस्थानाधिपति राजेसाहेब श्रीमंत बाबासाहेब यांनीं जीर्ण झालेल्या समाधीचें संगमरवरी दगडाचें नवीन बांधकाम करून पुढें विस्तीर्ण सभामंडप बांधला आहे. समाधीजवळ असलेल्या ओढयावर नवीन झुलता पूल तयार करण्यांत आला आहे. या पुलास श्रीमंतांच्या मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचे स्मरणार्थ ‘ जिजीसाहेब झुलता पूल ’ असें नांव दिलें आहे. समाधीच्या आसपासची जागा साफ करून तेथें सुंदर बगीचा करण्याचें काम चालू आहे. समाधीच्या नजीकच मागील बाजूस कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांचा पुतळा बसविला आहे. या ठिकाणीं राजेसाहेबांनीं वरील सर्व सुधारणा केल्यामुळें व सभोंवार दाट झाडी असल्यामुळें हें स्थळ अत्यंत प्रेक्षणीय व रमणीय झालें आहे. या समाधीनजीकच श्रीनागनाथाचें देवालय आहे. हें देवालय फार प्राचीन आहे. त्याचप्रमाणें श्रीजन्नीचें एक प्राचीन देवालय आहे. अंबवडें हें ठिकाण भोरचे नैर्ऋत्येस भोरपासून ९ मैल लांब आहे. तेथें मोटारी जाण्यासारखी सडक असल्यामुळें दूरदूरचे प्रवासी तेथें जात असतात. या स्थळाचे पूर्वेस रोहिडा अगर विचित्रगड किल्ला आहे.

रायरेश्वर—भोरचे नैर्ऋत्येस असलेल्या रायरी डोंगर सपाटीवर हें रायरेश्वराचें देवालय फार प्राचीन आहे. हें भोरपासून सुमारें १४ मैल लांब

आहे. तेथें जाण्यास महाड रस्त्यानें १० मैलांवर असलेल्या अपटी गांवापर्यंत मोटारनें जातां येतें. तेथून सुमारें ४ मैल पायीं जावें लागतें. डोंगर उंच असून चढण बरीच आहे.

रोहिडा—हा इतिहासप्रसिद्ध किल्ला भोरचे दक्षिणेस भोरापासून पांच सहा मैल आहे. तेथें जाण्यास २ मैलपर्यंत सडक आहे व तेथून पुढें बाजारवाडीहून १॥ मैल पायीं जावें लागतें.

अंबाडखिंड—अंबाडखिंड अथवा विश्रामघाट हें ठिकाण वाई व भोर यांचे दरम्यान असलेल्या डोंगरावर भोरचे दक्षिणेस सुमारें आठ मैलांवर आहे. व तेथून पुढें वाई ७ मैलांवर आहे. पूर्वीं सचिव घराण्यांत कर्तबगार होऊन गेलेल्या ताईसाहेब यांनीं सन १८६४ सालीं या खिंडीवर सुमारें दोन मैलांवर असलेल्या झऱ्याचें पाणी नळानें आणून हौद बांधून त्यांत तें सोडलें आहे व इमारती बांधून अन्नछत्र ठेविलें आहे. याचा उपयोग भोराहून वाईस जाण्यास फार होतो. उन्हाळ्यांत हवा खाण्याचें हें उतम स्थळ आहे. या ठिकाणास विश्रामघाट हें नांव दिलें असून तें सार्थ आहे. डोंगर चढून माथ्यावर या ठिकाणीं गेल्यानंतर पथिकांच्या श्रमांचा परिहार होऊन त्यांस विश्रांतीच मिळते इतकें हें स्थळ रम्य आहे. या ठिकाणीं जाण्यास डोंगराचे पायथ्यापर्यंत बैलगाडी जाण्यासारखा उन्हाळ्यांत रस्ता असतो. पुढें पायीं किंवा घोड्यावर जावें लागतें.

पांडवदरा—शिरवळपासून चार मैलांवर नैर्ऋत्य दिशेस नेनाडी डोंगरांत बुद्धकालीन लेणी आहेत. त्यांस पांडव लेणी असें म्हणतात. लेणी पाहण्यासाठीं शिरवळ गांवाजवळील शिंदेवाडीपासून पूर्वेस पायीं जावें लागतें. एकंदर लेणी पंधरा आहेत. या डोंगरास पूर्वीं लयणगिरी व शिरवळ गांवास 'श्रीमाळ', 'श्रीवलय', किंवा 'सिरिवलय' असें म्हणत. ह्या लेण्या फार प्राचीन म्हणजे सुमारें दोन हजार वर्षांपूर्वींच्या असाव्यात असें तज्ज्ञांचें मत आहे.

ह्या लेण्या जमिनींत गाडल्या गेलेल्या होत्या. श्रीमंत राजेसाहेबांच्या कारकीर्दींत त्यावरची सर्व माती उकरून काढून लेणी साफसूफ करून तेथपर्यंत जाण्यास सडक तयार करण्यांत आली आहे व हें एक प्रेक्षणीय स्थळ झालेलें आहे.

केदारेश्वर—हें देवालय शिरवळ गांवांत आहे. हेंहि फार प्राचीन आहे. शिरवळ हें गांव फार प्राचीन म्हणजे दोन हजार वर्षांपूर्वीचें आहे. तें पुणें-सातारा व भोर-लोणंद रस्त्यावर आहे व त्याचें अंतर पुण्यापासून व भोरपासून अनुक्रमें ३२ व ९ मैल आहे.

राजगड तालुका

बनेश्वर—हें देवालय नसरापूरपासून सुमारें १॥ मैल लांब आहे. याच्या सभोंवतीं बनाप्रमाणें गर्द झाडी आहे म्हणून यास बनेश्वर म्हणतात. हें शिवालय अत्यंत रमणीय आहे. पाणी फार लांबून बांधून आणून तें दोन मोठ्या कुंडांत सोडलें असून सर्व शिवालयांत खेळविलें आहे. उन्हाळयांत येथें राहण्याची मौज आहे. या देवालयांत जी मोठी घंटा आहे ती पोर्तुगीज लोकां-पासून चौलप्रांत मराठयांनीं जेव्हां जिंकून घेतला त्या वेळीं त्यांच्या एखाद्या देवळांतून आणली असावी. या घंटेवर इ. सन १६८९ हा इंग्रजी आंकड्यांत असून तो स्पष्ट दिसतो. येथें महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते. व त्या दिवशीं पुण्याहून व इतर ठिकाणांहून तेथें हजारों लोक जमतात. देवालयापर्यंत मोटारी जाण्याजोगी सडक आहे. पुणें-सातारा सडकेवर २२ मैलांवर नसरापूर आहे व तेथून बनेश्वर २ मैलांवर आहे.

हल्लीं पुण्याहून बरीच मंडळी बनेश्वर, भाटघर धरण, भोर व अंबवडें पाहण्यास येतात. बनेश्वरनंतर भाटघर धरण, भोर व अंबवडें येथील झुलता पूल, समाधि वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहून परत जातात. सकाळपासून सायंकाळ-पर्यंतचे अवधींत हीं सर्व स्थळें पाहून हा प्रवास मोठया करमणुकीचा व सुख-कारक होतो. अगोदर सूचना दिली असतां हीं स्थळें दाखविण्याची दरबारकडून तजवीज करण्यांत येते.

राजगड किल्ला—छत्रपति शिवाजीमहाराजांनीं हा किल्ला सन १६४८ सालांत बांधून त्या ठिकाणीं प्रथम राजधानी केली. हा पुण्याचे दक्षिणेस सुमारें ४० मैलांवर आहे. किल्लयावर जाण्यास पुण्यापासून पुणें-सातारा सडकेनें नसरापूरपर्यंत २२ मैल व तेथून नसरापूर-वेल्हें सडकेनें १३ मैल मिळून ३५ मैल मोटारनें जातां येतें. पुढें पांच मैल पायीं जावें लागतें.

## प्रचंडगड तालुका

प्रचंडगड अगर तोरणा किल्ला—छत्रपति शिवाजीमहाराजांनीं प्रथम हा किल्ला जिंकून घेतला व त्याचें नांव तोरणा असें ठेविलें. मराठी राज्याचें तोरणच या किल्ल्यावर बांधलें म्हणून हें नांव सार्थ आहे. हा पुण्याचे नैर्ऋत्येस सुमारें ४० मैल आहे. पुणें-सातारा सडकेनें नसरापूरपर्यंत २२ मैल व तेथून किल्ल्यापर्यंत १८ मैल, एकूण ४० मैल सडक आहे. किल्ल्याचे पायथ्यापर्यंत रोज मोटारी जातात. घाटमाथ्यावरील सर्व किल्ल्यांत याची उंची जास्त आहे म्हणून यास प्रचंडगड असेंहि नांव आहे.

## पौनमावळ तालुका

वाघेश्वर—हें शिवालय फार प्राचीन असून तें पुण्याचे पश्चिमेस सुमारें ३२ मैल आहे. या देवालयाशेजारीं तळें असून त्यांत निळीं कमळें विपुल होतात. या ठिकाणीं जाण्यास पुण्यापासून पौडवरून कोळवणपर्यंत सडक असून तेथपर्यंत मोटारी जातात. कोळवणपासून वाघेश्वरपर्यंत पायीं जावें लागतें.

तुंग-तिकोना—हे दोन्ही किल्ले या तालुक्यांत आहेत. कोळवणपासून तुंग सुमारें ६ मैल असून तिकोना ४ मैल आहे.

## सुधागड तालुका

पाली—सुधागड तालुक्याचे ठाण्याचा गांव पाली हा आहे. पाली येथें जाण्यास रेल्वेनें पुण्याहून कर्जत स्टेशनवर उतरून तेथून मोटारनें पालीस जातां येतें. तसेंच कर्जतहून रेल्वेनें खोपोलीस जातां येतें. व खोपोलीहून मोटारीनें पालीस जाण्याचा एक मार्ग आहे. हल्लीं पुण्याहून पालीस मोटारची वाहतुक आहे. या मार्गानें पाली ७३ मैल आहे व तसेंच भोराहून महाडकडून मोटारीनें पालीस जाण्याचा जो एक मार्ग आहे, तो ८३ मैलांचा आहे. शिवाय मुंबई ते नागोठणा येथें समुद्रांतून बोटीनें व पुढें मोटारीनें पालीस एक रस्ता आहे. पाली येथें अष्टविनायकांपैकीं **श्रीबल्लाळेश्वराचें** प्रसिद्ध देऊळ आहे. येथें माघ महिन्यांत शुद्ध ४ थीस मोठी यात्रा भरते.

पुणें-पाली रस्त्यावर खोपोलीनजीक ब्रिटिश हद्दींत मढ येथें अष्टविनायकांपैकीं श्रीविनायकाचें स्थान आहे.

रामेश्वर---हें शिवालय तालुक्याचें मुख्य ठिकाण जो पाली गांव त्या गांवापासून उत्तरेस सुमारें ६ मैलांवर एका उंच डोंगरसपाटीवर आहे. सभोंवार दाट झाडी आहे. या ठिकाणीं श्रीरामचंद्रानें जटायूचा उद्धार केला असें सांगतात. म्हणून त्यास 'उद्धर रामेश्वर' असें नांव आहे. उद्धर हें गांव या डोंगराचे पायथ्याशीं आहे. उद्धरपर्यंत बैलगाडीनें जातां येतें व पुढें डोंगर चढून जावें लागतें.

ठाणाळा व नेणोली---हे दोन्ही गांव सह्याद्रीचे पायथ्याशीं आहेत. ठाणाळा पालीचे पूर्वेस ८ मैल व नेणोली पालीचे आग्नेयेस १२ मैल आहे. या दोन्ही गांवांजवळ सह्याद्रिपर्वतांत बुद्धाच्या वेळच्या कोरीव लेण्या आहेत. त्या पाहण्याकरितां पायीं प्रवास करावा लागतो.

सुधागड अथवा भोरप किल्ला---हा इतिहासप्रसिद्ध किल्ला पालीचे पूर्वेस सह्याद्रीचे पायथ्याशीं पालीपासून नाडसूरवरून आठ मैलांवर आहे. पायथ्यापर्यंत बैलगाड्या जातात. येथें जाण्यास जांभूळपाड्यावरून दुसरी चांगली वाट आहे. जांभूळपाडा खोपोली-पाली रस्त्यावर पालीपासून ७ मैल व तेथून किल्ला ३ मैल आहे.

उन्हेरें---हा गांव पालीचे उत्तरेस १ मैलावर ब्रिटिश हद्दींत असून त्या ठिकाणीं उष्णोदकाचे झरे असून कुंडें बांधलीं आहेत. पुष्कळ लोक येथें स्नानाकरितां येत असतात.

सरसगड---पाली गांव या किल्ल्याचे पायथ्याशीं वसलेला आहे.

# अनुक्रमणिका



## खंड १ ला

## खंड २ रा

## खंड ३ रा

## परिशिष्टें

# चित्रानुक्रमणिका

## खंड १ ला

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १६ | ५ | पत्रायधी रयभाति | पत्रावधिरयंभाति |
| ३९४ | श्लोक ३ | चिरव्यतीतान्यपि | चिरव्यतीतानपि |
| ६५५ ते ६५९ | पानाचें शीर्षक | लॉर्ड आयर्विन यांचीं सुराज्याचीं तत्त्वें | नरेंद्रमंडळांतील कामगिरी |
| ६६६ ते ६७२ | पानाचें शीर्षक | नरेंद्रमंडळांतील कामगिरी | संयुक्त घटना व मोर संस्थान |
| ७८६ | पानाचें शीर्षक | सत्कारसमारंभ | कौटुंबिक वृत्तांत |
| ८८२ | २१ | १७ फेब्रुवारी | १७ सप्टेंबर |

# सचिव घराण्याचा वंशवेल

प्रल्हादपंत

मुकुंदपंत

नारोपंत

१ शंकराजी नारायण—सचिव घराण्याचे आद्यसंस्थापक

२ नारो शंकर

३ चिमणाजी नारायण

४ सदाशिव चिमणाजी

५ रघुनाथ चिमणाजी

६ शंकरराव ऊर्फ बाबासाहेब (दत्तक)

७ चिमणाजी ऊर्फ नानासाहेब (दत्तक)

८ रघुनाथ ऊर्फ रावसाहेब (दत्तक)

९ चिमणाजी ऊर्फ नानासाहेब (दत्तक)

१० शंकरराव ऊर्फ रावसाहेब

११ **रघुनाथराव** ऊर्फ—१ गंगूताईसाहेब (प्रथम कुटुंब)
**बाबासाहेब** २ लक्ष्मीबाईसाहेब (द्वितीय कुटुंब)
( चरित्रनायक )

श्री. सौ. तान्हुबाई ऊर्फ बाईसाहेब —शिवदेवराव ऊर्फ भाऊसाहेब

जान्हवीबाई (कन्या)

१ काशीताई २ भागिरथीबाई ३ सदाशिवराव—सौ. सरोजिनीबाई

१स्नेहलता २रामनाथ ३आनंदराव बापूसाहेब ४नारायणराव रावसाहेब ५पद्मावतीराजे

१विमलराजे २कमलाराजे ३लीलाराजे ४रेणुकाराजे ५श्री. चिमणाजीपंत ऊर्फ आबासाहेब

# पंतसचिव व विंचुरकर घराण्यांचा संबंधदर्शक वंशवेल

विठ्ठल नरसिंह विंचुरकर

१ रघुनाथराव ऊर्फ अण्णासाहेब विंचुरकर

१ शिवदेवराव ऊर्फ भाऊसाहेब
—१तान्हुबाई —२उमाबाई

१जान्हवीबाई
—राजे शामराज
हैद्राबाद

सरोजिनीबाई
—सदाशिवराव भाऊसाहेब
पंतसचिव

२ कृष्णराव ऊर्फ बापूसाहेब विंचुरकर

१ शिऊबाई ऊर्फ
जिर्जीसाहेब
—शंकरराव रावसाहेब

१ रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब
—गंगुताई

२ सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब—सरोजिनीबाई

२ तान्हुबाईसाहेब—शिवदेवराव भाऊसाहेब

जान्हवीबाई—राजे शामराज

२ रामराव ऊर्फ
बाळासाहेब

१शिवदेवराव भाऊसाहेब
(अण्णासाहेब यांस दत्तक)

२ गंगुताई—रघुनाथराव
बाबासाहेब

३ माधवराव ऊर्फ दादासाहेब
विंचुरकर

१ सौ. सीताबाई
—शंकरराव रावसाहेब

## प्रकरण १ लें

# कुलवृत्त



### शंकराजी नारायण गांडेकर, भोर संस्थानचे मूळ संस्थापक

गांडेकर हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण आहेत. हे मूळचे निजाम स्टेटमधील गांडापूर गांवचे राहणारे. शंकराजी यांचे आजे मुकुंदपंत विठ्ठल हे गांडापूर सोडून मावळ प्रांतांत रोजगारानिमित्त आपल्या कुटुंबासह फिरत फिरत पुण्याचे नैर्ऋत्य दिशेस आठ कोसांवर मांगदरी म्हणून गांव आहे तेथें येऊन राहिले व थोडक्याच दिवसांत तेथें घरदार करून कायमचे रहिवासी झाले. त्यांच्या कुटुंबाचें नांव शिऊबाई असें होतें. मुकुंदपंतांबद्दल जास्त माहिती मिळत नाहीं. शंकराजींचे वडील नारो मुकुंद यांनीं सन १६४३ त छत्रपति शिवाजी-महाराजांचे सैन्यांत कारकुनीची जागा पत्करली. नारोपंत सैन्याबरोबर असत. शिवाजीनें कोंकणांतील भोरप किल्ला घेतला, त्या वेळीं नारोपंत त्यांचेबरोबर होते. शिवाजीनें नारोपंतांची हुषारी पाहून त्यांना त्या किल्ल्याची सबनिशी दिली. किल्ल्यावरील धान्य, युद्धोपयोगी सामान यांचा हिशेब ठेवणें व त्यांचा पुरवठा करून त्यावर देखरेख ठेवणें हीं कामें सबनिसाचीं असत. किल्ल्याचा हिशेब देण्याकरितां नारोपंतांस शिवाजीमहाराजांचा हुकूम होईल तेथें जावें लागे. त्याप्रमाणें सन १६७७ त महाराजांची स्वारी प्रतापगड मुक्कामीं असतां नारोपंत हे आपल्या सबनिशीचा हिशेब घेऊन तेथें गेले होते. त्या वेळीं आपल्या मुलासहि दरबारांत नोकरी मिळावी या हेतूनें नारोपंतांनीं शंकराजींस आपल्याबरोबर तेथें नेलें होतें. त्यांनीं त्या वेळचे पेशवे मोरो त्रिंबक पिंगळे यांजपाशीं आपल्या मुलाबद्दल गोष्ट काढल्यावर पेशव्यांनीं शंकराजींस आपल्या-जवळ ठेवून घेतलें. पुढें ते त्यांना हलके हलके कामकाज सांगूं लागले. शंकराजी जात्या हुषार असल्यानें त्यांनीं पेशव्यांची मर्जी संपादन करून काम-काजांत चांगली वाकबगारी मिळविली. त्यांचेकडे लिहिण्याचें काम असे.

तो काल असा होता कीं, कोणाहि व्यक्तीस पुढें येण्यास त्याच्या अंगीं धाडस, साहस व शौर्य इत्यादि गुण असावे लागत. त्या वेळीं जितकी तलवार-

बहादर मंडळी सपाट्यानें पुढें सरसावली तितकी कलमबहादर मंडळी सरसावली नाहींत. शंकराजी नारायण यांनीं नुसती कारकुनी करण्यांत समाधान न मानतां वरील गुण अंगीं येण्याकरितां नेहमीं डोंगरांत हिंडणें, शिकार करणें, मावळी मुलखांतील चोरवाटांची माहिती करून घेणें, मावळे लोकांत मिसळून त्यांची मैत्री संपादन करणें, एखादें धाडसाचें काम करणें इत्यादि गोष्टी करण्याचें सुरू ठेविलें होतें. याच शिक्षणामुळें त्यांचे अंगीं साहस, धैर्य उत्पन्न होऊन पुढें लवकरच त्यांचा अभ्युदयकाल आला.

सन १६८० सालीं शिवाजीमहाराज दिवंगत झाले. त्या कालापर्यंत शंकराजी नारायण मोरोपंत पिंगळे यांचे हाताखालीं कारकुनी करीत होते. संभाजीच्या कारकीर्दींत पूर्वींच्या प्रधानमंडळाची दुर्दशा उडाली. त्यांत मोरोपंत पेशव्यांचा शेवट झाला. रामचंद्र नीलकंठ अमात्य हे त्या संकटांतून वांचले, व त्यामुळें त्यांचे हातून पुढें महाराष्ट्राची सर्वोत्कृष्ट सेवा झाली. पेशव्यांचा शेवट झाल्यावर शंकराजी नारायण रामचंद्रपंत अमात्य यांचे हाताखालीं कारकुनी करूं लागले. त्या वेळीं औंध संस्थानचे संपादक परशराम त्रिंबक हेहि रामचंद्रपंतांजवळ नोकरीस होते. रामचंद्रपंत अमात्य यांनीं या दोघांचे अंगच्या गुणांची परीक्षा करून पुढें योग्य वेळ येतांच त्यांना इतक्या महत्पदाला चढविलें कीं दोघेहि दोन संस्थानांचे मूळ संस्थापक झाले.

रामचंद्रपंत अमात्य यांच्या नजरेस शंकराजी नारायण यांच्या अंगचे शौर्य व साहस हे गुण आल्यावर त्यांनीं त्यांना कारकुनीचे कामांतून काढून फौजी कामांत १६८६ सालीं घेतलें. शंकराजींस आवडणारें काम मिळतांच थोड्याच दिवसांत ते त्यांत फारच तरबेज झाले व त्यांच्या अंगच्या गुणांचें चीज होण्याचा समय पुढें लवकरच आला.

मराठ्यांचें राज्य नष्ट करण्याच्या हेतूनें प्रचंड सैन्य घेऊन औरंगजेब दक्षिणेंत आला होता. त्यानें विजापूर व गोवळकोंडें हीं दोन्ही राज्यें बुडविलीं व मराठ्यांवर मोहिमा सुरू ठेविल्या होत्या. छत्रपति शिवाजीमहाराज परलोकवासी झाल्यावर मराठ्यांची सत्ता नष्ट होणार असें त्यास वाटलें. परंतु त्याची कल्पना चुकली. संभाजीनें त्याला चांगलाच हात दाखविला. परंतु तो व्यसनाधीन झाल्यामुळें औरंगजेबाचे हातीं सांपडून त्यानें त्याचा अत्यंत अमानुष-

पणानें वध केला. त्या वेळीं औरंगजेबास वाटलें कीं, आतां मात्र मराठी राज्य बुडालें. या वेळींहि त्याचा अंदाज सपशेल चुकला. संभाजीच्या वधाबरोबर महाराष्ट्राचें क्षात्रतेज नष्ट न होतां तें अधिकच प्रज्वलित झालें. संभाजीचा वध म्हणजे आपल्याच घरांतील एका पुरुषाचा वध होय व त्या वधाचा सूड घेणें हें पहिलें पवित्र कर्तव्य आहे, असें प्रत्येकास वाटूं लागलें. स्वातंत्र्यरक्षणार्थ सर्व महाराष्ट्रवीर शत्रूचा नि:पात करण्यास तयार झाले व ज्यांच्या अंगीं क्षात्रतेज होतें ते पुढें आले. आपल्या स्वातंत्र्यरक्षणार्थ मोगल सत्तेबरोबर सुमारें ३० वर्षें मराठ्यांचा झगडा चालला होता.(Thirty Years' War of Independence) हें त्रिंशत्-वार्षिक युद्ध इतिहासप्रसिद्ध असून त्या युद्धामुळें मराठ्यांच्या अंगचे विशिष्ट गुण जगाच्या निदर्शनास आले. या युद्धांत सन १६८९ पासून सन १७०७ पर्यंत मराठ्यांच्या खऱ्या कसोटीचा काल होता, व या कालांतच भोर संस्थानचे मूळ संस्थापक शंकराजी नारायण यांनीं पराक्रम गाजवून मराठी साम्राज्याचें रक्षण केलें व आपलें नांव मराठ्यांचे इतिहासांत अजरामर करून ठेविलें. ती हकीकत पुढें दिली आहे.

संभाजीच्या वधानंतर मोगल सरदारांनीं मराठ्यांचे किल्ले व प्रदेश घेण्याचा सपाटा चालविला. तेव्हां महाराष्ट्रांत राहणें धोक्याचें वाटून संभाजीचा भाऊ राजाराम बायकामुलांसह कर्नाटकांत जिंजी येथें जाऊन राहिला. संभाजीचा मुलगा व बायको औरंगजेबाचे कैदेंत होतीं. महाराष्ट्रांत मराठ्यांची सत्ता नाहींशी झाल्यासारखें दिसूं लागलें. राजाराममहाराज जेव्हां कर्नाटकांत गेले तेव्हां त्यांचेबरोबर बरीच मोठमोठी मुत्सद्दी मंडळीहि गेली. त्यांचेबरोबर शंकराजी नारायण कांहीं मुक्कामापर्यंत गेले होते. पण तेथून पुढें ते माघारीं आले व प्रधान-मंडळ स्थापन करून तेथून राज्यकारभार चालविला. एकटे रामचंद्रपंत अमात्य मात्र घाटमाथ्यावरील व कोंकणांतील प्रदेश होईल तितक्या रीतीनें मोगलांच्या हातीं न लागूं देण्याकरितां व त्याचें रक्षण करण्याकरितां राहिले. अशा रीतीनें त्यांच्यावर महाराष्ट्राचें रक्षण करण्याची अत्यंत बिकट जबाबदारी येऊन पडली होती. ते शिवाजीमहाराजांच्या तालमींत वावरलेले व कसलेले सरदार असल्यानें, शिवाय त्यांनीं महाराजांबरोबर अनेक बिकट प्रसंग अनुभवले असल्यानें त्यांचीच निवड राजाराममहाराजांनीं केली व त्यांचेवर

पूर्ण विश्वास ठेवून त्यांचे हातांत अमर्याद सत्ता दिली. ती अगदीं योग्य गोष्ट होती हें, त्यांनीं पुढें बजाविलेल्या कामगिरीवरून दिसून येणार आहे. राजाराम-महाराजांनीं त्यांना '**हुकमतपन्हा**' हा किताब दिला. 'सर्वांवर हुकमत चालविणारे म्हणजे सर्व सत्तेचें केंद्रस्थानच' असा त्या किताबाचा अर्थ होय.

रामचंद्रपंतांच्या हातीं सर्व दक्षिण देशांतील कुलमुखत्यारीचा अधिकार आल्याबरोबर त्यांनीं शंकराजी नारायणांस लागलेंच हातीं धरलें. त्यांच्याकडे फौजेचें काम आल्यामुळें त्यांच्या हातांतील लेखणी सुटून तिच्या जागीं समशेर आली. शंकराजी नारायणांस त्यांनीं पागेचें काम दिलें. रामचंद्रपंतांचे दुसरे कारकून परशराम त्रिंबक होते. त्यांनाहि त्यांनीं मोठ्या योग्यतेस चढवून त्यांस एका प्रांताचें रक्षण करण्याचें काम दिलें व त्यांनीं तें उत्तम रीतीनें बजाविल्याबद्दल पुढें त्यांना प्रतिनिधिपद प्राप्त होऊन ते औंध संस्थानचे मूळ संस्थापक झाले.

शंकराजी नारायणांकडे जरी फौजेचें काम होतें तरी तें संभाळून ते रामचंद्रपंतांना वसुलाच्या कामांतहि पुष्कळ मदत करीत असत. रामचंद्रपंत त्यांचेवर जी जी कामगिरी सोंपवीत ती ती कामगिरी ते स्वतंत्र जबाबदारीनें बिनचूक करीत. त्यामुळें रामचंद्रपंतांचा शंकराजींवर दिवसेंदिवस फारच विश्वास बसत चालला व त्यांच्या मदतीनें रामचंद्रपंतांनीं वसुलाचे बाबतींत सुधारणा करून सर्व प्रांतांत बरीच व्यवस्था केली.

## शंकराजी नारायणांचे पराक्रम

संभाजीचे वधानंतर मोगलांनीं घाटमाथ्यावरील तोरणा, राजगड वगैरे बहुतेक किल्ले काबीज करून त्या ठिकाणीं आपलीं ठाणीं बसविलीं होतीं. शंकराजी नारायण यांना या भागांतील दऱ्याखोऱ्यांची, किल्ल्यांची व एकंदर प्रदेशांची चांगली माहिती असून ते पूर्वीपासून तेथील मावळे लोकांत मिळून मिसळून वागत असल्यामुळें मावळे लोकांत त्यांचें चांगलें वजन होतें. याच घाटमाथ्यावरील प्रदेशाचें रक्षण करण्याचें काम रामचंद्रपंतांनीं त्यांचेकडे सोंपविलें. मावळे लोकांच्या मदतीनें पूर्वीं शिवाजीनें स्वराज्याची मुहूर्तमेढ ज्या ठिकाणीं रोंविली तेथेंच शंकराजी नारायण यांनीं त्याच मावळ्यांची फौज तयार करून मोगलांचे ताब्यांत गेलेलीं शिवाजीचीं तीन ठिकाणें मोगलांकडून परत घेण्याची तयारी केली,

चित्रांक २



राजगडावरील बालेकिल्ला; शिवाजीकडून मोंगलांनीं घेतलेला हा किल्ला श्रीशंकराजी नारायण यांनीं स्वपराक्रमानें परत घेतला. [सं. पा

घाटमाथ्यावरील किल्ल्यांपैकीं प्रथम राजगड किल्ला मोगलांपासून परत घेण्याची कामगिरी रामचंद्रपंतांनीं शंकराजी नारायणांकडे सोंपविली. त्यांनीं लगेच मावळे लोकांच्या फौजेच्या मदतीनें त्या किल्ल्यावर रात्रीचे वेळीं घोरपडीच्या साहाय्यानें वर चढून जाऊन तेथील शत्रूवर हल्ला करून तो किल्ला काबीज केला. त्या किल्ल्यावरच छत्रपति शिवाजीमहाराजांचें सिंहासन होतें. तेथें असलेलें मोगली निशाण फेंकून देऊन त्या ठिकाणीं मराठ्यांचें भगवें निशाण आपल्या हातांनीं फडकाविलें. तेथील मोगल ठाणेदार हा आकस्मिक हल्ला आलेला पाहून चकितच झाला. हे मराठे लोक आकाशांतून येतात कीं काय असें त्यास वाटलें.

रामचंद्रपंतांस गुणांची व शौर्याची चांगली परीक्षा होती. शंकराजी नारायण यांनीं जो विजय मिळविला त्याबद्दल ते त्यांना शाबासकी देऊनच थांबले नाहींत. त्यांनीं त्यांस खर्चाकरितां वाई प्रांताचा सुभा दिला, व चंदीस राजाराम-महाराजांकडे त्यांच्या कर्तबगारीची मोठ्या कौतुकानें तारीफ लिहून एखादें पद देण्याबद्दलहि शिफारस केली. त्या वेळीं रामचंद्रपंतांचें दरबारांत इतकें वजन होतें कीं, त्यांचेकडून उत्तेजनार्थ ज्यांबद्दल शिफारस लिहून जाई त्यांना राजाराम-महाराजांकडून लगेच पदव्या मिळत असत. शंकराजी नारायण यांचे पराक्रम महाराजांच्या कानीं अगोदरच गेले होते. तेव्हां वरील शिफारस होतांच महाराजांनीं शंकराजींस ‘ मदारुल महाम ’ हा वंशपरंपरेचा किताब व त्याचीं वस्त्रें चंदीहून पाठविलीं. ‘ मदारुल महाम ’ म्हणजे राज्याचे आधारस्तंभ, ‘Pillar of the Mahratta Kingdom’ असा त्या किताबाचा अर्थ होय.

पूर्वी कारकून असलेले शंकराजी नारायण स्वपराक्रमानें राज्याचे आधारस्तंभ झाले. रामचंद्रपंत हुकमतपन्हा, शंकराजी नारायण मदारुल महाम व परशराम त्रिंबक समशेरजंग असे हे तीन तारे त्या वेळीं महाराष्ट्रांत चमकत होते. या तिघांच्या शौर्यामुळेंच त्या वेळीं महाराष्ट्रधर्माचा व मराठी राज्याचा बचाव झाला. प्रत्येकानें गनिमी काव्याची युद्धपद्धति स्वीकारून औरंगजेबासारख्या प्रबल शत्रूची खोड मोडली. शंकराजी नारायणांस वरील किताबानें व वस्त्रानें उत्तेजन येऊन त्यांनीं मावळे लोकांची पुष्कळ फौज जमा केली. ते नेहमीं सह्याद्रि घाटमाथ्यावर राजगड, तोरणा व रोहिडा या किल्ल्यांच्या टापूंत राहत.

तेथूनच रात्रीं मोगली फौजेवर छापे घालणें, तिला लुटणें, तिचीं ठाणीं उठवून लावणें असा क्रम त्यांनीं मोठ्या जारीनें सुरू केला. अशा रीतीनें मोगली फौजेला पिसाळून सोडून संधि सांपडतांच सन १६९३ मध्यें त्यांनीं राजगडा-शेजारचा तोरणा, नंतर रोहिडा असे एकामागून एक सह्याद्रि-बंधारीचे किल्ले व घाटमाथ्यावरील बहुतेक सर्व प्रदेश आपल्या ताब्यांत आणला. ते इतकेंच करून राहिले नाहींत, तर सर्व कोंकणपट्टीचें रक्षण करून ते पुण्यापर्यंत सारखी टेहळणी करीत असत.

आतांपर्यंत त्यांचा क्रम मोगली फौजेच्या लहानमोठ्या सरदारांस त्रासवून, पिसाळून सोडण्याचा होता. यापुढें त्यांनीं औरंगजेबाची व त्याच्या छावणीची खबर घेण्यास सुरुवात केली. बादशहाचा धनगडानजीक मुक्काम असतां मराठी फौजेनें त्यांची रसद बंद करावी, लुटावें, छापा घालावा, बेरड घालून घोडीं न्यावीं असे अनेक उपद्रव करून शत्रूची लांडगेतोड करूं लागले. अशा रीतीनें शंकराजी नारायण व इतर मराठे सरदार यांनीं जेव्हां बादशहाची अत्यंत त्रेधा उडवून दिली, तेव्हां औरंगजेबानें त्रासून जाऊन विचार केला कीं, चंदीस जाऊन तेथील मराठ्यांचें बीज नष्ट करावें म्हणजे आपोआप हे सरदार वठणीवर येतील. बादशहानें लागलीच विजापुराकडे जाऊन जिंजीस वेढा घालण्याच्या कामावर जे सरदार पाठविले होते त्यांच्या मदतीला तेथून अधिक सैन्याचा पुरवठा केला.

बादशहाचें लक्ष जिंजीकडे गुंतल्यामुळें इकडे रामचंद्रपंत, शंकराजी नारायण, परशराम त्रिंबक यांना मोगलांचे ताब्यांत राहिलेला भाग परत घेण्यास चांगलीच संधि मिळाली.

रामचंद्रपंतांनीं महाराष्ट्रांतील प्रांताची वाटणी करून टाकल्यानें त्याची व्यवस्था बरीच सुरळीत चालली होती. शंकराजी नारायणांकडे मावळ, जुन्नर, पुणें, कडेवळीत, इंदापूर, चौल, राजपुरी, कडे, पौड खोरें वगैरे प्रांत होते. ह्या प्रांतांत ते कुलमुखत्यारीनें कारभार करीत. याप्रमाणें राजाराममहाराज परत येईपर्यंत त्यांनीं कारभार चालविला होता.

जिंजीस बादशहाचे फौजेचा बरेच दिवस वेढा पडला होता. त्या वेढ्यांतून निसटून राजाराममहाराज इ. स. १६९७ च्या डिसेंबर महिन्यांत

महाराष्ट्रांत आपल्या फौजेस येऊन मिळाले. कांहीं दिवसांनीं धनाजी जाधव, संताजी घोरपडे हेहि मराठे सरदार मोगली फौजेशीं लढत लढत स्वदेशीं येऊन पोहोंचले. थोडक्याच दिवसांत पुन्हां साताऱ्यास महाराष्ट्र-राजमंडळ पूर्ववत् जमलें.

राजाराममहाराज जेव्हां स्वदेशीं येऊन पोहोंचले तेव्हां रामचंद्रपंत, शंकराजी नारायण व परशराम त्रिंबक यांस अत्यानंद झाला. महाराजांची व त्यांची भेट झाल्यानंतर रामचंद्रपंत हुकमतपन्हा, शंकराजी नारायण मदारुल महाम आणि परशराम त्रिंबक समशेरजंग बहाद्दर हे तिघे एकत्र होऊन त्यांनीं महाराजांस विनंति केली, "स्वामींचें राज्य आजपर्यंत कळलें तसें राखलें. आतां स्वामींनीं बंदोबस्त करावा." ही त्या त्रिवर्गाची नम्रतापूर्वक विनंति ऐकून व त्यांना पाहून राजाराममहाराज यांस फार धन्यता व समाधान वाटलें. त्यांनीं लागलीच "पूर्वी तुम्हींच केलांत; पुढेंहि तुम्हींच करणार," असें बोलून त्यांचा गौरव केला. या धनी-चाकरांच्या भेटीच्या वेळच्या लहानशा संवादांत कितीतरी स्वामिभक्ति, स्वदेशप्रीति, प्रेम, स्वार्थत्याग, गुणग्राहकता इत्यादि गोष्टी स्पष्ट दिसत आहेत.

या तिघांच्या कामगिरीबद्दल राजाराममहाराज नुसत्या शब्दांनीं त्यांचा गौरव करून राहिले नाहींत; त्यांनीं त्यांस वस्त्रें व पदव्या दिल्या. त्यांत शंकराजी नारायण यांना सचिवपद देऊन त्या पदाचीं वस्त्रें दिलीं. शंकराजी नारायण हे सन १६९८ सालीं महाराजांच्या अष्टप्रधानांपैकीं एक प्रधान बनून मराठी राज्याचे आधारस्तंभ झाले.

## १. शंकराजी नारायण पंतसचिव

### १६९८–१७०७

शंकराजी नारायण यांना सचिवपद मिळाल्याबरोबर मागें सांगितलेल्या त्यांच्या ताब्यांत असलेल्या प्रांतांशिवाय सुधागड, तोरणा, पुरंदर, मृगगड, वर्धनगड, कानेरीगड, मनमोहनगड, रोहिडा, राजगड, सिंहगड व धनगड हे **किल्लेहि** आतां त्यांस देण्यांत आले.

शंकराजी नारायण हे सचिव बनून अष्टप्रधानांपैकीं एक प्रधान झाले. त्यांच्यावर लगेच एक मोठी कामगिरी येऊन पडली. राजाराम महाराज कर्नाटकांतून इकडे आल्यावर त्यांना स्वस्थ बसणें शक्य नव्हतें. जिंजीचे वेढ्यांतून राजाराम निसटून गेल्यामुळें मोगल बादशहाचा डाव फसून तो अगदींच चिडून गेला. त्यानें पुन्हां महाराष्ट्राकडे आपला मोर्चा वळविला. त्यामुळें राजाराममहाराजांना व त्यांच्या सर्व सरदारांना दक्ष राहणें भाग होतें. आपल्या हातांतून दोन वेळां निसटून गेलेली शिकार कशी व कोठें अडचणींत सांपडेल याकरितां औरंगजेब सर्वत्र हिंडूं लागला. तेव्हां मोठ्या सावधगिरीनें त्याची नजर चुकवून आपला बचाव करण्याचें व त्यास जेरीस आणण्याचें काम जसें महाराष्ट्रांतील सर्व सरदार मंडळींवर येऊन पडलें तसें शंकराजी नारायण सचिव त्यांपैकींच एक असल्यानें त्यांच्यावरहि तें येऊन पडलें.

## औरंगजेबाचा मराठ्यांशीं महाराष्ट्रांत शेवटचा रणसंग्राम १६९८–१७०६

राजाराममहाराज स्वदेशीं परत येईपर्यंत सुमारें आठ दहा वर्षें मोगलांचें व मराठ्यांचें युद्ध महाराष्ट्रांत व कर्नाटकांत सुरू होतें. दोन्ही ठिकाणीं दोघांचें सैन्य विभागलें असून राजाराम कर्नाटकांत व औरंगजेब महाराष्ट्रांत होता. आतांपर्यंत दोघांची समक्ष गांठ एकाच प्रदेशांत पडली नव्हती. आतां दोघांचीहि विभागलेली शक्ति एकत्र झाल्यामुळें दोन्ही पक्षांचा जोर जास्त झाला होता. या अखेरच्या झुंजांत एक महाराष्ट्रशाही तरी राहावयाची किंवा चोहोंकडे मोगलशाही तरी व्हावयाची, अशी ती मोठी आणीबाणीची वेळ होती.

मोगल सैन्य झपाट्यानें जमत चाललें ही बातमी राजाराममहाराजांस कळल्यानंतर त्यांनीं फौज जमा करून तिच्या तीन टोळ्या तयार केल्या. एक सेनापतीच्या हुकमतींत, दुसरी परशराम त्रिंबक यांच्या हुकमतींत व तिसरी शंकराजी नारायणांच्या हुकमतींत, अशा रीतीनें तिघांच्याकडे तीन भागांच्या रक्षणाची कामगिरी दिली; व राजाराममहाराज स्वतः मोठें सैन्य घेऊन खानदेश, बागलाण, गंगथडी, वऱ्हाड या प्रांतांत सरदेशमुखी व चौथ हे हक्क वसूल करण्याकरितां सन १६९९ मध्यें तिकडे गेले.

औरंगजेब बादशहानें दुसऱ्या सर्जेखान नामक एका सरदारास पुण्यास थोड्याशा फौजेनिशीं ठेविलें होतें. त्याचा समाचार घेण्याचें काम महाराजांनीं शंकराजी नारायण यांच्याकडे सोपविलें. सर्जेखान मोठ्या तयारीनिशीं राहिला होता. मदारुल महामहि तितक्या तयारीनिशीं त्याचेशीं सामना करण्यास तयार होतेच. त्यांची व सर्जेखानाची लढाई पुण्याजवळ झाली. मदारुल महाम शंकराजी नारायण यांनीं आपल्या मावळी फौजेच्या साहाय्यानें खानाची दुर्दशा उडवून देऊन पुणें प्रांत मोकळा करून घेतला. पुढें लवकरच परशराम त्रिंबक यांच्या हाताखालीं जें सैन्य महाराजांनीं ठेविलें होतें तेंहि शंकराजी नारायण यांस जाऊन मिळालें. या दोन्ही सैन्यांनीं सर्व पुणें प्रांत व्यापून टाकिला. महाराजांनींहि फिरती फौज पुणें, घांटमाथा, मावळ वगैरे प्रांतांत तयारीनें ठेविल्यामुळें फार फायदा झाला. मोगल सैन्यानें एखादें ठाणें अगर किल्ला घेऊन पुढें जावें तों मागें या फौजेनें तो किल्ला अगर ठाणें परत घ्यावें असा क्रम सुरू होता.

सर्जेखानाचा पराभव झाल्यानंतर औरंगजेबास अतिशय राग आला व ज्या सह्याद्रि बंधाऱ्यावरील किल्ल्याच्या आश्रयावर मराठी फौज झुंजते ते किल्ले आपल्या ताब्यांत घेण्याचा निश्चय करून तो स्वतः त्या उद्योगास लागला. पश्चिमेकडील सर्व किल्ले हस्तगत झाल्याशिवाय मराठ्यांचें बंड मोडणार नाहीं असें त्यानें ठरविलें व त्याप्रमाणें तो एकामागून एक किल्ले घेत चालला.

राजाराममहाराज सरदेशमुखी व चौथ वसूल करून सिंहगडास परत आले. तेथें ते आजारी पडून स. १७०० च्या मार्च महिन्यांत कालवश झाले. त्यामुळें महाराष्ट्रावर वज्रपाताप्रमाणें आघात होऊन मराठी राज्य मुळापासून उलथून पडतें कीं काय अशी सर्वांस भीति पडली. मराठ्यांचा राजा गेल्यामुळें औरंगजेबास मात्र अत्यानंद झाला. अल्लाची आपणांवर बहाल मर्जी झाली असें त्यास वाटून मराठ्यांची राजसत्ता नाहींशी करण्याच्या हेतूनें आपण दक्षिणेंत आलों तो आपला हेतु लवकरच पूर्ण होणार अशी त्याची पक्की खात्री होऊन तो मनांत अगदीं हुरळून गेला. त्याच्या सैन्यांत जिकडे तिकडे जयघोष करण्यांत आला. परंतु या वेळींहि औरंगजेबाचा अंदाज सपशेल चुकला. मराठ्यांची संघशक्ति व त्यांच्या अंगचा जोम हीं दिवसेंदिवस वाढतच आहेत हें बादशहाच्या ध्यानांत

आलें नाहीं. राजारामाच्या कारकीर्दींत लोकांचे अंगीं एक प्रकारचा विलक्षण हुरूप उत्पन्न झाला होता. महाराष्ट्रधर्मरक्षणाकरितां मराठे वीर सर्वस्वावर पाणी सोडण्यास तयार झाले होते.

महाराजांचे मृत्युसमयीं रामचंद्रपंत सिंहगडास आले होते. राजाराम-महाराजांची स्त्री ताराबाई आपल्या पुत्रासह पन्हाळा किल्ल्यावर होती. राजारामाच्या मृत्यूचें वर्तमान सरदार लोकांस कळवितांना रामचंद्रपंतांनीं चहूंकडे मोठीं आवेशयुक्त पत्रें पाठविलीं. “ आतां राज्यरक्षण करणें तुमचेकडेच आहे. सर्व लज्जा तुमची आहे ” इत्यादि शब्द वाचून सरदारांस स्फुरण चढलें व ते रामचंद्रपंतांचे हुकूम मोठ्या तत्परतेनें बजावूं लागले. त्यांनीं सिंहगडावर सरदारांस बोलावून दरबार भरविला आणि पुढील कर्तव्याची ओळख त्यांस देऊन सर्वांना मनापासून साहाय्य करण्याविषयींची विनंति केली. ताराबाईचा मुलगा शिवाजी हा सहा वर्षांचा होता. ताराबाई मुखत्यार या नात्यानें राज्य-कारभार चालवीत होती. तिनें शिवाजीच्या नांवानें राज्यकारभार सुरू केला. रामचंद्रपंत सर्व कारभार शंकराजी नारायण, परशराम त्रिंबक व सेनापती यांच्या मदतीनें करूं लागले. वरील सर्व व्यवस्था करण्यांत कांहीं दिवस गेल्या-मुळें त्या अवकाशांत मोगली फौजेस सवलत मिळून तिनें पुरंदर, राजगड, तोरणा, चंदनवंदन, पांडवगड, सातारा, परळी वगैरे किल्ले घेतले व सिंहगडाकडे आपला मोर्चा फिरविला. पुढें कांहीं दिवसांनीं मोगलांचे हातीं सिंहगड गेला.

मोगलांच्या ताब्यांत किल्ले गेले तेव्हां किल्ल्याच्या बाहेर पडलेल्या मराठी सैन्यानें चहूंकडे बंडाळी माजवून सोडली. तेव्हां मोगली फौज मराठी सैन्याच्या मागें धांवली. ती संधि पाहून शंकराजी नारायण यांनीं प्रथम सिंहगड किल्ला हस्तगत करून घेतला. नंतर ते राजगडाकडे वळले व तेथून मोगलांना हांकून देऊन नंतर रोहिडा किल्लाहि घेतला. अशा रीतीनें थोडेच दिवसांत पूर्वी ताब्यांत असलेला सर्व प्रदेश त्यांनीं मोगलांपासून परत घेतला. शंकराजी नारायण यांनीं जेव्हां सिंहगड घेतल्याची बातमी औरंगजेबास कळली तेव्हां त्याचे मनास मोठा धक्का बसून त्यास अत्यंत वाईट वाटलें. या किल्ल्यास त्यानें ‘ बक्षिदाबक्ष ’ असें नांव ठेवलें होतें. म्हणजे त्यास तो अल्लाची देणगी म्हणून समजत असे. ग्रँट डफनें याबद्दल लिहिलें आहे :

"In 1706 soon as the Mogul troops marched from Poona to Bijapur, Shankaraji Narayan Sachiv, Chief Manager of the country, retook Sinhgad and other places. The loss of Sinhgad was a great grief to Aurangzeb and aggravated the illness of which in the next year he died."

## औरंगजेबाचा अंत

सुमारें २५ वर्षांपूर्वीं औरंगजेब प्रचंड सैन्य घेऊन मराठी राज्याचा बींमोड करण्याच्या हेतूनें दक्षिणेंत आला होता. परंतु मराठ्यांच्या संघशक्तीपुढें त्याचा टिकाव न लागून त्याचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले व शेवटीं हताश होऊन सन १७०७ सालीं दक्षिणेंत अहमदनगर येथें त्याची इहलोकची यात्रा संपली. औरंगजेबाच्या मृत्यूमुळें मोगल सैन्यांत गडबड उडाली. त्या संधीचा फायदा घेऊन शंकराजी नारायण यांनीं पुरंदर किल्लाहि त्याच सालीं घेतला. घाटमाथ्यावरील किल्ले म्हणजे मराठ्यांचीं मुख्य आश्रयस्थानें होत. राजारामाच्या मृत्यूनंतर औरंगजेबानें मराठ्यांचें मुख्य आश्रयस्थान जे घाटमाथ्यावरील किल्ले ते घेण्याचा सपाटा चालविला. परंतु मराठ्यांनीं त्याला चांगलाच हात दाखवून मोगलांची हकालपट्टी केली. हे सर्व किल्ले व त्यांलगतचा प्रदेश मोगलांच्या हातांतून सोडविण्याची महत्त्वाची कामगिरी शंकराजी नारायणांकडे होती, व ती त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें बजाविल्यामुळेंच महाराष्ट्रधर्म व मराठ्यांचें राज्य राहिलें.

या वेळीं शंकराजी नारायण यांनीं घाटमाथ्यावरील व मावळांतील जो प्रदेश व जे किल्ले मोगली अंमलापासून सोडविले तो सर्व प्रदेश व ते किल्ले यांत नंतर थोडासा फेरबदल होऊन आजतागायत त्यांच्या वंशजांकडे कायम आहेत. छत्रपति शिवाजीमहाराजांनीं ज्या प्रदेशांत स्वराज्याची स्थापना केली, तो प्रदेश भोर संस्थानांत असल्यामुळें अद्यापहि तेथील प्रजा स्वराज्याचा अनुभव घेत आहे. ही गोष्ट महाराष्ट्रीयांना अभिमानास्पद वाटल्यावांचून राहणार नाहीं.

## शाहूची सुटका

औरंगजेबाच्या मृत्युसमयीं त्याचा मुलगा अजीमशहा त्याच्या जवळ होता. औरंगजेबाचा अंत होतांच अजीमशहा सर्व मोगल फौज घेऊन दिल्लीस जाण्या-करितां निघाला. माळव्यांत गेल्यावर त्यानें शाहूची मुक्तता करून त्यास

दक्षिणेंत जाण्यास परवानगी दिली. शाहूला सोडून देण्यांत त्याचा असा हेतु होता कीं, शाहू दक्षिणेंत गेल्यावर राज्याबद्दल भावाभावांत तंटे होऊन मराठ्यांची सत्ता आपोआपच नाहींशी व्हावी.

राजारामाची पत्नी ताराबाई ही फार महत्त्वाकांक्षी स्त्री होती. तिचा मुलगा लहान होता तरी त्याच्या नांवानें ती सर्व सरदारांच्या मदतीनें मुखत्यार या नात्यानें राज्यकारभार चालवीत होती. शाहूची सुटका होतांच तो दक्षिणेंत येण्यास निघाला. त्यानें ताराबाईस आपण येत असल्याबद्दल पत्र पाठविलें. ताराबाईस आपल्या मुलाकरितां गादी पाहिजे होती. शाहू येत आहे ही बातमी ऐकून तिला फार वाईट वाटलें. शाहूला राज्य मिळूं द्यावयाचें नाहीं असा तिनें आपल्या मनाशीं निश्चय करून सर्व सरदारांस एकत्र बोलाविलें. रामचंद्र निलकंठ, शंकराजी नारायण, परशराम त्रिंबक व सेनापति धनाजी जाधव वगैरे मंडळी होती. तिनें त्यांस सांगितलें कीं, हा खरा शाहू नसून तोतया शाहू आहे, तेव्हां त्यास कोणींहि जाऊन मिळूं नये व त्यास मदत करूं नये. तिनें सर्वांच्या पुढें दुधभाताचें ताट आणून त्यावर सर्वांकडून हात ठेवून शपथ घेवविली कीं, आम्ही ताराबाईचा पक्ष कधींहि सोडणार नाहीं.

आपल्याविरुद्ध ताराबाईचें कारस्थान सुरू असल्याचें शाहूस कळल्यावर तोहि लढाईचे तयारीनें येत होता. ताराबाईनें शाहूशीं लढण्याकरितां सेनापती-बरोबर मोठी फौज देऊन त्यास रवाना केलें. कांहीं सरदार व मुत्सद्दी मंडळी शाहूमहाराजांस मिळाली होती. दोन्ही फौजांची खेडकडूस येथें सन १७०७ च्या अखेरीस लढाई होऊन ताराबाईच्या फौजेचा पराभव झाला. नंतर शाहूनें सातारचा किल्ला हस्तगत करून घेऊन आपणांला तेथें राज्याभिषेक करवून घेतला. ताराबाई पन्हाळ्यास होती. तिनें शाहूमहाराजांस त्रास देण्या-करितां बंडाळी सुरू ठेविली होती. शंकराजी नारायण यांनीं शपथक्रिया केल्यामुळें ते शाहूस मिळाले नव्हते. ते ताराबाईच्या पक्षालाच राहून त्यांनीं आपल्या प्रांताचा उत्तम बंदोबस्त ठेविला होता. शंकराजी नारायण यांच्या ताब्यांत असलेले किल्ले आपल्या स्वाधीन झाल्याशिवाय राज्यास बळकटी येणार नाहीं असा विचार करून शाहूमहाराजांनीं शंकराजी नारायणांस भेटीस बोलाविलें. परंतु ताराबाईस वचन दिल्यामुळें ते भेटीस गेले नाहींत. तथापि,

चित्रांक ३



**तोरणाकिल्ला**; शिवाजीच्या ताब्यांतील मोंगलांनीं घेतलेला हा किल्ला श्रीशंकराजी नारायण यांनीं त्यांच्याकडून स्वपराक्रमानें इ. स. १६९३ मध्यें काबीज केला. [ सं. पा. ६

शाहूमहाराज हे ताराबाईनें भासविल्याप्रमाणें कोणीतरी तोतया इसम नसून खरे शाहू आहेत व तेच गादीचे खरे मालक आहेत ही गोष्ट त्यांचे ध्यानांत आल्यापासून त्यांचे मनास सारखी टोंचणी लागली होती. आपण शपथक्रिया केली हें आपल्या हातून मोठें पातक घडलें असें त्यांस वाटत होतें. राज्याचे खरे मालक शाहूमहाराज असून त्यांचे हुकुमाप्रमाणें आपण त्यांच्या भेटीस जात नाहीं हेंहि आपण पातकच करीत आहोंत असें त्यांस वाटत होतें. इकडे आड व तिकडे विहीर अशी त्यांची स्थिति होऊन ते राजगडावर स्वस्थ होते. शाहूमहाराजांच्या दृष्टीनें शंकराजींना प्रथम आपल्या बाजूस घेणें जरूर होतें. कारण त्यांच्या ताब्यांतील किल्ले व मुलूख महत्त्वाचे होते. ते किती महत्त्वाचे होते यासंबंधीं ग्रँट डफसाहेबांनीं आपल्या इतिहासांत लिहिलें आहे :

"As the territory of Shankaraji Narayan was reckoned the foundation stone of the empire from Shivaji's having first established himself there, Shahu determined to reduce the Sachiva. Most of the Sachiva's forts being well stored with provisions and garrisoned by 'Veteran' Mavalis were reckoned impregnable."

तसेंच त्या किल्ल्यांचें महत्त्व किती होतें याबद्दल मराठ्यांचा इतिहास लिहिणारे प्रसिद्ध किंकेडसाहेब म्हणतात :

"North of Satara, Shankar Narayan the Pant Sachiv held for Tarabai Poona and the great forts of Sinhgad, Purandhar, Rajagad and Torana, in this way cutting Shahu off from all communication with Khandesh and Nasik......It was with their capture that the great King (Shivaji) had begun his wonderful career and they were regarded by the Mahrattha people as the Keys of the Maratha Kingdom."

शाहूमहाराजांच्या बोलावण्याप्रमाणें जेव्हां शंकराजी नारायण भेटीस गेले नाहींत तेव्हां त्यांचे ताब्यांत असलेले किल्ले काबीज करण्याकरितां शाहूमहाराजांनीं सैन्य रवाना केलें. शंकराजींनीं आपल्या प्रांताचा उत्तम बंदोबस्त ठेवून ह्यांतील सर्व किल्ल्यांतून युद्धोपयोगी सामान भरपूर भरून लढाईची अगदीं जय्यत तयारी ठेविली होती. त्यांच्या ताब्यांत असलेले किल्ले जात्याच

मजबूत व अभेद्य असे पहिल्यापासूनच होते. त्यांत शंकराजी नारायण यांची व्यवस्था उत्तम होती, यामुळें ते अजिंक्य झाले होते. शंकराजी नारायणांनीं जर ते किल्ले लढविण्याचें मनांत आणिलें असतें तर कित्येक दिवसपर्यंत शाहूमहाराजांच्या फौजेशीं मोठ्या शौर्यानें त्यांना खास झुंजतां आलें असतें. परंतु त्या वेळीं त्यांचे मनाची स्थिति कशी झाली होती याचें वर्णन किंकेड-साहेबांनीं उत्तम रीतीनें केलें आहे. ते लिहितात :

"Trusting to Tarabai's word that Shahu was a pretending knave, Shankar Narayan had sworn to defend her son's cause against all comers. He was now convinced that Shahu was no impostor but Sambhaji's son. Devotedly loyal to the house of Shivaji, himself a hero of the War of Independence, Shankar Narayan could not bear to fight against the great King's grandson. At the same time he had sworn an oath of loyalty to Tarabai, which he could not as an honourable man break. The dilemma in which he found himself was too great for that loyal, brave and simple soul. While he hesitated what course to pursue, Shahu's troops stormed Rajgad and threatened Sinhgad and Torna. Forced at last to a decision he resigned his charge and his powers, and donning the garb of an anchorite, went to reside at Ambavade, a holy place."

शंकराजी नारायण शाहूमहाराजांचे फौजेबरोबर न लढतां राजगड किल्ला सोडून गेल्यामुळें तो किल्ला शाहूमहाराजांचे ताब्यांत सहजच आला. शाहू-महाराजांचे सैन्यावर शंकराजी नारायणांच्या सैन्यानें जेव्हां गोळी झाडली नाहीं व लढण्याचा इरादाहि दाखविला नाहीं तेव्हां शाहूमहाराजांनीं सचिवांचे दुसरे किल्ले व प्रांत घेण्याचें रहित केलें. स्वामिनिष्ठा व वचनपरिपालन हीं दोन्ही साधण्याकरितां शंकराजी नारायण यांनीं आजपर्यंत मिळविलेल्या जहागिरीचा त्याग करून संन्यास घेऊन ते आंबवडें येथें गेले व तेथें त्या रणशूर व मुत्सद्दी पुरुषानें इ. स. १७०७ च्या नोव्हेंबर महिन्यांत देहविसर्जन करून पर-लोकचा मार्ग स्वीकारला. शंकराजी नारायणांसारख्या थोर विभूतीचें श्रेष्ठत्व यांतच आहे. रघुकुलाचें वर्णन करितांना तुलसीदास म्हणतात :

" रघुकुलरीति सदा चलि आई
प्राण जाय वरु वचन न जाई ॥ "

भगवद्-गीतेंत श्रीकृष्ण म्हणतात :

" संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ "

श्रेष्ठ विभूतींना दुष्कीर्तीचें जितकें भय वाटतें तितकें प्रत्यक्ष मृत्यूचें सुद्धां वाटत नाहीं. सर्वस्व गेलें तरी हरकत नाहीं, पण अपकीर्ति होऊं द्यावयाची नाहीं असा ज्यांचा निर्धार असून जे त्याप्रमाणें वागतात तेच खरे थोर व तेच जगाला वंदनीय होऊन आदर्शभूत होतात. शंकराजी नारायण वरील कसोटीस उतरल्यामुळेंच त्यांचें नांव इतिहासांत चिरकाल राहिल्यावांचून राहणार नाहीं. शंकराजी नारायण यांच्या या अलौकिक वर्तनाचा व वचनासक्तीचा श्रीमंत बाबासाहेबांच्या मनावर पूर्ण ठसा उमटला असल्यामुळें त्यांनीं गादीवर आल्यानंतर या पुण्यपुरुषाच्या समाधीचा जीर्णोद्धार करून तें एक रमणीय क्षेत्र बनविलें आहे.

## शंकराजी नारायणांची योग्यता

शंकराजी नारायणांच्या अंगीं साहस, धैर्य, शौर्य व बुद्धिमत्ता वगैरे अलौकिक गुण होते. लहानपणीं कारकुनीचें काम केलें असल्यामुळें व पुढें जमाबंदीचीं वगैरे मोठ्या जबाबदारीचीं कामें केल्यानें शंकराजी कलमबहाद्दरींत व मुत्सद्दीपणांत जसे निष्णात झाले होते तसेच ते पुढें लष्करी खात्यांत शिरल्याबरोबर तलवारबहाद्दरीच्या कामांतहि त्यांनीं नैपुण्य संपादिलें. त्यांच्याकडे जी कामगिरी दिली होती ती उत्तम रीतीनें बजाविल्यामुळें त्यांनीं छत्रपतींच्या अष्टप्रधानांच्या पदांपैकीं सचिव हें महत्पद प्राप्त करून घेऊन भोर संस्थान संपादन केलें. शंकराजींस सचिवपद मिळण्याचे पूर्वींच छत्रपति राजाराममहाराज जिंजीस असतांना त्यांनीं शंकराजींनीं जिंकलेल्या प्रदेशांत इनाम जमिनी वगैरे देण्याचे त्यांना अधिकार दिले होते. पुढें सचिवपद प्राप्त झाल्यावर राजाराममहाराजांनीं त्यांना या संस्थानचे संपूर्ण अधिकार दिले, व त्या अधिकाराचा त्यांनीं योग्य उपयोग केला. ते अत्यंत पापभीरु, इमानी, धर्माभिमानी व राष्ट्राभिमानी होते. वचनासक्ति व स्वामिनिष्ठा हे गुण त्यांच्या अंगीं प्रामुख्यानें वसत होते. तीस

वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धांत ज्यांनीं पराक्रम गाजवून महाराष्ट्र मोगलाच्या ताब्यांतून सोडविला त्यांत शंकराजी नारायण हे एक प्रमुख होते.

शंकराजी नारायणांस सचिवपदाची प्राप्ति झाल्यानंतर त्यांच्या नांवाचा 'श्रीशंकराजी नारायण' हा शिक्का व पत्र वगैरे पुरें झाल्यावर 'पत्रायधी रयभाति' हें मोर्तब सुरू झालें.

कोणत्याहि सरकारी कागदावर व सनदेवर सचिवांची 'रुजू सुरनवीस', 'सुरू सुदबार' अशीं अक्षरें असल्याशिवाय कोणताहि सरकारी कागद अगर सनद पुरी होत नसे.

महाराज सचिवांस पत्र लिहितांना, 'राजश्री शंकराजी पंडित' असें नांव लिहीत असत.

शंकराजी नारायणांस एकच औरस पुत्र होता. त्याचें नांव नारोपंत. शंकराजी ब्रह्मीभूत झाले त्या वेळीं नारोपंतांचें वय दोन वर्षांचें होतें. त्यांनाच शाहूमहाराजांनीं सचिवपदाचीं वस्त्रें दिलीं.

## शिवाजीचे वेळचे अष्टप्रधान व त्यांचीं कर्तव्यें

| फारसी नांव | संस्कृत नांव | कर्तव्य |
|---|---|---|
| १. पेशवा | पंतप्रधान | मुख्य दिवाणगिरी. |
| २. मुजुमदार | पंतअमात्य | मुलकी वसूल व हिशेब. |
| ३. सुरनिस | पंतसचिव | दप्तराचा सांभाळ. |
| ४. वाकनिस | मंत्री | खाजगी कारभार. |
| ५. डबीर | सुमंत | परराज्यव्यवहार. |
| ६. सरनौबत | सेनापति | फौजेची व्यवस्था. |
| ७. ,, | न्यायाधीश | न्यायप्रकरणें. |
| ८. ,, | पंडितराव | शास्त्रार्थ व दानधर्म. |

प्रतिनिधि हें पद राजारामाचे वेळेस नवीन निर्माण झालें.

पंतप्रधान, पंतअमात्य व पंतसचिव यांचेकडे जीं कामें होतीं त्यांशिवाय त्यांना सैन्य ठेवून युद्धप्रसंग करून जो प्रांत स्वाधीन होईल त्याचें रक्षण करावें लागे व हीच पद्धत पुढें राजारामाचे वेळेस होती.

चित्रांक ४



श्रीशंकराजी नारायण यांची क्षेत्र अंबवडें येथील जुनी समाधि. [ सं. पा. १४

# २. नारो शंकराजी सचिव

## १७०७–१७३७

शंकराजी नारायणांच्या अकस्मात् मृत्यूमुळें ताराबाईची बाजू अगदींच लंगडी पडली. तिनें कोल्हापुरास मराठ्यांची स्वतंत्र गादी स्थापिली होती, व तेथेंहि नवीन अष्टप्रधानांचें मंडळ तयार केलें होतें. शंकराजी नारायणांवर तिचा फार भरंवसा होता. त्यांच्या निधनामुळें तिचा मोठा आधार गेला. शंकराजी नारायणांच्या मृत्यूचें वर्तमान शाहूमहाराजांस कळतांच त्यांनीं त्यांचे अंगची नीतिमत्ता, स्वामिनिष्ठा, वचनासक्ति, स्वदेशाभिमान इत्यादि गुणांकडे लक्ष देऊन तावडतोब त्यांच्या अज्ञान मुलास म्हणजे नारो शंकरांस सचिव-पदाचीं वस्त्रें पाठवून त्यांच्या मातोश्री व मुतालिक यांच्यावर राज्यकारभाराची जबाबदारी सोंपविली.

शाहूमहाराजांनीं या वेळीं मुत्सद्दीपणा व मनाचा थोरपणा दाखवून नारो शंकर यांना सचिवपदाचीं वस्त्रें देऊन नवीन सनदहि करून दिली. यामुळें शाहूमहाराजांचा फायदाच झाला. कारण, यानंतर सचिव घराणें कोल्हापूरच्या गादीकडे न जातां साताऱ्याच्या गादीशींच राजनिष्ठ राहिलें. शाहूमहाराजांनीं या वेळीं जो धूर्तपणा दाखविला त्याविषयीं ग्रँट डफ आपले इतिहासांत लिहितात :

" And Shahu in that temper of conciliation for which he is deservedly applauded seized the advantage which with the sanction of lawful authority always bears, and immediately despatched clothes of investiture to Naro Sankar, son of the late Sachiva, then a child of two years old, at the same time confirming as a matter of course his mutalik or principal agent in that situation. This measure immediately secured to him the services of that party and the Sachiva never afterwards departed from his allegiance."

—Grant Duff, p. 189.

नारो शंकर लहान असल्यामुळें संस्थानचा कारभार त्यांच्या मातोश्री येसूबाई व त्यांचे मुतालीक हीं दोघें चालवूं लागलीं. येसूबाईसाहेब चांगल्या

कर्त्या होत्या. त्यांचें आपल्या कारभाऱ्यांवर, इतर अम्मलदारांवर व त्यांच्या प्रजेवर चांगलें वजन होतें. इतकेंच नव्हे, तर त्यांचा त्यांना मोठा वचक होता. त्यांच्या अंगीं आपल्या जहागिरीचा बंदोबस्त व व्यवस्था ठेवण्याची महाराजांची कामगिरी बजाविण्याची कर्तृत्वशक्ति इतकी चांगली होती कीं, शंकराजी नारायण वारले तेव्हां त्यांचा पुत्र अज्ञान असल्यामुळें सचिवांच्या जहागिरींत सर्व पोरखेळ आहे असें येसूबाईंनीं कोणास वाटूं दिलें नाहीं. आपल्या प्रजेला योग्य न्याय मिळावा याबद्दल त्या नेहमीं दक्ष असत.

शाहूमहाराज गादीवर आल्यावर महाराष्ट्रांतील कांहीं गुंडांनीं बंडाळी माजविली होती. दमाजी थोरात या नांवाच्या पुंडानें बंड केलें. तें मोडण्याची कामगिरी सचिवांकडे आली. नारो शंकर अगदीं लहान तथापि, महाराजांची आज्ञा होतांच येसूबाईनें मुतालिकांच्या संमतीनें फौज जमवून त्यांना त्यांच्याबरोबर आपल्या लहान मुलासहित देऊन थोराताचें बंड मोडण्यास पाठविलें. येसूबाई ही धैर्यशाली स्त्री होती, म्हणूनच तिनें हें साहस केलें.

दुर्दैवानें मुतालिकाचा पराभव होऊन ते व नारो शंकर दमाजीचे कैदेंत पडले. याबद्दल शाहूमहाराजांस फार वाईट वाटलें. त्यांनीं सचिवांची मुक्तता करण्याकरितां बाळाजी विश्वनाथास मोठ्या फौजेसह दमाजीवर पाठविलें. त्यानें दमाजीचें बंड मोडून नारो शंकरची सुटका केली. दमाजी थोरातासारख्या पाताळयंत्री क्रूर मनुष्याच्या हातून आपल्या एकुलत्याएक मुलाची सुटका झालेली पाहून येसूबाईचा आनंद गगनांत मावेना. बाळाजी विश्वनाथांचे उपकार स्मरून त्या उपकारांची फेड करण्याकरितां येसूबाईंनीं बाळाजी विश्वनाथांस राहण्याला चांगली आश्रयाची जागा नसल्यामुळें आपल्या ताब्यांतील पुरंदर किल्ला आणि त्याचे आसपासचा पुणें प्रांतावरील आपला अम्मल त्यास बक्षिस देऊन शंकराजी नारायणांचे पत्नीस योग्य असेंच वर्तन त्यांनीं केलें.

येसूबाई जितक्या दक्ष आणि चतुर होत्या तितक्या त्या पापभीरु होत्या. याला एक लहानसें उदाहरण आहे तें सांगितलें म्हणजे त्यावरून वाचकांना कल्पना होईल.

येसूबाई जेव्हां आपल्या संस्थानचा कारभार पाहत होत्या तेव्हां त्यांच्या संस्थानापैकीं रोहिड खोरें व वेळवंड खोरें येथील परभू देशकुलकर्णी व गांव-

चित्रांक ५



दुसरे सचिव नारो शंकर यांस वेलसर येथील कुळकर्ण्यांकडून प्राप्त झालेल्या श्रीरामाच्या मूर्ती; या वेळेपासून श्रीराम हें सचिवांचें कुलदैवत झालें.

[सं. पा. २०

कुळकर्णी यांच्या वतनाचा तंटा लागून तो सरकारांत आला. एका पक्षाच्या मंडळींनीं कारभारी वगैरे मंडळींचें संधान बांधून दुसऱ्या पक्षाचें वतन येसूबाई-साहेबांकडून आपल्यांकडे घेतलें. दुसऱ्या पक्षाचें घरदार वगैरे सर्व मालमत्ताहि जबरीनें घेतली गेली. घराच्या आवारांत तेथील मालकाच्या हातचें डाळिंबाचें झाड होतें तेंहि त्याबरोबरच गेलें. दुसऱ्या पक्षाची मालकीण एक बाई होती, ती या जुलुमानें त्रासून देशांतरीं निघून गेली.

" त्या डाळिंबाचे झाडास फळें फार आलीं होतीं. जबरदस्ती करून वतनाचा कागद घेतल्यावर सहा महिन्यांनीं त्या झाडाचीं फळें उगीच झडून डाळिंबाचें झाड वाळलें. हें वर्तमान मातोश्री येसूबाईस कळल्यावरी मातोश्रींनीं चौकशीस लोक पाठविले. झाड जाळलें, तोडलें, झाडलें नाहीं, फळें गळालीं व वाळलें, म्हणून लोकांनीं जाऊन सांगितलें. त्याजवरी मातोश्रींस विश्वास न पडे. म्हणोन खासा मातोश्री येसूबाई वाडी तर्फ उत्रवली येथून स्वार होऊन कारीस झाड पाहावयास आली. येऊन झाड वाळलें पाहून आक्रोश केला जे परभू वतन बळेंच चौघांनीं भरी भरून घेतलें हें झाडांस देखील मानलें नाहीं. माझा वंश चालत नाहीं. ऐसें म्हणून कारभारी यांस शिव्यागाळी देऊन गेली. पुढें तें वतन त्यांनीं नारो शंकर यांस सांगून सोडून दिलें." त्यांच्या पापभीरु मनावर या झाडाचीं फळें गळून गेलेलीं पाहून झालेल्या परिणामामुळें त्यांच्या तोंडून जे वर उद्‌गार निघाले आहेत ते त्यांचा धर्मभीरुपणा व मनाचा कोवळेपणा दाखविण्यास बस्स आहेत असें वाटतें.

शाहूमहाराजांनीं सचिवांना स्वराज्यांत व मोगलाई मुलखांत साहोत्रा बाबेचा अंमल वंशपरंपरेनें वतनी करून दिला. सचिवांनीं महाराजांचा कोणता खर्च चालवावा हेंहि ठरवून दिलें. त्यांनीं अष्टप्रधानांच्या जहागिरीच्या मुलुखाची व त्यांच्या उत्पन्नाची व त्यांनीं करावयाच्या कामगिरीची व्यवस्था लावून दिली. त्यामुळें चहूंकडे शांतता होऊन महाराजांचा राज्यकारभार सुरळीत चालूं लागला.

शाहूमहाराजांच्या कारकीर्दींत पेशवे हेच मुख्य प्रधान व सेनापति झाल्यामुळें इतर प्रधानांकडे आपआपल्या जहागिरींचा बंदोबस्त ठेविण्यापलीकडे कांहीं काम राहिलें नाहीं. यामुळें यापुढें सचिव घराण्यांतील कोणाहि पुरुषावर

लढाईवर जाण्याचा प्रसंग न आल्यामुळें त्यांना आपल्या अंगचें शौर्य दाखविण्यास कधींहि संधि मिळाली नाहीं. नारो शंकराजींची कारकीर्द स्वस्थतेचीच गेली.

नारो शंकर फार धार्मिक होते. त्यांचे कारकीर्दींत एक चिरस्मरणीय गोष्ट घडून आली. पुरंदर किल्ल्याजवळ बेलसर नांवाच्या खेड्यांत एका रामोपासक कुलकर्ण्याजवळ श्रीरामाच्या मूर्ती होत्या. तो अत्यंत दरिद्री होता. एके रात्रीं त्यास असा दृष्टांत झाला कीं, “ तूं आमच्या मूर्ती सचिवांना नेऊन दे. ” त्याच रात्रीं “ कोणी रामाच्या मूर्ती आणून दिल्याच तर त्या तूं घे ” असा नारो शंकर यांस दृष्टांत झाला. पुढें तो कुलकर्णी चैत्र शु. ८ चे दिवशीं त्या रामाच्या मूर्ती घेऊन भोरनजीकच्या ओढ्याजवळ आला. नारो शंकरहि तेथें लवाजमा घेऊन गेले होते. कुलकर्ण्यानें तेथें त्यांना त्या मूर्ती दिल्या. तेव्हांपासून त्या ओढ्याचें नांव ‘रामबाग ओढा’ असें पडलें. तेंच हल्लीं चालू आहे. नारो शंकर त्या वेळीं रोहिडा किल्ल्यावर राहत असत. तेथें मूर्ती नेऊन त्यांनीं चैत्र शु. ८ पासूनच उत्सव करण्यास सुरुवात केली. तेव्हांपासून श्रीराम सचिवांचें कुलदैवत झालें, व दरसाल हा उत्सव करण्यांत येत असून महाराष्ट्रांत भोरच्या श्रीरामनवमीच्या उत्सवाची कीर्ति आहे.

नारो शंकर १७३७ मध्यें वारले. त्यांना औरस संतति झाली नाहीं. शंकराजी नारायणांचे एक दत्तक पुत्र होते, त्यांस चिमणाजी नांवाचा एक मुलगा होता. त्यास नारो शंकरांचे मांडीवर दत्तक दिलें होतें. त्यांचें नांव चिमणाजी नारायण ठेवून त्यांस शाहूमहाराजांनीं सचिवपदाचीं वस्त्रें दिलीं.

## ३. चिमणाजी नारायण सचिव

### १७३७–१७५७

चिमणाजी नारायणांचे कारकीर्दींत एकच महत्त्वाची गोष्ट झाली. आजपर्यंत शंकराजी नारायण व नारो शंकर हे कधीं राजगडावर, कधीं रोहिड्यावर व कधीं नेरें वगैरे ठिकाणीं राहत असत. सचिवांच्या संस्थानचें कायमचें असें ठिकाण ठरलेलें नव्हतें. शंकराजी नारायणांची सर्व कारकीर्द धामधुमींत व लढाईंत गेली. त्यामुळें त्यांना आपलें एक ठिकाण करतां आलें नाहीं. नारो शंकरांचा कालहि धामधुमींत गेला. चिमणाजी नारायण



विश्रामघाट ऊर्फ अंबाडखिंड  श्रीमंत ताईसाहेब पंतसचिव यांनीं सन १८६५–६६ इ.पासून अंबाडखिंडीवर अन्नछत्र सुरू केलें तें आजतागायत चालू आहे

सं. पा. २७

यांना स्वस्थतेचा काल मिळाल्यामुळें व त्यांचेकडे बाहेरची जबाबदारीची कामगिरी नसल्यामुळें त्यांना संस्थानचें राजधानीचें एक ठिकाण करतां आलें. ते नेरें येथें राहत असत. तेथील त्यांचा वाडा जळाल्यामुळें त्यांनीं नीरा नदीच्या कांठचें भोर गांव पसंत करून तेथें वाडा बांधला, व तें गांव १७४० मध्यें राजधानीचें ठिकाण केलें. तेव्हांपासून सचिवांच्या जहागिरीस भोर संस्थान हें नांव प्राप्त होऊन भोर हें राजधानीचें ठिकाण झालें.

चिमणाजी नारायणांच्या कारकीर्दींत १७५० सालीं पेशव्यांनीं त्यांचा सिंहगड किल्ला घेऊन त्याचे मोबदला सचिवांस तुंग व तिकोना हे दोन किल्ले व शिरवळ येथील खालसा अंमल हे दिले.

चिमणाजी नारायण यांस तीन पुत्र होते. वडील पुत्राचें नांव सदाशिवराव, दुसऱ्याचें आनंदराव व तिसऱ्याचें रघुनाथराव. चिमणाजी नारायण सन १७५७ मध्यें भोर येथें परलोकवासी झाले. त्यांचेमागून त्यांचे वडील पुत्र सदाशिवराव सचिवपदाचे अधिकारी झाले.

---

## ४. सदाशिव चिमणाजी सचिव

### १७५७–१७८७

या कारकीर्दींत १७६३ सालीं मोगल पुणें लुटण्याच्या इराद्यानें आले. त्यांनीं वाई, भोर व नीराथडीचे गांव लुटून खूप पैसा खंडणीदाखल गोळा केला. त्यांनीं भोरची पेठ मारली व भोर संस्थानचें फार नुकसान केलें. हें नुकसान भरून काढण्यास पुढें बरींच वर्षें लागलीं. सदाशिव चिमणाजी १७८७ मध्यें निपुत्रिक वारल्यामुळें त्यांचे धाकटे बंधूंस सचिवपदाचीं वस्त्रें मिळालीं.

## ५. रघुनाथ चिमणाजी सचिव

### १७८७–१७९१

रघुनाथ चिमणाजी चार वर्षें संस्थानचा उपभोग घेऊन ते १७९१ मध्यें वारले. त्यांना एक औरस पुत्र होता. त्याचें नांव शंकरराव ऊर्फ बाबासाहेब असें होतें. ते पुढें सचिवपदाचे अधिकारी झाले.

# ६. शंकरराव रघुनाथ ऊर्फ बाबासाहेब

## १७९१–१७९८

बाबासाहेब हे जात्या थोडेसे भोळसर होते. ते गादीवर आले तेव्हां त्यांच्या दरबारांत आपसांत बरींच वैमनस्यें होतीं. त्यामुळें त्यांचा कारभार बरोबर चालेनासा झाला.

छत्रपतींच्या ताब्यांतील कोणत्याहि प्रधानांच्या, सरदारांच्या व जहागिरदारांच्या जहागिरींत व संस्थानांत अव्यवस्था झाली व ती निदर्शनास आली तर ती दूर करून कांहीं काल तेथील राज्यकारभार वरिष्ठ सरकारांतून कामगार नेमून करण्याची पूर्वीपासून वहिवाट होती. सन १७५० पासून छत्रपतींचे सर्व अधिकार पेशव्यांकडे आले असल्यानें संस्थानच्या राज्यकारभाराचा बंदोबस्त पुणें दरबारांतूनच होत असे.

भोरच्या कारभाराची अव्यवस्था पुणें दरबारास कळल्यावर नाना फडणविसांनीं आपल्या मर्जीतल्या बाजी मोरेश्वर नांवाच्या गृहस्थास कारभारी नेमून भोरास पाठविलें. त्यानें वास्तविक कारभाराची व्यवस्था करावयास पाहिजे होती. पण हा इसम अत्यंत नीच, फाजील महत्त्वाकांक्षी व दुष्ट वृत्तीचा होता. त्यानें भोरच्या कांहीं आपमतलबी लोकांस वश करून घेतलें. जुन्या अनुभवी लोकांना कामावरून दूर करून आपल्या बगलेंतल्या लोकांच्या नेमणुका करण्यास त्यानें सुरुवात केली. नानांचा त्यावर भारी विश्वास होता; त्याचा फायदा घेऊन, बाबासाहेबांस वेड लागलें आहे असें त्यानें नाना फडणवीस यांस भासविलें, व नानांसहि तें खरें वाटूं लागलें. बाजीनें पुढें बाबासाहेबांचा छळ करण्यास सुरुवात केली. त्याची इच्छा संस्थान बळकावण्याची होती. बाबासाहेबांच्या हितकर्त्या मंडळींनीं पुणें दरबारास खरा प्रकार कळविण्याचा प्रयत्न केला, परंतु तेथें त्यांची दाद लागेना. बाजी मोरेश्वरानें सर्वांचीं तोंडें बंद केलीं होतीं. बाबासाहेब शेवटीं बाजी मोरेश्वराचे छळास त्रासून जेजुरीस जाऊन राहिले. त्यांची पत्नी सखारामबापू बोकिलांची कन्या होती ती त्यांच्याजवळ होती. तेथेंहि या नीचानें मारेकरी घालून बाबासाहेबांस ठार मारण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांच्या पत्नीच्या प्रसंगावधानानें व चतुरपणा-

मुळें त्यांतून ते वांचले. पुण्यापासून भोर अगदीं नजीक म्हणजे १५-१६ कोस असतांहि पुणें दरबारास भोरास सुरू असलेल्या बेबंदशाहीची दाद लागूं नये हें आश्चर्यच आहे. यावरून या वेळीं पुणें दरबारांत किती हलगर्जीपणा शिरला होता हें स्पष्ट दिसतें.

सुदैवानें महादजी शिंदे—ज्यांस पाटिलबोवा म्हणत ते—या वेळीं पुण्यास होते. नानांचे विरुद्ध त्यांचेकडे बऱ्याच तक्रारी आल्या होत्या. त्यांतच सचिवांच्या छळाची बातमी त्यांस कळली. सचिवांची दाद लावण्याचें त्यांनीं मनावर घेऊन सवाई माधवराव पेशवे यांच्या कानावर सचिवांच्या छळाची बातमी घातली. पेशव्यांना कांहींच माहीत नव्हतें. भर दरबारांत नानांच्या व पेशव्यांच्या समोर पाटिलबोवांनीं बाजी मोरेश्वराच्या कृत्यांचा पाढा वाचला. तेव्हां नानांना खालीं मान घालावी लागली. पाटिलबोवांनीं सचिवांस पुण्यास मोठ्या सन्मानानें आणून त्यांचा योग्य सत्कार केला. पाटिलबोवांनीं स्पष्ट सांगितलें कीं, आम्ही पेशव्यांप्रमाणेंच सचिवांना मानतों. ते अष्टप्रधानांपैकीं एक प्रमुख प्रधान आहेत. पाटिलबोवांनीं जेव्हां नानांची फटफजीती केली तेव्हां नानांनीं बाजी मोरेश्वरास व त्याच्या साथिदारांस बोलावून त्यांची चौकशी करून त्यांना कडक शिक्षा दिल्या.

पाटिलबोवांनीं मनावर घेतलें म्हणूनच बाबासाहेबांची सुटका होऊन ते आपल्या संस्थानचा कारभार करूं लागले. पाटिलबोवांचे उपकार सचिव घराण्यांतील मंडळी अद्यापहि स्मरतात.

बाबासाहेबांनीं तीन लग्नें केलीं होतीं. तिसरें लग्न त्यांनीं सन १७९६ सालीं केलें. त्यांना औरस संतति नव्हती, म्हणून त्यांनीं दत्तक पुत्र घेऊन त्याचें नांव चिमणाजी शंकर ऊर्फ नानासाहेब ठेविलें; व त्यास गादीचा वारस करून ठेविलें. बाबासाहेब सन १७९८ सालीं वारले. त्यांचें तिसरें कुटुंब ताईसाहेब त्यांच्या मागें राहिल्या.

## ७. चिमणाजी शंकर ऊर्फ नानासाहेब

### १७९८–१८२७

नानासाहेबांना आपली कारकीर्द त्रासांतच काढावी लागली. प्रथम कांहीं दिवस त्यांचें व त्यांच्या सापत्न मातोश्री ताईसाहेब यांचें बरें होतें. पुढें नानासाहेब मुखत्यारीनें कारभार करूं लागले, तेव्हां कित्येक बाबतींत त्यांचें व ताईसाहेब यांचें पटेना. ताईसाहेब महत्त्वाकांक्षी होत्या. आपल्या हातांत राज्य-कारभार असावा अशी त्यांना इच्छा उत्पन्न झाली व मुलाविरुद्ध कट करण्यास त्यांनीं सुरुवात केली. त्यांच्या पक्षास कांहीं मंडळी मिळाली. सचिवांना वाठारच्या निंबाळकरांचें देणें होतें. ताईसाहेबांनीं निंबाळकरांस भोरास बोलावून त्यांच्या-कडून दंगा करविला व नानासाहेबांना भोरास त्यांच्या वाड्यांतच अटकेंत ठेविलें. पुणें दरबारीं जेव्हां ही बातमी कळली तेव्हां सन १८१५ सालीं बाजीराव पेशव्यांनीं बापू गोखले यांस भोरास पाठविलें. त्यांनीं निंबाळकरांचें बंड मोडून सचिवांची मुक्तता केली. नंतर ताईसाहेब रोहिडे किल्ल्यावर राहण्यास गेल्या. पुढें कांहीं वर्षांनीं त्यांना दरसाल १७००० रुपयांची नेमणूक करून देण्यांत आली. नेमणूक मिळाल्यावर त्या माहुलीस जाऊन राहिल्या व त्यांनीं आपलें पुढील आयुष्य तीर्थयात्रा व सत्कर्में करण्यांत घालविलें.

भोर संस्थानच्या दरबारची व्यवस्था बाजीरावांनीं केली, परंतु त्यांस त्यांच्या दरबारची व्यवस्था करतां आली नाहीं. पुणें दरबाराविषयीं असंतोष माजून इंग्रज सरकारास पेशव्यांबरोबर युद्ध करणें भाग पडलें. पुणें सोडून बाजीराव पळत सुटले, तेव्हां इंग्रजांनीं सन १८१७ च्या अखेरीस पुणें शनवारवाड्यावर आपलें निशाण लाविलें, व पेशव्यांचें राज्य खालसा केल्याचा जाहिरनामा सन १८१८ मध्यें प्रसिद्ध केला. सचिव दूरदर्शीपणानें इंग्रजांस मिळाले व पुढें सन १८२० सालीं नानासाहेबांचा इंग्रज सरकारशीं तह झाला. या तहामुळें इंग्रज सरकारशीं संबंध येऊन सचिव घराणें इंग्रज सरकारशीं राज-निष्ठेनें वागूं लागलें.

सन १८२५ चे सुमारास साताराचे छत्रपति प्रतापसिंह महाराज आपल्या बंधूंसह नानासाहेबांचे इच्छेवरून भोरास आले होते. त्यांना नाना-

साहेबांनीं पांच दिवस ठेवून घेऊन उत्तम मेजवानी दिली, व पोषाख, वस्त्रें वगैरे देऊन त्यांना निरोप दिला. नानासाहेबांस औरस संतति नसल्यामुळें त्यांनीं आपल्या पूर्वींच्या घरच्या सापत्न बंधूस दत्तक घेऊन त्याचें नांव रघुनाथ चिमणाजी ठेवून त्यास गादीचा वारस केलें. नानासाहेब सन १८२७ सालीं परलोकवासी झाले व रघुनाथ चिमणाजी गादीवर आले.

---

## ८. रघुनाथ चिमणाजी ऊर्फ रावसाहेब

### १८२७–१८३६

रघुनाथराव चिमणाजी अधिपति झाले तेव्हां ते वयांत आले नसल्यामुळें संस्थानचा कारभार त्यांच्या सापत्न मातोश्री भवानीबाईसाहेब पाहत असत. त्या महत्त्वाकांक्षी असल्यामुळें रघुनाथ चिमणाजी यांनीं वयांत आल्यावर कारभार हातीं घेतला तरी त्यांच्या मातुःश्रींनीं त्यांना स्वतंत्रपणें कारभार कधींहि करूं दिला नाहीं. यामुळें मायलेकांत वैमनस्य येऊन कंपनी सरकारमार्फत भवानीबाईसाहेबांना दरसाल १४००० रुपयांची नेमणूक करून देण्यांत आली व तंटा मिटून स्वस्थता झाली.

रावसाहेबांच्या कारकीर्दींत इंग्रजी हद्दींत उमाजी नायकानें बंड केलें होतें. तें मोडण्यास भोर दरबारनें चांगली मदत केली. या कारकीर्दींत सुधागड तालुक्यांतील कांहीं गांवांचा मोबदला झाला. या मोबदल्यामुळें सचिवांचें नागोठणें बंदर गेलें. रघुनाथ चिमणाजी १८३६ सालीं दिवंगत झाले व त्यांचे दत्तक पुत्र चिमणाजी रघुनाथ गादीचे मालक झाले.

---

## ९. चिमणाजी रघुनाथ ऊर्फ नानासाहेब

### १८३६–१८७१

सन १८३६ सालीं रघुनाथराव मृत्यु पावले त्या वेळीं त्यांचे दत्तक पुत्र चिमणाजी ऊर्फ नानासाहेब यांचें वय फक्त तीन वर्षांचें होतें. त्यांच्या मातोश्री गंगाबाईसाहेब यांचें वय त्या वेळीं जरी बरेंच लहान होतें तरी त्या फार विचारी, पोक्त व संभावित होत्या, अशी भोर संस्थानांत त्यांची मोठी कीर्ति आहे. त्यांचे पति रघुनाथराव निवर्तल्यावर अज्ञान नानासाहेबांचें पालनपोषण

करण्याचें व संस्थानच्या राज्यकारभारावर देखरेख करण्याचें जबाबदारीचें काम गंगाबाईसाहेब यांचेवर येऊन पडलें.

सन १८३६ सालीं नानासाहेबांचें दत्तविधान झालें. परंतु त्याची मंजुरी सातारचे प्रतापसिंहमहाराज व इंग्रज सरकार यांचेकडून यावयाची होती, ती मंजुरी येण्यास तीन वर्षें लागलीं. याचें कारण असें झालें कीं, सातारचे महाराज प्रतापसिंह व त्यांचे बंधु अप्पासाहेब यांच्यामध्यें वैमनस्य येऊन अप्पा-साहेबांस साताऱ्यास राहणें धोक्याचें वाटूं लागलें. त्या कारणानें ते नजीकच्या माळावर येऊन राहिले होते. त्यांजकडे चौकी-पहाऱ्यास व बंदोबस्तास माणसें, शिपाई व सामान वगैरेंची सर्व तजवीज नानासाहेबांच्या मातोश्री गंगाबाईसाहेब व त्यांचें कारभारीमंडळ यांनीं उत्तम प्रकारची ठेविली होती. पुढें सन १८३९ मध्यें प्रतापसिंहमहाराज इंग्रज सरकारच्या विरुद्ध दंगा व फितुरी करण्याची मसलत करीत आहेत अशी इंग्रज सरकारची खात्री होऊन त्यांनीं प्रतापसिंहमहाराजांस पदच्युत करून काशीस ठेविलें; व अप्पासाहेबांस सातारच्या गादीवर बसविलें. अप्पासाहेब गादीवर आल्यानंतर कठिण समयीं सचिवांनीं केलेले उपकार स्मरून नानासाहेबांचें दत्तविधान मंजूर करण्याबद्दल त्यांनीं ताबडतोब इंग्रज सरकारकडे लिहिलें, व त्याप्रमाणें इंग्रज सरकारकडून मंजुरी येऊन सन १८३९ सालीं नानासाहेबांचें सचिवपद कायम झालें. या वेळीं पूर्वीं प्रतापसिंहमहाराजांनीं सचिवांकडून जो १५००० रुपये नजराणा घेण्याचें ठरविलें होतें तो अप्पासाहेबांनीं माफ केला.

## नानासाहेबांच्या अज्ञानावस्थेंतील राज्यकारभार

रावसाहेबांच्या मृत्यूपासून नानासाहेबांच्या मातोश्री गंगाबाईसाहेब या भोर संस्थानचा कारभार भोर संस्थानांतील तीन कारभारी नेमून त्यांच्या मदतीनें मोठ्या दक्षतेनें चालवूं लागल्या. त्या तिघां कारभाऱ्यांबद्दल त्यांनीं सातारच्या दरबारची व इंग्रज सरकारची मंजुरी मिळविली होती. सन १८४१ सालीं गंगाबाईसाहेब कैलासवासी झाल्या. त्यामुळें संस्थानचा सर्व राज्यकारभार वरील तिघां कारभाऱ्यांवर येऊन पडला. हे तिघे कारभारी आपआपलीं कामें इमानानें व मोठ्या जबाबदारीनें बजावीत होते, व त्यांचेवर सातारच्या दरबारची

व इंग्रज सरकारची सक्त नजर होती. यामुळें कारभारांत अव्यवस्था झाली नाहीं. संस्थानचा कच्चा हिशेब दरवर्षी साताराचे दरबारीं व इंग्रज सरकाराकडे द्यावा लागे व दोन्ही दरबारांच्या हुकुमानें संस्थानांतील महत्त्वाचीं कामें चालत.

## विवाह

सन १८४४ सालीं ताईसाहेबांनीं आपल्याविषयीं लोकांच्या मनांतील पूर्वींची अढी नाहींशी व्हावी म्हणून आपले बंधु मल्हारराव अंबेकर यांच्या कन्येबरोबर नानासाहेबांचें लग्न भोर येथें मोठ्या समारंभानें केलें. नववधूचें नांव सरस्वतीबाई ठेविलें. त्यांना माईसाहेब असें म्हणत. या नवीन नात्यामुळें ताईसाहेबांची नानासाहेबांवर अत्यंत ममता होती. पुढें त्यांच्या पूर्ववयांतील हकीकतीचें कोणासहि स्मरणसुद्धां राहिलें नाहीं. ताईसाहेबांनीं अंबाडखिंडीवर विश्रामघाट बांधून अन्नछत्र ठेविलें. त्याची व्यवस्था आजतागायत संस्थान-मार्फत चालू आहे.

सन १८४८ सालीं साताराचे छत्रपति अप्पासाहेब कैलासवासी झाले. ते निपुत्रिक असल्यामुळें इंग्रज सरकारच्या हुकुमानें सन १८४९ सालीं साताराचें राज्य खालसा होऊन मराठेशाही नष्ट झाली.

यापुढें साताराच्या कमिशनरसाहेबांचे सल्लामसलतीनें संस्थानचा राज्यकार-भार चालूं लागला. जे संस्थानिक मोठे असून आपल्या संस्थानचा कारभार चालवीत होते त्यांच्या कारभारावर सार्वभौम सरकारनें बारीक नजर ठेविली; पण लक्ष घातलें नाहीं. ज्या संस्थानचे मालक अल्पवयी असून त्यांच्या संस्थानचा कारभार कारभाऱ्यासारख्या तिऱ्हाइतामार्फत चालत होता त्या संस्थानच्या कारभारासंबंधीं मात्र इंग्रज सरकार, आपल्या मुलुखांतील कारभारा-संबंधानें त्यास जितकी काळजी घ्यावी लागत असे तितकीच काळजी संस्था-नांच्या हिताकरितां घेत होतें व त्यांच्या कारभारावर सतत नजर ठेवीत होतें. भोर संस्थानची स्थिति या वेळीं अशीच होती.

नानासाहेबांचें वय या वेळीं सुमारें १७ वर्षांचें होतें. सन १८४९ मध्यें झालेल्या क्रांतीनें संस्थानच्या कारभारांत कांहींएक फरक झाला नाहीं. कारभाऱ्यांच्या मार्फतच राज्यकारभार चालला होता. संस्थानचा कच्चा हिशेब

पूर्वी प्रथम सातारा दरबारांत गुदरून मग इंग्रज सरकारकडे गुदरला जात असे. तो आतां कारभाऱ्यांनीं फक्त सातारा कमिशनरकडे गुदरावा एवढा फरक झाला.

## मुखत्यारी

याप्रमाणें १८५१ पर्यंत कारभाऱ्यांचे मार्फत कारभार चालला होता. या सालीं नानासाहेब २० वर्षांचे झाले. तेव्हां इंग्रज सरकारांतून मुंबई सरकारच्या हुकुमानें साताराचे कमिशनर मि. थॉमस ऑजिल्व्ही (Mr. Thomas Ogilvie) साहेब यांच्या मार्फत भोर संस्थानचीं राज्यसूत्रें नानासाहेबांच्या हातीं आलीं.

" नानासाहेबांनीं आपल्या संस्थानचा कारभार कुलमुखत्यारीनें पाहावा. तो चालविण्यास ते सर्व प्रकारें योग्य आहेत अशी इंग्रज सरकारची खात्री आहे. नानासाहेबांनीं सर्व दौलतीचा कारभार आपल्या मर्जीप्रमाणें चालवावा अशी इंग्रज सरकार त्यांस मोठ्या आनंदानें परवानगी देत आहे. " या आशयाचें कमिशनरनीं नानासाहेबांस पत्र पाठवून सन १८५२ मध्यें संस्थानचा कारभार त्यांच्या स्वाधीन केला. त्यांच्या कारभारावर पूर्वीप्रमाणें देखरेख राहील व त्यांनीं दरवर्षी कच्चा हिशेब देत जावा, असें त्यांना इंग्रज सरकारनें कळविलें.

## नानासाहेब गादीवर आले त्या वेळची संस्थानची सांपत्तिक स्थिति

या वेळची संस्थानची सांपत्तिक स्थिति फार निकृष्ट होती. संस्थानांत मागें तीनचार कारकीर्दीपासून जें कर्ज शिरलें होतें तें फिटलें नव्हतें. हें कर्ज पूर्वी संस्थानच्या दोनतीन पुरुषांस संस्थानची मालकी मिळण्याच्या वेळीं नजराणे भरण्याकरितां काढावें लागलें होतें. नानासाहेब जेव्हां संस्थानचा कारभार पाहूं लागले त्या वेळीं त्यांची स्थिति एखाद्या मध्यम स्थितींतील गृहस्थाच्या स्थिती-सारखी होती. संस्थानचा गाडा बराच खिळखिळा व जीर्ण झालेला, अशा स्थितींतच तो पुढें चालविण्याकरितां नानासाहेबांच्या हातांत आला. यामुळें त्यांच्या अंगावर मोठी जबाबदारी येऊन पडली. तथापि नानासाहेब धैर्यवान् असल्यामुळें ते गांगरून गेले नाहींत. ते संस्थानची स्थिति सुधारण्याच्या प्रयत्नास लागले. त्या वेळचे साताराचे कमिशनर सर बार्टल फ्रिअर हे बरेच दिवस या संस्थानचे रेसिडेंट असल्यानें नानासाहेबांच्या अज्ञानावस्थेतील भोर

चित्रांक ७



श्री. चिमणाजी रघुनाथ ऊर्फ नानासाहेब, नववे पंतसचिव ( हल्लींच्या संस्थानाधिपतींचे आजे ).

कारकीर्द स. १८५२ पासून स. १८७१ पर्यंत. [ सं. पा. २८

संस्थानची त्यांस चांगली माहिती झाली होती. त्यांची नानासाहेबांवर अत्यंत मर्जी असे. त्यांनीं नानासाहेब गादीवर आल्यानंतर संस्थानास जें बऱ्याच दिवसांचें कर्ज होतें त्याची तडजोड दोन वर्षांत लाविली. त्यामुळें नानासाहेबांची बरीच काळजी निवारण होऊन त्यांस उमेद येत चालली.

## पुत्रजन्मोत्सव

इ. स. १८५४ सालीं नानासाहेबांस आणखी उमेद व आनंद होईल अशी एक गोष्ट घडून आली. ती म्हणजे पुत्ररत्नप्राप्ति ही होय. मुलाचें नांव शंकरराव असें ठेविलें. त्यांना पुढें रावसाहेब म्हणत असत. या पुत्रजन्मामुळें नानासाहेबांनाच नव्हे तर भोर संस्थानच्या सर्व प्रजाजनांस अत्यानंद होणें अगदीं स्वाभाविक होतें. त्या वेळीं लॉर्ड डलहौसीसाहेबांची कारकीर्द चालू होती. त्या कारकीर्दींत कोणत्याहि संस्थानचें अस्तित्व औरस संततीवर कसें अवलंबून होतें हें इतिहासज्ञांस सांगण्याचें कारण नाहीं. औरस संततीच्या अभावीं एतद्देशीय संस्थानें नष्ट करण्याचा डलहौसीसाहेबांनीं सपाटा सुरू केला होता व या पद्धतीचें पर्यवसान पुढें बंडांत कसें झालें हें सांगण्याचें कारण नाहीं. शंकररावांच्या जन्मामुळें हा औरस संततीचा लाभ भोर संस्थानच्या गादीस व सचिवांच्या घराण्यास पन्नास-साठ वर्षांनीं व तीन-चार पिढ्यांनंतर झाला. म्हणून हा कपिलाषष्ठीच्या अपूर्व योगाप्रमाणें वाटून संस्थानांत जिकडे तिकडे आनंदमहोत्सव करण्यांत आला.

## राज्यांत सुधारणा

कर्जाची तडजोड झाल्यामुळें नानासाहेबांस मोठी उमेद येऊन ते संस्थान कर्जमुक्त करून संस्थानांत सुधारणा करण्याच्या उद्योगास लागले.

नानासाहेबांनीं पहिलीं सहासात वर्षें घरगुती कामकाजाकडे लक्ष लावण्यांत व संस्थानांत नवीन तऱ्हेच्या सुधारणा हलके हलके अमलांत कशा आणाव्यात या विचारांत घालविलीं. सन १८५८ सालीं भोरची पेठ आग लागून जळून गेली होती, ती त्यांनीं लोकांस तगाई व मदत देऊन नवीन बांधविली. याच सालीं त्यांनीं रावसाहेबांचें मौंजीबंधन मोठ्या थाटानें केलें.

नानासाहेब हौशी असल्यानें त्यांनीं आपल्या एकुलत्या एक लाडक्या मुलाचें लग्न सन १८६१ सालीं भोर येथें सरदार माधवराव विठ्ठल विंचुरकर यांच्या कन्येबरोबर मोठ्या समारंभानें केलें. परंतु लग्न झाल्यानंतर तीन वारांनीं नव-वधू कॉलऱ्यानें विंचूर येथें काळवश झाली ! या अपमृत्यूनें विंचूरकर घराण्याशीं तुटलेला संबंध कायम राहावा म्हणून रावसाहेबांचें दुसरें लग्न माधवराव विठ्ठल विंचूरकर यांचे वडील बंधु कृष्णराव विठ्ठल विंचूरकर यांच्या कन्येबरोबर सन १८६२ सालीं नसरापूर येथें झालें. याच श्रीमंत बाबा-साहेबांच्या मातोश्री होत. यांना जिजीसाहेब म्हणत असत.

सन १८५७ सालचा बंडाचा वणवा विझल्यानंतर राणीसाहेबांचा जाहिरनामा प्रसिद्ध झाला. पुढें सन १८६२ सालीं संस्थानिकांना दत्तक घेण्याच्या परवानगीची राणीसाहेबांची सनद त्यांच्या प्रतिनिधीमार्फत सर्व संस्थानिकांबरोबर नानासाहेबांसहि मुंबई सरकारकडून साताराचे कलेक्टर-मार्फत भोरास मिळाली.

सन १८६२ सालापासून संस्थानच्या भरभराटीस खरोखर आरंभ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. भोर हें गांव नीरा नदीचे कांठीं वसलें आहे. तरी नदीकांठच्या भागाशिवाय इतर भागास नदीचे पाण्याचा उपयोग नाहीं. भोरच्या लोकांचे पाण्याचे हाल दूर करण्याचें नानासाहेबांच्या मनांत फार असल्यामुळें त्यांनीं १८६३ सालीं भोरपासून एक मैलावर असलेल्या राम ओढ्यास धरण बांधून व त्याचें पाणी नळानें शहरांत आणून त्याची विपुलता करून सोडली. जागजागीं सार्वजनिक हौद बांधून शिवाय गांवांतील लोकांना त्यांचे घरींहि त्यांचेवर कराचा बोजा न घालतां मोफत नळ दिले. या पाण्याकरितां नानासाहेबांना एक लाख रुपये खर्च आला. तरी लोकांच्या सोयीकरितां तो त्यांनीं उदार अंतःकरणानें सोसून आपलें प्रजावात्सल्य प्रकट केलें. या त्यांच्या सत्कृत्याचें विस्मरण भोरच्या नागरिकांस कधींहि होणें शक्य नाहीं.

नानासाहेबांच्या दक्षतेमुळें संस्थानची स्थिति सुधारत चालली होती. कर्ज नाहींसें होत चाललें होतें व रयतेच्या सुखाकरितां इंग्रज सरकारच्या मर्जी-प्रमाणें नानासाहेब दरवर्षी कांहींतरी सुधारणा संस्थानांत करीत होते, व त्याबद्दल त्यांना सरकारांतून शाबासकीहि मिळत होती.

चित्रांक ८



भोर येथील राजवाडा; श्रीमंत नानासाहेब यांचे कारकीर्दीत इ. स. १८६९ सालीं हा वाडा बांधण्यांत आला. [ सं. पा ३२

इंग्रज सरकारच्या राज्यपद्धतीस अनुसरून नानासाहेबांनीं रयतेच्या बंदोबस्ताकरितां पोलिस उभारून ठिकठिकाणीं चौक्या वगैरे बांधिल्या. इंग्रज सरकारच्या नवीन पोषाखाच्या धर्तीवर संगीनवाल्या पहारेकऱ्यांची नवीन छोटीशी पलटण तयार केली. सर्व रयतेस न्याय मिळावा व तिची दाद लवकर लागावी म्हणून संस्थानच्या परगण्याच्या ठिकाणीं मामलेदार, मॅजिस्ट्रेट व मुनसफ वगैरे कचेऱ्या स्थापन केल्या. निरनिराळ्या कामांसंबधींचे अधिकार सगळ्यांना यथाप्रमाण वांटून दिले. यापूर्वी मुलकी, दिवाणी व फौजदारी वगैरे कामांचे सर्व अधिकार परगण्याच्या एकट्या मामलेदारास किंवा वहिवाटदारासच असत. कोर्ट फी सुरू केली.

## मुंबईचे गव्हर्नर सर बार्टल फ्रिअर यांची भोरास भेट

नानासाहेब अज्ञानावस्थेंत असतांना भोर संस्थानची स्थिति व कारभार मे. सर बार्टल फ्रिअर हे त्या वेळीं सातारा प्रांताचे कमिशनर असतांना त्यांना माहित होती. ते आतां मुंबईचे गव्हर्नर झाले होते. तेव्हां संस्थानची पूर्वीची व्यवस्था व आतांची व्यवस्था नामदारसाहेबांनीं पाहून जावी या हेतूनें नानासाहेबांनीं साहेबबहादुरांस भोरास येण्याबद्दल विनंति केली. त्याप्रमाणें नामदार फ्रिअरसाहेब सन १८६० च्या मे महिन्यांत भोरास येऊन गेले. त्या वेळीं मोठ्या थाटानें त्यांचें स्वागत त्यांनीं केलें. पुढें संस्थानचे मागें दरवर्षी सरकारांत कच्चा हिशेब पाठविण्याचा जो ससेमिरा लागला होता तो काढून टाकण्याबद्दल नानासाहेबांनीं सरकारकडे विनंति केली. नानासाहेबांची उत्तम राज्यव्यवस्था सरकारच्या नजरेसमोर असल्यामुळें सरकारासहि त्यांची विनंति अमान्य करतां येईना. वरिष्ठ सरकारनें नानासाहेबांची विनंति मोठ्या उदार अंतःकरणानें मान्य करून सन १८६४ सालीं संस्थानच्या मागचा कच्चा हिशेब देण्याचा तगादा बंद केला.

## पुण्यांतील पहिला दरबार

नामदार गव्हर्नरसाहेब सर बार्टल फ्रिअर हे आपल्या अंगच्या अनेक गुणांनीं लोकप्रिय होते. सर्व लहानमोठ्या एतद्देशीय लोकांच्या मनांत त्यांच्या संबंधानें मोठा आदर व प्रेम होतें. साताऱ्चें राज्य खालसा झाल्यानंतर त्यांनीं

सन १८६५ सालीं पुण्यास मोठा दरबार भरविला होता. नानासाहेबांस बोलाविल्यावरून ते तेथें गेले होते.

नामदारसाहेब विलायतेस जाण्यापूर्वी सर्वांची भेट घ्यावी म्हणून त्यांनीं पुण्यास सन १८६६ सालीं दुसरा मोठा दरबार भरविला. या दरबारास महाराष्ट्रांतील सर्व संस्थानिकांस आणि मोठमोठ्या सभ्य व वजनदार लोकांस त्यांनीं निमंत्रण केलें होतें. नानासाहेबहि गेले होते. नामदारांनीं सर्वांची मोठ्या प्रेमानें भेट घेऊन त्यांना निरोप दिला.

या दरबारास कोल्हापूरचे छत्रपति राजाराम महाराज व दुसरे मोठमोठे संस्थानिक आले होते. नवीन पद्धतीप्रमाणें त्यांची त्यांच्या इतमामा-प्रमाणें बसण्याची व्यवस्था केली होती. नामदारांचे उजव्या बाजूस पुढील क्रमानें बसण्याची व्यवस्था होती.

१ प्रतिनिधि;

२ अक्कलकोटचे राजे;

३ सचिव. त्यांचे खालीं निंबाळकर, डफळे, सावनूरकर, मुधोळकर, घोरपडे, सांगलीकर, मिरजकर, जमखिंडीकर, कुरुंदवाडकर, रामदुर्गकर.

याप्रमाणें दरबारांत बसण्याचा क्रम लावण्यांत आला होता.

## प्रवास

नानासाहेबांना प्रवासाची फार इच्छा होती, परंतु राज्याची व्यवस्था करण्याच्या कामामुळें त्यांना १८६८—६९ सालापर्यंत सवडच मिळाली नाहीं. या सालीं ते प्रवासास निघाले. सुरत, अहमदाबाद वगैरे शहरें पाहिल्यावर पुढें जाण्याचा बेत रहित करून त्यांना परत यावें लागलें.

## अग्निप्रकोपाचें संकट

सन १८६९ सालीं रामनवमीचा उत्सव झाल्यावर अग्निनारायणानें एकाएकीं प्रकट होऊन भोर येथील भव्य राजवाड्याचा स्वाहा केला. संस्थान कर्जमुक्त होण्याच्या बेतांत असतां नानासाहेबांवर हें संकट आलें. तथापि धैर्य न सोडतां इंग्रज सरकारकडून कर्ज घेऊन नानासाहेबांनीं एका वर्षांत मोठा टोलेजंग वाडा उठवून देऊन झालेल्या नुकसानीचा आपल्या मनावर परिणाम होऊं दिला नाहीं. या वाड्यास दोन लाख रुपये खर्च झाला. संस्थाननें काढलेलें कर्ज पुढें लवकरच फेडण्यांत आलें.



भो ये नदीस बांधलेल्या घाटाचा देखा नानासाहेब नवव्वे पंतसचिव यांनीं घाट बांधला. [सं. पा. ३३

## इतर सुधारणा व देणग्या

नानासाहेबांस बाग-बगीचाचा व इमारतींचा अतिशय षोक होता. संस्थानच्या राजधानीचे ठिकाणीं रामबाग, वाड्याशेजारीं परसांतील बाग, बंगला व भागवडीबाग तयार करून व नीरा नदीस घाट व दगडी पूल बांधून भोरास रमणीयता आणली. म्युनिसिपॅलिटी नव्हती तरी शहरांत ठिकठिकाणीं रस्त्यावर दिवे लावण्याची त्यांनीं सोय केली. तालुक्याचे ठिकाणींहि मोठमोठे वाडे बांधिले.

नानासाहेबांचा स्वभाव अत्यंत उदार होता. त्यांच्या औदार्याचा लाभ झाला नाहीं अशी भोर संस्थानच्या दरबारची मंडळी क्वचितच असतील. ते गुणिजनांचे मोठे चहाते होते. त्यांनीं आपल्या पदरीं बरेच गुणिजन ठेविले होते. त्यांच्या औदार्याचा फायदा प्रजेलाहि मिळत असे. त्यांच्या औदार्याबद्दल लोक अद्यापहि त्यांची कीर्ति गातात.

## शेवट

नानासाहेबांच्या हातीं अधिकारसूत्रें आलीं त्या वेळीं संस्थानास फार कर्ज होतें. तें नानासाहेबांनीं आपल्या कारकीर्दींत फेडून टाकलें. त्यांनीं राज्यकारभार दक्षतेनें चालविल्यामुळेंच त्यांना हें करतां आलें. त्या कालाला अनुसरून राज्यकारभारांत जितक्या सुधारणा करतां येणें शक्य होतें तितक्या केल्या. लोकांच्या सुखसोयींकडे लक्ष पुरवून लोकांचा दुवा मिळविला. संस्थानला व्यवस्थित स्वरूप दिलें. इतक्या गोष्टी त्यांनीं आपल्या १८ वर्षांचे अवधींत करून आपली कारकीर्द चिरस्मरणीय करून ठेविली. सन १८७१ सालीं त्यांनीं आपली इहलोकची यात्रा अकालीं संपविली.

# १०. शंकरराव ऊर्फ रावसाहेब

### १८७१–१९२२

रावसाहेबांचे वडील नानासाहेब परलोकवासी झाले त्या वेळीं म्हणजे सन १८७१ इ. सालीं रावसाहेब यांचें वय १७ वर्षांचें होतें. यामुळें राज्यकारभाराचीं सूत्रें त्यांच्या हातीं आलीं नाहींत. ते वयांत येईपर्यंत राज्यकारभार त्यांच्या मातोश्री माईसाहेब आणि इंग्रज सरकारतर्फे नेमलेले रा. ब. गोपाळ कृष्ण सोमण व

श्रीमंत रावसाहेबांचे आजे ( नानासाहेबांचे पूर्व घरचे वडील ) रामचंद्र काशी ऊर्फ अप्पासाहेब हे दोन कारभारी मिळून एकंदर तिघांचे विचारें चालत होता. संन १८७३ इ. सालीं माईसाहेब निवर्तल्या. त्यानंतर दोघां कारभाऱ्यांचे सल्ल्यानें कारभार चालूं लागला. सन १८७४ सालीं रावसाहेब वयांत आले. तेव्हां ता. ६ जुलै सन १८७४ इ. रोजीं त्यांना मुखत्यारी मिळून ते संस्थानचा राज्यकारभार पाहूं लागले.

सन १८७४ पासून सन १९२२ जुलैपर्यंत ४८ वर्षे त्यांनीं राज्यकारभार केला. इतकी दीर्घकाल कारकीर्द रावसाहेबांच्याशिवाय भोर संस्थानच्या इतिहासांत दुसरी कोणाचीहि झाली नाहीं. त्यांनीं आपल्या कारकीर्दीत बऱ्याच सुधारणा केल्या. पब्लिक वर्क्स, फॉरेस्ट, शिक्षण वगैरे निरनिराळीं खातीं निर्माण करून त्यांवर निरनिराळे अंमलदार नेमले. भोर व शिरवळ येथें दवाखाने सुरू केले. प्राथमिक व दुय्यम शिक्षणाचा बराच प्रसार झाला. भोर येथें हायस्कूल स्थापन होऊन मुंबई युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिक परीक्षेस विद्यार्थी बसूं लागले. भोर येथें व तालुक्याच्या ठिकाणीं पुष्कळ नवीन इमारती बांधण्यांत आल्या. दळणवळणाच्या सोईकरितां तालुक्यांतून नवीन सडका तयार करण्यांत आल्या.

रावसाहेबांना बाकीच्या संस्थानिकांबरोबर सन १८९७ सालीं दिवाणीचा स्पेशल अधिकार मिळाला, व त्यांची हुशारी व राजनिष्ठा पाहून सन १९०३ च्या दिल्लीदरबारच्या वेळीं त्यांना ९ तोफांच्या सलामीचा मान मिळाला. पुढें सन १९११ सालीं भरलेल्या दिल्लीदरबारच्या वेळीं आणखी दोन तोफांची वाढ होऊन ११ तोफांच्या सलामीचा मान मिळून त्याचबरोबर 'हिज हायनेस' ही पदवी मिळाली. हे मान वैयक्तिक असल्यामुळें पुढें त्यांच्या निधनाबरोबर ते नाहींसे झाले. सन १९२१ मध्यें फांशी देण्याचा अधिकार त्यांना मिळाला. त्यामुळें दिवाणी व फौजदारी संपूर्ण अधिकार मिळून संस्थानचा दर्जा बराच वाढला.

गादीवर आल्यानंतर प्रथम त्यांनीं जी सुधारणा केली ती ही कीं, श्रीरामाचा उत्सव निरंतर निर्वेधपणें चालावा म्हणून १२००० रु. वसुलाचीं गावें निराळीं तोडून देऊन रामसंस्थान म्हणून स्वतंत्र संस्था निर्माण केली. त्याचप्रमाणें आंबवडें येथील श्रीशंकराजी नारायण यांच्या समाधीची व्यवस्था निरंतर चालण्याकरितां १८००रु. उत्पन्नाचीं गावें देऊन आंबवडें संस्थान निराळें केलें.

चित्रांक १०




हिज हायनेस श्री. शंकरराव ऊर्फ रावसाहेब, दहावे पंतसचिव ( हल्लींच्या राजेसाहेबांचे वडील ).
( कारकीर्द सन १८७४ पासून सन १९२२ पर्यंत )

[ सं. पा. ३३

दौलतीशीं सदर गांवांचा संबंध ठेविला नाहीं. बऱ्याच देवालयांच्या जीर्णोद्धाराचीं कामेंहि त्यांचे हातून झालीं. त्यांनीं हिंदुस्थानांतील सर्व तीर्थयात्रा केल्या होत्या. काशी येथें एक शंकराचें देवालय बांधून त्यालगत लहानसा वाडा बांधला आहे. या देवस्थानच्या खर्चाची त्यांनीं कायमची व्यवस्था करून ठेविली आहे. तीर्थयात्रा करण्यांत व धर्मादायांत त्यांनीं पुष्कळ खर्च केला.

रावसाहेबांच्या विवाहाची हकीकत मागें देण्यांत आलीच आहे. त्यांच्या पत्नी जिजीसाहेब यांना सन १८७८ सालीं जें पुत्ररत्न झालें, तेंच आमचे चरित्र-नायक हल्लींचे संस्थानाधिपति श्रीमंत राजे रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब होत. जिजीसाहेबांना आणखीहि अपत्यें झालीं. त्यांची हकीगत पुढें यावयाची आहेच.

नियमितपणा, निरलसता, कामाची तडफ, दक्षता इत्यादि गुण राव-साहेबांच्या अंगीं प्रामुख्यानें वसत होते. इंग्रज सरकारांत त्यांनीं आपलें वजन चांगलें बसविलें होतें. त्यांचा स्वभाव अत्यंत मानी, हेकेखोर, करारी व दुराग्रही होता. मी म्हणेन तेंच झालें पाहिजे, अशी त्यांची वृत्ति असे. तिचा परिणाम घरच्या माणसांवर व नोकरवर्गावर होत असे. तरुणपणीं ते बरेच खर्चिक असत. पुढें ते काटकसरी बनले; व अखेरीस काटकसरीपणाचा अतिरेक झाला. त्याचा परिणाम सर्व खात्यांच्या कार्यक्षमतेवर झाल्यावांचून राहिला नाहीं.

जिजीसाहेबांची धर्मावर अत्यंत श्रद्धा असून त्यांचें अंतःकरण प्रेमळ असे. त्यांचा स्वभाव जवळजवळ रावसाहेबांच्या उलट होता. मनमिळाऊपणा, क्षमा-शीलता, दातृत्व, नोकरवर्गाबद्दल सहानुभूति इत्यादि गुणांमुळें जिजीसाहेबांबद्दल सर्वांच्या मनांत आदरबुद्धि व प्रेम वसत असे. रावसाहेबांच्या तापट स्वभावाचा अनुभव त्यांना लहानपणापासून होता. त्यामुळें त्या फार भिऊन वागत असत. रावसाहेबांचा संताप त्या आपल्या शांत वृत्तीनें नाहींसा करीत. रावसाहेबांवर त्यांनीं आपलें बरेंच वजन बसविलें होतें. यावरूनच त्यांच्या अंगीं किती श्रेष्ठ गुण वसत असले पाहिजेत हें दिसून येणार आहे. परस्पर भिन्न स्वभावांचा संयोग झाला असतांहि त्यांनीं आपलें जीवित शक्य तितकें सुखमय करण्यांत जें कौशल्य दाखविलें त्याबद्दल कोणालाहि त्यांच्याबद्दल कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. आयुष्यांत त्यांच्यावर अनेक दुःखाचे प्रसंग आले, परंतु अंगीं विवेक, शांतता, धर्मश्रद्धा इत्यादि गुण असल्यामुळें त्यांनीं सर्व संकटें धैर्यानें सहन करून आपलें चित्तस्वास्थ्य ढळूं दिलें नाहीं.

## प्रकरण २ रें

# ११. राजा श्रीमंत रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब

## ( चरित्रनायक )

### जन्म, बालपण, प्राथमिक शिक्षण, उपनयन वगैरे

### १८७८--१८९२

भोर संस्थानच्या राज्यकारभाराच्या नव्या मनूचे प्रवर्तक हल्लींचे संस्थानाधिपति राजेसाहेब श्रीमंत रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब यांचा जन्म भोर येथें आपले वाड्यांत भाद्रपद वद्य ८, शके १८००, म्हणजे ता. २० माहे सप्टेंबर सन १८७८ इसवी रोजीं झाला. श्रीमंत रावसाहेबांचें हें दुसरें अपत्य. पहिलें अपत्य कन्या असून तें सन १८७७ सालीं फेब्रुवारी महिन्यांत झालें होतें. परंतु तें एक वर्षानेंच म्हणजे सन १८७८ सालीं फेब्रुवारी महिन्यांतच कालवश झालें. या वेळीं श्रीमंत सौ. जिजीसाहेब गरोदर होत्या. पहिलें अपत्य गेल्यामुळें त्यांना फार दुःख झालें. परंतु त्या विवेकसंपन्न असल्यामुळें त्यांनीं आपल्या मनावर दुःखाचा परिणाम होऊं दिला नाहीं. लहानपणापासून त्यांची धर्माचरणाकडे प्रवृत्ति होती. या खेपेस आपणांस पुत्र व्हावा म्हणून त्यांनीं बरींच व्रतें केलीं व ईश्वरकृपेनें त्यांना वर सांगितल्याप्रमाणें सन १८७८ सालीं पुत्रलाभ झाला. या पुत्रलाभामुळें श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत सौ. जिजीसाहेब यांना गादीस वारस झाल्यामुळें अत्यानंद झाला. श्रीमंत रावसाहेबांच्या पूर्वीं भोर संस्थानच्या गादीवर बरेच दत्तक पुरुष आले होते. यामुळें या वेळीं येथें औरस संततीचें महत्त्व फार मोठें होतें. श्रीमंत बाबासाहेब यांच्या जन्माची वार्ता शहरांत पसरतांच सर्व वातावरण आनंदानें भरून गेलें. चौघडा झडूं लागला. शहरांतील सर्व देव-देवतांना व नागरिकांना हत्तीवरून साखर वाटण्यांत आली. त्याचप्रमाणें संस्थानचे मूळ संपादक श्री. शंकराजी नारायण यांच्या आंबवडें येथील समाधीस व तेथील नागेश्वरास साखर पाठविण्यांत आली. भोरच्या आसपासच्या सातआठ मैलांतील खेड्यांतून बायका हेल

घालण्याकरितां बारा दिवसपर्यंत रोज भोरास येत असत. बारा दिवसपर्यंत भोर अगदीं आनंदून गेलें होतें.

श्रीमंत बाबासाहेबांचा जन्म शके १८०० च्या भाद्रपद कृष्ण ८ स शुक्रवारीं सकाळीं सूर्योदयानंतर घ. ० प. ३० नीं आर्द्रा नक्षत्रावर झाला. त्या वेळीं सोबतच्या कुंडलींत दर्शविल्याप्रमाणें ग्रहमान होतें. त्यावरून त्यांची रास मिथुन व गण मनुष्यगण येतो. श्री. रावसाहेब यांचा ज्योतिषावर पूर्ण विश्वास होता व श्री. बाबासाहेब यांचीहि ज्योतिषावर श्रद्धा असून त्यांनीं आजपर्यंत अनेक तज्ज्ञ ज्योतिर्विदांना आपली जन्मकुंडली दाखविलेली आहे. त्यांनीं कुंडलींतील ग्रहांचे योग पाहून जीं भविष्यें वर्तविली त्यांपैकीं साधारणपणें खालीं दिलेल्या ठळक गोष्टी आहेत. त्यांवरून श्री. बाबासाहेब यांचें शरीर लहानपणापासून कृश राहून ही शरीराची स्थिति सर्व आयुष्यभर तशीच राहणारी आहे; त्यांच्या आयुष्यांतील उत्कर्षाचा काल त्यांच्या वयाच्या उत्तरार्धांत उत्तरोत्तर वाढत्या प्रमाणांत येईल; त्यांच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी घडून येतील, परंतु त्या प्रत्येक गोष्टीकरितां त्यांना विशेष परिश्रम घ्यावे लागतील; बऱ्याच वेळां त्यांना सुख न लागल्यामुळें आयुष्याचा कंटाळा येईल अशी मनःस्थिति राहील, याप्रमाणें गोष्टी घडून येतील, असें वर दिलेल्या जन्म-कुंडलीवरून ज्योतिष्यांनीं वर्तविलेलें भविष्य श्रीमंत बाबासाहेब यांना आतांपर्यंत पटत आलें असल्यानें ज्योतिषावर त्यांचा विश्वास आहे व यास्तव ही कुंडली येथें देण्यांत आली आहे.

**श्री. बाबासाहेब यांची जन्मकुंडली**




बारशाचा समारंभ फार थाटाचा झाला व मुलाचें नांव रघुनाथराव ऊर्फ बाबासाहेब ठेवलें. या समारंभाकरितां विंचूरहून विंचूरकरांकडील मंडळी, त्याचप्रमाणें पुणें, सातारा, वाई येथील शास्त्री, वैदिक, पुराणिक वगैरे बरीच मंडळी जमली होती. अनेक ठिकाणचे गुणिजनहि आले होते. या समारंभा-प्रीत्यर्थ श्रीमंत रावसाहेबांनीं पाहुणेमंडळी, अंमलदार, दरकदार, आश्रित, नोकर, शास्त्री, वैदिक, गुणिजन वगैरे सर्वांना मेजवान्या, देणग्या, देकार

वगैरे देण्याच्या कामीं २०,००० रुपये खर्च केले. यावरून त्या वेळीं श्रीमंत रावसाहेबांचा हात खर्चाच्या बाबतींत किती सढळ होता हें दिसून येणार आहे.

राजाबद्दल प्रजेच्या मनांत हल्लीं ज्या प्रकारच्या भावना वसत आहेत त्या प्रकारच्या भावना त्या काळीं त्यांच्या मनांत नव्हत्या. राजा म्हणजे विष्णूचा अवतार हीच कल्पना त्या वेळीं दृढमूल असल्यामुळें राजेसाहेब श्रीमंत बाबासाहेब यांच्या जन्माची सुवार्ता संस्थानांत पसरतांच प्रजेचीं अंत:करणें आनंदानें किती उचंबळून गेलीं असतील याची सहज कल्पना करतां येण्यासारखी आहे. " देवानें कृपा केली ", " सरकारला मुलगा झाला " अशा प्रकारचे उद्गार घरोघर ऐकूं येऊं लागले.

श्रीमंत बाबासाहेबांच्या जन्मानंतर दोन वर्षांनीं म्हणजे सन १८८० सालीं फेब्रुवारी महिन्यांत श्रीमंत सौ. जिजीसाहेबांना तिसरें अपत्य कन्यारत्न झालें. परंतु तें फार दिवस लाभलें नाहीं. श्रीमंत बाबासाहेबांस भगिनीसौख्याचा झालेला लाभ नाहींसा झाला.

श्रीमंत रावसाहेबांना आपल्या वडिलांच्या वेळेपासून प्रवासाचा नाद लागला होता. बरेच दिवस त्यांच्या मनांत काशीयात्रा करण्याचा विचार होता व तो विचार त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांचा जन्म झाला त्याच सालीं अंमलांत आणिला. त्या वेळीं त्यांना श्री. सौ. जिजीसाहेब यांना बरोबर नेणें शक्य नव्हतें. परंतु पुढें सन १८८२ सालीं श्रीमंत रावसाहेबांनीं पुन्हां काशीयात्रा करण्याचें ठरविलें. त्या वेळीं श्री. सौ. जिजीसाहेबांनींहि काशीयात्रेस येण्याबद्दल आपली उत्कट इच्छा दर्शविल्यावरून श्रीमंत रावसाहेबांनीं त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यांना बरोबर घेण्याचें कबूल केलें. या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांचें वय अवघें चार वर्षांचें होतें. या अल्प वयांतच त्यांना प्रथमप्रवासाचा योग आला व तोहि काशीसारख्या पुण्यक्षेत्राचें प्रथम दर्शन घेण्याचा.

प्रवासाची सर्व तयारी झाल्यावर सन १८८२ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत श्रीमंत रावसाहेब सहकुटुंब काशीस गेले. जगांतील नवीन गोष्टी पाहून मुलांना कौतुक वाटत असतें व त्या गोष्टींची माहिती करून घेण्याकरितां वडील माणसांना प्रश्न विचारण्याचा त्यांचा सपाटा सुरू असतो. अशा वेळीं बालमानसशास्त्रज्ञ जर जवळ असेल तर तो मुलांना योग्य तऱ्हेची माहिती देऊन त्यांची चौकस

बुद्धि वाढवूं शकतो. परंतु अशा तज्ज्ञ इसमांच्या अभावीं मुलांची जिज्ञासा दाबली जाऊन त्यांच्या बुद्धिविकासास वाव मिळत नाहीं. श्रीमंत बाबासाहेबांच्या जवळ त्या वेळीं अगदीं जुन्या वळणाचीं माणसें असल्यामुळें त्यांनीं कांहीं प्रश्न विचारले तर "मुलांना तें इतक्यांत कळण्यासारखें नाहीं" अशीं सरळ उत्तरें त्यांना मिळत असत. काशीस गेल्यावर भव्य इमारती, देवालयें वगैरे पूर्वी न पाहिलेले अनेक देखावे त्यांच्या नजरेसमोर येऊं लागले. एकदां ते आपल्या मातोश्रींबरोबर घाटावर गेले असतां भागीरथीचें विशाल पात्र व त्यांत इकडे तिकडे फिरणाऱ्या नावा त्यांनीं पाहिल्या. त्या वेळीं ते आपल्या आईस म्हणाले, "आई, ही किती मोठी नदी! आपली भोरची नदी लहान कां? तिच्यांत इतकें पाणी कां नाहीं? नावा कां नाहींत?" अशा प्रकारचे जेव्हां प्रश्न सुरू झाले तेव्हां त्यांच्या चौकस बुद्धीचें कौतुक करण्यापलीकडे त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें देण्याच्या भानगडींत कोणी पडलें नाहीं हें सांगणें नकोच. प्रत्येक क्षेत्राच्या ठिकाणीं भिक्षेकऱ्यांची गर्दी असावयाचीच. काशीस श्रीमंत सौ. जिजीसाहेब श्रीमंत बाबासाहेबांना घेऊन देवदर्शनास जात. तेव्हां "पैसे द्या" म्हणून भिक्षेकरी मागें लागत. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब त्यांना पैसे देण्याबद्दल आपल्या मातोश्रींस आग्रह करीत. श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत गरिबांविषयीं दयाबुद्धि असल्याचें पाहून त्यांच्या मातोश्रींचें अंतःकरण आनंदानें भरून येई व त्या आपल्या मुलाच्या हातून गरिबांना पैसे वांटीत असत. श्री. सौ. जिजीसाहेबांच्या अंगचे गुण श्रीमंत बाबासाहेबांच्या अंगीं उतरले होते व त्यांचा स्वभाव आपल्या मातोश्रींच्या वळणावर बनत चालला होता. काशी येथील सर्व धार्मिक विधी आटोपल्यावर श्रीमंत रावसाहेब प्रयाग येथें जाऊन तेथील यात्रा करून सहकुटुंब भोरास परत आले. या प्रवासांत श्रीमंत बाबासाहेबांच्या मनावर साहजिकपणें बरेच संस्कार झाले असले पाहिजेत.

सन १८८३ सालीं ऑगस्ट महिन्यांत श्री. सौ. जिजीसाहेबांना चौथें अपत्य कन्यारत्न झालें. श्रीमंत बाबासाहेबांना भगिनीचा लाभ झाला, म्हणून जिजीसाहेब व रावसाहेब यांना आनंद झाला. श्रीमंत बाबासाहेबांच्या शिवाय घरांत दुसरें मूल नव्हतें. श्रीमंत बाबासाहेबांचें वय त्या वेळीं पांच वर्षांचें होतें. मुलगी चारपांच महिन्यांची झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब आपल्या

बहिणीजवळ बसून तिला खेळवीत असत. तिचा हंसरा चेहरा पाहून त्यांना फार आनंद वाटे. त्यांना करमणुकीचें चांगलेंच साधन झालें होतें. परंतु ईश्वराच्या मनांत या नूतन अपत्यास या जगांत फार दिवस वास्तव्य करूं द्यावयाचें नव्हतें. मुलगी सहा महिन्यांची होतांच निर्घृण काळानें तिला हिरावून नेलें व श्रीमंत बाबासाहेबांना भगिनीसौख्याचा लाभ फार दिवस घेऊं दिला नाहीं. रावसाहेब व जिजीसाहेब यांना खिन्नता प्राप्त होऊन त्यांच्या मनांवर औदासीन्याची छाया पसरली. तथापि आपल्या एकुलत्या एक मुलाकडे पाहून तीं उभयतां आपल्या दुःखाचा विसर पाडीत.

या अपत्याच्या निधनानंतर जिजीसाहेब श्रीमंत बाबासाहेबांना एक क्षणभरहि दृष्टीआड होऊं देत नसत. त्यांना जरा कांहीं होऊं लागलें कीं त्यांच्या पोटांत धस्स होऊन बाळाला सुरक्षित ठेवण्याबद्दल त्या ईश्वराची रात्रंदिवस करुणा भाकीत. नवस-सायास नेहमीं चालूच असत. श्रीमंत बाबा-साहेबांची प्रकृति पहिल्यापासून नाजूक व अशक्त असल्यामुळें जिजीसाहेबांना त्यांच्याविषयीं अहोरात्र काळजी वाटत असे. एकदां त्यांना ताप येऊं लागला. ताप साधारण खोकल्यापडशाचाच होता, पण तो लवकर थांबेना. त्या वेळीं भोर येथें दवाखाना नव्हता. नामांकित वैद्य होते, त्यांचींच औषधें सर्वजण घेत असत. इंग्रजी औषध कोणालाहि माहीत नव्हतें. त्या वेळीं पुणें, सातारा प्रांतांत विख्यात असलेले भोरचे रहिवासी विनायकशास्त्री गोखले हे राजवैद्य होते. त्यांचेंच औषध श्रीमंत बाबासाहेबांना सुरू होतें. "ताप साधाच असून तो आठ-चार दिवसांत राहील" असें त्यांनीं सांगितलें होतें; पण इतका दम कोण धरणार? राजवाड्यांत रिकामटेकड्या आयाबाया असतातच. त्यांनीं आपलें प्रस्थ माजविण्याकरितां शक्कल काढली कीं, बाळाला झपाटा झाला असला पाहिजे. त्यांची ही कल्पना पटण्यास वेळ लागला नाहीं. असें होणें संभवनीय आहे, असें सर्वांना वाटूं लागलें. कारण श्रीमंत बाबासाहेब परसांतील बागेंत असलेल्या बंगल्यांत नेहमीं जात असत. बागेंत जाणाऱ्या वाटेवर एक प्रचंड विहीर आहे. या विहिरीभोंवतीं त्या वेळीं वड, पिंपळ वगैरेंचीं मोठीं झाडें होतीं. चिंच, वड, पिंपळ हीं भुतांखेतांचीं आवडतीं स्थानें. त्या काळीं अशा प्रचंड वृक्षांवर भुतें फार, अशी समजूत असे. या ठिकाणाशेजारून श्रीमंत बाबासाहेब नेहमीं जात येत असल्या-

मुळें ते झपाटले जाणें संभवनीय आहे, असें वाड्यांतील मंडळींना वाटूं लागलें. त्या काळीं भुतांखेतांचा उपद्रव फार असल्यामुळें मांत्रिक व देवऋषि यांचाहि तोटा नव्हता. एका देवऋषीनें सांगितलें कीं, दुखणाइतावरून कोंबडी उतरून टाका म्हणजे ताप हटलाच म्हणून समजा. आर्त स्थितीमध्यें कोणीं कांहींहि उपाय सुचविले कीं ते करून पाहण्याकडे मनुष्याची साहजिकच प्रवृत्ति होते.

रावसाहेबांची मात्र पहिल्यापासून अखेरपर्यंत अनुष्ठानावर अत्यंत श्रद्धा असे. ज्या प्रसंगास जें जें अनुष्ठान सांगितलें असेल तें तें त्या त्या वेळीं करण्यास ते कधींहि चुकत नसत. श्रीमंत बाबासाहेबांच्या आजारीपणानिमित्त या वेळींहि त्यांनीं अनुष्ठान सुरू ठेवलेंच होतें. वरीलप्रमाणें त्यांचा भुतांखेतांवर फारसा विश्वास नव्हता. राजवैद्य विनायकशास्त्री गोखले यांचाहि भुतांखेतांवर बिलकुल विश्वास नव्हता. ते फार करारी, निःस्पृह व स्पष्टवक्ते होते. त्यांनीं सडेतोडपणानें वाड्यांत निरोप पाठविला कीं, असले खेळ सुरू ठेवावयाचे असतील व इतर बायकांचीं औषधें घ्यावयाचीं असतील तर मी मुळींच औषधें देणार नाहीं. कोंबडी-लिंबाचा मारा खुशाल चालूं द्या. जिजीसाहेब व राव-साहेब उभयतांचीहि शास्त्रीबुवांवर पूर्ण श्रद्धा असून ते त्यांना वचकून असत. शास्त्रीबुवा खरोखरी औषध देणार नाहींत ही खात्री असल्यामुळें शास्त्रीबुवांच्या म्हणण्याप्रमाणें कोंबड्यांचा प्रयोग करण्याचें व इतर औषधें देण्याचें त्यांनीं रहित केलें. शास्त्रीबुवांचें औषध सुरू झालें व तीनचार दिवसांतच श्रीमंत बाबा-साहेबांचा ताप राहिला. गरीब बिचाऱ्या कोंबड्यांचा प्राण वांचून झाडांवरील भुतांखेतांची व त्यांच्या भक्तांची मात्र निराशा झाली असेल. त्या वेळीं बागेंतील चिंच, वड, पिंपळ इत्यादि वृक्षांवरील भुतांच्या ज्या गोष्टी ऐकूं येत असत, त्या आतां फारशा ऐकूं येत नाहींत. ज्ञानाच्या प्रकाशांत त्यांचा लोप होत चालला असावा. साठ वर्षांपूर्वी खेड्यांपाड्यांतून भुतांखेतांचा जितका धुमाकूळ चालू होता तितका आतां राहिला नाहीं.

श्रीमंत बाबासाहेबांच्या जन्मानंतर जिजीसाहेबांना दोन अपत्यें होऊन तीं दोन्ही अल्पवयी ठरल्याचें मागें सांगण्यांत आलेंच आहे. त्यानंतर शके १८०७ पौष वद्य ३०, ता. ३ फेब्रुवारी सन १८८६ रोजीं त्यांना पांचवें अपत्य कन्यारत्न झालें. हें नूतन अपत्य दीर्घायु व्हावें म्हणून रावसाहेबांनीं

अनुष्ठानें करविलीं. बारशाचा समारंभ थाटाचा होऊन मुलीचें नांव तान्हूबाई ऊर्फ बाईसाहेब असें ठेवण्यांत आलें. या समारंभाकरितांहि रावसाहेबांनीं पुष्कळ खर्च केला. या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांचे वयास सात वर्षे पुरीं होऊन आठवें वर्ष सुरू होतें. त्यांनाहि भगिनीलाभ झाल्यामुळें आनंद वाटूं लागला. ईश्वरकृपेनें त्यांना या भगिनीचा सहवास पुष्कळ वर्षे मिळाला. या अपत्यानंतर जिजी-साहेबांना सन १८९३ पर्यंत दोन पुत्र व एक कन्या अशीं तीन अपत्यें झालीं. परंतु तीं तीन्ही या मर्त्यलोकीं फार दिवस वास न करतां स्वर्गलोकीं निघून गेलीं. अशा रीतीनें जिजीसाहेबांना एकंदर आठ अपत्यें झालीं. परंतु त्यांपैकीं श्रीमंत बाबासाहेब व त्यांच्या भगिनी कै. श्री. सौ. तान्हूबाईसाहेब या दोघांचेंच सौख्य पाहण्याचें भाग्य रावसाहेब व जिजीसाहेब यांना लाभलें होतें.

श्रीमंत तान्हूबाईसाहेब जन्मास येईतोंपर्यंत श्रीमंत रावसाहेब यांचीं तीन अपत्यें स्वर्गवासी झालीं होतीं. त्यामुळें त्यांना व श्री. सौ. जिजीसाहेब यांना मुलें जातात याबद्दल फार वाईट वाटत होतें. जीं मुलें हयात आहेत तीं व पुढें होणारीं हीं पुष्कळ वर्षे जगावीं अशाकरितां श्रीमंत रावसाहेब अनुष्ठानें व देवधर्म विशेष करीत होते. त्या वेळीं संस्थानचे आश्रित आण्णाचार्य पुराणिक यांनीं, मोगलाईंत जोडजवळें म्हणून एक गांव आहे, तेथील रहिवासी भगवंत व्यंकटेश जोडजवळेकर या नांवाचे एक शास्त्री होते, त्यांना भोरास आणिलें होतें. या शास्त्रीबोवांना जवळेकरशास्त्री म्हणत असत. ग्रह कितीहि अनिष्ट असले तरी या शास्त्रीबुवांच्या मंत्रसामर्थ्यापुढें ते हतबल होऊन जातात, अशी त्यांची कीर्ति झाली होती. आण्णाचार्य पुराणिकांनीं शास्त्रीबुवांच्या सामर्थ्याबद्दल श्रीमंत रावसाहेबांच्याजवळ पुष्कळच तारीफ केली होती. अनिष्ट ग्रहांची श्रीमंत रावसाहेबांना धास्ती वाटत होतीच. त्यांनीं जवळेकरशास्त्र्यांना पत्रिका दाखविल्या. तेव्हां शास्त्रीबुवांनीं रावसाहेबांना सांगितलें कीं, "ग्रह अनिष्ट आहेत ही गोष्ट खरी आहे. तथापि आपण कांहीं काळजी करूं नका. ग्रहांना खाऊन टाकण्याचें माझ्या अंगीं सामर्थ्य आहे. मी अनुष्ठानास सुरुवात करितों म्हणजे आपणांस व आपल्या मुलांना ग्रहांची बाधा होण्याची मुळींच भीति नाहीं." शास्त्रीबुवा देवीचे उपासक होते. रावसाहेबांनीं त्यांची योग्य तजवीज लावून दिली होती. त्यांच्या तैनातीस चाकरमाणसें ठेविलीं होतीं. त्यांच्या

पूजेचा थाट गंभीर स्वरूपाचा असे. त्यांच्या पूजेच्या वेळीं बरेच लोक जमत असत. पूजा झाल्यावर शास्त्रीबुवा एक चमत्कार करून दाखवीत. एक काकडा करून तो ते पेटवीत व त्याच्यावर तेलाऐवजीं देवीचें तीर्थच घालीत; पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, पाण्यावर काकडा जळत असे. काकडा विझत आला कीं, त्यावर पुन्हां ताम्हनांतील तीर्थोदक तेलाऐवजीं घालावयाचें म्हणजे काकडा पुन्हा जळूं लागे. हा चमत्कार पाहून शास्त्रीबुवांच्या दैवी सामर्थ्यावर लोकांचा विश्वास बसूं लागला.

श्रीमंत बाबासाहेबहि हा चमत्कार पाहण्यास जात असत. त्यांना फारच आश्चर्य वाटे. रावसाहेबांची शास्त्रीबोवांवर श्रद्धा बसली. शास्त्रीबोवांचें अनुष्ठान बरेच दिवस चालू होतें. अनुष्ठानसमाप्तीनंतर रावसाहेबांच्याकडून शास्त्रीबोवांना चांगलीच प्राप्ति झाली व जवळेकरशास्त्री, आण्णाचार्य पुराणिक व श्रीमंतांचे आश्रित नरसू दीक्षित यांना सोन्याचीं दानें देण्यांत आलीं. कांहींतरी वार्षिक नेमणूक करून मिळावी म्हणून आण्णाचार्य पुराणिकांच्या मार्फत शास्त्रीबोवांनीं रावसाहेबांना विनंति केली. रावसाहेबांनीं नेमणूक करून देण्याचें कबूल केलें, तेव्हां शास्त्रीबोवांनीं “आपलें वय झालेलें आहे म्हणून आपल्या व आपल्या भावाच्या नांवानें नेमणूक करून मिळावी” अशी विनंति केली. शास्त्रीबोवांच्या विनंतीप्रमाणें रावसाहेबांनीं त्यांच्या व त्यांचे बंधु पांडुरंग व्यंकटेश या उभयतांच्या नांवानें सन १८९३ पासून दरसाल रु. १२५ ची नेमणूक करून दिली. ती त्यांना सन १९२० पर्यंत देण्यांत येत असे. पुढें त्यांच्यापैकीं कोणी रक्कम मागण्यास न आल्यामुळें ती बंद करण्यांत आली. शास्त्रीबोवांच्या अनुष्ठानांच्या प्रभावानें अनिष्ट ग्रहांची पीडा कोणालाहि झाली नाहीं व यामुळेंच रावसाहेबांची शास्त्रीबोवांवर श्रद्धा बसली. या वेळीं वाईचे राहणारे नारायण जोशी बेडेकर या नांवाचे प्रसिद्ध ज्योतिषी भोरास होते. पाण्यांत काकडा जाळून दाखविण्याचा चमत्कार करण्याचें त्यांच्या मनांत येऊन त्यांनीं तीर्थ तयार करण्याचे प्रयोग सुरू केले व त्यांत त्यांना यश येऊन त्यांनीं कांहीं मंडळींना पाण्यांत काकडा जाळून दाखविला. जवळेकरशास्त्रीबोवांचें महत्त्व कमी करण्याची त्यांची इच्छा नसल्यामुळें त्यांनीं या चमत्काराचें फारसें प्रदर्शन केलें नाहीं. असल्या चमत्कारांत कांहीं अर्थ नसतो, इतकेंच त्यांना समंजस

लोकांना दाखवावयाचें होतें. जवळेकरशास्त्रीबोवांना दानें देऊन नेमणूक करून दिली तरी पुढें श्रीमंत रावसाहेबांना अपत्यें लाभलीं नाहींत, यामुळें त्यांचीहि जवळेकरशास्त्रीबोवांवरील श्रद्धा जवळ जवळ उडाली होती.

सचिव घराण्यांत औरस संतति फारच थोडी होती. बहुतेक पुरुष दत्तक होऊनच गादीवर आले होते. श्री. रावसाहेबांच्या जन्मापासूनच औरस संततीस सुरुवात झाली. रावसाहेबांच्या पूर्वी कन्यालाभ तर कोणासच झाला नव्हता. यामुळें त्यांचें आपल्या कन्येवर म्हणजे श्रीमंत तान्हूबाईसाहेबांचेवर श्रीमंत बाबासाहेबांवरील प्रेमापेक्षां जास्त प्रेम होतें. जिजीसाहेबांचें मात्र मुलांमुलींवर सारखेंच प्रेम होतें.

श्रीमंत बाबासाहेब हे लहान असतांना लॉर्ड रे व लेडी रे ह्यांचेकडे वडिलांच्या व मातोश्रींच्याबरोबर भेटीस जात असत. तेव्हां लॉर्ड व लेडी रे श्रीमंत बाबासाहेबांना इंग्रजी चित्रांचीं पुस्तकें देत असत. नामदार गव्हर्नर लॉर्ड रे हे जेव्हां सन १८८५ सालीं भोरास आले, तेव्हां श्रीमंत बाबासाहेब हे लहान होते. त्यांना पाहून दरबारच्या वेळीं त्यांनीं खालील उद्गार काढले. ते म्हणाले :

"I am much pleased to see Pant Sachiv and the young Pant, who, we see, I may say, seated on the Gadi, is the son and heir to the Pant Sachiv and I hope he will be able to afford an opportunity to my successor to address him, as I now do to you, Pant Sachiv and he will develop into an Orator."

याच सालीं संस्थानच्या जंगलांची चौकशी करण्याकरितां ब्रिटिश सरकारनें एक कमिटी नेमली होती. त्या कमिटीस माहिती देण्याकरितां सातारचे सुप्रसिद्ध वकील कै. दादासाहेब करंदीकर यांची संस्थानतर्फे त्या कमिटींत नेमणूक झाली होती. या कामानिमित्त दादासाहेब भोरास राहत होते. लॉर्ड रे भोरास आले त्या वेळीं ते भोरास असल्यामुळें वरील दरबारास हजर होते. त्यांनीं आपल्या डायरींत त्या दिवसांच्या हकीकतींत श्रीमंत बाबासाहेबांबद्दल लिहून ठेविलें होतें. तो उतारा दादासाहेबांच्या चिरंजीवांकडून मिळाला तो खालीं दिला आहे :

"Just when the young Sachiv was brought up H. E. rose up and received him as if in an ecstatic mood and exclaimed "O ho, shake hands with me," and surveyed the boy from top to toe, and while the address was being read, he often times looked at both the father and the son with a view to form perhaps an estimate of the future, holding the paper between himself and the audience. I doubt not, even if H. E. did not find anything very imposing or likening in the boy, still there is something in the childlike glance of the boy that does not betoken empty head. It is said the boy is too dwarf for his age but the head seems intelligent. At least that is the impression it created in me."

## प्राथमिक शिक्षण

श्रीमंत बाबासाहेबांना पांचवें वर्ष लागलें तेव्हां त्यांच्या प्राथमिक शिक्षणास सुरुवात झाली. त्या वेळीं भोर येथें इंग्रजी ३ इयत्तांपर्यंत व मराठी ४ इयत्तांपर्यंतच शिक्षणाची सोय होती. चांगला सुमुहूर्त पाहून श्रीमंत बाबासाहेबांना मराठी शाळेंत घातलें व मुलींच्या शाळेमधील साने आडनांवाच्या एका वयोवृद्ध जुन्या पद्धतीच्या शिक्षकास खाजगी शिक्षक नेमण्यांत आलें. श्रीमंत बाबासाहेब प्रथम कांहीं दिवस शाळेंत बहुधा जात नसत. घरींच अभ्यास करीत. त्यांची प्रकृति अशक्त असल्यामुळें त्यांचे खाजगी शिक्षक अभ्यासाची त्यांचेवर सक्ती करीत नसत. त्यांच्या इच्छेप्रमाणें होईल तितकाच अभ्यास करून घेत. लहानपणीं बऱ्याच मुलांना र चा उच्चार करणें प्रथम जरा जड्च पडतें. श्रीमंत बाबासाहेबांनाहि र चा उच्चार करणें कठिण जात असे. ते र बद्दल य किंवा ल असा उच्चार करीत. त्यांच्यांतील हा दोष घालविण्यास त्यांचे शिक्षक फार मेहनत घेत असत. परंतु तो अजिबात नाहींसा झाला नाहीं. हल्लीं देखील साहेब लोक इंग्रजींतील आर् ( R )चा जसा उच्चार करतात तसाच ते र चा उच्चार करतात. इंग्रजी भाषण करतांना हल्लीं त्यांना या उच्चाराचा मात्र चांगला उपयोग होतो.

श्रीमंत बाबासाहेबांना खाजगी शिकविण्याकरितां ज्या शिक्षकांची नेमणूक केली होती त्यांचें शिक्षण लिहिणेंवाचणें व सामान्य गणित यांपलीकडे

झालेलें नव्हतें. यामुळें जुन्या तात्या पंतोजी पद्धतीप्रमाणें त्यांची शिक्षणपद्धति होती. त्यांच्याऐवजीं श्री. रावसाहेबांनीं जर एखाद्या ट्रेन्ड शिक्षकाची नेमणूक केली असती तर त्याचा श्रीमंत बाबासाहेबांना लहानपणीं कितीतरी फायदा झाला असता. परंतु रावसाहेब ज्या कालांत शिकले त्या काळच्या कल्पना त्यांच्या मनांत असल्यामुळें बालपणींच शिक्षणशास्त्रांत निपुण असलेल्या शिक्षकाची कां जरूर असते ही गोष्ट त्यांच्या लक्षांत येणें शक्य नव्हतें. शिक्षणोपयोगी साधनें व बालमानसशास्त्रज्ञ शिक्षक यांच्या अभावीं श्रीमंत बाबासाहेबांना बुद्धीची वाढ व मनोविकास होण्यासारखी माहिती मिळत नसे, व यामुळें लहानपणीं त्यांच्या शिक्षणाची बरीच हेळसांड झाली. त्यांचे खाजगी शिक्षक साने हे आपल्या पद्धतीप्रमाणें त्यांना फार प्रेमळपणानें शिकवीत व श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत त्यांचेबद्दल आदरहि असे. आपल्या मातोश्रींच्या सहवासांत श्रीमंत बाबासाहेबांना धार्मिक व नैतिक शिक्षण मिळत असे. जिजीसाहेबांना पुराणश्रवणाचा व स्वतः पुराणें वाचण्याचा फार नाद असे. त्या श्रीमंत बाबासाहेबांना पुराणांतील गोष्टी नेहमीं सांगत व यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना गोष्टी ऐकण्याची फारच गोडी लागली होती. रामायण, महाभारत यांतील गोष्टी ऐकून त्यांच्या मनावर नैतिक संस्कार न कळत होत असले पाहिजेत. दया, क्षमा, शांति इत्यादि गुण प्रामुख्यानें त्यांच्या स्वभावांत हल्लीं दिसून येतात, त्यांचें बीजारोपण त्याच वेळीं झालें असलें पाहिजे. मराठी शाळेंत असतांना एकदां क्षमागुणनिदर्शक अशी एक गोष्ट घडून आली. पूर्वी ज्या इमारतींत हायस्कूल होतें, त्या इमारतींत त्या वेळीं मराठी शाळा, इंग्रजी वर्ग व मुलींची शाळा भरत असे. शिकणाऱ्या मुलांमुलींची संख्या त्या वेळीं सुमारें २५० असल्यानें इमारतींत सगळ्या मुलां-मुलींची सोय होत असे.

वर उल्लेख केलेली गोष्ट अशी : श्रीमंत बाबासाहेब शाळेंत जात त्या वेळीं त्यांचें पाटी-दप्तर घेऊन त्यांचा हुजऱ्या शाळेच्या दारापर्यंत जात असे. तेथून श्रीमंत बाबासाहेब आपलें पाटी-दप्तर स्वतः घेऊन वर्गांत जात. हुजऱ्या दारांत बसून राही व शाळा सुटल्यानंतर पाटी-दप्तर घेऊन वाड्यांत जाई. एकदां शाळा सुटण्याच्या अगोदर हा हुजऱ्या एका निकडीच्या कामामुळें दुसऱ्या एखाद्या हुजऱ्यास वर्दी न देतां नदीकडे गेला. शाळा सुटण्

चित्रांक ११



काशी येथील श्रीशिवाशंकरेश्वराचें देवालय; हें श्रीमंत शंकरराव ऊर्फ रावसाहेब यांनीं इ. स. १८९७ सालीं बांधलें.

[ सं. पा. ३५

आपण परत येऊं असें त्यास वाटलें होतें. परंतु तो येण्यापूर्वींच शाळा सुटली. श्रीमंत बाबासाहेब दारांत येऊन पाहतात तों हुजऱ्या कोठें दिसेना. तेव्हां त्याची वाट न पाहतां स्वतःच पाटी-दप्तर घेऊन ते वाड्यांत गेले. त्यांच्याबरोबर अभ्यासासाठीं रावसाहेबांनीं गरिबांचीं दोनतीन मुलें ठेवलीं होतीं, तीं त्यांच्या-बरोबर वाड्यांत गेलीं. त्यांपैकीं एक मुलगा म्हणाला, " चला, आपण ही गोष्ट सरकारला कळवूं. म्हणजे ते हुजऱ्याची चांगली खोड मोडतील." त्यावर श्रीमंत बाबासाहेबांनीं त्या मुलाला असें न करण्याबद्दल सांगितलें. परंतु त्या मुलाला मिळालेली संधि तो थोडीच फुकट घालविणार ! त्यानें सरकारांच्या कानावर ही गोष्ट घातलीच. तेव्हां सरकार रागावलेले पाहून त्याला फार आनंद वाटला. श्रीमंत बाबासाहेबांना मात्र त्याच्या चुगलखोरपणाची चीड येऊन त्यांनीं त्याची चांगलीच खरडपट्टी काढली.

इकडे हुजऱ्या धांवत धांवत शाळेजवळ येऊन पाहतो तों शाळा सुटून श्रीमंत बाबासाहेब स्वतःच पाटी-दप्तर घेऊन वाड्यांत गेल्याचें कळलें. तेव्हां तो तसाच वाड्यांत गेला. तेव्हां सरकारांच्या कानावरहि ही बातमी गेल्याचें त्याला समजलें. त्या वेळीं त्याची पांचावर धारण बसून तो अगदीं गर्भगळित झाला. रावसाहेबांचा रागीट स्वभाव त्यास माहित होता. आतां आपणास दंड होणार, कदाचित् नोकरीवरहि गदा येणार, अशी त्यास भीति वाटून तो अगदीं घाबरून गेला. रावसाहेबांनीं जेव्हां त्यास बोलाविलें, तेव्हां तो कांपत कांपतच त्यांच्या पुढें जाऊन उभा राहिला. " तुला दंड कां करूं नये ?" असें रावसाहेबांनीं दरडावून विचारतांच त्याच्या तोंडांतून शब्दहि निघेना. त्यांच्या पायां पडून " सरकारनीं माफी द्यावी " इतकेंच बोलून तो तेथून निघून श्रीमंत बाबासाहेब यांच्याकडे गेला व त्यांच्या पायां पडून आपण त्यांना शाळा सोडून कां गेलों याबद्दलची खरी हकीकत सांगून दुसऱ्या हुजऱ्यास कळवून गेलों नाहीं ही चूकहि त्यानें कबूल केली. त्याची ती घाबरलेली स्थिति पाहून श्रीमंत बाबासाहेबांना त्याची दया आली, व ते म्हणाले, "भिऊं नकोस." त्या वेळीं त्यांचें वय ९ वर्षांचें होतें. ते आपल्या वडिलांना ' सरकार ' म्हणत असत. सरकारांना एखादी गोष्ट सांगण्यास त्यांना भीति वाटत असे. सरकारकडून एखादें काम करून घ्यावयाचें

असल्यास ते आपल्या मातोश्रींच्या मार्फत करून घेत असत. आपल्या मातोश्रींकडे जाऊन त्यांनीं हुजऱ्याची खरी हकीकत सांगितली व "त्यास दंड न करण्याबद्दल सरकारांना सांगा" असें म्हणाले. जिजीसाहेब म्हणाल्या, "क्षमा होईल असें वाटत नाहीं." यावर श्रीमंत बाबासाहेब म्हणाले, "आई, तुम्हीच ना मला नेहमीं सांगत असतां कीं, शरण आलेल्यास मरण देऊं नये; गरिबांवर दया करावी." आपल्या मुलाच्या तोंडून हें बोलणें ऐकून जिजीसाहेबांचें अंत:करण आनंदानें भरून येणें अगदीं स्वाभाविक होतें. आपल्या मुलाच्या अंगीं सद्गुणांचा विकास होत आहे हें पाहून त्यांना धन्यता वाटली. त्यांनीं आपल्या पतीला सर्व प्रकार सांगून मुलाच्या आग्रहास्तव हुजऱ्यास दंड करूं नका अशी गळ घातली. मुलाची क्षमाशील वृत्ति पाहून रावसाहेबांनाहि कौतुक वाटल्यावांचून राहिलें नसावें. त्यांनीं हुजऱ्याला क्षमा करून पुन्हां असें न करण्याबद्दल ताकीद दिली.

## उपनयनसमारंभ

श्रीमंत बाबासाहेबांना नववें वर्ष लागलें, तेव्हां श्रीमंत रावसाहेबांनीं त्यांचें उपनय करण्याचें ठरविलें व सन १८८७ सालांतील चैत्र शु. ११ हा व्रतबंधाचा मुहूर्त कायम केला. हा मुहूर्त रामनवमीच्या उत्सवांतच धरला असल्यामुळें समारंभास विशेष शोभा येणार होती. हा समारंभ होण्यापूर्वीं एकच महिना अगोदर म्हणजे फेब्रुवारी ता. १६ रोजीं भोर येथें महाराणी व्हिक्टोरिया यांचा सुवर्णमहोत्सव मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला होता. त्यानंतर लगेच हा व्रतबंधमहोत्सवाचा योग भोरच्या नागरिकांना प्राप्त झाला. रावसाहेबांच्या लग्नानंतर पाव शतकानें सरकारी वाड्यांत मंगल कार्याचा हा प्रथमच योग आलेला पाहून भोरच्या नागरिकांना अत्यानंद वाटत होता. भोरांतील ब्राह्मणवर्गाची सांपत्तिक स्थिति त्या वेळीं चांगल्या प्रकारची होती. लोक फार हौशी असत. उपनयनसमारंभाच्या अगोदर दोन महिने लोकांनीं मोठ्या उत्साहानें व आदरानें श्रीमंत रावसाहेब, श्री. सौ. जिजीसाहेब व श्री. बाबासाहेबांना गडंगनेरें देण्याचा क्रम सुरू ठेविला होता. कित्येकांच्या वांट्यास दिवस न आल्यामुळें त्यांची निराशा झाली. श्रीमंत बाबासाहेबांना रोजचे रोज गोडाचा अगदीं वीट येत असे. ते मधूनमधून त्यांच्या

चित्रांक १२



श्रीमंत बाबासाहेब यांचा बालपणचा फोटो. [ सं. पा. ४८

आवडीचे तिखटामिठाचे व साधे पदार्थहि करण्यास सांगत असत व लोकहि मोठ्या प्रेमानें त्यांच्या इच्छेप्रमाणें वागत. नेहमींच्या प्रघाताप्रमाणें रामनवमीच्या उत्सवाकरितां पुणें, सातारा, वाई वगैरे दूरदूरच्या ठिकाणचे लोक, गुणिजन, शास्त्री, पंडित, वैदिक, हरदास वगैरे मंडळी जमली होती. त्यांतच व्रतबंधाकरितां निमंत्रित पाहुण्यांची भर पडून भोरांत या वर्षी अगदीं गर्दी उडून गेली होती. दक्षिणेंतील सर्व संस्थानिक, सरदार, जहागिरदार वगैरे बड्या गृहस्थांना रावसाहेबांनीं व्रतबंधाचीं आमंत्रणें केलीं होतीं. बहुतेकांचे प्रतिनिधि अहेर घेऊन आले होते. ठरलेल्या मुहूर्तावर म्हणजे चैत्र शु. ११ रोजीं श्रीमंत बाबासाहेबांचा मौंजीबंधनसमारंभ यथाविधि साजरा झाला. त्यांच्या मुंजीबरोबरच रावसाहेबांनीं पांचसहा धर्ममुंजीहि केल्या. दरबारी कचेऱ्या, प्रयोजनें वगैरे कार्यक्रम चालू होते. दारूकामहि उत्तम प्रकारचें झालें. सर्वांना देणग्या, बिदाग्या देण्यांत येऊन देकारहि फार मोठा झाला. गरिबांना अन्नदान करण्यांत आलें. चारपांच दिवस शहर अगदीं गजबजलेलें असून जिकडेतिकडे आनंदीआनंद दिसत होता. या समारंभाप्रीत्यर्थ रावसाहेबांनीं पंचवीस हजार रुपये खर्च केले.

उपनयनानंतर श्रीमंत बाबासाहेबांना संध्या, पूजा वगैरे ब्रह्मकर्म शिकविण्याकरितां रावसाहेबांनीं एका उत्तम वैदिकाची, म्हणजे हल्लींचे महामहोपाध्याय सीतारामशास्त्री शेंडे यांचे आजे, यांची योजना केली होती. धर्मपरायण मातेच्या सान्निध्यांत त्यांचा काल जात असल्यामुळें त्यांना लहानपणापासूनच पूजेची गोडी लागली होती. त्यांच्या मातोश्रींबरोबर तेहि पूजा करीत असत. संध्यापठनाचा त्यांनीं कधींच कंटाळा केला नाहीं. त्यांना पूजाहि पाठ येत होती. हल्लीं मुंज झाल्यावर उपाध्येबुवा चार-पांच दिवस संध्या सांगतील तोंपर्यंतच मोठ्या मारामारीनें मुलगा संध्या करण्यास बसतो. पुढें तो संध्येला रामराम ठोकून मोकळा होतो. श्रीमंत बाबासाहेबांच्या मुंजीच्या वेळीं अशी स्थिति नव्हती. मुलांना संध्या, पूजा शिकविण्याची आईबापांना जरूरी भासे.

## देवदर्शनाकरितां प्रवास

सन १८८७ सालच्या डिसेंबर महिन्यांत श्रीमंत बाबासाहेब आपल्या मातोश्रींबरोबर पाईट येथील देवदर्शनास गेले होते. सचिव घराण्याचे संस्थापक

श्री. शंकराजी नारायण यांच्या पूर्वजांपैकीं एक कुटुंब फिरत फिरत पाईट येथें येऊन राहिलें होतें. त्या कुटुंबांतील शिवाबाई या आपल्या नवऱ्याबरोबर सती गेल्या होत्या. त्यांना सचिव घराण्यांतील मंडळी देवाप्रमाणें मानतात. म्हणून तेथें सचिव घराण्यांतील मंडळींचा दर्शनाकरितां जाण्याचा परिपाठ आहे. त्या बाईंचा टाक भोर येथील देवांमध्येंहि ठेवण्यांत आलेला आहे. वरील परिपाठाला अनुसरून श्रीमंत बाबासाहेब आपल्या मातोश्रींबरोबर शिवासतीच्या दर्शनास गेले होते. हें गांव खेड तालुक्यांत आहे. दुसरें एक निघोज नांवाचें गांव नगर जिल्ह्यांत पारनेर तालुक्यांत आहे. हीं दोन्ही गांवें इंग्रजी हद्दींत आहेत. तीं सचिवांना छत्रपति राजाराममहाराज यांच्या कारकीर्दींत वतनी इनाम म्हणून मिळालीं असून तीं आजतागाईत त्यांचेकडे चालत आहेत. पाईट येथें जेव्हां श्रीमंत बाबासाहेब गेले तेव्हां आपले बाल इनामदार येणार म्हणून पाईटच्या ग्रामस्थ लोकांनीं त्यांच्या स्वागताची उत्तम तयारी करून ते त्यांच्या आगमनाची वाट पाहत होते. श्रीमंत बाबासाहेबांचें तेथल्या लोकांनीं शिवेजवळ स्वागत करून मोठ्या समारंभानें त्यांना गांवांतून त्यांच्या वाड्या-पर्यंत वाजत गाजत नेलें. पाईट येथील देवाची यथासांग पूजाअर्चा होऊन ब्राह्मणभोजन घालण्यांत आलें. तेथून निघण्यापूर्वीं श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या मातोश्रींच्या आज्ञेप्रमाणें तेथील लोकांना देणग्या दिल्या.

नंतर तेथून निघून आवों सिद्धटेक येथील देवांचीं दर्शनें घेऊन ते पुण्यास आले. लगेच चार पांच दिवसांनीं रावसाहेब, श्रीमंत बाबासाहेब व जिजीसाहेब यांच्यासह सुधागडास गेले. त्या वेळीं सुधागडास जाण्यास सडक नव्हती. लोणावळ्यापासून पालखीमेण्यानें बोरघाटांतून जावें लागे. रावसाहेबांच्याबरोबर उंट, घोडे, मेणे वगैरे सर्व लवाजमा होता. लोणावळें स्टेशनावर उतरल्यानंतर खाशा स्वाऱ्या मेण्यांत बसून निघाल्या. बाकीच्या कामगारमंडळीकरितां घोडीं होतीं. सामानाकरितां उंट होते. लोणावळ्याहून निघाल्यानंतर घाटमाथ्यावर एक गांव लागतें. तेथून घाट उतरण्यास सुरुवात होते. घाटांतील वाट नाग-फडी ऊर्फ ड्यूक्स नोजजवळून गेली आहे. घाट उतरून जातांच पायथ्याशीं संस्थानचे हद्दींत घोटावडें नांवाचें एक गांव आहे, तेथें संस्थानची पोलीस चौकी आहे. तेथें पोहोंचल्यावर कांहीं वेळ विश्रांति घेऊन सर्व स्वाऱ्या

जांभुळपाड्यास आल्या. तेथें भोजनाकरितां मुक्काम करून नंतर त्या पालीस गेल्या. रावसाहेब पालीस राहिले व पालीपासून पूर्वेस सुमारें चार कोसांवर सह्याद्रीच्या पायथ्याशीं असलेल्या सुधागड किल्ल्यावरील भोराई देवीच्या दर्शनाकरितां श्रीमंत बाबासाहेब आपल्या मातोश्रींसह त्या किल्ल्यावर गेले. बरोबर अम्मलदार, उपाध्ये वगैरे मंडळी होती. तेथें एक दिवस मुक्काम होता.

तेथील देवीची यथासांग पूजा होऊन भोजन झाल्यावर दुपारीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं किल्ला पाहण्याची इच्छा दर्शविली. त्या वेळीं त्यांचें वय अवघें दहा वर्षांचें होतें. त्यांची चौकस बुद्धि तीव्र असल्यामुळें ते कोठेंहि गेले तरी त्या त्या ठिकाणची माहिती ते विचारीत असत. तेथील किल्लेदारानें त्यांना व त्यांच्याबरोबरच्या मंडळींना किल्ला दाखविण्याकरितां नेलें. किल्ल्यावर विस्तीर्ण मैदान आहे. भोर संस्थानच्या इतिहासांत या किल्ल्यास फार महत्त्व आहे. मागें उल्लेखिल्याप्रमाणें संस्थानचे मूळ पुरुष शंकराजी नारायण यांचे वडील नारो मुकुंद हे छत्रपति शिवाजी-महाराजांच्या पदरीं कारकून असून त्यांना याच किल्ल्याची सबनिसी महाराजांनीं सन १६४८ सालीं दिली होती. या अधिकारामुळेंच पुढें शंकराजी नारायण यांना आपली कर्तबगारी दाखविण्यास संधि मिळून सचिव-पदाची प्राप्ति झाली. भाग्योदय होण्यास या किल्ल्याची सबनिसी कारणीभूत झाली म्हणून तेथील देवीच्या दर्शनास जाण्याची पहिल्यापासून वहिवाट आहे. म्हणूनच श्रीमंत बाबासाहेब देवीच्या दर्शनास आले होते.

श्रीमंत बाबासाहेब फिरावयास निघाले तेव्हां त्यांना किल्ल्याच्या पूर्व बाजूस असलेले सह्याद्रीचे तुटलेले कडे व त्यांच्या पायथ्याशीं असलेला विस्तीर्ण घेरा व त्यांतील प्रचंड जंगल दाखविण्यांत आलें. तेव्हां त्या देखाव्याकडे मोठ्या कौतुकानें पाहत एका ठिकाणीं बराच वेळ ते बसले होते. नंतर त्यांना ‘ टकमक ’ नांवाची एक जागा दाखविण्यांत आली. तेव्हां टकमक म्हणजे काय म्हणून त्यांनीं विचारतांच किल्लेदार म्हणाला, “ पूर्वीं कोणी एखादा मोठा गुन्हा केला तर त्यास पोत्यांत घालून येथून खालीं ढकलून देत. ” हें ऐकून श्रीमंत बाबासाहेबांच्या तोंडून पुढील उद्गार निघाले : “ काय हा रानटी क्रूरपणा ! ” हल्लीं जशी फांशीची शिक्षा

आहे तशीच पूर्वीं ही कडेलोटाची शिक्षा होती. टकमक पाहिल्यानंतर कांहीं अंतरावर ' बोलकडा ' नांवाचें एक ठिकाण आहे तें दाखविण्यांत आलें. तेथें समोरासमोर दोन तुटलेले कडे असून एका कड्यावर बोललें असतां प्रतिध्वनि अगदीं स्पष्टपणें उमटतो. श्रीमंत बाबासाहेब या ठिकाणीं बराच वेळ प्रतिध्वनीची मौज पाहत बसले होते. शिंग वाजविलें कीं, समोरून शिंगाचा प्रतिध्वनि येत असे. श्रीमंत बाबासाहेब मोठयानें ओरडले, कीं समोरचा कडाहि त्यांच्याप्रमाणेंच मोठयानें ओरडत असल्याचें त्यांना ऐकू येई. अशा रीतीनें बराच वेळ गंमत चालली होती. नंतर शिडीची वाट, पाच्छापूरकडील दरवाजा वगैरे ठिकाणें दाखविण्यांत आलीं. किल्ल्यावरील मुख्य मुख्य स्थळें पाहिल्यावर ते परत देवीच्या देवालयाजवळील वाड्यांत परत आले. संध्याकाळीं मंडळींच्या गप्पागोष्टी चालू होत्या; किल्ल्याचीं वर्णनेंहि सुरू होतीं. श्रीमंत बाबासाहेब तीं सर्व लक्षपूर्वक ऐकत होते. त्यांना गोष्टींचा नाद आहे असें पाहून किल्ल्याचा एक वृद्ध हवालदार होता तो म्हणाला, " सरकार, मी सांगू का आपल्याला किल्ल्याची थोडी हकीकत ? " श्रीमंत बाबासाहेबांनीं लगेच त्याला हकीकत सांगण्यास सांगितलें. ही उत्सुकता पाहून म्हाताऱ्यासहि फार आनंद झालासें दिसलें.

तो म्हणाला, " सरकार, पूर्वीं या किल्ल्यावर पुष्कळ गडकरी असत. आमच्याजवळ तलवारी बंदुका असत. एकदां हिंदुस्थानांत झालें बंड. इंग्रजांनीं तें बंड मोडलें व सगळयांच्या जवळचीं हत्यारें काढून घेण्याचा हुकूम झाला. आम्हांलाहि आमच्याजवळचीं सर्व हत्यारें तालुक्यांत नेऊन देण्याचा आमच्या अंमलदारांनीं हुकूम केला. सरकार, आम्हीं आपले तलवार-बंदुकीचे भारे डोक्यावर नेऊन जेव्हां पोहोंचते केले तेव्हां आमच्या बायका नेल्या असत्या तरी देखील आम्हांला वाईट वाटलें नसतें, इतकें त्या वेळीं आम्हांस वाईट वाटलें. आम्ही मर्द असून बायका बनलों. आतां आमच्यापाशीं हत्यारें नाहींत. किल्ल्यावर वाघ आला तर किल्ल्याचीं दारें लावून घरांत बायकांसारखं लपून बसण्याची आम्हांवर पाळी आली आहे."

ही हकीकत सांगत असतांना त्याच्या डोळयांत पाणी आल्यावांचून राहिलें नाहीं. हा किल्लेदार सन १८५७ सालच्या बंडापूर्वीपासून येथें

नौकर होता. या वेळीं तो अगदीं वृद्ध झाला होता. त्यानें किल्ल्यावरील आणखीहि कांहीं गंमतीच्या जुन्या गोष्टी सांगितल्या. श्रीमंत बाबासाहेब एकाग्र मनानें त्या गोष्टी ऐकत होते. त्यांना ऐतिहासिक गोष्टींच्या वाचनाचा बराच नाद असल्यामुळें त्या वृद्ध किल्लेदाराबद्दल आदर वाटून त्यांनीं आपल्या मातोश्रींकडून पांच रुपये घेऊन त्यास दिले. तेव्हां त्याचा कंठ गहिंवरून येऊन तो म्हणाला, " सरकार, पुष्कळ अंमलदार किल्ल्यावर येतात; पण आमची कोणी विचारपूस करीत नाहींत. आमच्याशीं दोन गोड शब्दहि बोलत नाहींत. मग आमची गोष्ट ऐकून घेतो कोण? सरकार, आपण लहान असून आमची गोष्ट ऐकलीत, आमच्याशीं गोड बोललांत, आम्हांला किती आनंद झाला म्हणून सांगूं! श्री. भोराई सरकारला उदंड औक्ष देवो! " अशा प्रकारचे म्हाताऱ्याचे उद्गार ऐकून जवळच्या सर्व मंडळींनाहि त्याचें कौतुक वाटलें. किल्ल्यावरील सर्व कार्यक्रम आटोपल्यावर स्वाऱ्या पालीस आल्या. पालीहून रावसाहेब सर्व मंडळीसह पुण्यास आले. तेथें कांहीं दिवस राहून सर्व स्वाऱ्या भोरास आल्या. रावसाहेब वर्षांतून एकदोन महिने तरी कोठें ना कोठें प्रवासांत घालवीत असत. नाशिक, जेजुरी, वाई, सातारा, नरसोबाची वाडी, पंढरपूर इत्यादि आसपासच्या क्षेत्रांच्या ठिकाणीं ते वरचेवर जात असत. ते एकटे कधींच प्रवास करीत नसत. बहुधा सहकुटुंब प्रवास करण्याची त्यांची पद्धत असे. श्रीमंत बाबासाहेबांनाहि त्यांच्या बरोबर जावें लागे. त्यामुळें त्यांच्या अभ्यासांत व्यत्यय येऊन त्यांचें नुकसान होत असे, व आपलें नुकसान होतें याबद्दल त्यांना पुढेंपुढें विशेष वाईटहि वाटत असे. रावसाहेबांच्या बरोबर श्रीमंत बाबासाहेब पुण्यास असत तेव्हां कांहीं दरबार व समारंभ झाले तर त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनाहि ते आपल्या बरोबर नेत असत. सन १८८८ सालीं जानेवारीच्या दोन तारखेस ड्यूक ऑफ कनॉट यांच्या निमंत्रणावरून रावसाहेब पुण्यास स्वागतसमारंभाला गेले होते. तेव्हां त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांनाहि बरोबर नेलें होतें. तेथें श्रीमंत बाबासाहेबांच्या शिक्षणाबद्दल राजपुत्रानें बरीच चौकशी केली. श्रीमंत बाबासाहेबांचा तरतरीतपणा पाहून राजपुत्र ड्यूक ऑफ कनॉट यांना फार आनंद झाला.

## भाऊसाहेब विंचूरकर यांचें दत्तविधान

एकोणिसाव्या शतकांत महाराष्ट्रांत आपल्या कर्तबगारीनें व धार्मिक शुद्धाचरणानें प्रख्यातीस येऊन सर्वत्रांच्या आदरास पात्र झालेले कै. अण्णासाहेब विंचूरकर यांना पुत्रसंतान नव्हतें. जहागिरीस वारस पाहिजे म्हणून त्यांनीं कै. श्रीमंत बाळासाहेब विंचूरकर यांचे चिरंजीव भाऊसाहेब यांना दत्तक घेण्याचें ठरविलें. भाऊसाहेब हे श्रीमंत बाबासाहेबांचे मामेबंधु होत. हा दत्तविधानसमारंभ पुणें येथें ता. ८ डिसेंबर सन १८८८ इ. रोजीं होणार होता व त्याकरितां रावसाहेबांना निमंत्रण आलें होतें. निमंत्रणाप्रमाणें रावसाहेबांनीं सहकुटुंब पुण्यास जाण्याचें ठरविलें. भोराहून निघण्यापूर्वीं श्रीमंत बाबासाहेब व त्यांच्या मातोश्री जिजीसाहेब यांच्यांत जो थोडासा संवाद झाला, तो गंमतीदार असल्यामुळें येथें देत आहों.

जिजीसाहेब म्हणाल्या, " बाळ, उद्यां आपणांस पुण्यास जावयाचें आहे. तेथें भाऊसाहेबांचा दत्तविधानसमारंभ आहे."

श्रीमंत बाबासाहेब म्हणाले, " आई, दत्तविधानसमारंभ म्हणजे काय? कोणत्या देवाचा हा समारंभ?"

जिजीसाहेब म्हणाल्या, " देवाचा समारंभ नाहीं. अण्णासाहेबांना मुलगा नाहीं. त्यांच्या मांडीवर भाऊसाहेबांना दत्तक द्यावयाचें आहे. म्हणजे भाऊसाहेब आतां अण्णासाहेबांचे मुलगे होतील."

भाऊसाहेब हे श्रीमंत बाबासाहेबांचे मामेबंधु असल्याचें वर सांगितलेंच आहे. त्यांचें आपल्या मामेबंधूंवर फार प्रेम असे. पुण्यास असतांना ते नेहमीं एकत्र खेळत असत. त्यांना दुसऱ्यास देऊन टाकणार हें ऐकून ते जरा रागावले व म्हणाले, " भाऊसाहेबांना काय म्हणून दुसऱ्यास देणार? मी मामांना सांगणार कीं, त्यांना देऊं नका."

त्यावर जिजीसाहेब म्हणाल्या, " अण्णासाहेबांना मुलगा नाहीं म्हणून त्यांना देणार."

तेव्हां श्रीमंत बाबासाहेब सहज बोलून गेले, " आई, मला नाहीं ना कोणाला देऊन टाकणार! मी नाहीं दुसऱ्याच्या घरीं जाणार."

दत्तविधान म्हणजे काय, तें कशाकरितां करतात याबद्दल माहिती देऊन त्यांची समजूत घालणें जिजीसाहेबांना शक्य नसल्यामुळें त्या पुढें कांहींच बोलल्या नाहींत. पुण्यास गेल्यावर श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या मामासहि बोलण्यास कमी केलें नाहीं. दत्तविधानसमारंभ झाल्यावर कांहीं दिवस पुण्यास राहून नंतर रावसाहेब सर्व मंडळीसह भोरास आले.

## दक्षिण हिंदुस्थानांतील यात्रा

सन १८८८ सालीं आश्विन महिन्यांत रावसाहेबांना द्वितीय पुत्ररत्नाची प्राप्ती झाली होती. बारशाचा समारंभहि त्यांनीं केला होता व हा मुलगा लाभेल अशी त्यांना आशा वाटत होती. परंतु त्याचें वास्तव्य या जगांत फार दिवस व्हावें अशी ईश्वराची इच्छा नव्हती. सन १८८९ सालच्या फेब्रुवारी महिन्यांतच या मुलानें इहलोकचा निरोप घेतला. त्यामुळें रावसाहेब व जिजीसाहेब यांच्या मनास उद्विग्नता उत्पन्न होऊन कोठेंतरी यात्रेस जावें असें त्यांना वाटूं लागलें. म्हणून त्याच सालीं ऑगस्ट महिन्यांत त्यांनीं ही दक्षिणची यात्रा केली. या यात्रेच्या मार्गांत असलेलीं बहुतेक पुण्यक्षेत्रें त्यांनीं पाहिलीं.

रामेश्वरच्या यात्रेंत श्रीमंत रावसाहेब यांच्या बरोबर श्रीमंत बाबासाहेब गेले होते. त्या वेळीं वाटेनें खालील ठिकाणीं मुक्काम केले होते :

पुणें, कलबुर्गा, ताडपत्री, मद्रास, चिदंबर, मदिरा मीनाक्षी, नवपाण, रामेश्वर, रामनाथपूर, धर्मशयन, मदुरा, त्रिचनापल्ली, तिनवेल्ली, श्रीरंग, तंजावर, कुंभकोण, चिंगलपट्ट, कांची, त्रिपती, रायचूर, पुणें.

ही यात्रा श्रीमंत बाबासाहेब यांना चांगली आठवते. यामध्यें त्यांच्या विशेष ध्यानांत राहण्याची गोष्ट म्हणजे रामेश्वराच्या दर्शनानंतर पावनखाडींत बसून मंडपमला जहाजामधून जातांना थोडें वादळ झालें व त्यामुळें श्रीमंत सरकार व इतर मंडळींना फार भीति वाटली.

## उत्तर हिंदुस्थानांतील यात्रा

सन १८८९ सालीं रावसाहेबांनीं रामेश्वरची यात्रा करून दक्षिणेंतील सर्व प्रसिद्ध स्थळें पाहिलीं होतीं. सन १८९० सालीं त्यांनीं प्रवासाची तयारी करून नातूंच्या लग्नसमारंभाकरितां डिसेंबरच्या ता. १८ रोजीं ते सहकुटुंब

पुण्यास गेले. नातूंच्या येथील लग्नाच्या मुहूर्तावरच पुण्यास त्याच दिवशीं दुसरा एक विक्षिप्तपणाचा लग्नसमारंभ झाला. या प्रकारची हकीकत श्रीमंत बाबासाहेबांच्या रोजनिशींत आढळते. श्रीमंत बाबासाहेब यांनीं भोराहून निघाल्यापासून नित्यक्रमाप्रमाणें आपली रोजनिशी लिहिण्याचा क्रम ठेविला होता. त्या वेळीं त्यांचें वय १२ वर्षांचें होतें. त्यांनीं त्या वेळीं लिहिलेल्या डायरींतील मजकूर पुढें 'क' परिशिष्टांत दिला आहे. यावरून त्यांच्या अवलोकनशक्तीची व त्यांच्या वयाच्या मानानें त्यांच्या साध्या भाषेची कल्पना येणार आहे. ते भोराहून पुण्यास आले त्या वेळीं नातूंच्या घरीं लग्न होतें, त्याविषयीं ते डायरींत लिहितात :

"ता. १८-१२-१८९० मुक्काम पुणें येथें नातूंचें लग्न झालें व चमत्कार हा कीं, त्याच मुहूर्तावर एका गाढवाचें लग्न लावण्यांत आलें."

वर ज्या विक्षिप्तपणाच्या लग्नसमारंभाविषयीं उल्लेख केलेला आहे, तें हेंच गाढवाचें चमत्कारिक लग्न. या लग्नाची थोडक्यांत हकीकत अशी आहे. 'मुलामुलींचें लहानपणीं लग्न करण्याची चाल अनिष्ट आहे, ती बंद झाली पाहिजे म्हणून पुण्यांतील कांहीं प्रतिष्ठित लोकांनीं सभा भरवून लहानपणीं लग्नें न करण्याचा ठराव केला व ज्यांना तो ठराव मान्य होता त्यांनीं त्यावर सह्या केल्या होत्या. या कामीं श्रीमंत बाबासाहेब नातूंनीं पुढाकार घेतला होता; व त्यांनीं ठरावावर सहीहि केली होती. असें असून त्यांनींच आपल्या मुलाचें म्हणजे श्रीमंत बाळासाहेब यांचें लहानपणीं लग्न करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें नातूंच्या येथें लग्नसमारंभ होता. नातूंच्या या कृत्याचा निषेध दर्शविण्याकरितां कै. गोपाळराव जोशी व चित्रशाळेचे हल्लींचे मालक श्री. वासुदेवराव जोशी यांनीं याच मुहूर्तावर गाढवागाढवींचें लग्न लावण्याचें ठरविलें. एक गर्दभ-वराचे वडील होऊन दुसरे गर्दभ-वधूचे वडील बनले. उभयतांनीं आपल्या सह्यांच्या निमंत्रणपत्रिका छापून त्या शहरभर वाटल्या. निमंत्रणपत्रिकेवर गर्दभकुमार व गर्दभकुमारीचीं सुंदर चित्रें छापिलीं होतीं. लग्नाची जागा नारायण पेठेंतील मातीच्या गणपतीच्या मागील परांजपे यांची बखळ ठरविण्यांत येऊन तेथें सुंदर मंडप घालून बोहलें घालण्यांत आलें होतें. ताशा-वाजंत्रीं वाजत होतीं. नातूंच्या येथील लग्नाच्या मुहूर्तावरच गर्दभ-वधूवरांस बोहल्यावर आणून मंगलाष्टकें

( विक्षिप्तपणाचींच ) म्हणण्यांत येऊन लग्न लावण्यांत आलें. या लग्नास जितकी मंडळी आली होती तितकी नातूंच्या घरीं आली नव्हती. नातूंच्या येथील वरातीच्या वेळींच या बाल-गर्दभ-वधूवरांची वरात काढण्याचें ठरवून वरातीची तयारी करण्यांत आली होती. परंतु शांतताभंगाच्या भीतीस्तव या वरातीस मनाई करण्यांत आल्यामुळें ती निघाली नाहीं.' मनाई झाली नसती तर बुधवारांत या दोन्ही वराती समोरासमोर येऊन फारच बहार उडाली असती! या सर्व उपद्यापाचा हेतु इतकाच होता कीं, पुढारी लोक कधीं कधीं स्वार्थासाठीं स्वतःच्या वचनाविरुद्ध वागून कसें विचित्र वर्तन करतात हें दाखविणें.

नातूंच्या येथील विवाहसमारंभ झाल्यानंतर रावसाहेब ता. २२ डिसेंबर रोजीं सहकुटुंब मुंबईस गेले. तेथून डाकूर, अहमदाबाद, पोरबंदर वगैरे ठिकाणीं मुक्काम करीत करीत ता. ३ जानेवारी स. १८९१ इ. रोजीं सर्व स्वाऱ्या द्वारकेस जाऊन पोहोंचल्या. तेथें देवदर्शन, धार्मिक विधि वगैरे आटोपल्यानंतर सोमनाथास जाऊन सोमनाथाचें दर्शन घेतलें; व पुन्हां पोर-बंदर, अहमदाबादवरून स्वाऱ्या सिदपुरास गेल्या. सिदपुराहून अजमीर, पुष्कर, जयपूर, आग्रा, प्रयाग वगैरे ठिकाणच्या प्रवासांत एक महिना घालवून ता. १ फेब्रुवारी रोजीं स्वाऱ्या काशीस गेल्या. काशीस एक आठवडा मुक्काम करून स्वाऱ्या अयोध्या, हरिद्वार, अंबाला, कुरुक्षेत्र, दिल्ली, मथुरा वगैरे पवित्र क्षेत्रें व प्रेक्षणीय स्थळें पाहून इटारसीवरून नाशिकास येऊन ता. ३ मार्च रोजीं सर्व मंडळी अडीच महिन्यांच्या प्रवासानंतर पुण्यास सुखरूप येऊन पोहोंचली.

श्रीमंत बाबासाहेब यांच्या ध्यानांत हिंदुस्थानच्या यात्रेंतील दोन गोष्टी विशेष राहिल्या आहेत. त्यांपैकीं एक म्हणजे विठू भेलका यास काशी मुक्कामीं कॉलऱ्यानें मृत्यु आला ही होय व त्याबद्दल त्यांना विशेष वाईट वाटलें. नारायण जगदाळे व विठू भेलका हे, त्यांचीं वयें १२ वर्षांचीं असतांना, श्रीमंत बाबासाहेबांपाशीं ते तीन वर्षांचे असल्यापासून हुजरे होते, त्यामुळें त्यांच्यावर श्रीमंतांचा विशेष लोभ होता. म्हणून विठू भेलका वारल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब यांस फार वाईट वाटलें. दुसरी गोष्ट, काशी मुक्कामीं विशेष

कॉलरा झाला होता. स्वारींतील कांहीं माणसें आजारी पडून त्यांत बळी पडलीं व बाकीचीं यात्रेमुळें फार कंटाळलेलीं होतीं. त्यामुळें सर्वांच्या मनांत भोरास तेथूनच परत फिरावें असें होतें. पण श्रीमंत रावसाहेब यांच्या मनांत अयोध्या, हरिद्वार, मथुरा, गोकुळ, वृंदावन वगैरे ठिकाणें पाहून भोरास जावयाचें होतें. त्या वेळेस सीतारामशास्त्री वैद्य हे श्रीमंतांच्या बरोबर होते, व त्यांनीं लोकांची युक्तीनें अशी समजूत घातली कीं, प्रयाग वगैरे ठिकाणीं कॉलऱ्याचा उपद्रव पुष्कळ आहे. तिकडून मुक्काम करीत गेल्यास मंडळीस फार त्रास होईल. याकरितां श्रीमंत रावसाहेबांच्या हेतूप्रमाणें गेलें असतां लोकांस अपाय होण्याची भीति नाहीं. अशा प्रकारें लोकांची समजूत घालून श्रीमंत रावसाहेब यांच्या इच्छेप्रमाणें सर्व कार्यक्रम घडवून आणला.

या प्रवासाचें वर्णन श्रीमंत बाबासाहेबांनीं स्वतःच आपल्या रोजनिशींत लिहून ठेविलें आहे. तें पुढें परिशिष्ट ‘ क ’ मध्यें दिलें आहे.

## गोकर्णाची यात्रा

रावसाहेबांना प्रवासाचा कधींहि कंटाळा नसे. तीर्थयात्रा करण्याचा त्यांना नादच लागला होता. उत्तर हिंदुस्थानांतील यात्रा करून आल्यानंतर त्याच सालीं म्हणजे सन १८९१ सालीं त्यांनीं गोकर्णाची यात्रा करण्याचें ठरविलें; व ता. ५ नोव्हेंबर रोजीं त्या यात्रेकरितां ते भोराहून सहकुटुंब निघून लोणंद स्टेशनवर गेले. तेथून त्याच रात्रीं निघून गोकाक, बेळगांव, हुबळी, एल्लापूर वगैरे ठिकाणीं मुक्काम करीत सर्व मंडळी गोकर्णास गेली. परत येतांनाहि श्रीमंत बाबासाहेबांनीं अनेक स्थळें पाहिलीं. या प्रवासाची हकीकत श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या रोजनिशींत लिहिली आहे. ती पुढें ‘ ख ’ परिशिष्टांत दिली आहे. या प्रवासांत त्यांच्याबरोबर त्यांचे मराठी शिक्षक पंचपोर मास्तर व इंग्रजी शिक्षक लिमये हे होते. त्या वेळचे संस्थानचे शाळाधिकारी सरंजामे हेहि स्वारीबरोबर होते. ता. ८ डिसेंबर रोजीं सर्व स्वाऱ्या पुण्यास येऊन पोहोंचल्या. या प्रवासांत कांहीं ठिकाणीं बचनागाच्या मुळयांतून वाहत येणारें पाणी पिण्यांत आल्यामुळें बरीच मंडळी तापानें आजारी पडली. श्रीमंत बाबासाहेबांनाहि बरेच दिवस ताप येत होता. तो पुढें विनायकशास्त्री गोखले वैद्य यांच्या औषधानें राहिला.

## इंग्रजी शिक्षणास सुरुवात

सन १८९० सालीं श्रीमंत बाबासाहेब मराठी चौथ्या इयत्तेंत गेले होते. या सालच्या फेब्रुवारी महिन्यांत त्यांना इंग्रजी शिकविण्याकरितां गणेश महादेव लिमये यांची रावसाहेबांनीं नेमणूक केली. लिमये हे फार हुशार शिक्षक असून त्यांची शिकविण्याची हातोटी प्रशंसनीय होती. "अभ्यास कसा करावा हें प्रथम लिमये मास्तर यांनींच आपणास शिकविलें" असें श्रीमंत बाबासाहेब नेहमीं म्हणत असत. ते भोरच्या शाळेंत मराठी चौथी इयत्ता शिकत असत व घरीं इंग्रजी अभ्यास करीत. लिमये मास्तरांची नेमणूक होईपर्यंत श्रीमंत बाबासाहेब यांचा अभ्यास यथातथाच चालू होता. वयाच्या बाराव्या वर्षीं ते मराठी चौथ्या इयत्तेंत होते. यावरून त्यांचा अभ्यास किती मंद गतीनें चालला होता हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. या मंद गतीस कारणेंहि अनेक होतीं. त्यांची प्रकृति अशक्त असल्यामुळें त्यांच्या मातोश्री त्यांना फार अभ्यास करूं देत नसत. लायक शिक्षकांचा अभाव हेंहि एक कारण होतें. शिवाय रावसाहेब त्यांना वरचेवर परठिकाणीं नेत असल्यामुळें अभ्यासांत खंड पडत असे व त्यामुळें वर्गाबरोबर अभ्यास चालत नसे. वरचेवर प्रवासास जावें लागल्यानें आपला नंबर खालीं जातो याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांना वाईट वाटे. त्यांची पठणशक्ति चांगली होती; परंतु धारणाशक्ति जरा कमी असल्यामुळें घोकण्याचे श्रम घ्यावे लागत व त्यास ते कधीं कंटाळत नसत. लिमये मास्तरांची नेमणूक झाल्यापासून त्यांचा अभ्यास व्यवस्थित सुरू झाला. लिमये मास्तर श्रीमंत बाबासाहेब यांच्याबरोबर खेळत बसतात, नीट शिकवीत नाहींत अशा प्रकारच्या तक्रारी कांहीं मंडळींनीं रावसाहेबांच्या कानांवर घातल्या. लिमये मास्तरांना हा प्रकार समजला तेव्हां त्यांनीं ता. ११ जुलै सन १८९१ इ. रोजीं श्रीमंत बाबासाहेबांच्या शिक्षणासंबंधीं ते आल्यापासून दीड वर्षाचा रिपोर्ट रावसाहेबांकडे सादर केला. या रिपोर्टांत त्यांनीं अगदीं निर्भीडपणें सर्व हकीकत लिहिली होती. तो रिपोर्ट खालीं दिला आहे, यावरून श्रीमंत बाबासाहेबांचा अभ्यासक्रम कळून येणार आहे.

## लिमये मास्तर यांचा रिपोर्ट

हुजुरांस विनंति रिपोर्ट श्रीमंत बाबासाहेब यांच्या इंग्रजी शिक्षणाविषयींचा ता. ३१ जुलै १८९१ इसवी.

१ माझी नेमणूक ता. १ माहे फेब्रुवारी सन १८९० इ. रोजीं झाली. तेव्हांपासून ता. ३१ माहे जुलै १८९१ पावेतों दीड सालाबद्दल हा रिपोर्ट आहे.

२ मी आलों त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब मराठी चौथ्या इयत्तेंत गेले होते. इंग्रजी अभ्यास सुरू करण्यास मराठी चौथी इयत्ता पास झाली पाहिजे, परंतु बाबासाहेब तिसऱ्या इयत्तेंतहि नापास होते.

३ परकीय भाषा शिकण्याला प्रारंभ करण्यास स्वभाषेचें ज्ञान अवश्य पाहिजे. त्याप्रमाणें बाबासाहेब यांचें त्या वेळीं मराठी भाषेविषयीं ज्ञान पाहतां ते तिसऱ्या इयत्तेंत आहेत असें धरलें तरी इतकें कमी होतें कीं वाक्यांत क्रियापद म्हणजे काय असतें आणि नाम म्हणजे काय असतें हें देखील त्यांस माहीत नव्हतें.

४ सारांश काय कीं, बाबासाहेब यांस इंग्रजी शिकविण्याची वेळ मराठी भाषेच्या मानानें पाहतां हा वेळपावेतों आली नव्हती. तरी मला मुद्दाम त्या कामाकरितां नेमलें. ती हरकत काढून टाकून माझें काम मार्गाला लावणें जरूर होतें.

५ अशा स्थितीवरून पाहतां आजपर्यंतच्या मुदतींत जितका वास्तविक बाबासाहेबांचा इंग्रजी अभ्यास व्हावयाचा त्याच्या निम्मा जरी झाला तरी फार झालें हें उघड कोणाच्याहि नजरेस येईल. तशांतून तो श्रीमंतांचा अभ्यास असल्यामुळें त्या मानानें पाहिलें तर निम्मा तरी अभ्यास व्हावा कीं नाहीं याची शंका आहे. शाळेंतील मुलें १५।२० शब्द रोज करतात, परंतु बाबासाहेब यांना प्रथम मला प्रारंभ पांच शब्दांवर करावा लागला आणि हल्लीं ती मजल दहा शब्दांवर येऊन ठेपली आहे.

६ त्यामध्यें तीन महिने फुकट गेले. इतर किरकोळ दिवस फुकट जातात. बहुधा स्वारी वाईची असो कीं पुण्याची असो, स्थलांतर झालें, कीं अभ्यास स्थायिक जागेप्रमाणें होत नाहीं.

७ ह्या प्रकारच्या अभ्यासाला अडचणी आल्या असतां हल्लीं अभ्यासाची स्थिति आहे ती येणेंप्रमाणें :

( १ ) इंग्रजी पहिल्या इयत्तेचा इंग्रजी अभ्यास पुरा झाला आहे.

( २ ) दुसऱ्या इयत्तेचा इंग्रजी अभ्यास चालू आहे.

( ३ ) तिसऱ्या इयत्तेची भाषांतरपाठमाला पुरी झाली आहे. बाबासाहेबांस लवकर इंग्रजी बोलतां आलें पाहिजे असा सरकारचा हुकूम असल्यावरून ही पाठमाला अगोदर शिकविली.

( ४ ) तिसऱ्या इयत्तेची कॉपी चालू आहे.

..........येणेंप्रमाणें हल्लींचे अभ्यास आहेत.

८ आतां पुढील धोरण व पुढील उद्देश आहेत ते येणेंप्रमाणें:—

( १ ) हल्लीं सहा महिन्यांत बाबासाहेब यांस पुण्यास ठेवण्याचें ठरल्यास त्यांना तिसऱ्या इयत्तेंत बसविण्याचा बेत आहे. त्याला मराठी अभ्यासाची हरकत आल्यास माझा इलाज नाहीं.

( २ ) पुढें तिसऱ्या इयत्तेंतहि गबाळ मुलांमध्यें बाबासाहेब यांनीं न राहतां हुशारी राखली पाहिजे, अशी बळकट आशा आहे. कारण तिसऱ्या इयत्तेच्या इंग्रजी अभ्यासाला दोन पुस्तकें लागतातः एक रॉयल रीडर नंबर ३ व एक भाषांतरपाठमाला पुस्तक एक भाग २. त्यांपैकीं भाषांतरपाठमाला पुरी झाली आहे व तिसऱ्या इयत्तेची कॉपीहि चालू आहे.

( ३ ) इतर अभ्यासाविषयीं मी कांहीं सांगूं शकत नाहीं. परंतु हल्ली इंग्रजी अभ्यास चालला आहे त्याप्रमाणें बिनहरकत चालल्यास पुण्यास ठेविल्यापासून पांच वर्षांनीं बाबासाहेब मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेस जातील असा आजच्या स्थितीवरून अजमास आहे.

...........येणेंप्रमाणें पुढील धोरण व उद्देश आहेत.

९ ह्या सालीं पोलिटिकल एजंटांच्या सांगण्याप्रमाणें मी बाबासाहेबांस इंग्रजी शाळेंत दुसऱ्या इयत्तेंत घालण्यास गेलों. परंतु त्यांचे इतर मराठी अभ्यास फारच कच्चे असल्यामुळें दुसऱ्या इयत्तेच्या मास्तरांनीं त्यांस दुसऱ्या इयत्तेंत घेण्याचें नाकारलें. म्हणून त्यांना शाळेमध्यें इंग्रजी पहिल्या इयत्तेंत बसविणें भाग पडलें.

१० शाळेमध्यें त्यांना पहिल्या इयत्तेंत बसविलें आहे. तरी मी वाड्यांत दुसरी इयत्ता शिकवीत असतों. म्हणजे शाळेकरितां व सातारच्या एज्युकेशन इन्स्पेक्टरकरितां पहिल्या इयत्तेच्या इंग्रजीवर उजळणी ठेवून दुसऱ्या इयत्तेचें इंग्रजी शिकवीत असतों. आतां स्वारी पुण्याला गेल्याबरोबर गव्हर्नर वगैरे साहेब लोक येतील त्यांस दुसऱ्या इयत्तेची तयारी दाखविली पाहिजे. गुदस्तां त्यांना पहिल्या इयत्तेची तयारी दाखविली होती.

११ तिसऱ्या इयत्तेंतहि उत्तमपैकीं ठरेल असें कॉपींत यश येईलसें वाटतें. गुदस्तां साहेबलोकांस साध्या अक्षराची कॉपी दाखविली होती. यंदां कॅपिटल अक्षरांसह दाखविली पाहिजे, म्हणून तशी तयारी चालविली पाहिजे.

१२ त्यांना र चा उच्चार बरोबर करतां येत नाहीं. तो सुधारण्याविषयीं मेहनत चालली आहे; व इंग्रजी शब्दांपुरती सुधारणाहि झाली आहे.

१३ सदर दीड वर्षांत बाबासाहेब यांची परीक्षा घेतलेल्या गृहस्थांचीं नांवें :

| | |
|---|---|
| १ श्री. नानासाहेब विंचुरकर. | १ बाबासाहेब नातू. |
| १ रा. बाळशास्त्री लागवणकर. | १ पुन्हां लागवणकर, पुणें. |
| १ हरिपंत अनोडकर, पुण्याच्या न्यू इं. स्कू. मधील टीचर. | १ पोलिटिकल एजंट. |
| | १ श्री. बाळासाहेब विंचुरकर. |
| १ रेव्हरंड स्माल. | |

सदरहू गृहस्थांपैकीं फक्त साहेबलोकांचे शेरे घेतले आहेत. बाकीच्या लोकांचे आवश्यक वाटले नाहींत म्हणून घेतले नाहींत. साहेबमजकुरांनीं दिलेले शेरे सरकारच्या नजरेखालून गेले आहेत. बाकीच्या लोकांनीं तोंडींच अभ्यास उत्तम तऱ्हेनें चालला आहे असें म्हटलें. इंग्रजी उच्चारांतील र ची सुधारणा झाल्याबद्दल श्री. बाबासाहेब नातू बोलले. शिवाय खुद्द सरकारनीं एकदां अभ्यास पाहिला आहे, व पुणें मुक्कामीं गुदस्त सालीं साहेबलोकांनीं सरकारच्या समक्ष परीक्षा घेतली आहे.

१४ शाळाधिकारी, सं. भोर, यांनीं इंग्रजी शाळेंत वर्गामध्यें बाबासाहेबांची तीनचार वेळ इंग्रजीची परीक्षा रामनवमीच्यापूर्वीं घेतली होती. त्या वेळीं अभ्यास चांगला चालला आहे अशाबद्दल त्यांनीं मला कळविलें होतें.

ही परीक्षा चालू असूनहि वाड्यांत जाऊन परीक्षा घेत जावी असा त्यांना हुकूम झाला. त्याप्रमाणें ते आठवड्याचे आठवड्यास वाड्यांत येऊन शाळेंतील इयत्तेप्रमाणें परीक्षा घेत असतात. त्यांच्याजवळ अभ्यासाबद्दल शेरा मागितला, परंतु त्यांनीं सांगितलें कीं, आम्ही परस्पर सरकारला कळवूं.

१५ बाबासाहेबांकडील पुस्तकांचा झाडा अलाहिदा बळवंतराव मेढेकर यांचे मार्फत गेला आहे. म्हणून या रिपोर्टाबरोबर पाठविला नाहीं. त्यांतील नीतिपर व बोधपर वगैरे मनोरंजक पुस्तकें घेतलीं आहेत. त्यांचा उद्देश नीति सुधारण्याचा तर आहेच; परंतु त्यांना मराठी वाक्य नीट जुळवितां येत नाहीं, त्याची वाचतां वाचतां संवय लागावी हा उद्देश आहे.

१६ वर लिहिल्याप्रमाणें सरकारनीं अभ्यासाची पाहिजे तेव्हां येऊन परीक्षा घ्यावी. माझी तयारी आहे.

१७ कमींत कमी पाहतां बाबासाहेबांचा अभ्यास एक वर्षाचा फायद्यांत पडला आहे.

१८ शाळाधिकारी परीक्षक नेमल्यामुळें मजवरहि तितकी जबाबदारी कमी झाली हें खरें, तरी माझें कर्तव्यकर्म पूर्णपणें मी करीत आहें. याप्रमाणें वार्षिक रिपोर्ट दरसाल मी करीत जाईन. पण सरकारचा हुकूम झाल्यास सहामाही, तिमाही किंवा दरमाही रिपोर्ट पाठविण्यास माझी हरकत नाहीं. इच्छा म्हणून इतकीच कीं, लोकांच्या बातमीवर सरकारचें लक्ष जाण्यास कारण होऊं नये. तथापि बाबासाहेब यांच्याबरोबर मी पत्ते खेळत असतों, ही बातमी खोटी नसून खरी आहे. त्याला कारण असें कीं, श्रीमंतांच्या मुलाला शिकविणें हें काम मोठें नाजुक असतें. त्यांना काठीनें मारतां येत नाहीं. गोड खाण्या-प्रमाणें मुलांना कांहीं तरी आमिष लागत असतें. पत्ते खेळणें हें आमच्या अभ्यासाचें आमिष व न खेळणें ही शिक्षा आहे. बाबासाहेबांनीं दिलेला अभ्यास नीट केला तर त्या दिवशीं अभ्यासानंतर अमुक डाव खेळावयाचे, अभ्यास न करतील त्या दिवशीं खेळणें वर्ज्य.

२० ह्या खेळण्यालाहि मर्यादा आहे. सायंकाळीं अभ्यासानंतर तालमींत किंवा बाहेर जाण्यापूर्वीं जो वेळ मिळतो त्या वेळीं काय तें हें खेळणें होत असतें. फक्त पांचपंचवीस मिनिटें मिळतात. तशांतून अभ्यास लांबल्यास

कधीं वेळहि मिळत नाहीं. श्रीमंत बाबासाहेब नातूंजवळ बाबासाहेब रात्रंदिवस पत्ते खेळत असतात म्हणून कोणीं सांगितलें, त्याची तोंडावर रुजुवात होऊन सदरहू सांगणें सर्वथैव खोटें आहे असें ठरलें आहे.

२१ यात्रेमध्यें अभ्यास पूर्वी झालेला मात्र बाबासाहेब विसरून गेले. आगगाडींत फर्स्टक्लासमध्यें बाबासाहेब यांस बोलल्याचालल्यावांचून सारा वेळ एकसारखें बसावें लागे. त्यामुळें फारच कंटाळा येत असे. त्यांनीं आमच्या डब्यांत यावें अशी त्यांच्याच सांगण्यावरून मी सरकारजवळ विनंति करीत असें. तेथें आम्ही सर्व वेळ खेळलों असतों असेंहि नाहीं. सरकारच्या भयास्तव थोडाबहुत अभ्यास झाला असता. मुळीं अभ्यास झाल्याशिवाय आम्हांस खेळण्याचा हक्कच आला नव्हता. इतर विषयांसंबंधानेंहि माहिती देतां आली असती. परंतु सरकारांची खुषी नसल्यामुळें मीं पुढें विचारण्याचें सोडून दिलें.

२२ आतां पुढच्या यात्रेस बाबासाहेब यांस नेणें म्हणजे त्यांच्या अभ्यासी आयुष्यांतील इतके दिवसांचा खाडा समजावा. त्यांना यात्रेला नेऊं नये असें माझें मत आहे. परंतु ती गोष्ट सरकारांच्या खुषीची आहे.

२३ बाबासाहेबांच्या प्रकृतीसंबंधानें पुण्यांत कोणीं कांहीं भलतीच बातमी उठविली होती. तशी भीति बाळगण्यास कांहीं कारण नाहीं. माझें तें काम नव्हे, तरी त्यांच्या प्रकृतीकडे मी लक्ष देत असतों. ज्याप्रमाणें मास्तर कांहीं शिकवीत नाहींत असें म्हणणारे लोक आहेत त्याचप्रमाणें उलटपक्षीं मास्तर बाबासाहेबांकडून फार अभ्यास करवितात व त्यामुळें त्यांची प्रकृति खराब होते, असेंहि म्हणणारे लोक आहेत. परंतु माझ्या अभ्यासाची त्यांस मुळींच तसदी नाहीं. माझा अभ्यास फक्त ते दिवसा करतात. त्यांची बुद्धि तीव्र असून त्यांचा जो इतका अभ्यास झाला आहे त्यांत तीन-चतुर्थांश मेहनत माझी आहे.

२४ बाबासाहेब माझा अभ्यास नीटपणें करतात. त्यांच्यासंबंधानें माझी बिलकुल तक्रार नाहीं.

२५ बाबासाहेबांबरोबर सरकारनीं एक गरिबाचा मुलगा वाड्यांत जेवा-वयास सांगून अभ्यास घेतला व त्याला कांहीं रुपयेहि बक्षिस दिले हें कृत्य फार स्तुत्य झालें. सदरहू मुलगा अभ्यासांत व समजुतींत चांगला हुशार असून हा

चित्रांक



श्रीमंत बाबासाहेबांचें दुय्यम शिक्षण 'पुणें हायस्कूल' या नांवानें संबोधल्या जाणाऱ्या शाळेंत झालें. पुणें हायस्कूल त्या वेळीं विश्रामबागवाड्यांत होतें. ती इमारत. [ सं. पा.

वेळपावेतों त्याचें गैरवर्तन कांहीं आढळलें नाहीं. दुसरा मुलगा गोविंदराव जोशी यांचा पुतण्या आहे. तो अभ्यासांत साधारण आहे. या दोन्ही मुलांस सरकार परवानगीवरून कागदशाईचा दरमहा दोनतीन आण्यांचा खर्च सरकारखर्चांतून होत असतो.

२६ शिकण्याची वेळ शाळेच्या वेळेप्रमाणें बदलावी लागते. ती सायंकाळचे तीन किंवा साडेतीनपासून पुढें असते.

२७ या दीड वर्षांत सरकार परवानगीनें मी आठ दिवसांची रजा घेऊन पुण्यास गेलों होतों, त्याशिवाय एक दिवसहि मजकडून खाडा झाला नाहीं.

२८ यात्रेंतील पुष्कळ दिवस व परगांवीं जाण्यायेण्यास खर्च झालेले दिवस शिवाय करून डोकें दुखणें वगैरेसंबंधानें एक एक दिवसप्रमाणें एकंदर चार दिवस बाबासाहेबांकडून या चौदा महिन्यांत खाडे झाले. मुलें घेतल्यापासून म्हणजे जून १८९० पासून आज चौदा महिन्यांचें हजेरीपत्रक व मार्कांचा कॅटलॉग ठेविला आहे. रविवारची सुट्टी असते. इतर सणांच्या आमचेकडील सुट्टया भोरच्या शाळेच्या सुट्टयांपेक्षां फार कमी असतात. दसरा, पाडवा असा मुख्य सण असल्यास सुट्टी देतों. किरकोळ कुळधर्म, मार्ग मळणें, श्राद्धपक्ष इत्यादि भोजनी सुट्टया भोरच्या शाळेप्रमाणें देत नाहीं. ज्या सुट्टया व गैरहजेऱ्या आहेत त्या हजेरीपत्रकांत नमूद आहेत. रामनवमीची सुट्टी भोरच्या शाळेस दहा दिवस असते. परंतु मी अक्षदीचे दोन दिवस, खुद्द नवमी एक दिवस व देकार एक दिवस याप्रमाणें सुट्टया देत असतों. अशीच गोष्ट शिमगा व दिवाळी इत्यादि मोठ्या सणांसंबंधानें आहे. मंगळवारचीहि भोरच्या शाळे-प्रमाणें अर्धी सुट्टी देत नाहीं.

.... येणेंप्रमाणें २८ कलमें सेवेसीं श्रुत होण्याकरितां लिहिलीं आहेत. श्रुत होतील हे विनंति. ता. ३० माहे जुलै १८९१ इ.

**गणेश महादेव लिमये.**

ह्या वेळेस श्रीमंत बाबासाहेब यांच्याबरोबर सहाध्यायी चिंतामण गणेश जोशी व दत्तात्रय गणेश बोकील असे विद्यार्थी होते व बळवंतराव मेढेकर हे व्यवस्थापक होते.

सन १८९१ च्या डिसेंबर महिन्यांत गोकर्णाच्या यात्रेहून परत आल्यावर स्वारींतील मंडळी आजारी पडल्याचें मागें सांगण्यांत आलेंच आहे. लिमये मास्तर यांनाहि प्रवासांतील पाणी बाधलें होतें. भोरास आल्यानंतर तेहि तापानें आजारी झाले व त्या आजारांतच त्यांचा अंत झाला. त्यांच्या निधनामुळें श्रीमंत बाबासाहेबांना फार वाईट वाटलें. शाळाधिकारी सरंजामे हेहि आजारी झाले होते. तेहि कांहीं दिवसांनीं परलोकवासी झाले. त्यांचें श्रीमंत बाबासाहेबांवर फार प्रेम असे. ते त्यांना मधून मधून शिकवीत असत. गोकर्णाच्या यात्रेनें या दोन शिक्षकांचे बळी घेतले, त्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांचें फार नुकसान झालें असें त्यांना वाटलें.

भोर येथें त्या वेळीं इंग्रजी तीन इयत्ता शिकविण्याची सोय होती. श्रीमंत बाबासाहेबांची इंग्रजी दुसरी इयत्ता सन १८९३ सालीं पुरी झाली. त्या वेळीं त्यांच्या वयाचीं चौदा वर्षें पुरीं होऊन त्यांना पंधरावें वर्ष लागलें होतें. यावरून शिक्षणाच्या बाबतींत ते किती मागें राहिले होते हें दिसून येईल. अभ्यासाचा जो महत्त्वाचा काल तो भोरास गेल्यामुळें त्यांचें फार नुकसान झालें. भोर येथें त्या वेळीं शिक्षणाची सोय साधारण होती. मराठी चार इयत्ता व इंग्रजी तीन इयत्ता इतकेंच शिक्षण दिलें जात असे. शिक्षण-सामग्रीहि बेताचीच होती. चित्रकला, गायनकला इत्यादि उपयुक्त कलाशिक्षणाची सोय नव्हती. या कला शिकण्यांत वेळ घालविणें म्हणजे वेळेचा दुरुपयोग करणें अशी त्या वेळीं पालकांची समजूत असे. मुलांचा सर्व वेळ अभ्यासाची घोकंपट्टी करण्यांत गेला पाहिजे, अभ्यासाव्यतिरिक्त त्यांना दुसरा कोणताहि छंद असतां कामा नये, असें त्यांना वाटे. ते मुलांना खेळण्यांतहि वेळ घालवूं देत नसत. नानाप्रकारचे खेळ खेळण्याचीं साधनें नव्हतीं. श्रीमंत बाबासाहेबांची भिडस्त वृत्ति व वरील प्रतिकूल परिस्थिति यांमुळें त्यांना विशेष अशा कोणत्याच खेळाची आवड उत्पन्न झाली नाहीं.

शाळेंत फक्त एक तालीम होती. त्या तालमींत ते कधीं कधीं जात. तेथील त्यांचा व्यायाम बेताचाच असे. इतर मुलांच्या कुस्त्या होत त्या ते पाहत बसत. त्यांना कुस्ती खेळण्याची इच्छा होत असे. परंतु राजपुत्राबरोबर सामान्य मुलांना खेळण्याची भीति वाटते. त्यांतून राजधानीच्या ठिकाणीं तर ही भीति फार असते.

बहुतेक मुलें नोकरवर्गांतील लोकांचीं असल्यामुळें त्यांच्या मनावर एक प्रकारचें दडपण असतें. राजपुत्रास अप्रिय अशी कोणतीहि गोष्ट करण्यास तीं सहसा धजावत नसत. कोणत्याहि खेळांत पराभव आपल्या पदरांत घेतला पाहिजे याची त्यांना जाणीव असे. आपल्या हातून राजपुत्राचा पराभव झाला तर आपल्यावर त्यांचा रोष होईल या भीतीनें कोणताहि मुलगा त्यांच्याबरोबर मोकळेपणानें वागत नसे. श्रीमंत बाबासाहेब मुलांना आपल्याबरोबर कुस्ती खेळण्यास सांगत; परंतु वरील भीतीमुळें त्यांपैकीं कोणीहि तयार होत नसे. त्या वेळचे दप्तरदार आण्णासाहेब चित्रे यांचा सच्चिदानंद नांवाचा मुलगा श्रीमंत बाबासाहेबांच्या वर्गांत होता. तो जरा धीट होता. त्यानें श्रीमंत बाबासाहेबांच्या बरोबर कुस्ती खेळण्याचें कबूल केलें. श्रीमंत बाबासाहेबांना कुस्ती खेळण्याची संवय नसल्यामुळें त्यांना पाडण्यास चित्रे यास मुळींच प्रयास पडला नाहीं व संकोचहि वाटला नाहीं. चित्रे याचें धाडस इतर मुलांना पसंत पडलें नाहीं. तीं घाबरल्यासारखीं दिसलीं. श्रीमंत बाबासाहेबांना चित्रे यानें पाडल्याबद्दल कांहींच वाटलें नाहीं. उलट त्यांनीं चित्रे याची खिलाडू वृत्तीनें तारीफच केली. ते म्हणाले, "संवय केल्याशिवाय आम्हांस तरी दुसऱ्यांस कसें पाडतां येईल ?" चित्रे याच्याबरोबर ते पुढें फारच मोकळ्या मनानें वागत. त्यांची ही खेळाडू वृत्ति पाहून इतर मुलांच्या मनांतील भीति हळू हळू नाहींशी होत गेली व तीं त्यांच्याबरोबर सलगीनें वागूं लागलीं.

श्रीमंत बाबासाहेब यांच्या इंग्रजी दोन इयत्ता झाल्यावर पुढील शिक्षणाकरितां त्यांना कोठें ठेवावें याबद्दल विचार सुरू झाला. पोलिटिकल एजंट यांनीं त्यांना राजकोट येथें ठेवण्याबद्दल रावसाहेबांना सुचविलें. रावसाहेब व जिजीसाहेब यांना आपल्या एकुलत्या एक मुलास आपल्यापासून इतकें दूर ठेवणें पसंत नव्हतें. शिवाय श्रीमंत बाबासाहेबांची प्रकृति पहिल्यापासून अशक्त, यामुळें ते नेहमीं आपल्या नजरेखालीं असावे, असें त्यांना वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. रावसाहेबांनीं साहेबांना अडचणी कळविल्यावर त्यांनींहि बाबासाहेबांना राजकोटास ठेवण्याचा आग्रह धरला नाहीं. साहेबांच्या विचारें त्यांना पुणें हायस्कुलांत ठेवण्याचें ठरलें. रावसाहेबहि याच हायस्कुलांत पूर्वी कांहीं दिवस शिकत होते. त्या वेळच्या हायस्कूलचे हेडमास्तर प्रायरसाहेब

यांची रावसाहेबांनीं भेट घेतली व श्रीमंत बाबासाहेबांना हायस्कुलांत ठेवण्याचा आपला मनोदय कळविला. प्रायरसाहेबांना रावसाहेबांची योजना पसंत पडली व त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना पुण्यास ठेवण्यास सांगितलें. त्या वेळीं वार्षिक परीक्षा ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांत होत असत व डिसेंबरपासून नवीन वर्ग सुरू होत. श्रीमंत बाबासाहेबांची इंग्रजी दुसऱ्या इयत्तेची परीक्षा भोरास झाली होती. तेव्हां त्यांना डिसेंबर महिन्यांत पुण्यास ठेवण्याचें रावसाहेबांनीं निश्चित करून पुण्यास त्यांच्या तैनातीस कोण कोण मंडळी ठेवावयाची वगैरे सर्व तयारी करण्यास सुरुवात केली.

चित्रांक १४



श्रीमंत बाबासाहेब यांचा विवाहाच्या वेळचा फोटो.

[ सं. पा. ७३

१. श्रीमंत बाबासाहेब ( वय १५ )

२. श्री. सौ. गंगूताईसाहेब ( वय ७ )

## प्रकरण ३ रें

# दुय्यम व उच्च शिक्षण

### १८९३ ते १९०६

सुखार्थी त्यजते विद्यां विद्यार्थी त्यजते सुखम् ।
सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम् ॥

पूर्वीं ठरल्याप्रमाणें रावसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या तैनातीस ठेवावयाच्या मंडळींची निवड करून ती मंडळी त्यांच्या तैनातीस देऊन सन १८९२ च्या डिसेंबर महिन्यांत त्यांना शिक्षणाकरितां पुण्यास ठेविलें. ता. १४ डिसेंबर रोजीं सुमुहूर्तावर त्यांचें नांव पुणें हायस्कुलांत तिसऱ्या इयत्तेंत दाखल केलें व खाजगी शिक्षक म्हणून गंगाधर बल्लाळ लेले यांची नेमणूक केली. लेले हे पुण्यांतील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षक होते. ते श्रीमंत बाबासाहेबांचे इंग्रजी सहाव्या इयत्तेपर्यंत खाजगी शिक्षक होते. त्यांची शिकविण्याची पद्धत चांगली असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना त्यांचा फार उपयोग झाला. त्यांच्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत फार आदर असे. खाजगी शिकविण्याचा संबंध सुटल्यानंतरहि त्यांचें श्रीमंत बाबासाहेबांच्याकडे मधून मधून येणें जाणें असे. राज्यारोहणानंतर श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना त्यांची पूर्वींची कामगिरी लक्षांत घेऊन दरमहा दहा रुपये पेन्शन करून दिलें. सुमारें सहासात वर्षांपूर्वीं लेले परलोकवासी झाले. तोंपर्यंत त्यांनीं पेन्शनचा उपभोग घेतला. प्राथमिक शिक्षणाच्या वेळचे पहिले खाजगी शिक्षक साने यांस व त्यांच्या पश्चात् त्यांच्या कुटुंबासहि श्रीमंत बाबासाहेबांनीं पेन्शन दिलें होतें. गादीवर येण्यापूर्वीं ज्या ज्या शिक्षकांचा श्रीमंत बाबासाहेबांना अत्यंत उपयोग झाला व ज्यांनीं ज्यांनीं त्यांना योग्य प्रकारची मदत केली त्यांना ते विसरले नाहींत.

श्रीमंत बाबासाहेब पुणें हायस्कुलांत जाऊं लागले तेव्हां भोरांतल्यापेक्षां अगदीं स्वतंत्र वातावरणांत आल्याबद्दल त्यांना आनंद वाटूं लागला. मागें सांगितलेंच आहे कीं, त्या वेळीं भोरास इंग्रजी ३ इयत्ता शिकविण्याची सोय होती. इंग्रजी शिक्षकांत एकच मॅट्रिक झालेला शिक्षक असून बाकीचे सेकंड

ग्रेड पब्लिक सर्व्हिस परीक्षा पास झालेले होते. इंग्रजी शिकणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्याहि पंचवीस-तीसपेक्षां जास्त नव्हती. बहुतेक विद्यार्थी नोकर लोकांचीं मुलें असून एकदोन इयत्ता झाल्या कीं, नोकरीची उमेदवारी मिळविण्याकडे त्यांचें लक्ष लागे. अभ्यासाकडे त्यांचें विशेष लक्ष नसे. डोक्यावर पागोटें घालून वाड्यांत जाऊन उमेदवारी करण्याची संधि कधीं मिळते याची ते वाट पाहत असत. अशा मुलांच्या सहवासांत श्रीमंत बाबासाहेबांच्या भोर येथें इंग्रजी दोन इयत्ता झाल्या. त्यामुळें ते जरी दुसऱ्या इयत्तेंत पास झाले होते तरी त्यांची ती इयत्ता कच्चीच राहिली. पुण्यास जेव्हां ते तिसऱ्या इयत्तेंत गेले व वर्गाबरोबर अभ्यास करणें कठीण पडूं लागलें तेव्हां आपण किती मागें आहोंत हें त्यांच्या लक्षांत आलें. तथापि उमेद खचूं न देतां खाजगी शिक्षकांच्या मदतीनें मेहनत करून सहामाही परीक्षेपर्यंत आपण वर्गाबरोबर येऊं असा त्यांना विश्वास वाटत होता. परंतु गोकर्णाच्या यात्रेहून आल्यापासून त्यांना मधून मधून मलेरियाचा ताप येतच असे. त्यामुळें सहामाही परीक्षेची तयारी झाली नाहीं म्हणून त्यांना त्या परीक्षेस बसतां आलें नाहीं. तयारी न झाल्यामुळें ते सहामाही परीक्षेस बसले नाहींत. त्या वेळीं त्यांना फार वाईट वाटलें. शिक्षणाकरितां आपणास प्रथमपासून पुण्यास ठेवलें असतें तर कितीतरी फायदा झाला असता, असेहि उद्गार त्यांनीं त्या वेळीं काढले होते. तथापि कोणत्याहि गोष्टींत निराश व नाउमेद न होणें हा त्यांच्या स्वभावांतील विशेष गुण असल्यामुळें सहामाही परीक्षेची जरी आपणास तयारी करतां आली नाहीं तरी वार्षिक परीक्षेपर्यंत तयारी करून तिसऱ्या इयत्तेंत पास होण्याचा त्यांनीं निश्चय केला.

## प्रथम विवाह

श्रीमंत बाबासाहेबांना पंधरावें वर्ष लागल्यानंतर त्यांच्या मातोश्री कै. श्री. सौ. जिजीसाहेब यांच्या मनांत त्यांचा विवाह लांबविणें चांगलें नाहीं असा विचार येऊन त्यांनीं आपला हेतु रावसाहेबांना कळविला. रावसाहेबहि त्याच विचारांत असल्यामुळें त्यांनीं जिजीसाहेबांच्या इच्छेप्रमाणें हें कार्य लवकर जुळवून आणण्याचें ठरविलें. जिजीसाहेबांचे बंधु कै. सरदार बाळासाहेब विंचुरकर यांच्या कन्येस सून करून घेण्याचें जिजीसाहेबांच्या मनांत होतें व तें साहजिक

होतें. देशस्थांत मातुल कन्येबरोबर विवाह करणें सशास्त्रच असल्यामुळें हा शरीरसंबंध घडून येण्यास हरकत येण्याचें मुळींच कारण नव्हतें. शिवाय मुलगी सुस्वरूप असून श्रीमंत बाबासाहेबांना अनुरूप अशीच होती. त्या वेळीं शारदा कायदा अस्तित्वांत आला नसल्यामुळें वयाची आडकाठी नव्हती. रावसाहेबांना ही योजना पसंत पडून त्यांनीं आपला हेतु बाळासाहेब विंचुरकरांना कळविला. या बाबतींत बहीणभावांचें अगोदरच ठरलें असल्यामुळें रावसाहेबांच्या म्हणण्यास त्यांनीं ताबडतोब रुकार दिला. पुढें वधूवरांच्या पत्रिका पाहण्याचें काम ज्योतिषाकडे आलें तेव्हां त्यांनीं पत्रिका जमत नाहींत, ग्रह अनिष्ट आहेत असें आपलें मत दिलें. या निर्णयानें जिजीसाहेबांच्या मनावर परिणाम होऊन त्यांचा हिरमोड झाला व आपण योजिलेला बेत फिसकटणार याबद्दल त्यांना वाईट वाटलें. कांहीं ज्योतिषांनीं सांगितलें कीं, योग्य दानाच्या भोगानें ग्रहांची अनिष्टता टळण्यासारखी असल्यामुळें हा संबंध कायम करण्यास हरकत नाहीं. रावसाहेब व्यवहारचतुर होते. त्यांनीं सर्व गोष्टींचा विचार करून जिजी-साहेबांच्या इच्छेप्रमाणें हेंच स्थळ कायम करण्याचें ठरविलें व त्यामुळें जिजी-साहेबांना आनंद वाटला.

सन १८९२ साळच्या दिपवाळींत रावसाहेब सर्व खाशा स्वाऱ्यांसह मुंबईस होते. तेथें बाळासाहेब व नानासाहेब विंचुरकर त्यांना भेटले. विवाह जरी पुढें सहासात महिन्यांनीं होणार होता तरी विवाहासंबंधीं उभयतां भावी व्याह्यांमध्यें बोलणें वगैरे होऊन याद्या झाल्या. तिथिनिश्चय करण्याचें काम फक्त राहिलें होतें. दिपवाळी झाल्यानंतर विंचुरकर मंडळी विंचुरास गेली व रावसाहेब भोरास आले. भोरास कांहीं दिवस राहून श्रीमंत बाबासाहेब डिसेंबर महिन्यांत पुणें हायस्कुलांत गेल्याचें सांगण्यांत आलेंच आहे.

सन १८९३ सालच्या सहामाही परीक्षेनंतर श्रीमंत बाबासाहेब भोरास गेले. तेव्हां ज्येष्ठ वद्य २, ता. १ जून हा विवाहाचा मुहूर्त निश्चित करण्यांत येऊन विवाहसमारंभाच्या तयारीस सुरुवात झाली. लग्नाच्या याद्या होऊन तिथिनिश्चय होईपर्यंत दरम्यानच्या सहा महिन्यांच्या अवधींत कांहीं उपद्व्यापी लोकांनीं हा शरीरसंबंध घडूं न देण्याचा चंग बांधल्याचें दिसत होतें. मधून मधून रावसाहेबांना बिननांवी पत्रें येत असत व त्यांत हा शरीरसंबंध झाला

तर मुलगी नवऱ्याच्या मुळावर असल्यामुळें व बरेच ग्रह अनिष्ट असल्यामुळें अनर्थ ओढवल्यावांचून राहणार नाहीं अशा प्रकारचा मजकूर असे. हीं पत्रें रावसाहेब जिजीसाहेबांना दाखवीत असत व त्यांतील मजकुराची चर्चा कधीं कधीं श्रीमंत बाबासाहेबांच्या देखत होत असे. वास्तविक पाहतां असल्या गोष्टी बाबासाहेबांच्या देखत काढावयास नको होत्या, पण त्या काढल्या जात. त्याचा परिणाम त्यांच्या मनावर होत असे. अनिष्ट ग्रहशांत्यर्थ रावसाहेब नेहमीं अनुष्ठानें ठेवीत असत. दानेंहि चालू असत. श्रीमंत बाबासाहेब लहानपणापासून हें सर्व पाहत असल्यामुळें ग्रहांच्या इष्टानिष्टतेवर त्यांचा विश्वास बसला होता, व अद्यापहि ज्योतिषावर त्यांचा भरंवसा आहे. पण त्यावर सर्वस्वीं विसंबून इतर योग्य प्रयत्न न करतां स्वस्थ बसावयाचें असें मात्र त्यांचें मत नाहीं. वरील निनांवी पत्रें पाठविणाऱ्यांचा हेतु रावसाहेबांनीं व जिजीसाहेबांनीं घाबरून जाऊन या शरीरसंबंधांत मोडता घालावा, असा असला पाहिजे. परंतु त्यांचे प्रयत्न निष्फल झाले. रावसाहेबांनीं आपला निश्चय ढळूं दिला नाहीं. त्यांचा ज्योतिषशास्त्रावर विश्वास होता. त्याचप्रमाणें कोणत्या अनिष्ट ग्रहांची शांति कोणत्या उपायानें करावी, कोणतीं अनुष्ठानें केलीं असतां व कोणतीं दानें दिलीं असतां ग्रहांना प्रसन्न करून घेतां येतें हें ज्योतिष्यांच्याच संमतीनें त्यांनीं ठरवून ठेविलें होतें. आपल्या धर्मशास्त्रानें कोणत्याहि अडचणीचा परिहार करण्याचे मार्ग सांगितले आहेत. मुलीचे ग्रह जर नवऱ्याला बाधक होणारे असतील तर तिचा प्रथम कुंभाशीं विवाह लावावा, म्हणजे सर्व अनर्थ टळतात, असा शास्त्राधार निघाला; व त्याप्रमाणें श्रीमंत बाबासाहेबांशीं विवाह लावण्यापूर्वी बाळासाहेब विंचुरकरांनीं आपल्या कन्येचा प्रथम कुंभविवाह करावा असें ठरलें. त्यामुळें सर्वांच्या मनावरील भीति दूर झाली व अनिष्ट ग्रहांचा प्रश्न निकालांत निघाला.

विवाहाचा तिथिनिश्चय केल्याचें वर सांगण्यांत आलेंच आहे. ज्येष्ठ शु.९ शके १८१५ रोजीं विवाहाची कुंकुमपत्रिका प्रथम श्रीस अर्पण करण्यांत आली. नंतर निमंत्रणपत्रिका इतर ठिकाणीं पाठविण्यांत आल्या. त्या वेळीं हल्लींप्रमाणें छापील निमंत्रणपत्रिका पाठविण्याची पद्धत नव्हती. निमंत्रणपत्रिका सुंदर वळणदार मोडी अक्षरांत लिहून त्यांवर केशरी रंगाचा शिडकाव

करून त्या पाठविल्या जात. बऱ्या लोकांच्याकडे पोष्टानें न पाठवितां समक्ष आमंत्रण करून अगर कारकुनाबरोबर त्या पाठविण्याचा रिवाज होता. त्याप्रमाणें निमंत्रणपत्रिका रवाना झाल्या.

ता. २९ मे रोजीं श्रीमंतांच्या स्वाऱ्या आंबवड्यास आपल्या पूर्वजांच्या म्हणजे श्री. शंकराजी नारायण यांच्या समाधीच्या दर्शनास जाऊन आल्या. ठरल्याप्रमाणें कुंभविवाहविधि उरकून घेऊन वधूपक्षाकडील मंडळीहि त्याच दिवशीं भोरास येऊन दाखल झाली. या मंडळीस राहण्याकरितां निरनिराळ्या ठिकाणीं जागा देण्यांत आल्या होत्या. लग्नमंडप वे. शा. सं. बाबा दीक्षित यांचे आजे वे. शा. सं. नरसू दीक्षित यांच्या घरीं तयार करण्यांत येऊन त्यांच्या समोरच रथखान्यांत कचेरीचा मंडप उभारला होता. ता. ३१ मे, ज्येष्ठ वद्य १ रोजीं वाङ्निश्चय व सीमान्तपूजन हे समारंभ झाले. गुरुवार ता. १ जून, ज्येष्ठ वद्य २ रोजीं सकाळीं रुखवताचा थाट होऊन श्रीमंत बाबासाहेब यांची स्वारी हत्तीवर अंबारींत बसून वधूगृहीं जाण्यास निघाली. मिरवणुकीचा थाट पुढीलप्रमाणें होता. अग्रभागीं पायदळ, बॅण्ड, वाजंत्री वगैरे मंगल वाद्यें, स्वार, शिबंदी, डंका, निशाण, कोतवाली घोडीं चालत असून त्यांच्या मागें अंबारीचे हत्ती व हत्तींच्या मागें बायकांसह जिर्जीसाहेबांची स्वारी व त्यांच्या मागून पुरुष मंडळी व रावसाहेब चालत होते. अशा मोठ्या लवाजम्यानिशीं समारंभानें श्रीमंत बाबासाहेब मिरवत मिरवत वधूगृहीं गेले व ठरलेल्या सुमुहूर्तावर लग्न लागलें. नंतर पानसुपारीची कचेरी झाली. पुढें मेजवान्या सुरू झाल्या. वधूपक्षाकडून वरपक्षास तीन मेजवान्या देण्यांत आल्या. रोज चारपाचशें पात्रें होत असत. लग्नसमारंभाकरितां भोरास बरेच ब्राह्मण जमल्यामुळें रावसाहेबांच्याकडे रोज दोनदोन हजार भोजनाचीं पात्रें होत असत. ता. २ रोजीं जहागिरदार वगैरेकडील कारकून व पदरची आश्रित मंडळी अहेर घेऊन आली होती. त्यांच्या अहेरांची कचेरी झाली. ता.३ रोजीं वरातीचा समारंभ झाला. वरात हत्तीवरूनच निघाली होती. मिरवणूक प्रेक्षणीय होती. वरात वाड्यांत आल्यावर लक्ष्मीपूजनाची कचेरी झाली व रावसाहेबांनीं आपल्या स्नुषेचें नांव सौ. गंगाबाईसाहेब असें ठेविलें. तथापि पुढें त्यांना श्री. सौ. गंगूताईसाहेब ऊर्फ वहिनीसाहेब म्हणत असत.

ता. ४ रोजीं रावसाहेबांनीं विंचुरकरांकडील मंडळींस मोठ्या थाटाची मेजवानी दिली.

ता. ५ रोजीं मांडवपरातनें होऊन विंचुरकरांनीं रावसाहेब, जिजीसाहेब, श्रीमंत बाबासाहेब व वरपक्षाकडील सर्व मानकरी मंडळींस पोषाख दिले व त्याच दिवशीं संध्याकाळीं ब्राह्मणांस व इतरांस देकार वांटला. त्या वेळीं सुमारें साडेतीन हजार ब्राह्मण जमले होते.

दुसऱ्या दिवशीं शास्त्री, वैदिक वगैरे बाहेरच्या निमंत्रित मंडळींस व आश्रित मंडळींस शालजोड्या धोतरजोडे, वगैरे योग्यतेनुरूप देण्यांत आले. गवई वगैरे गुणीजनांना बिदाग्या देण्यांत आल्या. सुमारें एक आठवडाभर लग्नसमारंभ चालू असून रोज कांहीं तरी कार्यक्रम सुरू असे. या विवाहसमारंभाप्रीत्यर्थ एकतीस हजार रुपये खर्च झाला.

त्या वेळीं पुण्यास चालू असलेल्या शुक्लपक्ष-कृष्णपक्षवादाचा संबंध भोरासहि येऊन पोहोंचला होता. म्हणून त्यासंबंधीं थोडक्यांत माहिती देणें जरूर आहे. पुण्यांत विक्षिप्तपणाच्या कामांत ख्याति पावलेले गोपाळराव जोशी यांनीं सन १८९१ सालीं सुशिक्षित लोकांच्या अंगच्या पोकळ सुधारकी बाण्याची टर उडवून त्यांची फजिती करण्याचा बेत केला. नारदमुनींप्रमाणें कळ लावून मौज पाहत बसण्याची कला त्यांना उत्तम साधली होती. व्याख्यानाकरितां म्हणून पुण्यांतील पंचहौद मिशन-स्कूलमध्यें त्यांनीं पुण्यांतील सुमारें ५० ठळक सुशिक्षित मंडळी जमा केली होती. त्यांत रानडे, टिळक यांसारखी मंडळी होती. व्याख्यानानंतर पूर्वीच गुपचुप रीतीनें तयार करून ठेवलेले चहाचे पेले सर्वांच्यापुढें आले. कांहींनीं तोंड वाईट करून कां होईना चहा घेतला. कांहींनीं मुळींच घेतला नाहीं. गोपाळरावांचें काम झालें. त्यांनीं दुसऱ्या दिवशीं पंचहौद मिशनमध्यें जमलेल्या सर्वच मंडळींचीं नांवें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करून सर्वांनीं चहापान केल्याचें जाहीर केलें. या बातमीनें धर्माभिमान्यांत खळबळ उडून ग्रामण्य प्रकरण सुरू झालें. चहा पिणारे व त्यांच्याशीं संबंध ठेवणारे कृष्णपक्षांत घातले गेले व धर्माभिमान्यांचा शुक्लपक्ष बनला. याप्रमाणें पुण्यांत दोन पक्ष निर्माण झाले. बरींच वर्षें हा वाद पुण्यांत चालू होता. बाबासाहेब नातू कृष्णपक्षांत सांपडले. रावसाहेबांचा व

त्यांचा स्नेह असल्यामुळें व रावसाहेबांचे व त्यांचे एकमेकांकडे भोजनाचे प्रसंग येत असल्यामुळें रावसाहेबांचें नांव कृष्णपक्षांत दाखल झालें. शुक्रपक्षाचे पुढारी बाळासाहेब नातू होते.

श्रीमंत बाबासाहेबांच्या विवाहाच्या वेळीं लो. टिळक सरदार बाळासाहेब विंचुरकरांच्या वाड्यांत राहत असत व बाळासाहेबांचा व त्यांचा स्नेह असल्यामुळें ते भोरास या लग्नाकरितां आले होते. रावसाहेबांच्या निमंत्रणावरून त्या वेळचे सुप्रसिद्ध कृष्णशास्त्री राजवाडे व नारायणशास्त्री गोडबोले हेहि आले होते. रावसाहेबांनीं विंचुरकरांकडील मंडळीस ज्या दिवशीं मेजवानी दिली त्या दिवशीं टिळकहि आले होते. श्रीराममंडपांत मेजवानीच्या पंगती मांडण्यांत आल्या होत्या. रावसाहेब जरी कृष्णपक्षांत होते तरी पंचहौद मिशनमध्यें प्रत्यक्ष चहापान करणाऱ्यांच्या पंगतीस बसण्याचा त्यांना कधीं प्रसंग आला तर ते मोठ्या युक्तीनें तो टाळीत असत. या भोजनास टिळक हजर होते. पंगतींत रावसाहेबांचेंहि पान मांडलेलें होतें. सर्व मंडळी आपापल्या जागीं येऊन बसल्यावर रावसाहेबांना मोठी पंचायत पडली. पंगतींत येतांच आपल्या जागेवर न बसतां त्यांनीं व्याह्यांना सांगितलें कीं, "आज आमच्याकडे आपणास मेजवानी असल्यामुळें आम्हांला भोजनास बसणें योग्य नाहीं. आपला समाचार घेणें आमचें कर्तव्य आहे. तेव्हां आम्ही आपल्याबरोबर बसत नाहीं. याबद्दल कोणी राग मानूं नये." असें म्हणून भोजनास न बसतां ते पंगतींत हिंडून सर्वांना आग्रह करीत होते. याप्रमाणें त्यांनीं पंगतींत बसण्याचें टाळलें.

कृष्णशास्त्री राजवाडे व नारायणशास्त्री गोडबोले हे भोजनास वाड्यांत येत नसत. मेजवानीच्या दिवशीं ते हजर होते, परंतु त्यांनीं फक्त दुध व केळीं घेतलीं. लग्नसमारंभानंतर उभयतां शास्त्र्यांना रावसाहेबांनीं शालजोड्या दिल्या होत्या. त्या घेऊन ते पुण्यास गेले. पुण्यांतील धर्ममार्तंडांना शास्त्रीबोवा लग्नास गेले हें खपलें नाहीं. त्यांनीं उभयतां शास्त्रीबोवांना प्रायश्चित्त घ्यावयास लावलें व त्यांना मिळालेल्या शालजोड्या हिरावून घेण्यांत आल्या.

भिक्षुकवर्गांत भोरांतहि दोन पक्ष झाले होते. सरकारी उपाध्ये धोंडभट पारखी हे कृष्णपक्षाचे पुढारी झाले व शुक्रपक्षाचें पुढारीपण अग्निहोत्री नरसू

दीक्षित यांनीं स्वीकारलें होतें. रावसाहेब कृष्णपक्षाभिमानी होते हें सांगण्यांत आलेंच आहे. तथापि वाड्यांत ते दोन्ही पक्षांच्या लोकांना सारख्याच रीतीनें वागवीत. या दोन पक्षांतील वाद त्यांना मुळींच पसंत नव्हता. भोरास त्यांनीं हा वाद मुळींच चालूं दिला नाहीं. विनायकशास्त्री चिरपुटकर नांवाचे सरकारच्या पदरीं एक आश्रित होते. त्यांनीं गलमिशा राखलेल्या असत व स्वभावानें ते मोठे विनोदी असत. यांचा सर्वत्र संचार असे. शुक्लपक्षांतील व कृष्णपक्षांतील लोकांच्या गंमती ते नेहमीं श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब यांना सांगत असत. इतर गोष्टी सांगून करमणूक करण्यांत त्यांचा हातखंडा असे. श्रीमंत बाबासाहेबांचें त्यांच्यावर फार प्रेम असे. हे शास्त्री सन १९१६ सालीं दिवंगत झाले. तोंपर्यंत श्रीमंत बाबासाहेबांना त्यांची फार करमणूक होत असे. तंटा मिटविण्यांत ते मोठे कुशल असत. ते परलोकवासी झाले त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांना फार वाईट वाटलें व त्यांनीं आपल्या रोजनिशींत त्यांच्या अंगच्या गुणांचा गौरवपर उल्लेख केला आहे.

विवाहाच्या वर्णनांत शुक्लपक्ष व कृष्णपक्ष यांचा संबंध आल्यामुळें या वादाची माहिती देणें जरूर वाटून ती देण्यांत आली आहे. कांहीं वर्षांनीं या वादाची तीव्रता कमी कमी होत जाऊन दोन्ही पक्ष एक झाले.

विवाहसमारंभ आटोपल्यानंतर विंचुरकर मंडळी विंचुरास गेली व शाळा सुरू झाल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब पुण्यास गेले. सहामाही परीक्षेस त्यांना बसतां आलें नाहीं, हें मागें सांगितलेंच आहे. दुसऱ्या सहामाहींत त्यांनीं अभ्यासास जोरानें सुरुवात केली व वार्षिक परीक्षेंत सर्व विषयांत पास होऊन ते वरच्या वर्गांत गेले. दर सहा महिन्यांनीं हायस्कूलचे हेडमास्तर श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रगतीचा अहवाल रावसाहेबांकडे पाठवीत असत. तो अहवाल पाहतां तिसऱ्या इयत्तेच्या वार्षिक परीक्षेंत श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रत्येक विषयांत चांगले मार्क मिळविल्याचें दिसून येतें. तिसरी इयत्ता पास झाल्यानंतर त्यांचा अभ्यास वर्गाबरोबर सुरळीत चालू झाला. सन १८९४ सालीं ते चवथ्या इयत्तेंत पास झाले. या परीक्षेचा वार्षिक अहवाल पाहतां त्यांना इंग्रजी, संस्कृत व इतिहास-भूगोल या विषयांत शेंकडा ६० च्या वर गुण मिळाले असून गणितांत १५० पैकीं १०० गुण मिळाल्याचें दिसून येतें.

चित्रांक १५



श्री. सौ. गंगुताईसाहेब.
श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रथम पत्नी.

चित्रांक १६



श्रीमंत बाबासाहेब यांच्या भगिनी
श्री. सौ. तान्हूबाई ऊर्फ बाईसाहेब

सं. पा. ७७

यावरून चिकाटी, अभ्यासाची तळमळ व परिश्रमाची हौस त्यांना किती वाटत होती हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. पांचव्या व सहाव्या इयत्तांच्या वार्षिक परीक्षांतहि प्रत्येक विषयांत त्यांनीं असेच चांगले गुण मिळविले होते. सन १८९६ सालीं त्यांची सहाव्या इयत्तेची परीक्षा पास होऊन ते सातव्या इयत्तेंत गेले.

## श्रीमंत बाबासाहेब यांच्या प्रिय भगिनी बाईसाहेब यांचा विवाह

रावसाहेबांची एकुलती एक कन्या तान्हूबाई ऊर्फ बाईसाहेब यांना सन १८९६ सालीं ११ वें वर्ष लागलें. त्यांचें वय जरी लहान होतें तरी त्या काळच्या मानानें त्यांचें वय लग्नाचें झालें होतें. रावसाहेबांच्या पूर्वीं सचिव घराण्यांत कोणाहि पुरुषास कन्यादानाचा लाभ मिळाला नव्हता. रावसाहेबांचें बाईसाहेबांवर अत्यंत प्रेम असे. जिजीसाहेबांच्याहि मनांतून आपल्या कन्येचा विवाह लवकर व्हावा असें होतें. बाईसाहेब देखण्या नव्हत्या. त्यांचा स्वभाव मात्र अत्यंत गरीब, सालस व विनयशील होता. रावसाहेब व जिजीसाहेब यांना आपल्या मुलीला आपल्या दर्जाचें व त्रास होणार नाहीं असें स्थळ कोठें मिळेल याची रात्रंदिवस विवंचना असे. सरदार अण्णासाहेब विंचुरकर यांचे दत्तक पुत्र भाऊसाहेब यांना जर आपली मुलगी दिली तर मुलीला त्रास होणार नाहीं असें रावसाहेब व जिजीसाहेब यांच्या मनांत येऊन त्यांनीं भाऊसाहेब यांनाच आपली कन्या देण्याचें ठरवून ता. ९ एप्रिल सन १८९६ इ. रोजीं पुणें येथें लग्नाच्या याद्या होऊन वैशाख वद्य ६, ता. ३ मे १८९६ हा दिवस लग्नसमारंभाकरितां निश्चित केला व लग्नसमारंभ भोर येथें करावयाचें ठरलें. सरदार बाळासाहेब विंचुरकर व त्यांच्या पत्नी वाराणशीबाई म्हणजे बाईसाहेबांचे मामा व मामी यांना मुलगी पसंत नव्हती. तथापि त्यांचीहि मुलगी रावसाहेबांची सून असल्यामुळें त्यांना रावसाहेबांच्या आग्रहास्तव संमती देणें भाग पडलें होतें.

ता. २९ एप्रिल रोजीं विंचुरकर व्याहीमंडळी नवरदेवासह भोरास येऊन दाखल झाली. ता. ३ मे रोजीं ठरलेल्या सुमुहूर्तावर वधूवरांचा विवाह होऊन पानसुपारीची कचेरी झाली. ता. ४ रोजीं वरातीचा समारंभ होऊन बाईसाहेबांचें सासरचें नांव सौ. पार्वतीबाईसाहेब असें ठेवण्यांत आलें. तथापि

त्यांना सासरीं सर्वजण माहेरच्या नांवानेंच हांक मारीत असत. लग्नसमारंभ तीनचार दिवस चालू होता. ब्राह्मणांना देकार वाटला त्याकरितां तीन हजार रुपये खर्च आला. सर्वांची यथोचित संभावना करण्यांत आली. या कार्या-निमित्त एकंदर ३१ हजार रुपये खर्च आला. त्याशिवाय रावसाहेबांनीं आपल्या कन्येस ५० हजारांचे अलंकार देऊन वरास वार्षिक बाराशें रुपये उत्पन्नाचीं कांहीं गांवें खरेदी करून तीं दिलीं. रावसाहेबांनीं आपल्या कन्येस इतमामानें राहतां यावें म्हणून एकंदर एक लक्ष रुपयांचा ऐवज दिला. भाऊ-साहेब विंचुरकर दत्तक जाण्यापूर्वी श्रीमंत बाबासाहेबांचे मामेबंधू होते, हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. आतां ते त्यांचे मेहुणे झाले. लग्नापर्यंत ते पुण्यास पंतसचिवांच्या वाड्यांतच अभ्यासाकरितां राहत होते व त्यामुळें श्रीमंत बाबा-साहेबांना त्यांच्या सतत सहवासाचा लाभ मिळत होता, तो लग्न झाल्यानंतर ते विंचुरकर यांच्या वाड्यांत राहूं लागल्यामुळें मिळेनासा झाला.

आपल्या मुलीस त्रास होणार नाहीं अशी जी रावसाहेबांची अपेक्षा होती ती पुढें लग्न झाल्यानंतर कांहीं दिवसांनीं फोल ठरली. त्या काळच्या आपल्या सामाजिक स्थितीप्रमाणें बाईसाहेबांना सासरीं बराच सासुरवास सोसावा लागून सुख लागलें नाहीं. हें पाहून श्रीमंत बाबासाहेबांनाहि वाईट वाटत असे व ते आपल्या भगिनीचें समाधान करून भाऊसाहेबांना चार समजुतीच्या गोष्टी सांगत असत.

## मॅट्रिकच्या वर्गांत

सन १८९७ सालीं श्रीमंत बाबासाहेब मॅट्रिकच्या वर्गांत गेले. श्रीमंत बाबासाहेब पुणें हायस्कूलमध्यें शिकण्यास राहिल्यापासून त्यांचे सहाध्यायी—ज्यांच्या लग्नासंबंधानें मागें हकीकत दिली आहे व ज्यांच्या लग्नाच्या वेळींच रासभ-रासभी विवाह झाला ते—कै. बाळासाहेब नातू व हल्लीं सेवानिवृत्त झालेले डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, भोर संस्थानचे दिवाण म्हणून हल्लीं काम करीत असलेले श्री. दादासाहेब कुमठेकर ( ता. १५ नोव्हेंबर १९३८ पासून श्रीमंत राजेसाहेब यांनीं कुमठेकर यांची दिवाण म्हणून नेमणूक केली आहे ) हे होते. मॅट्रिक क्लासपर्यंत श्रीमंत बाबासाहेब यांचे खाजगी शिक्षक कै. गंगाधरपंत लेले होते. पुढें हायस्कुलांतच त्या वेळीं शिक्षक असलेले श्री. तात्यासाहेब केळकर

यांचे बंधु व काव्यसंग्रहाचे संपादक कै. नारायणराव केळकर यांची खाजगी शिक्षकाच्या जगीं नेमणूक करण्यांत आली. नारायणराव केळकर यांच्या उत्कृष्ट शिक्षणपद्धतीमुळें व सदुपदेशामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत त्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन त्यांच्या धोरणाप्रमाणें त्यांनीं अभ्यास सुरू ठेविला. रोज आपल्या हातून काय काय गोष्टी झाल्या त्या सर्व ते रोजच्या रोज रोजनिशींत लिहून ठेवीत असत. त्या वेळीं त्यांनीं अभ्यासाचें रोजचें वेळापत्रक तयार केलें होतें तें असें :

**सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार**—शौचमुखमार्जन झाल्यानंतर तालीम १०० जोर व सुमारें ७५ बैठकी, त्यानंतर शाळेंत नेमून दिलेला अभ्यास, नंतर वेळ सांपडल्यास 'व्हिकार ऑफ वेकफील्ड' या पुस्तकांतील पंचवीस-तीस ओळी पाठ करणें, पुस्तकावरून एकदोन पानें लिहिणें, सायंकाळीं शाळेंतून आल्यानंतर बॅडमिंटन खेळणें अगर फिरावयास जाणें, रात्रीं जेवण झाल्यावर संस्कृत, गणित, इतिहास पाळीपाळीनें करणें.

**शनिवार**—सकाळीं शाळेंत जाणें, जेवण झाल्यानंतर १२ पासून १-३० पर्यंत मराठीचें इंग्रजी भाषांतर करणें, १-३० पासून ३ पर्यंत निबंध, इतिहास वगैरे. ३ ते ४ पर्यंत इंग्रजींतून संस्कृतमध्यें भाषांतर करणें. नंतर फराळ. फराळ झाल्यावर करमणूक—केसरी, मराठा वगैरे वर्तमानपत्रें वाचणें. पुढें फिरावयास जाणें. रात्रींचा क्रम बाकीच्या वारांप्रमाणें.

**रविवार**—सकाळीं शाळेंतील अभ्यास, दुपारीं विश्रांति, करमणूक वगैरे.

वरील वेळापत्रक श्रीमंत बाबासाहेबांनीं स्वत: लिहिलें होतें तें जसेंच्या तसेंच दिलें आहे. विशेष कारणांशिवाय त्यांच्या अभ्यासाच्या नियमितपणांत खंड पडत नसे. पुण्यास त्या वेळीं दरसाल प्लेगमुळें शाळा कांहीं महिने बंद ठेवाव्या लागत, त्यामुळें मुलांचें नुकसान होत असे. सन १८९७ सालींच श्रीमंत बाबासाहेब मॅट्रिक परीक्षेस बसणार होते; परंतु कांहीं महिने फुकट गेल्यामुळें त्यांना त्या सालीं परीक्षेस बसतां आलें नाहीं. सन १८९८ सालींहि पुण्यांतील हवा बिघडल्यामुळें त्यांना भोरास यावें लागलें. भोर येथील अँग्लो-व्हर्नाक्युलर स्कूलचें रूपांतर हायस्कूलमध्यें सन १८९७ सालींच झालें होतें.

श्रीमंत बाबासाहेब भोरास आले त्या वेळीं त्यांचे सहाध्यायी व स्नेही श्री. दादासाहेब कुमठेकर हेहि त्यांच्याबरोबर भोरास राहण्यास आले होते. भोर येथें हायस्कूलची सोय झालेली असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब व श्री. दादासाहेब या दोघांनींहि भोर येथील मॅट्रिकच्या वर्गांत नांवें दाखल केलीं. हा वर्ग नवीनच सुरू झाला असल्यानें त्यांत दहाबाराच मुलें होतीं. भोर हायस्कुलांत श्रीमंत बाबासाहेब ६-७ महिनेच होते.

श्री. रा. श्रीपाद केशव भिडे, बी.ए., हे त्या वेळीं हायस्कूलचे पहिले हेडमास्तर असून रा. रा. नारायण गणेश लेले फर्स्ट असिस्टंट होते. रा. लेले मास्तर यांचा गणित विषय शिकविण्यांत हातखंडा असे. पुढें ते भोर येथील नोकरी सोडून अहमदाबादेस गेले व तेथें प्रोप्रायटरी हायस्कुलांत नांवलौकिक मिळवून त्यांनीं स्वतंत्र न्यू इंग्लिश स्कूल काढलें; व त्यांत सहा वर्षें हेडमास्तरचें काम करून सेवानिवृत्त होऊन हल्लीं ते पुण्यास राहत आहेत. रा. भिडे इंग्रजी व संस्कृत शिकवीत असत. त्यांच्याकडेच श्रीमंत बाबासाहेबांना खाजगी शिकविण्याचें काम दिलें होतें. श्रीमंत बाबासाहेब भोर येथील मॅट्रिक क्लासांत आले त्या वेळीं त्यांचे नातेवाईक कै. नारायणराव अंबेकर यांच्याबरोबर त्याच क्लासांत त्यांचा दृढ परिचय होऊन पुढें त्याचें रूपांतर मित्रत्वांत झालें. पुण्याची हवा साफ झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब व श्री. कुमठेकर दोघेहि पुन्हां पुणें हायस्कुलांत गेले. त्या वेळीं भोर हायस्कूलचे हेडमास्तर रा. श्रीपाद केशव भिडे यांची खाजगी शिक्षक म्हणून कायमची नेमणूक करण्यांत आल्यामुळें तेहि पुण्यास गेले. श्रीमंत बाबासाहेबांचें शिक्षण संपल्यावर ते त्यांच्याकडेच राहिले. पुढें कांहीं वर्षांनीं ते युवराज श्रीमंत भाऊसाहेब यांचे शिक्षक होते व हल्लींहि ते राजकुमारांना शिकवीत असतात. श्रीमंत बाबासाहेबांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास व मर्जी असून ते त्यांना गुरुजी या नात्यानें मान देऊन वागवितात.

पुणें हायस्कुलांत सन १८९७ पासून प्लेगमुळें सर्व मुलांचे अभ्यास बेतानेंच चालत असत. मध्यंतरीं शाळा कांहीं महिने बंद असल्यामुळें वर्षाचे अभ्यास पुरे झाले नाहींत. तथापि सन १८९८ सालीं श्रीमंत बाबासाहेब परीक्षेस बसले व नापास झाले, याबद्दल त्यांना फार वाईट वाटलें. सन १८९९ सालीं

तर पुण्यास प्लेगचा फार कहर होता. तथापि श्रीमंत बाबासाहेब दररोज पुणें हायस्कूलमध्यें जात होते. पुढें श्रीमंत जिजीसाहेब व श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांस काळजी वाटूं लागली. तेव्हां त्यांच्या आग्रहावरून रावसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेबांना मुंबईस ठेवण्याचें कबूल केलें.

## एल्फिन्स्टन हायस्कूल

रावसाहेबांची संमति मिळाल्यावर मुंबईंत मलबार हिलवर एक बंगला भाड्यानें घेण्यांत आला व सन १८९९ च्या जुलैच्या सुमारास श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत भाऊसाहेब विंचुरकरांसह तेथें राहण्यास गेले व एल्फिन्स्टन हायस्कुलांत नांव दाखल केलें. याच सालीं ते वरील हायस्कुलांतून मॅट्रिक परीक्षेस बसले व यशस्वीपणानें उत्तीर्ण झाले. श्रीमंत बाबासाहेब इंग्रजी तिसऱ्या इयत्तेपासून पुणें हायस्कुलांत होते व त्याच हायस्कुलांतून आपण पास व्हावें अशी त्यांची इच्छा होती. परंतु पुण्यांत दरवर्षी प्लेगमुळें कांहीं महिने शाळा बंद असत व त्यामुळें त्यांचीं दोन वर्षें व्यर्थ गेलीं. या कारणामुळें त्यांना मुंबईस जाणें भाग पडलें. मुंबईस असतांना त्यांच्यावर देखरेख करण्याचें काम प्रो. मुल्लर यांनीं पत्करिलें होतें व तेव्हांपासून त्यांचें श्री. बाबासाहेबांच्या हिताकडे सारखें लक्ष असे. त्यांच्या पास होण्याचें श्रेय पुणें हायस्कूलला मिळावयाचें तें शेवटीं एल्फिन्स्टन हायस्कूलला मिळालें. मुंबईस मॅट्रिक परीक्षा झाल्यावर ते भोरास आले. भोरास आल्यावर पुढील अभ्यासाकरितां रावसाहेबांनीं त्यांना डेक्कन कॉलेजांत घालण्याचें ठरविलें.

## श्रीमंत बाबासाहेब यांना प्रथमकन्यारत्नाचा लाभ

मॅट्रिक परीक्षा पास झाली त्यापूर्वीं सहा महिने अगोदर आणखी एक आनंदाची गोष्ट घडून आली. ती म्हणजे रावसाहेब व जिजीसाहेब यांना नातवंडाचें मुख पाहण्याचा लाभ मिळाला ही होय. श्रीमंत बाबासाहेबांची परीक्षा होण्यापूर्वी श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब गरोदर होत्या. पुढें भोरास डोहाळेजेवण झाल्यावर प्रसूतीकरितां त्या आपल्या माहेरीं विंचूर येथें गेल्या. तेथें ता. १ जून सन १८९९ इ. रोजीं त्या प्रसूत होऊन त्यांना कन्यारत्न झालें. तेथें बारशाचा समारंभ होऊन मुलीचें नांव काशीताईसाहेब ठेवण्यांत आलें.

## मॅट्रिक परीक्षा पास झाल्याबद्दल मानपत्रें

श्रीमंत बाबासाहेब मॅट्रिक पास झाल्याचा त्यांच्या वडील-मातोश्रींना आनंद वाटणें अगदीं स्वाभाविक होतें. सचिव घराण्यांत मॅट्रिक झालेले श्रीमंत बाबासाहेब हेच पहिले आहेत. संस्थानच्या प्रजाजनांनाहि आनंद होऊन त्यांनीं रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब यांना मानपत्रें अर्पण करण्याचें ठरविलें. सुधागड तालुक्यांतील लोकांनीं प्रथम संधि घेऊन त्यांना पहिलें मानपत्र दिलें. या मानपत्राचा समारंभ पुण्यास पंतसचिव यांच्या वाड्यांत ता. २८ जानेवारी सन १९०० इ. रोजीं मोठा दरबार भरवून करण्यांत आला. सुधागड तालुक्यांतील लोकांच्या तर्फे मानपत्र कमिटीचे अध्यक्ष पालीचे रहिवासी श्री. अप्पासाहेब लिमये यांनीं वाचून दाखविलें.

## सुधागड तालुक्याचें मानपत्र

" श्रीमंत सरकार राजश्री शंकरराव रावसाहेब पंतसचिव व युवराज श्रीमंत राजश्री रघुनाथराव बाबासाहेब पंतसचिव संस्थान भोर

यांचे चरणसेवेसी—

" युवराज श्रीमंत रघुनाथराव बाबासाहेब यांनीं मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत जें यश संपादन केलें त्याबद्दल आम्ही तालुके सुधागड येथील राजनिष्ठ प्रजाजन व अधिकारी श्रीमंत सरकारांचें व श्रीमंत बाबासाहेबांचें अंतःकरण-पूर्वक अभिनंदन करतों.

" श्रीमंत सरकार यांनीं श्रीमंत बाबासाहेबांचे शिक्षणाबद्दल जी काळजी घेतली व श्रीमंत बाबासाहेब यांनीं कळकळीनें अभ्यास करून तिचें जें सार्थक केलें तें उभयतां श्रीमंतांस भूषणावह आहे. अशीं उदाहरणें संस्थानिक व जहागिरदार यांत दुर्लभच आहेत.

" श्रीमंत सरकारांची श्रीमंत बाबासाहेब यांच्या शिक्षणाविषयींची कळकळ अशीच कायम राहून श्रीमंत बाबासाहेब यांचा विद्यासंपादना-विषयींचा उल्हास वृद्धिंगत होत जाऊन विश्वविद्यालयांतील निरनिराळ्या पदव्यांच्या परीक्षांत त्यांस असेंच यश प्राप्त होऊन त्याबद्दल अभिनंदन करण्याचे आनंददायक प्रसंग आम्हांवर वारंवार येवोत व उभयतां श्रीमंत कुटुंबासह

चित्रांक १९



श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव, श्रीमंत बाबासाहेब यांच्या प्रथम पत्नी. [सं. पा. ८१

चिरायु होवोत अशी जगन्नियंत्या परमेश्वरापाशीं आमची मनोभावानें निरंतर प्रार्थना आहे."

मानपत्राच्चें वाचन झाल्यावर श्रीमंत रावसाहेबांच्या आज्ञेवरून संस्थानचे त्या वेळचे कारभारी कै. रा. ब. श्रीधर आबाजी सातभाई यांनीं श्रीमंत रावसाहेबांच्या तर्फे सयुक्तिक उत्तर दिलें.

पुढें एक महिन्यानें फेब्रुवारी महिन्यांत पौनमावळ तालुक्यांतील प्रजाजनांनीं पुणें वाड्यांतच मानपत्र देऊन आपला आनंद व्यक्त केला. बाकी राहिलेल्या राजगड, प्रचंडगड व विचित्रगड या तीन तालुक्यांतील लोकांनीं व भोर म्युनिसिपॅलिटीनें भोरास मानपत्रें देण्याचें ठरविलें, व रावसाहेबांच्या परवानगीनें या सालचा श्रीरामनवमीचा उत्सव झाल्यानंतर मे महिन्यांत भोर येथील सरकारी वाड्यांतील श्रीराममंडपांत दरबार भरवून श्रीमंत बाबासाहेबांची मॅट्रिक परीक्षा पास झाल्याबद्दल त्यांनीं आपआपलीं मानपत्रें वाचून दाखवून तीं चांदीच्या नळकांड्यांतून श्रीमंत रावसाहेबांना अर्पण केलीं. या समारंभाच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांचे मेहुणे कै. श्री. भाऊसाहेब विंचुरकर हे हजर होते. त्या सालीं ते मॅट्रिकच्या वर्गांत होते. त्यांनीं या मानपत्र-समारंभाच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांचें अभिनंदन करून समयोचित भाषण केलें. ते म्हणाले :

"आपले सरकार व युवराज श्रीमंत बाबासाहेब यांचा मानपत्राच्या रूपानें प्रजाजनांनीं केलेला सन्मान व त्याजवरून उभयतां सरकारांचे संबंधानें दिसून येणारी आपली प्रेमबुद्धि या गोष्टी पाहून माझे मनास फार आनंद होत आहे. या आनंदाचे प्रसंगीं मला येथें असण्याचा सुयोग आला. शिक्षणाची योग्यता जाणणारे श्रीमंतांत फार थोडे व योग्यता कळूनहि विद्याप्राप्तीकरितां परिश्रम घेणारे त्याहूनहि थोडे ! अशी स्थिति असतां युवराजांनीं श्रम करून यश संपादन केलें, तें त्यांना खरोखर भूषणावह आहे. राज्यवैभव व विलासांचीं साधनें अनुकूल असतां विद्यार्जनाकरितां श्रम करीत राहणें यास अंगीं चांगलेंच आत्मसंयमन असलें पाहिजे व तशा प्रकारचें आत्मसंयमन युवराजांनीं दाखविलें हें पाहून सर्वांस संतोष होईल यांत संशय नाहीं. युवराजांनीं परीक्षेंत यश मिळविलें याचा आपणां सर्वांस अतिशय अभिमान वाटावा हें अगदीं साहजिक आहे.

मला स्वतःस युवराज पास झाल्याचें ऐकून जो आनंद झाला त्याची कल्पना आपणांस होणार नाहीं. युवराज मला किती प्रेमानें वागवितात व माझे हिताविषयीं ते किती कळकळ धरतात याची कल्पना असेल तर माझे आनंदाविषयीं आपणांस कल्पना करतां येईल. श्रीमंत बाबासाहेब यांच्या शिक्षणाविषयीं श्रीमंत सरकारांनीं आस्थापूर्वक काळजी घेतली त्याचें हें फल आहे. याबद्दल आपण सर्वांनीं श्रीमंतांचे ऋणी असलें पाहिजे. पुढील वरिष्ठ परीक्षेंत त्यांस यश येऊन असेच आनंदाचे समारंभ व्हावेत अशी माझी इच्छा आहे."

श्रीमंत भाऊसाहेब यांच्या भाषणानंतर श्रीमंत बाबासाहेब यांनीं उत्तरादाखल जें भाषण केलें त्यावरून त्यांची आपल्या वडिलांबद्दल व शिक्षकांबद्दल किती आदरबुद्धि आहे हें व्यक्त होत आहे. त्यांनीं पुढील भाषण केलें :

" श्रीमंत भाऊसाहेब विंचुरकर व सभ्य गृहस्थ हो, मजला मॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेंत यश आल्याबद्दल श्रीमंत भाऊसाहेब विंचुरकर, आपण प्रजाजन व अधिकारी यांनीं प्रेमपुरस्सर माझे वडील श्रीमंत सरकार पंतसचिव यांचें व माझें जें अभिनंदन केलें त्याबद्दल आम्हांस फार संतोष वाटत आहे.

" माझे हातून आपण म्हणतां त्याप्रमाणें कांहीं मोठेंसें कृत्य झालें असें नाहीं. तथापि त्यामुळें आतां मुंबईच्या विश्वविद्यालयांत माझा प्रवेश झाला आहे. जें काय कर्तव्य आहे तें अद्याप पुढेंच आहे. तें मोठ्या नेटानें करून दाखविण्याची माझी उमेद आहे. विद्या हेंच मुख्य धन आहे. त्याची मोठी योग्यता आहे. हें पूर्णपणें लक्षांत येऊन आपण मानपत्रांत म्हणतां त्याप्रमाणें व श्रीमंत भाऊसाहेब यांनीं आपले भाषणांत इच्छा प्रदर्शित केलेली आहे त्याप्रमाणें घडवून आणविण्याचा प्रयत्न मी करीन.

" प्रवेशपरीक्षेंत पास झाल्याचें श्रेय माझें नसून तें सर्वस्वीं माझे वडील श्रीमंत सरकार यांनीं माझे अभ्यासाविषयीं काळजी घेतली त्याचें आहे. त्यांनीं माझेकडून पितृवात्सल्यानें अभ्यास करविला आणि त्यामुळें मला यश आल्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें. वडिलांचे स्वकार्यतत्परता, दृढैकनिश्चय, लोकप्रियता, निरालस्य व नियमितपणा असे अनेक उत्तम गुण आहेत. त्या गुणांचें अनुकरण करण्याविषयीं मी तत्परता ठेवीन.

चित्रांक २



श्रीमंत बाबासाहेब पुणें हायस्कूलमध्यें ५ व्या इयत्तेंत असल्यावेळचा शाळेंतील शिक्षकवर्गासह घेतलेला फोटो. [ सं. पा. ९०

खुर्चीवर : ३ देशमूख; ४ केळकर; ५ भदे.

मागें उभे असलेले : ४ मि. इराणी; ६ श्री. वि. नातू; ७ विंचुरकर; ८ श्री. बाबासाहेब; ९ कों. म. कुमठेकर; ११ पुराणिक; १२ इनामदार.

श्रीमंतांचे मागें : चिं. ग. जोशी.

“ मे. राइटसाहेब, मे. मेनसाहेब, मुंबई व पुणें हायस्कूलचे हेडमास्तर, ती. श्री. मामासाहेब बाळासाहेब विंचुरकर, आणि माझे खाजगी शिक्षक रा. रा. श्रीपाद केशव भिडे, बी.ए., यांनीं माझ्या अभ्यासाविषयीं काळजी घेतली याबद्दल त्यांचें स्मरण मला या वेळेस झाल्याशिवाय राहत नाहीं.

“ श्रीमंत भाऊसाहेब विंचुरकर यांनींहि प्रवेशपरीक्षेचा अभ्यास मोठ्या मेहनतीनें चालू केला असून यंदाचे सालीं त्यांस परीक्षेंत यश येऊन त्यांचें अभिनंदन करण्याचा आनंदाचा समय मजला प्राप्त होईल अशी मला पूर्ण आशा आहे. ”

## डेक्कन कॉलेज

पूर्वीं ठरल्याप्रमाणें श्रीमंत बाबासाहेब सन १९०० सालापासून डेक्कन कॉलेजांत जाऊं लागले. त्याच सालीं ते प्रीव्हिअसच्या परीक्षेस बसले, पण त्यांना यश आलें नाहीं. तथापि उमेद खर्चू न देतां दुप्पट जोरानें अभ्यास करून सन १९०१ सालीं ते पुन्हां त्या परीक्षेस बसले व उत्तीर्ण झाले. त्यांच्या या यशाबद्दल त्या वेळचे डेक्कन कॉलेजचे प्रोफेसर जे. एन्. फ्रेजर यांनीं त्यांना पुढील पत्र पाठवून अभिनंदन केलें.

Dhulia, 13–12–1901

My dear Sachiva,

I am glad to see your perseverance has been rewarded and your name appears in the P. E. list.

Yours sincerely,
J. N. Fraser.

श्रीमंत बाबासाहेबांचें वय बरेंच झालें असतांहि त्यांच्या अंगची चिकाटी पाहून प्रोफेसरांनाहि त्यांचें कौतुक वाटत असे. प्रीव्हिअस परीक्षा पास झाल्यानंतर ते इंटरमीजिएट वर्गांत गेले. परंतु त्यांची प्रकृति अशक्त असल्यामुळें सर्व विषयांच्या अभ्यासाचा बोजा आतां एका वर्षांत आपणांस सहन होणार नाहीं म्हणून कांहीं विषयांकरितां ते कॉलेजांत जात व घरीं अभ्यास करीत आणि त्यांनीं दुसऱ्या वर्षी परीक्षेस बसावयाचें ठरविलें.

## सन १९०३ सालचा पहिला दिल्ली दरबार

सातवे एडवर्ड बादशहांच्या राज्यारोहणानिमित्त हिंदुस्थानांत दिल्ली येथें मोठा दरबार भरविण्याचें ठरून या दरबाराकरितां सर्व राजेरजवाडे यांना निमंत्रण करण्यांत आलें होतें. रावसाहेबांनाहि दरबारचें निमंत्रण आलें होतें. त्यावरून त्यांनीं दरबारांस जाण्याचें ठरवून ते सौ. जिजीसाहेबांसह दिल्लीस जाण्याकरितां भोराहून ता. २२ डिसेंबर, सन १९०२ इ. रोजीं निघाले. श्रीमंत बाबासाहेबांनीं आपले स्नेही नारायणराव अंबेकर व श्री. दादासाहेब कुमठेकर यांना राव-साहेबांच्या परवानगीनें बरोबर घेतलें होतें. ता. २७ रोजीं सर्व स्वाऱ्या दिल्लीस सुखरूप पोहोंचल्या. दिल्लीस काबुली गेटाजवळ लाल नारायणदार यांचा वाडा ३३०० रुपये भाड्यानें राहण्याकरितां घेतला होता. त्या वाडयांत सर्व मंडळी राहिली. श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर व भाऊसाहेब विंचुरकर हेहि बरोबर होते.

ता. २९ रोजीं दुपारीं मुंबईहून डयूक आणि डचेस ऑफ कॅनॉट व हरिद्वारकडून त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन आपल्या पत्नीसह दिल्ली स्टेशनवर येऊन दाखल झाले. स्टेशनवर त्यांच्या स्वागतार्थ सर्व राजेरजवाडे, गव्हर्नर्स वगैरे हजर होते. रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब हेहि हजर होते. स्वागतानंतर हत्तीवरून मोठी मिरवणूक निघाली. मिरवणुकींत सुमारें १०० च्या वर हत्ती होते. हत्तीवरची ही मिरवणूक प्रेक्षणीय व अवर्णनीय होती.

ता. ३० रोजीं दिल्ली येथील प्रचंड प्रदर्शन नामदार व्हाइसरॉय यांच्या हस्तें उघडण्यांत आलें. हें प्रदर्शनहि अद्वितीय असें होतें. प्रदर्शनास श्रीमंत रावसाहेब, श्रीमंत बाबासाहेब, बाळासाहेब विंचुरकर व भाऊसाहेब विंचुरकर गेले होते.

ता. १ जानेवारी, सन १९०३ रोजीं अकरा वाजतां लाखों रुपये खर्च करून तयार केलेल्या भव्य ॲंफिथिएटरमध्यें दरबार भरविण्यांत आला होता. सर्व मंडळी स्थानापन्न झाल्यावर व्हाइसरॉयांनीं बादशहांचा जाहिरनामा वाचून दाखविला. दरबारास श्रीमंत बाबासाहेब हजर होतेच.

या दरबाराच्या प्रसंगीं रावसाहेबांना ९ तोफांच्या सलामीचा वैयक्तिक मान मिळाला. दरबारनिमित्त झालेल्या सर्व कार्यक्रमास श्रीमंत बाबासाहेब रावसाहेबांच्याबरोबर जात असत. सर्व समारंभ झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब

चित्रांक



डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल डॉ. एफ्. जी. सेल्बी. [सं. पा. ९१

चित्रांक २२



डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल एफ्. डब्ल्यू. बेन. [सं. पा. ९१

पुण्यास आले व रावसाहेब हरिद्वार करून काशीस गेले व तेथून पुण्यास आले. श्रीमंत बाबासाहेब यांनीं पुण्यास येण्याची घाई केली. कारण त्यांच्या मनांतून टर्म भरून इंटरमीजिएटला बसावयाचें होतें. रावसाहेबांच्या मनांतून श्रीमंत बाबासाहेबांनीं दिल्लीहून निघण्याची घाई करूं नये असें होतें. परंतु कॉलेज सुरू झाल्यामुळें पुण्यास लवकर जाऊन टर्म भरून १९०३ सालच्या इंटर-मीजिएटच्या परीक्षेस बसण्याचा त्यांचा हेतु असल्यामुळें त्यांनीं पुण्यास जाण्याचा आग्रह धरला, हें पाहून रावसाहेबांस त्यांचें हें करणें पसंत पडलें नाहीं. या दरबारनिमित्त याच सालच्या जून महिन्यांत त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड नॉर्थकोट यांच्या हस्तें श्रीमंत रावसाहेबांना सुवर्ण पदक व श्रीमंत बाबासाहेब आणि श्रीमंत भाऊसाहेब व बाळासाहेब विंचुरकर यांना रौप्य पदकें मिळालीं होतीं.

श्रीमंत बाबासाहेब पुण्यास आले तेव्हां तेथें प्लेग सुरू असल्यामुळें पुण्याच्या दक्षिणेस पुणें-सातारा रोडवर बारा मैल लांब असलेल्या संस्थानच्या हद्दींतील शिंदेवाडी गेटावर ते राहावयास गेले व तेथून रोज कॉलेजांतून जाऊन परत येत. दरबारास जाण्यापूर्वींपासून ते *Abott's Life of Napoleon* हें बारीक टाइपाचें पुस्तक रांजणवाडी व गोवर आला असतांहि वाचीत होते. त्यामुळें त्यांचे डोळे बिघडले, व शिवाय शिंदेवाडीहून रोज बारा कोस जाऊन येण्याच्या दगदगीचाहि त्यांच्या प्रकृतीवर व डोळ्यांवर परिणाम झाला. इंटरमीजिएट परीक्षेस बसण्याची जरी त्यांची उत्कट इच्छा होती तरी कांहीं दिवसांनीं अभ्यास रेटणार नाहीं असें वाटूं लागलें, तेव्हां त्यांनीं पुढें काय करावें म्हणून प्रोफेसर फ्रेजरसाहेबांचें मत विचारलें. त्यांनीं परीक्षेस बसण्याचा विचार सोडून देऊन कायद्याचा वगैरे अभ्यास करावा अशाबद्दल पुढील पत्र पाठविलें.

23rd Jan.

My dear Sachiv,

You have by now received my letter I expect.

With regard to the question you ask me, my own opinion is clear. It will not, I think, be advisable for you to take up the I. E. Examination. You would certainly have great

difficulty in getting through it ; and your age is so far advanced that you have not much time to spare. It is moreover pleasanter for you to end your college career with a success than with a failure ; which I am afraid might be the result in the I. E. Exam. I think you should apply yourself to law, a knowledge of which, apart from examinations, will be useful to you. A further reason is that the time you are now missing at the college will be disadvantageous to you.

Yours sincerely,
J. N. Fraser.

तेव्हां त्यांनीं फ्रेजरसाहेबांच्या सल्ल्याप्रमाणें सन १९०३ सालअखेर कॉलेज कोर्स सोडून दिला व कायद्याचा अभ्यास करण्याचें ठरविलें.

## कायद्याचा अभ्यास

कॉलेज सोडल्यानंतर कायद्याचा अभ्यास करण्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं ठरविलें. रावसाहेबांनाहि त्यांचा हा बेत पसंत पडला व एखादा एल्एल्. बी. शिक्षक ठेवून भोरास राहूनच कायद्याचा अभ्यास करावा, पुण्यास राहण्याचें कारण नाहीं, असें रावसाहेबांनीं त्यांना सांगितलें. परंतु कै. तात्यासाहेब कुमठेकर व त्यांचे चिरंजीव श्री. दादासाहेब यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना स्पष्टपणें सल्ला दिला कीं, भोरास राहून कांहीं होणार नाहीं, पुण्यासच राहावें व डेक्कन कॉलेजांत जाऊन कायद्याचीं लेक्चर्स ऐकावीं म्हणजे फायदा होईल. श्रीमंत बाबासाहेबांनाहि त्यांचें हें म्हणणें पटलें व भोरास राहण्याचा बेत रहित करून ते पुण्यास गेले व डेक्कन कॉलेजांतील लॉ क्लासमध्यें नांव दाखल केलें.

सन १९०४-०५ सालीं त्यांनीं फर्स्ट एल्एल्. बी. च्या दोन्ही टर्म्स भरल्या. कारण त्या वेळीं बी. ए. होण्याच्या अगोदर टर्म्स भरतां येत होत्या.

सन १९०५ सालीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं डेक्कन कॉलेजांत जाण्याचें बंद करून घरींच डेक्कन कॉलेजांतील गव्हर्मेंट लॉ-लेक्चरर व पब्लिक प्रॉसिक्यूटर श्री. व्यंकटराव रामचंद्र आणि पुढें कांहीं दिवसांनीं पेन्शनर मामलेदार व्यंकटराव कृष्ण द्रवीड, बी. ए., या उभयतांच्या मदतीनें त्यांनीं सिव्हिल, क्रिमिनल व रेव्हेन्यू कायद्यांचा* अभ्यास करण्याचा क्रम सुरू ठेविला.

## विद्यार्थिदशेंतील जीवन

श्रीमंत बाबासाहेब यांचा पुणें हायस्कूल व डेक्कन कॉलेज या दोन विद्यालयांत सन १८९३ पासून १९०५ पर्यंत १२ वर्षांचा काल गेला. म्हणजे त्यांनीं एक तप विद्यार्थिदशेंत काढलें. तो काल व हल्लींचा काल यांत महदंतर पडलें आहे. त्या वेळीं गुरुशिष्यांचे संबंध प्रेमळपणाचे असत. विद्यार्थ्यांच्या मनांत गुरूबद्दल आदरबुद्धि वसत असे. त्यांचा आयुष्यक्रम एकमार्गी असे. त्या वेळीं सिनेमा, बोलपट वगैरे करमणुकीच्या साधनांचा अभाव असून नवनीतिप्रवर्तक वाङ्मयाचा प्रसार करणारीं मासिकें अस्तित्वांत आलीं नव्हतीं. चहा-चिवड्याचीं हॉटेलें नव्हतींच म्हटलें तरी चालेल. स्त्रीशिक्षणाचीहि प्रगति फारशी झालेली नसल्यामुळें कळ्यांचे निःश्वास बाहेर पडून मुलां-मुलींना हिंदोळे बसत नव्हते, व त्यामुळें त्यांच्या मनांत बंधनाच्या पलीकडे किंवा घराबाहेर जाण्याच्या कल्पनांचा प्रवेश झाला नव्हता. भावनाप्रधान वाङ्मयाचा फैलाव झाला नसल्यामुळें विद्यार्थ्यांच्या मनाला धक्के बसून त्यांचें अभ्यासावरील लक्ष कमी होण्याचा संभव नव्हता. शाळा व कॉलेजांतून विद्यार्थ्यांबरोबर विद्यार्थिनी शिकत नसल्यामुळें स्टॅंपिंग हा शब्द अगदीं अपरिचित होता. एकंदरींत विद्यार्थ्यांच्या मनांत चलबिचल उत्पन्न करून सोडणारीं साधनें व प्रसंग त्या वेळीं नसल्यामुळें विद्यार्थिवर्ग सामान्यतः आपल्या अभ्यासांत निमग्न असे. त्या वेळीं नाटक कंपन्याहि फार नव्हत्या. किर्लोस्कर नाटक कंपनी हीच काय ती प्रसिद्ध नाटक कंपनी होती. त्या वेळीं विद्यार्थ्यांनीं नाटकें पाहावीं कीं पाहूं नये हा वादाचा विषय होता व त्याचा निर्णय अस्तिपक्षीं झाल्यामुळें त्या कंपनीचीं नाटकें पाहण्यास विद्यार्थिवर्ग जात असे.

त्या काळच्या विद्यार्थ्यांचा व हल्लींच्या विद्यार्थ्यांचा पोषाख व राहणी वगैरे बाबींची जरी तुलना केली तरीहि फार मोठा फरक पडलेला आहे. त्या वेळीं शेंडी राखण्यांत भूषण वाटे. मिशा हें पुरुषत्वाचें लक्षण समजलें जात असे. आईबाप निवर्तले तरच मिशा काढण्याचा प्रसंग. आतां सर्व बदललें आहे. शेंडीला काट मिळून केस राखण्याची प्रथा सुरू झाली आहे. आईबापांचा व मिशांचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नसल्यामुळें निर्मिश राहण्यांतच भूषण वाटूं लागलें आहे. एखादी प्रतिज्ञा करण्याच्या कामीं पूर्वी मिशांचा उपयोग करीत.

अमुक काम झालें नाहीं तर मिशा उतरून ठेवीन, अशी प्रतिज्ञा मोठ्या अभिमानानें करीत. वरील शब्दप्रयोगाचा अर्थ आतां बदलून लिहावा लागेल. कारण हल्लीं मिशा नेहमींच उतरून ठेवण्याचा प्रघात पडलेला आहे. पोषाखांतहि बदल झालेला आहे. हल्लीं विद्यार्थ्यांचा पोषाख म्हणजे धोतराऐवजीं पोकळ विजार, पोलो कॉलरचा शर्ट, टोपी घालणें किंवा न घालणें, पायांत चप्पल वगैरे तऱ्हेचा जसा आहे तसा त्या वेळीं नव्हता. हल्लीं जरी श्रीमंत बाबासाहेबांचा पोषाख, आचार व विचार यांकडे लक्ष दिलें तरी सुद्धां त्यांत पूर्वींचाच कायमपणा राहिलेला दिसून येतो.

विद्यार्थी या नात्यानें श्रीमंत बाबासाहेबांचें वर्तन प्रशंसनीय होतें. हायस्कुलांत इंग्रजी पांचव्या इयत्तेंत असतांना श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रामाणिकपणाविषयींची एक गोष्ट घडून आली ती अशी :

या वेळीं त्यांच्या वर्गावर केळकर या नांवाचे एक शिक्षक होते. एके दिवशीं ते वर्गांत मुलांना प्रश्न विचारीत होते. श्रीमंत बाबासाहेबांच्या शेजारीं एक मुलगा होता, त्यास केळकर मास्तरांनीं एक प्रश्न विचारला. त्या प्रश्नाचें उत्तर त्यास येत नव्हतें. श्रीमंत बाबासाहेबांना त्या प्रश्नाचें उत्तर माहीत होतें. तो शेजारचा मुलगा त्यांचा स्नेही होता, म्हणून त्यांनीं त्यास तें उत्तर हळूच सांगितलें. तेव्हां त्या मुलानें त्या प्रश्नाचें उत्तर दिलें. ही गोष्ट दुसऱ्या एका मुलानें केळकर मास्तरांच्या लक्षांत आणून दिली, तेव्हां त्यांनीं " त्या मुलास प्रश्नाचें उत्तर कोणीं सांगितलें ?" असें आसपासच्या मुलांना विचारिलें. श्रीमंत बाबासाहेबांनीं " मीं उत्तर सांगितलें." असें ताबडतोब कबूल केलें. त्या वेळीं त्यांची सत्याभिरुचि व प्रामाणिकपणा पाहून केळकर मास्तरांना कौतुक वाटलें व खरें बोलण्याबद्दल त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना शाबासकी दिली.

कितीहि श्रम लागले तरी न कंटाळतां ते वर्गांत वर नंबर ठेवण्याचा प्रयत्न करीत. ते हायस्कुलांत शिकत होते त्या वेळीं त्यांच्या वाड्यांत मागील दरवाजाजवळच्या खोलींत कांहीं विद्यार्थी राहत असत. त्यांत बारामती येथील प्रसिद्ध वकील कै. कृष्णाजीपंत गणपुले हे त्या वेळीं तेथें राहत असून ते वकिलीचा अभ्यास करीत होते. त्याच खोलीच्या वरील मजल्यावर श्रीमंत बाबासाहेब यांची अभ्यासाची खोली होती. श्री. गणपुले सांगत असत कीं,

चित्रांक २३



सन १९०० इ. सालच्या संमेलनप्रसंगीं डेक्कन कॉलेजमधील विद्यार्थी व प्रोफेसर्स यांचा फोटो. [सं. पा. ९१

खुर्चीची रांग : ६ श्री. बाबासाहेब; ९ प्रो. जे. एन्. फ्रेजर; १० प्रि. डॉ. एफ्. जी. सेल्बी.

कधीं कधीं श्रीमंत बाबासाहेब पहाटे तीन वाजतां उठून अभ्यास करीत असत, व त्यांना घोकण्याचा कधीं कंटाळा नसे. क्रिकेट, टेनिस, फुटबॉल वगैरे खेळांची त्यांना आवड नसे. कारण तशी आवड उत्पन्न होण्यासारख्या साधनांची त्यांना अनुकूलताहि नव्हती. तथापि श्रीमंत रावसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेबांना घोड्याची पहिली सर्कस काढणारे विष्णुपंत छत्रे यांच्याकडे पाठवून घोड्यावर बसण्यास शिकण्याची सोय केली होती. विष्णुपंतांच्या हाताखालीं श्रीमंत बाबासाहेब घोड्यावर बसण्यांत बरेच तरबेज झाले होते. पुढें कांहीं दिवसांनंतर श्रीमंत बाबासाहेबांचा मुक्काम भोरास असला म्हणजे ते निशाण मारण्यासहि शिकत असत. परंतु त्यांत त्यांना प्रावीण्य संपादन करतां आलें नाहीं.

त्यांचा स्वभाव अत्यंत मिडस्त असून सरळपणानें वागणें त्यांना आवडत असे. हायस्कुलांत व कॉलेजांत असतांना श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या विनयशील सद्वर्तनानें आपल्या शिक्षकांचें व प्रोफेसरांचें प्रेम संपादन केलें होतें. आपण संस्थानिकांचे चिरंजीव म्हणून त्यांनीं उद्दामपणाचें वर्तन कधींहि केलें नाहीं. पुणें हायस्कूलचे हेडमास्तर श्री. विठ्ठलराव पाठक व कॉलेजचे प्रिन्सिपॉल प्रो. सेल्बी यांनीं त्यांच्या वर्तनाबद्दल प्रशंसापर रिपोर्ट रावसाहेबांच्याकडे केलेले आहेत. श्री. विठ्ठलराव पाठक, प्रि. सेल्बी, प्रो. शार्प, प्रो. मुल्लर, प्रो. फ्रेजर, प्रि. बेन यांनीं ते सेवानिवृत्त झाल्यावर अखेरपर्यंत श्रीमंत बाबासाहेबांशीं प्रेमाचे संबंध ठेविले होते. त्यांनीं कॉलेजांतील नियमित अभ्यासक्रम डोळ्यांच्या अधूपणामुळें सोडला, त्या वेळीं कॉलेजचे अ‍ॅ. प्रि. मि. शार्प यांना फार वाईट वाटलें व त्यांनीं पुढीलप्रमाणें श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल लिहून ठेविलें.

Deccan College,
Sept. 15, 1903

Mr. R. S. Pant Sachiva of Bhor has been obliged to give up the regular University course owing to defective eyesight. As long as he was able to do, he pursued his studies with great attention and regularity and even during the last plague epidemic in Poona he continued to attend the college as long as possible, driving in daily a distance of sixteen miles over the Katraj Ghat. It is a cause of regret to all of us that he should have been obliged to give up the regular

course, but has for some time been attending particular lectures, and I hope that his eye-sight will improve sufficiently to enable him to go on doing so, or at any rate to do a little reading by himself. His conduct as a student of the college has always been excellent.

W. H. Sharp,
Ag. Principal.

डॉ. सेल्बी यांचीं *Advancement of Learning* वरील व्याख्यानें व प्रो. बेन यांचीं इतिहास व अर्थशास्त्र या विषयांवरील व्याख्यानें त्यांनीं कधींहि चुकविलीं नाहींत. त्यावरून श्रीमंत बाबासाहेबांना अभ्यासाची किती कळकळ वाटत होती हें दिसून येणार आहे. श्रीमंत बाबासाहेब ज्या वेळीं हायस्कुलांत व कॉलेजांत होते त्याच वेळीं पुण्यांतील सुप्रसिद्ध शिक्षणप्रेमी प्रो. महादेव रामचंद्र परांजपे, एम्.ए., बी.एस्सी., हेहि वरील हायस्कुलांत व कॉलेजांत शिकत होते. प्रो. परांजपे हे श्रीमंत बाबासाहेबांचे स्नेही नव्हते. दोघांचा साधारण परिचय होता. प्रो. परांजपे हे सूक्ष्म निरीक्षण करणारे असल्यामुळें त्यांना आम्हीं श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल माहिती विचारली, तेव्हां त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या हायस्कुलांतील व कॉलेजांतील वर्तनाबद्दल तिऱ्हाईत या नात्यानें लेखी कळविलें. त्यावरून श्रीमंत बाबासाहेबांच्या स्वभावविशेषावर प्रकाश पडणार आहे. त्या वेळच्या कॉलेजांतील एकंदर विद्यार्थ्यांचें श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल सामान्यतः काय मत बनलें असलें पाहिजे हें खालीं प्रो. परांजपे यांचें मत दिलें आहे त्यावरून दिसून येईल.

## प्रो. एम्. आर. परांजपे यांचें मत

सन १८९६ ते १९१६ पर्यंत म्हणजे तब्बल वीस वर्षें पुण्याला सालोसाल प्लेगची भेट होई व वर्षांतून चार-पांच महिने गांवाबाहेर राहणें हा एक त्या वेळचा पुणेकरांचा वार्षिक कार्यक्रमच होऊन बसला होता. प्लेगची सुरुवात झाली म्हणजे कोणी टोंचून घेत व बरेचसे घर सोडून झोंपडींत राहत असत. स्वतःला संवय झाल्यामुळें म्हणा अगर डॉक्टरांच्या आटोक्यांत आल्यामुळें म्हणा, प्लेगचे रोगी पुढेंपुढें पुष्कळ बरे होऊं लागले. त्यामुळें प्लेगची दहशतहि पुढेंपुढें वाटेनाशी झाली. पण १८९६ ते १९०० हीं वर्षें पुणेकरांना

चित्रांक २४



रा. ब. विठ्ठल नारायण फाटक, श्रीमंत बाबासाहेब पुणें हायस्कूलमध्यें शिकत असल्यावेळचे हेडमास्तर. [सं. पा. ९१

२५



श्रीमंत बाबासाहेबांचे बालपणचे स्नेही रा. नारायण गोपाळ अंबेकर. [सं. पा. ९५

फार काळजीचीं गेलीं. अगदीं अनोळखी अशा सांसर्गिक रोगाचा प्रसार, प्लेगनें पछाडलेल्या रोग्यांच्या मृत्यूचें भयंकर प्रमाण, इनॉक्युलेशनवरील लोकांचा गैरविश्वास, प्लेगच्या इस्पितळांतील किळसवाणीं दृश्यें, प्लेगला हुसकून लावण्यासाठीं योजिलेले कडक उपाय व त्यांतूनच उद्भवलेलें रँडसाहेबांच्या खुनाचें प्रकरण इत्यादि गोष्टींमुळें हीं चार वर्षें फार विवंचनेंत गेलीं, व वर्षांतून शाळा चारपांच महिने बंद राहिल्याकारणानें त्या वेळीं इंग्रजी शाळांत शिकत असलेल्या विद्यार्थ्यांचें अतोनात नुकसान झालें. हीं चार वर्षें मी विश्रामबाग हायस्कुलांत घालविलीं व त्या वेळच्या विद्यार्थ्यांपैकीं जीं कांहीं ठळक नांवें डोळ्यांपुढें येतात त्यांत एक सध्याचे श्रीमंत पंतसचिव, त्या वेळचे भोर संथानचे युवराज, यांचें होय. वर सांगितल्याप्रमाणें सर्वच व्यवस्था विस्कळीत असल्याकारणानें त्या वेळच्या फारशा आठवणी मला आज नाहींत; पण भोरकरांची चारचाकी बग्गी अजून चांगली आठवते. त्या वेळेला मोटार तर पुण्यांत नव्हतीच. पण सायकलीहि क्वचित् दृष्टीस पडत.

श्रीमंत पंतसचिव हे कांहीं हुशार विद्यार्थ्यांत मोडत नव्हते, व आतांच्यासारखीं क्रीडांगणें व खेळण्याच्या सोयी त्या वेळीं नसल्यामुळें त्या दृष्टीनेंहि ते चमकलेले आढळत नाहींत. शांत स्वभावाचा, सुस्वभावी, साधारण बऱ्यांपैकीं अशी आमची त्यांच्याविषयीं समजूत व ती पुढें डेक्कन कॉलेजांतील त्यांच्या आयुष्यक्रमावरून खरीहि ठरली. मला पक्कें आठवत नाहीं, परंतु बहुधा सन १८९९ मध्यें ते मॅट्रिक्युलेशन व १९०१ मध्यें प्रीव्हिअस परीक्षा पास झाले व इंटरमीजिएटमध्यें त्यांना गोता मिळाला. आणखी एखादें वर्ष घालविलें असतें तर तीहि परीक्षा पास होऊन ते आज बी. ए. झाले असते. पण त्या वेळीं त्यांना कोणीतरी उपदेश केला व ट्रिगॉनॉमेट्री व फिजिक्स यांसारख्या पुढच्या आयुष्यक्रमाला बहुतांशीं निरुपयोगी विषयांच्या अभ्यासांत एक वर्ष घालविण्याऐवजीं बी. ए. च्या विद्यार्थ्यांबरोबर इतिहास, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान व इंग्रजी या विषयांचीं व्याख्यानें ऐकण्याची त्यांनीं खास परवानगी मिळविली. अर्थातच त्या वेळीं त्यांचें नांव विद्यार्थ्यांच्या हजेरीपटावर नव्हतें व म्हणून साधारण विद्यार्थ्यांवर असलेलीं नियंत्रणेंहि त्यांच्यावर नव्हतीं. पण रोज शिस्तीनें येऊन व इतर विद्यार्थ्यांप्रमाणें

कॉलेजच्या वादसभा, क्रिकेटचे सामने, संमेलनें वगैरे प्रसंगीं हजर राहून आपणांस कॉलेजचा विद्यार्थी म्हणवून घेण्यांतच त्यांना भूषण वाटे. प्रो. बेन, प्रि. शार्प, प्रि. सेल्बी व प्रो. फ्रेजर या नांवाजलेल्या अध्यापकांच्या विचार-सरणीचा व त्यांच्या वागणुकीचा त्यांजवर बराच परिणाम घडला असावा.

श्रीमंत पंतसचिवांचें हें दृश्य मनावर विशेष रीतीनें ठसण्यास एक कारणहि त्या वेळीं घडलें. आणखी दोन राजपुत्र त्या वेळीं डेक्कन कॉलेजांत शिक्षण घेत. पैकीं बडोद्याचे प्रिन्स शिवाजीराव हे उत्तम खेळाडू असल्या-कारणानें विद्यार्थ्यांत फार प्रिय झाले होते. पंतसचिव जितके शांत तितके हे चळवळे. शिवाय वयानेंहि ते चार दोन वर्षांनीं लहान असावेत. वडील व मातोश्री दोघेंहि युरोपमध्यें हिंडलेलीं असल्यानें त्यांच्या चालीरीतींवर पाश्चात्यांचा संस्कारहि पुष्कळच झाला होता. पंतसचिव व शिवाजीराव म्हणजे त्या वेळीं समाजांत चालू झालेल्या क्रांतीचीं दोन टोंकें होतीं असें म्हटलें तरी चालेल. दोघेहि सुशील व सुस्वभावी. पण एकाच्या वागणुकींत पेशवाईची आठवण होई व दुसऱ्याच्या बोलण्याचालण्यांत विलायत दिसे.

प्रिन्स शिवाजीराव हे मॅट्रिक पास होऊन आल्याकारणानें ते कॉलेजचे रीतसर विद्यार्थी म्हणूनच दाखल झाले होते. पण त्या वेळेला आणखी एका युवराजांनीं पंतसचिवांप्रमाणें बी. ए.चीं व्याख्यानें ऐकण्याची खास परवानगी मिळविली होती. पंतसचिवांचा इंटरचा अभ्यास पुरा झाला होता. त्या कारणानें बी. ए. चीं व्याख्यानें समजण्याइतकी त्यांची तयारी होती. पण हे दुसरे युवराज सरासरी मॅट्रिक झाले असावेत. कदाचित् मॅट्रिकहि नसतील. त्यांना प्रो. बेन व प्रि. सेल्बी यांच्या व्याख्यानांतील काय कळणार! पण डेक्कन कॉलेजांत बी. ए.चीं व्याख्यानें ऐकण्याची परवानगी मिळविण्यांत त्यांचा हेतु शिकण्याचा नसून पुण्यांत राहण्यास मिळावें एवढाच होता. वर्गांत ते सहसा दिसत नसत; पण कॉलेजची फेरी त्यांनीं चुकविली नाहीं. कांहीं सुखवस्तू विद्यार्थी त्यांच्या नादीं लागून श्रीमंती चोचले शिकले व त्यांनीं आपल्या आयुष्याचें नुकसान करून घेतलें. विद्यार्थ्यांना आपल्या घरीं बोलावून चैन करणें, नाटकाला नेणें, युवराजाला न शोभेल अशी भाषा वापरणें वगैरे गुणांनीं या गृहस्थांनीं डेक्कन कॉलेजचें वातावरण सुमारें एक वर्षभर बरेंच दूषित केलें



पुणें येथील डेक्कन कॉलज; श्रीमंत बाबासाहेबांनीं या कॉलेजांत उच्च शिक्षण घेतलें. [सं. पा. ९२

होतें व त्यांच्याशीं तुलना केली म्हणजे श्रीमंत पंतसचिव यांची थंड पण मर्यादशील वागणूक सहजच उठून दिसे. म्हणून तीस वर्षानंतरहि त्या वेळच्या कॉलेजच्या चित्रांतील हा एवढा भाग माझ्या स्मृतिपटलावर मला अद्यापि स्पष्ट दिसतो.

**महादेव रामचंद्र परांजपे**
१०।२।१९३५

## स्नेहसंबंध व विद्वत्समागमाची आवड

श्रीमंत बाबासाहेबांचे सहाध्यायी श्री. दादासाहेब कुमठेकर, श्री. बाळासाहेब नातू व के. नारायणराव अंबेकर हे असल्याचें मागें सांगण्यांत आलेंच आहे. हेच पुढें त्यांचें स्नेही बनले. हे तिघेहि सद्वर्तनी, सरळमार्गी, स्पष्टवक्ते असून त्यांचें श्रीमंत बाबासाहेबांच्यावर निःस्वार्थी प्रेम असे. श्रीमंत बाबासाहेबांना अशा मित्रांचा सहवास लाभल्यामुळें त्यांना फार फायदा झाला. के. नारायणराव अंबेकर हे त्यांचे स्नेही असून आप्तहि होते. त्यांच्याजवळ ते मनमोकळेपणानें वागत असत. खर्चाच्या बाबतींत रावसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेबांना स्वातंत्र्य ठेविलें नव्हतें. यामुळें अनेक वेळां श्रीमंत बाबासाहेबांच्या मनास त्रास उत्पन्न होऊन त्यांना खिन्नता प्राप्त होत असे व त्या वेळीं त्यांच्या मनांत नाना प्रकारचे विचार येत असत. अशा वेळीं नारायणराव अंबेकर हे शांत व विचारी वृत्तीचे असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना सदुपदेशाच्या व तडजोडीच्या गोष्टी सांगून त्यांचा मनस्ताप दूर करीत असत. श्रीमंत बाबासाहेबांचे डोळे बिघडून त्यांना कॉलेज सोडावें न लागतें तर ते पदवीधरहि झाले असते. नारायणरावांसारख्या स्नेह्याचा सहवास त्यांना फार दिवस लाभला नाहीं. सन १९०३ सालीं एप्रिल महिन्यांत नारायणराव विषमज्वरानें दिवंगत झाले. त्या वेळीं आपला एक हितकर्ता नाहींसा झाल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना अत्यंत दुःख झालें. श्री. दादासाहेब कुमठेकर यांच्या मनांतहि नारायणरावांबद्दल पूज्यबुद्धि व आदर वसत असे. त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना नारायणरावांच्या निधनानंतर त्यांच्याबद्दल दुःखप्रदर्शक खालील पत्र पाठविलें होतें :

## नारायणराव अंबेकर यांच्या मृत्यूबद्दल श्री. कुमठेकर यांचें पत्र

23-4-1903.

"Indeed, dear Babasaheb, you would never get such a good, loyal and faithful friend and adviser. He was very

very superior to me. He was my dearest friend. I had great respect and veneration for him and great confidence in him."

K. M. Kumthekar.

ह्या पत्रांत नारायणरावांसारखा स्वामिनिष्ठ, प्रामाणिक स्नेही व सल्लागार मिळणार नाहीं, असे जे उद्गार श्री. कुमठेकर यांनीं काढले आहेत ते अगदीं यथार्थ होते. श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर त्यांनीं नारायणरावांचा स्नेहसंबंध लक्षांत ठेवून त्यांच्या पत्नीस पेन्शन करून दिलें आहे. श्री. दादासाहेब कुमठेकर यांचें श्रीमंत बाबासाहेबांवर पूर्ववत् अकृत्रिम प्रेम कायम असून त्यांच्या पोक्त सल्लामसलतीचा श्रीमंत बाबासाहेबांना नेहमीं उपयोग होतो.

वर उल्लेख केलेल्या दोन स्नेह्यांखेरीज पुणें येथील रा. विठ्ठल नारायण करंदीकर यांचेबरोबर राजेसाहेब पुणें हायस्कूलांत आल्यापासून स्नेह जमला. पुढें श्रीमंतांनीं दक्षिण हिंदुस्थानांतील रामेश्वर वगैरे ठिकाणें आणि उत्तरेकडील काश्मीरचा प्रवास केला त्या वेळीं या दोन्ही प्रवासांत रा. करंदीकर आपल्या कुटुंबांसह श्रीमंतांचे बरोबर होते, व या उभयतांचा श्रीमंतांना या प्रवासांत पुष्कळ उपयोग झाला.

श्रीमंत बाबासाहेब मॅट्रिकच्या वर्गांत गेल्यावर त्यांना शिकविण्याकरितां श्री. तात्यासाहेब केळकर यांचे बंधु नारायणराव ऊर्फ नानासाहेब केळकर यांची खाजगी शिक्षक म्हणून कांहीं दिवस नेमणूक केल्याचें मागें सांगण्यांत आलें आहे. नानासाहेब जरी थोडे दिवसच शिक्षक होते तरी त्यांनीं अल्पावधींत श्रीमंत बाबासाहेबांना अभ्यासाची योग्य दिशा दाखवून त्यांच्या ठिकाणीं वाङ्मयाची व इतिहासाची गोडी उत्पन्न केली. श्रीमंत बाबासाहेबांना त्यांची आठवण अद्यापहि होत असते. नानासाहेबांच्यामुळें त्यांचे बंधु श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याशीं श्रीमंत बाबासाहेबांचा परिचय झाला व तेव्हांपासून श्री. तात्यासाहेब केळकर यांच्याकडून संस्थानच्या हिताच्या दृष्टीनें व स्नेहभावानें श्रीमंत बाबासाहेबांना वेळोवेळीं योग्य सल्ला मिळत असतो. नानासाहेब सन १९०४ सालीं धुळें येथें फार आजारी पडले, तेव्हां श्रीमंत बाबासाहेब त्यांना पत्रें पाठवून प्रकृतीबद्दल विचारपूस करीत असत. सन १९०४ सालच्या ऑगस्ट महिन्यांत नानासाहेबांची प्रकृति फारच बिघडली. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना एक पत्र पाठविलें. परंतु तें पोहोंचण्याच्या आदले दिवशींच नानासाहेब दिवंगत झाले होते. त्या वेळीं श्री. तात्यासाहेब केळकर तेथें होते. त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या पत्राचें पुढील उत्तर पाठविलें :

चित्रांक २७



शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी, श्रीमंतांचे स्नेही. [ सं. पा. १८

Private.　　Dhulia 30-8-1904.

Dear Shrimant Babasaheb,

I am extremely sorry to let you know that your friend and my brother Nanasaheb died last night owing to a fever. And consequently I have to reply to your letter to him. I hasten to inform you of the sad event. Vague and unconfirmed rumours are otherwise sure to reach your ears and cause you a good deal of mental distress.

Your letter of anxious inquiry shows that you will feel at hearing of the sad news, the same kind of grief that has fallen upon us his surviving brothers. Your relations with him,—relations which I may say were, so far as little experience went, of confiding and respectful friendship on your part and sincere and disinterested well-wishing on his part—were quite unique; and your respect and affection for him was always a source of pride to me. It is possible, his death will prove a loss to you in more ways than one; and I may assure you that I shall always hold myself at your service for such assistance in advice and conversation as I may be able to give you though, I may say that I cannot claim to have even a fraction of that farsightedness and level-headedness which you must often have marked in my brother. Nobody can be more aware than I am of the natural difference and distance between an heir-apparent to a great gadi and a humble editor of a newspaper which is in bad order in official quarters. But I will always endeavour to regard it as my duty to bear in mind the friendship that existed between my lamented brother and yourself, and to esteem it a privilege to be able to do any small service to you in my own humble way whenever an opportunity may occur.

Yours truly,
Narsinh C. Kelkar.

हें पत्र पाहिलें असतां श्रीमंत बाबासाहेबांचा व नानासाहेबांचा संबंध कशा प्रकारचा होता हें दिसून येतें.

नानासाहेब केळकरांच्यामुळेंच प्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. रा. ब. पारसनीस यांचा परिचय करून घेण्याची संधि श्रीमंत बाबासाहेबांना मिळाली. पारसनिसांच्या परिचयाचें रूपांतर पुढें मित्रत्वांत झालें. पारसनिसांचा परिचय झाल्यावर त्यांचे स्नेही पुरुषोत्तम मावजी यांचाहि परिचय झाला. मावजी शेटजींचा श्रीमंत बाबासाहेब यांना फार उपयोग होत असे. पारसनीस यांचा दृढ परिचय झाल्यावर त्यांनीं ता. १६-८-१९०३ रोजीं श्रीमंत बाबासाहेबांस पाठविलेल्या पत्रांतील उतारा पुढें दिला आहे :

" मागील रविवारीं राणीच्या बागेमध्यें माझे दोनतीन तास आपल्या व रा. कुमठेकर यांच्या सहवासांत फारच आनंदांत गेले, व त्याचें विस्मरण मला कधींहि होणार नाहीं. आपला अतिशय सत्त्वस्थ, गंभीर व शांत स्वभाव मला आपल्या थोड्या सहवासानेंच दिसून आला. रा. कुमठेकर यांचें तुमच्यावर अकृत्रिम व सत्य प्रेम आहे यांत शंका नाहीं. मला तें पाहून फार आनंद झाला. बहुतकरून दोन मित्रांचें खरें प्रेम पाहून लोकांस मत्सर वाटतो. परंतु माझी याच्या अगदीं उलट स्थिति आहे. जेथें स्वच्छ व सोज्वळ प्रेम दृष्टीस पडतें तेथें मला कांहीं अद्भुत व कौतुकास्पद गुण दिसून येतो, व तेणेंकरून माझ्या मनास विलक्षण संतोष वाटतो. रा. कुमठेकर यांची मनोवृत्ति सामान्य लोकां-प्रमाणें कृत्रिम व स्वार्थपटु अशी मुळींच नसून तिच्यामध्यें सप्रेमता व सत्यता फार आहे. माझा त्यांचा जरी फारसा सहवास नाहीं तथापि त्यांच्याबद्दल माझें स्वाभाविक बनलेलं मत सहसा चुकीचें असणार नाहीं. आपला त्यांचा अकृत्रिम स्नेह असाच चिरकाल व सुखावह होवो एवढीच माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे."

## दैनंदिनी ( डायरी-लेखन )

श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या वडिलांप्रमाणें लहानपणापासून रोजनिशी लिहिण्याचा क्रम सुरू ठेविला आहे. त्यांनीं लहानपणीं लिहिलेल्या रोजनिशीं-तील प्रवासवर्णनाचे उतारे पुढें परिशिष्टांत दिले आहेत. विद्यार्थिदशेंत त्यांनीं लिहिलेल्या रोजनिशा पाहिल्या असतां आपलें वर्तन शुद्ध व निष्कलंक ठेवण्या-कडे त्यांचें सदैव लक्ष असल्याचें दिसून येतें. त्याचप्रमाणें परिश्रमपूर्वक अभ्यास करून मोठेपणा मिळविण्याची महत्त्वाकांक्षा बाळगल्याचेंहि दृष्टोत्पत्तीस येतें. एखादे दिवशीं हातून कांहीं चूक झाली तर ती नमूद केलेली असून तीबद्दल

चित्रांक २८



रा. ब. डी. बी. पारसनीस, श्रीमंतांचे स्नेही आणि साताराचे प्रसिद्ध इतिहाससंशोधक.

[सं. पा. १८

पश्चात्ताप व्यक्त करण्यांत येऊन पुन्हां तशी चूक न होऊं देण्याचा केलेला निश्चय आढळून येतो. कांहीं रोजनिशांच्या आरंभीं नीतिपर श्लोक लिहिले आहेत. एके ठिकाणीं

" प्रत्यहं प्रत्यवेक्षेत नरश्चरितमात्मनः ।
किंनु मे पशुभिस्तुल्यं किंवा सत्पुरुषैरिति ।। "

हा श्लोक लिहिलेला आहे. दुसऱ्या एका रोजनिशींत " उद्धरेदात्मनात्मानं " हा गीतेंतील श्लोक आहे. मॅट्रिक परीक्षा नापास झाल्यानंतर पुढील सालच्या रोजनिशीच्या आरंभीं " कर्मण्येवाधिकारस्ते " हा श्लोक लिहिलेला आहे. याप्रमाणें अनेक ठिकाणीं बोधपर श्लोक लिहिलेले आढळून येतात. यावरून त्यांच्या मनांत कोणते विचार घोळत असावेत याची कल्पना येते. विशेष गोष्टी घडलेल्या असतील त्या, त्या दिवशींच्या रोजनिशींत लिहून ठेविलेल्या आहेत. एकंदरींत आत्मनिरीक्षण करून आत्मोन्नति करण्याचा प्रयत्न सुरू ठेविल्याचें दिसतें.

## वाचनाभिरुचि

हायस्कूल व कॉलेज यांतील क्रमिक पुस्तकांशिवाय इतर पुस्तकें वाचण्याचा श्रीमंत बाबासाहेबांना बराच नाद असे. इंग्रजी व मराठी कादंबऱ्यांपैकीं त्या वेळीं लोकप्रिय असलेल्या बऱ्याच कादंबऱ्या त्यांनीं वाचल्या होत्या. कै. हरीभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्या त्यांना फार आवडत असत. त्याचप्रमाणें मिसेस हेन्री वुडची ' ईस्ट लीन ' ही त्यांची अतिशय आवडती कादंबरी होती. या कादंबरींतील नायकाच्या स्वभावाचा आदर्श श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्यापुढें ठेविल्याचें दिसून येतें. सरळपणा, सत्याची आवड, असत्याचा तिटकारा, प्रामाणिकपणा, हे दोघांचेहि स्वभावविशेष आहेत. कादंबऱ्यांशिवाय धार्मिक, ऐतिहासिक, तत्त्वज्ञानविषयक ग्रंथहि ते वाचीत असत. नित्य नियमानें वाचण्याचा ग्रंथ म्हणजे भगवद्गीता. त्यांनीं त्या वेळीं वाचलेल्या ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथांची यादी खालीं दिली आहे :

### इंग्रजी ग्रंथ

Charles Dickens—Pickwick Papers.
Sir Walter Scott—Talisman, Ivanoh.

Mrs. Henry Wood—East Lynne.
Mari Corelli—Sorrows of Satan, Free Opinion, Vendatta.
W. M. Thackery—Vanity Fair.
A. C. Conan Doyle—The Exploits of Bregadier Gerard; Adventures of Sherlock Homes.

## मराठी कादंबऱ्या

काशीबाई कानिटकर : रंगराव. धनुर्धारी : वांईकर भटजी.

देव—विषवृक्ष, बंकिमचंद्र चतरजी यांच्या बंगाली ' विषवृक्ष ' कादंबरीचें भाषान्तर.

हरी नारायण आपटे—' करमणुकीं 'त प्रसिद्ध होणाऱ्या कादंबऱ्या, पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालेल्या-पण लक्षांत कोण घेतो, मी.

प्रि. गोळे यांचीं पुस्तकें—१ ब्राह्मण व त्यांची विद्या. २ हिंदुधर्म व सुधारणा.

**The World's Great Classics**

Histories of Different Nations.
Democracy in America—Literature,
Essays and Orations–American English.
Philosophy—Plato, Aristotal, Cant, Critique of Pure Reason etc.

## भगिनी-विरह

श्रीमंत बाबासाहेब यांच्या भगिनी श्री. सौ. बाईसाहेब यांच्या विवाहाची हकीकत मागें देण्यांत आलीच आहे. बाईसाहेबांना प्रथम अपत्य कन्यारत्न ता. ३१ जानेवारी सन १९०२ रोजीं होऊन कन्येचें नांव जान्हवीबाईसाहेब ठेवण्यांत आलें. त्यांचें लग्न हल्लींचे श्री. राजे शामराज रायरायन राजवंत, हैद्राबाद, यांचेबरोबर झालें. त्यानंतर ता. १२ मे सन १९०३ इ. रोजीं बाईसाहेब भोर येथें प्रसूत होऊन त्यांस पुत्र झाला. पौत्रजननामुळें रावसाहेब व जिजीसाहेब यांना आनंद झाला. त्याचप्रमाणें श्रीमंत बाबासाहेबांना भाच्याचा लाभ मिळाल्यानें आनंद झाला.

बाईसाहेब गरोदर असतांनाच त्यांची प्रकृति बरीच बिघडलेली होती. ती प्रसूतीनंतर ता. १७ मे रोजीं वातानें एकाएकीं जास्तच बिघडली व त्याच

दिवशीं तिसऱ्या प्रहरीं त्या स्वर्गवासी झाल्या. त्यानंतर पांचसहा दिवसांनीं त्यांना झालेल्या पुत्रासहि निर्घृण काळानें हिरावून नेलें. या उभयतांच्या निधनामुळें रावसाहेब, जिजीसाहेब व श्रीमंत बाबासाहेब यांना फार दु:ख झालें. श्रीमंत बाबासाहेबांचें आपल्या भगिनीवर अत्यंत प्रेम असे. निधनसमयीं त्यांचें वय १८ वर्षांचें होतें. त्यांची पहिली कन्या जान्हवीबाईसाहेब यांचें वय या वेळीं अवघें दीड वर्षाचें होतें. त्यांच्याकडे पाहून सर्वांनीं आपल्या दु:खाचें सांत्वन करून घेतलें. याच सालच्या दिवाळींत भाऊबीजेच्या दिवशीं आज आपणांस ओवाळण्यास बहीण नाहीं म्हणून श्रीमंत बाबासाहेबांना फार वाईट वाटलें. त्या दिवशीं त्यांना काय वाटलें तें त्यांनीं त्या दिवशींच्या रोजनिशींत पुढील-प्रमाणें लिहून ठेविलें आहे: "आजचा सर्व दिवस दु:खांत गेला. दुसरी बहीण असती तर दु:ख विसरलों असतों. दरसाल या दिवशीं असेंच दु:ख होणार!" असा मजकूर डायरींत आहे.

## पुत्ररत्नप्राप्ति

श्रीमंत बाबासाहेब डेक्कन कॉलेजांत असतांना सन १९०० सालीं त्यांना प्रथम कन्यारत्न झाल्याचें मागें सांगण्यांत आलेंच आहे. त्यानंतर त्यांना दुसरें अपत्य कन्यारत्नच सन १९०३ सालीं ता. १२ एप्रिल रोजीं होऊन तें दोन वर्षांनीं ता. ७ सप्टेंबर, सन १९०५ रोजीं कालवश झालें.

दुसरें अपत्य कन्यारत्न हयात असतांना त्यांना सन १९०४ सालीं ता. २७ सप्टेंबर रोजीं पुत्ररत्नाचा लाभ झाला. श्रीमंत रावसाहेब आणि श्रीमंत सौ. जिजीसाहेब यांना नातवंडाचें मुख पाहण्याचा योग आल्यामुळें त्यांना अत्यानंद झाला. सचिव घराण्यांत हा वेळपावेतों कोणालाहि नप्तृमुख पाहण्याचा योग आला नव्हता म्हणून त्यांना धन्यता वाटणें साहजिक होतें.

यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः ।
तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम् ॥

सुशील भार्या, विपुल संपत्ति, विनय, बुद्धिमत्ता इत्यादि गुणांनीं युक्त असा पुत्र व अशा पुत्रापोटीं जर पुत्र झाला तर स्वर्गामध्यें तरी जास्त सुख काय असणार? अण्णासाहेब किर्लोस्करांनींहि म्हटलें आहे: "पुत्रापोटीं पुत्र होय तरि स्वर्गाधिक सुख त्याला." रावसाहेब व जिजीसाहेब खरोखर भाग्यवान्.

वरील सर्व गोष्टींची अनुकूलता असल्यानें रावसाहेबांना स्वर्गाधिकसुखाचा लाभ होऊन धन्यता वाटली. बारशाचा समारंभ होऊन मुलाचें नांव सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब ठेवण्यांत आलें व तेच हल्लींचे युवराज होत.

## ज्ञानलालसा

सन १८९३ पासून १९०४ अखेरपर्यंत १२ वर्षें म्हणजे एक तप श्रीमंत बाबासाहेब यांनीं पुणें हायस्कुलांत व डेक्कन कॉलेजांत विद्यार्जनांत घालविलें. तो काल पुण्यांत चळवळींचा व धामधुमीचा होता. विद्यार्थ्यांच्या मनांवर या चळवळींचा परिणाम होणें साहजिक होतें. श्रीमंत बाबासाहेब पुण्यास गेल्यावर एक वर्षानें नवीन राष्ट्रीय उत्सव सुरू करण्याचा उपक्रम झाला.

## गणपति-उत्सव

महाराष्ट्रांत पूर्वीपासून घरोघर गणपति-उत्सव सुरू होते; सामुदायिक उत्सव करण्याचा प्रघात नव्हता. राष्ट्रांत धार्मिक तेज उत्पन्न करून समाजाची संघटना करण्यास सार्वजनिक उत्सव सुरू करून सातआठ दिवस ज्ञानसत्र सुरू ठेविल्यास पुष्कळ कार्यभाग होणारा आहे, असें वाटून पुण्यांतील पुढा-ऱ्यांनीं लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, बी. ए., एल्एल्. बी., यांच्या प्रेरणेनें प्रथम सार्वजनिक गणपति-उत्सव सुरू केला. लोकमान्य टिळक बाळासाहेब विंचुरकर यांच्या वाड्यांत राहत असल्यामुळें सार्वजनिक उत्सव कांहीं वर्षें तेथें होत असे. या उत्सवांत गणपतीपुढें धार्मिक व सामाजिक विषयांवर जीं व्याख्यानें होत व जीं कीर्तनें होत त्यांचा लाभ श्रीमंत बाबासाहेब कधीं कधीं घेत असत व आपल्या ज्ञानांत भर घालीत असत. ते आपल्या वाड्यांतहि गणपती बसवून खाजगी रीतीनें उत्सव करीत व एखाद्या उत्तम हरिदासाचें कीर्तन करवीत असत.

## राष्ट्रीय सभा

सन १८९५ सालीं पुण्यास राष्ट्रीय सभा भरली होती. या सभेचे अध्यक्ष सुरेन्द्रनाथ बानर्जी हे होते. उत्कृष्ट वक्ते म्हणून सुरेन्द्रनाथ बानर्जींची ख्याति होती. श्रीमंत बाबासाहेब यांना या सभेशीं संबंध ठेवणें जरी प्रशस्त नव्हतें तरी बानर्जीसारख्या नामांकित वक्त्याचें भाषण ऐकण्याची संधि वायां

चित्रांक २९



श्रीमंत बाबासाहेब व श्री. रा. कोंडो महादेव ऊर्फ दादासाहेब कुमठेकर, श्रीमंतांचे स्नेही.
( श्रीमंतांना वार्षिक खर्चाची नेमणूक झाली त्या वेळचा फोटो. )

[ सं. पा. १०

घालवूं नये असें वाटून ते सुरेन्द्रनाथ बानर्जींचें व्याख्यान ऐकण्यास गेले होते. त्यांचें अस्खलित भाषण ऐकून वक्तृत्वकलेचें महत्त्व किती आहे हें त्यांच्या लक्षांत आलें असावें.

## श्रीशिवाजी-स्मारक-फंड-सभा

राष्ट्रीय सभेचें काम चालू असतांनाच शिवाजी-स्मारक-फंडाकरितां रे मार्केटांत सुरेन्द्रनाथबाबूंच्या अध्यक्षतेखालींच प्रचंड जाहीर सभा भरली होती. शिवाजी-स्मारकाची योजना सर्व संस्थानिक, सरदार वगैरेंना मान्य झालेली होती. श्रीमंत बाबासाहेब या रे मार्केटांतील सभेस गेले होते. तेथें त्यांना सुरेन्द्रनाथ व हल्लींचे हिंदुस्थानांतील ऋषितुल्य वंदनीय पुढारी पंडित मदन मोहन मालवीय यांचीं छत्रपति शिवाजीमहाराजांच्या अतुल कामगिरीबद्दल स्फूर्तिदायक भाषणें ऐकावयास मिळालीं. भोर संस्थानचे मूळ संस्थापक श्री. शंकराजी नारायण यांचे वडील शिवाजीमहाराजांच्या पदरीं नोकर होते. त्यामुळें शिवाजीमहाराजांच्याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांच्या मनांत पूज्यबुद्धि व आदर वसत असे. रे मार्केटांतील सभेंत जीं भाषणें झालीं तीं ऐकून पूर्वजांच्या इतिहासाची जिज्ञासा उत्पन्न होऊन त्यांना इतिहासवाचनाचा नाद लागला असावा.

## फ्रेन्डस् लिबरल ॲसोसिएशन

सन १८९३ पासून १८९६ पर्यंत गणपति-उत्सव, हिंदुमुसलमान-दंगा, राष्ट्रीय सभा, शिवाजी-स्मारक-फंड-सभा, शिवाजी-उत्सवाचा उपक्रम, इत्यादि अनेक चळवळी झाल्यानंतर सन १८९७ सालीं प्लेगचा उद्भव झाला व पुढें तीनचार वर्षें पुणेंकरांना अनेक हालअपेष्टा, संकटें भोगावीं लागलीं. सर्वत्र औदासीन्याचें वातावरण पसरलें होतें. विद्यार्थ्यांचेंहि अपरिमित नुकसान झालें. प्लेगचा जोर कमी झाल्यावर पुण्यास फ्रेन्डस् लिबरल ॲसोसिएशन नांवाची एक संस्था स्थापन झाली. या ॲसोसिएशनमार्फत दर आठवड्याला अनेक उपयुक्त विषयांवर व्याख्यानें होत असत. रानडे, गोखले, भाण्डारकर इत्यादि थोर विद्वानांचीं व्याख्यानें होत. श्रीमंत बाबासाहेब बरेच वेळां या व्याख्यानांस हजर असत. नवीन ज्ञान मिळविण्याची कोठेंहि संधि दिसली कीं, त्या संधीचा फायदा करून घेतल्याशिवाय राहावयाचें नाहीं असा त्यांचा सामान्यतः नियम असे व ही त्यांची वृत्ति अद्यापहि कायम आहे.

## श्रीमंतांचे बालवयांतील पालक ( गार्डियन )

सन १८९३ सालीं श्रीमंत बाबासाहेब शिक्षणाकरितां पुण्यास राहिले. त्यांच्यावर देखरेख ठेवण्याकरितां तेथें प्रथम कांहीं वर्षे रा. मेढेकर, बापूसाहेब पाटणकर व सदाशिवराव पोतनीस यांची एकामागून एकाची पालक म्हणून नेमणूक करण्यांत आली होती. या तिघांपैकीं पहिले गृहस्थ रा. मेढेकर. हे फार क्षुद्र बुद्धीचे व कोत्या विचाराचे होते. त्यांच्यापासून श्रीमंत बाबासाहेबांना बराच त्रास होत असे. बाबासाहेबांशीं त्यांचें वागणें अगदीं तुच्छतेचें असून ते हिडिसफिडिस करणारे व अंगावर खेंकसणारे होते.

मेढेकरांच्यामागून बापूसाहेब पाटणकरांची नेमणूक झाली. हे श्रीमंत बाबा-साहेबांचे आजोबा नानासाहेब यांच्या कारकीर्दींत उदयास येऊन नानासाहेबांच्या मर्जींतले होते. त्यांच्याबद्दल रावसाहेबांच्या मनांतहि आदर होता. बापूसाहेब पाटणकर दिलदार स्वभावाचे असून त्यांचें श्रीमंत बाबासाहेबांवर फार प्रेम असे. सन १९०३ सालीं बापूसाहेब आजारी होऊन अंथरुणावर पडून होते. ते अत्यवस्थ स्थितींत आहेत हें जेव्हां श्रीमंत बाबासाहेबांना समजलें तेव्हां त्यांच्या घरीं ते भेटीस गेले होते. त्या दिवशींच्या रोजनिशींत त्यांनीं पुढील-प्रमाणें लिहिलें आहे :

"बापूसाहेब फार आजारी असल्याचें कळलें; म्हणून आज त्यांचे भेटीस गेलों. भेटीस जाण्यापूर्वीं त्यांचे नातू रा. वामनराव पाटणकर यांना कळविलें कीं, मी भेटीस येणार आहें. मी येणार आहें म्हणून माझेकरितां विशेष तयारी ठेवूं नये. तें मला आवडणार नाहीं."

श्रीमंत बाबासाहेब ठरल्याप्रमाणें त्यांच्या भेटीस गेले. त्या वेळीं बापूसाहेबांना धन्यता वाटून त्यांच्या डोळयांतून अश्रू आले व श्रीमंतांनीं आप-णांस उपकृत केल्याबद्दल श्रीमंतांचे त्यांनीं आभार मानले. या आजारांतून बापूसाहेब बरे झाले, तेव्हां श्रीमंत बाबासाहेबांना आनंद वाटला. पुढें १९०६ सालीं बापूसाहेब पुन्हां आजारी पडले व त्यांतच त्यांचा अंत झाला. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांना आपला हितकर्ता गेला याबद्दल फार वाईट वाटलें. बापूसाहेब पाटणकर यांच्यापासून श्रीमंत बाबासाहेब यांच्या लहानपणची बरीच

माहिती आम्हांस मिळाली, त्या माहितीचा हें पुस्तक लिहिण्याच्या कामीं बराच उपयोग झाला.

बापूसाहेबांच्या नंतर सदाशिवराव पोतनीस यांची नेमणूक करण्यांत आली होती. हे गृहस्थ फार सज्जन होते. यांचीहि श्रीमंत बाबासाहेबांना फार मदत झाली. सदाशिवराव दिवाणजीमागून भाऊराव पागे होते. तेहि चांगल्या प्रकारचे गृहस्थ होते. त्यांच्या पश्चात् देखरेखीकरितां स्वतंत्र इसम नेमण्याचें बंद करण्यांत आलें; व तें काम वाकनिसांकडे सोंपविण्यांत आलें. वासुदेवराव दसपुत्रे व माधवराव परळीकर यांनीं वाकनीस या नात्यानें बरेच दिवस हें काम केलें.

पुण्यास खाजगी शिक्षणाकरितां पहिल्यांदा लेले मास्तर यांची नेमणूक करण्यांत आली होती व श्रीमंत बाबासाहेब सातव्या इयत्तेंत असतांना कै. नारायणराव ऊर्फ नानासाहेब केळकर यांना नेमिलें होतें. त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या ठिकाणीं क्रमिक पुस्तकांव्यतिरिक्त त्या त्या विषयावरील इतर पुस्तकें वाचण्याची अभिरुचि उत्पन्न केली. यांच्याविषयीं श्रीमंत बाबासाहेबांचे ठिकाणीं किती आदर होता याविषयीं सविस्तर वर्णन मागें आलेंच आहे.

## खाजगी खर्चाकरितां नेमणूक

खाजगी खर्चाच्या बाबतींत मुळींच स्वातंत्र्य नसल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्या मनास वरचेवर त्रास होऊं लागला. तेव्हां त्यांनीं श्रीमंत रावसाहेबांच्या कडून पो. ए. मि. डब्ल्यू. डी. शेपर्ड यांच्या सल्ल्यानें १९०५ सालीं खाजगी खर्चाकरितां वार्षिक पंचवीस हजार रुपयांची नेमणूक करून घेतली.

मि. शेपर्ड यांनीं रावसाहेबांना पाठविलेल्या पत्रांत श्रीमंत बाबासाहेब यांच्या स्वभावाबद्दल पुढीलप्रमाणें उल्लेख केला होता :

"I would merely add that it has occurred to me in connection with this matter that you have perhaps hardly realised fully the age that your son has now attained; nor do I think that you have appreciated the high esteem in which he is held by all who have been brought in contact with him as an honourable and unassuming young nobleman of the highest character actuated by a strong desire to fit himself by

study, travel and such experience as is open to him to eventually fill the exalted post in the distant future it should please God to call him."

आर्थिक स्वातंत्र्य मिळाल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना आनंद होऊन यापुढें आपणांस उपयुक्त सार्वजनिक कार्यांत कांहींतरी भाग घेतां येईल असें वाटूं लागलें. विद्यार्थिदशेंत जर त्यांना हें स्वातंत्र्य मिळालें असतें तर त्यांचें मन मोकळें राहून त्यांना उल्हसित वृत्तीनें अधिक ज्ञानार्जन करतां आलें असतें व प्रकृति चांगली राहिली असती. परंतु तो काल कडक नियंत्रणांत गेल्यामुळें त्यांच्या स्वभावांत भित्रेपणा, कुढेपणा, अनिश्चितता, संशयवृत्ति इत्यादि किरकोळ दोष उत्पन्न झाले. कारण विशिष्ट प्रकारच्या परिस्थितींत स्वभावावर विशेष प्रकारचे परिणाम होणें स्वाभाविक असतें. एकंदरींत श्रीमंत बाबासाहेबांच्या अध्ययनकालीन जीवित-क्रमाचें पर्यालोचन केलें असतां त्यांनीं प्रतिकूल परिस्थितींतहि अभ्यासाकडे दुर्लक्ष केलें नाहीं व शुद्धाचरण ठेवून विनय, सौजन्य, निगर्वीपणा इत्यादि गुणांमुळें सर्वांचें प्रेम संपादन केलें होतें असें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे; व यामुळेंच त्यांना आपल्या कडक स्वभावाच्या वडिलांपासून नेमणूक करून घेतां आली.

चित्रांक ३०



श्रीमंत बाबासाहेब पुणें येथें ऑनररी मॅजिस्ट्रेट होण्याचे सुमारास घेतलेला फोटो. [ सं.पा.१०७

## प्रकरण ४ थें

# अधिकाराची पूर्वतयारी



## १९०६–१९१२

मागील प्रकरणांत श्रीमंत बाबासाहेबांनीं वार्षिक खर्चाची नेमणूक करून घेतली हें सांगण्यांत आलें आहे. ही नेमणूक करून घेण्यांत त्यांचा हेतु स्वच्छंदपणें वाटेल तशी चैन करतां यावी असा मुळींच नव्हता. चैनबाजीकडे त्यांच्या मनाची प्रवृत्ति कधींच नव्हती. तसा त्यांच्या मनाचा कल असता तर कॉलेजांत असतांना ज्या एका चैनी राजपुत्राचें वर्णन प्रो. एम. आर. परांजपे यांनीं केलें आहे तशाच प्रकारचे चाळे त्यांनीं केले असते. परंतु आपलें वर्तन निष्कलंक व शुद्ध ठेवून दुर्वृत्त मंडळींच्या वाऱ्यासहि ते कधीं उभे राहिले नाहींत; व त्यामुळेंच त्यांच्या शिक्षकवर्गाचा व अधिकारी यांचा त्यांच्यावर लोभ जडून ते त्यांच्या हिताची काळजी वाहत असत. खर्चाची नेमणूक करून घेण्यांतहि त्यांचा हेतु मानसिक शांति व व्यावहारिक शिक्षण मिळविण्याचाच होता. ठरलेल्या रकमेंत कोणत्या गोष्टींत खर्च करावा, कोणत्या गोष्टींत करूं नये, काटकसर कोठें करावी, इत्यादि गोष्टी ठरविण्याचें आपणांस स्वातंत्र्य असावें व ठरलेल्या रकमेंतूनच लोकोपयोगी कार्यास थोडीफार मदत करतां यावी हाच त्यांचा हेतु होता.

नेमणूक करून घेतल्यावरहि १९०७ अखेरपर्यंत त्यांनीं शिक्षक ठेवून कायद्याचें अध्ययन सुरूच ठेविलें होतें. श्रीमंत बाबासाहेबांचे हितकर्ते पो. ए. मि. शेपर्डसाहेब सन १९०५ सालीं बदलून गेले व त्यांच्या जागीं मे. स्विफट-साहेब पोलिटिकल एजंट झाले. स्विफटसाहेब पुण्यासच ॲक्टिंग कलेक्टर म्हणून काम करीत असल्यामुळें त्यांनाहि श्रीमंत बाबासाहेबांची पूर्ण माहिती असून त्यांच्यावर साहेबांचें प्रेम होतें. त्यांच्या सल्ल्यावरून न्यायमंदिरांत कायद्याच्या कामाची प्रत्यक्ष माहिती करून घेण्याकरितां सन १९०५ सालींच ते पुणें सिटी मॅजिस्ट्रेट मि. एच्. एफ्. कारव्हालो यांच्या कोर्टांत जाऊन खटले कसे

चालतात तें पाहत बसत असत. पुढें सालअखेर स्विफ्टसाहेबांनीं श्रीमंत बाबासाहेब यांचें कसें काय चाललें आहे म्हणून मि. कारव्हालोसाहेबांना पत्र पाठवून विचारिलें होतें. त्यावरून त्यांनीं स्विफ्टसाहेबांना पुढीलप्रमाणें आपलें मत कळविलें :

"I was very pleased with the intelligent interest he took in the proceedings of the court. He was present at the hearing of several cases and from the conversation I had with him, I felt sure that he watched the proceedings with keen interest. He also read through several cases which were placed at his disposal when he attended the court. I took opportunities of explaining technical points which might have arisen in the trials and at all times, I was glad to answer any question as regards any difficulties he felt. I think, he now fully understands the procedure of a Criminal Court and he has no doubt profitted by attending this court, He was regular in attendance and generally remained from 2 to 3 hours daily.

Your faithfully,
H. F. Carvalho.

मॅजिस्ट्रेट कोर्टांत काम कसें चालतें याची पूर्ण माहिती घेतल्यानंतर प्रत्यक्ष काम चालवितां यावें म्हणून स्विफ्टसाहेबांच्या शिफारशीवरून पुणें येथील ऑनररी मॅजिस्ट्रेटचे बेन्चांत श्रीमंत बाबासाहेब यांना सन १९०६ सालापासून जागा देण्यांत आली. तेथें ते ऑनररी मॅजिस्ट्रेट या नात्यानें प्रत्यक्ष काम चालवूं लागले. हें काम त्यांनीं सन १९११ सालपर्यंत केलें. त्या सालीं युवराज श्रीमंत भाऊसाहेब यांच्या आजारीपणामुळें त्यांना बेन्चांतील ऑनररी मॅजिस्ट्रेटच्या जागेचा राजीनामा द्यावा लागला.

ऑनररी मॅजिस्ट्रेटचें काम त्यांनीं सुमारें सहा वर्षें केलें. या अवधींत त्यांना फौजदारी कामाची उत्तम माहिती झाली होती. त्या वेळीं त्यांनीं ज्या दुसऱ्या ऑनररी मॅजिस्ट्रेटबरोबर काम केलें त्यांच्यापैकीं ज्यांच्याशीं त्यांचा विशेष परिचय होता त्यांचीं नांवें खालीं दिलीं आहेत :

१. मे. काळूराम भान मन्सराम.
२. ,, कैकोबाद अदारबाद दस्तूर.
३. ,, नारायणराव चिंतामणराव नातू.
४. ,, एस. व्ही. रानडे.
५. ,, इ. एच. जाफर ( 'सर' किताब मिळाल्यावर यांना सर इब्राहिम हरून जाफर म्हणूं लागले ).
६ ,, खानबहादुर दिनशा डोसाभाई खंबाटा ( पुढें यांना 'सर' ही पदवी मिळाली ).
७. ,, मार्तंड त्रिंबक गद्रे.
८. ,, खानसाहेब दोराबजी दादाभाई बूटी.
९. ,, सदाशिवराव माधवराव पुरंदरे.
१०. ,, विनायकराव कान्हेरराव पटवर्धन.
११. ,, चिमणलाल किसनदास ( हे हल्लीं रावबहादुर आहेत ).
१२. ,, एस. सी. मुदलीयार (हे हल्लीं सरदार व सी. बी. ई. आहेत).

गव्हर्नरसाहेबांच्या लेव्ही, पार्टी वगैरे समारंभांस हजर राहण्याचा मान श्रीमंत बाबासाहेबांना सन १९०१ सालापासून दरवर्षीं देण्यांत येत असे. तो पुढें सतत चालू ठेविल्याचें त्यांना सन १९०७ सालीं कळविण्यांत आलें. तें पत्र खालीं दिलें आहे :

Bombay, 27th November 1907.

To

Shrimant Raghunathrao Shankarrao Pant Sachiv of Bhor,
Dear Sir,

In reply to your letter of the 27th instant I am directed to inform you that H. E. the Governor is pleased to continue the privilege to you of Private Entree at H. E.'s Levees, on personal grounds.

I remain,
Yours sincerely,
J. G. Greig,
Captain, Military Secretary.

## थोर व्यक्तींच्या भेटींचा लाभ

### प्रिन्स ऑफ वेल्स, पूर्वीचे बादशहा पंचम जॉर्ज, यांची हिंदुस्थानास भेट : सन १९०५

सन १९०५ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या ९ तारखेस प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थान पाहण्याकरितां मुंबईस आले, त्या वेळीं त्यांच्या स्वागतार्थ मुंबई इलाख्यांतील बहुतेक संस्थानिक मुंबईस जमले होते. श्रीमंत बाबासाहेब यांचे वडील कै. हिज हायनेस रावसाहेब हेहि मुंबईस गेले होते व त्यांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबहि होते. ता. १० रोजीं प्रिन्स ऑफ वेल्स यांनीं सर्व राजेलोकांच्या भेटी घेतल्या, त्या वेळीं रावसाहेबांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबहि असल्यामुळें त्यांना प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या भेटीचा लाभ मिळाला. अशा समारंभांच्या प्रसंगीं जो फायदा मिळतो तो करून घेण्याची संधि श्रीमंत बाबासाहेब कधींहि दवडीत नसत. अनेक लोकांशीं परिचय करून घेऊन त्यांच्याबरोबर विचारविनियम करून आपल्या ज्ञानांत भर घालण्यास ते नेहमीं तयार असत. ही त्यांची वृत्ति अद्यापहि कायम आहे.

याच महिन्यांत लॉर्ड कर्झन यांची मुदत संपल्यामुळें ते ता. १८ रोजीं मुंबईहून विलायतेस जाण्याकरितां निघाले व ते गेल्यानंतर त्यांच्या जागीं आलेले लॉर्ड मिंटो यांनीं त्याच दिवशीं व्हाइसरॉयच्या जागेचा चार्ज घेतला व रात्रीं गव्हर्न्मेंट हाउसमध्यें रिसेप्शन पार्टी देण्यांत आली. त्या वेळीं त्यांच्या स्वागतार्थ जमलेल्या सर्व राजे लोकांच्या व त्यांच्या भेटी झाल्या. श्रीमंत बाबासाहेबांनाहि भेटीचा लाभ मिळाला.

### विलायतच्या सफरीचा बेत : सन १९०६

सन १९०५ सालीं खर्चाची नेमणूक करून घेतल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत इंग्लंडचा प्रवास करून आपल्या ज्ञानांत भर घालण्याचे विचार येऊं लागले. सन १९०६ सालीं पो. ए. मि. स्विफ्ट हे रजेवर होते. त्यांना श्रीमंत बाबासाहेबांनीं इंग्लंडचे प्रवासास काय खर्च येईल म्हणून पत्र पाठवून विचारलें होतें. त्याचें उत्तर मि. स्विफ्ट यांनीं पाठविलें होतें, तें पुढें दिलें आहे :

चित्रांक २१



विंचुरकर मंडळी; ( सन १९०७ सालीं घेतलेला फोटो ) [ सं. पा. ११६

उभे :—(१) सरदार बाळासाहेब विंचुरकर, (२) श्री. भाऊसाहेब विंचुरकर

खुर्चीवर बसलेल्या :—(१) श्री. सौ. वाराणशीबाई, (२) श्री. सौ. गंगुताईसाहेब, कु. चंद्रशेखर, (बाळासाहेबांचे चिरंजीव), (३) श्री. सौ. उमाबाईसाहेब (भाऊसाहेबांचें कुटुंब)

बसलेल्या :—(१) सौ. शांताबाई; (२) सौ. सोनुताई (बाळासाहेबांच्या कन्या)

Dublin, 28th March 1906.

My dear Babasaheb,

I am very glad to hear good news of you and note that you wish to visit England. Personally I am in favour of the project, as I think the experience would prove beneficial to you; but every thing must depend upon the view your father takes in the matter.

If you come at all, I think you would like to come as a prospective Ruling Chief, and make the acquaintances of various important personages in England. But to keep a position of this kind, you would be put to a very heavy expenditure, especially if accompanied by a suite of some 7 or 8 persons. You could not think of making the trip without a large special grant from your father. It would be impossible to do it in your allowance, and I should be inclined to advise you not to attempt the project at all unless in a manner fitting your position.

As to the amount of expense to be incurred, much, of course, depends on what it is desired to do; if you come as a private visitor, the cost could be kept down; but if you wanted to assert your position, I think at a rough estimate a special grant of rupees one lakh from the State Treasury would be necessary. All must depend upon how far your father approves of the project and you can show him this letter if you wish. Should you decide to come, you might arrive in May when the weather would be fairly warm. I could and should be happy to arrange regarding your accommodation in London and elsewhere, your introduction to persons of note and, if necessary, the appointment of a suitable gentleman in England to accompany you to show you round and make all arrangements for you. As I have already said, it only remains to consult your father and should he be in favour of the project I would arrange to have you met on arrival in England and have every thing done for you. It would only be necessary for you to get on

board the ship in Bombay with your attendants. Funds could be remitted to London, against your arrival through (say) Messrs. Grindlay Groom and Co., Bombay. I hope the above information will prove sufficient for your purpose.

With kind regards and best wishes,

I remain,
Your sincerely,
L. C. Swifte.

श्रीमंत बाबासाहेबांना वाटत होतें कीं, प्रवासास फार खर्च येणार नाहीं. स्विफ्टसाहेबांच्या पत्रावरून निदान एक लाख रुपये खर्च येईल असें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां एवढी मोठी रक्कम वडिलांच्याकडून मिळण्याची त्यांना आशाच नसल्यामुळें त्यांनीं तो नाद सोडून दिला.

## जिजीसाहेबांना प्लेगचा आजार

सन १९०६ सालीं नोव्हेंबर महिन्यांत भोर येथें प्लेग सुरू झाल्यामुळें रावसाहेब सहकुटुंब वाईस गेले व श्रीमंत बाबासाहेब आपल्या कुटुंबासह मुंबईस जाऊन राहिले होते. नोव्हेंबर ता. १७ पर्यंत रावसाहेबांचा मुक्काम वाईस होता. नंतर जमाबंदीकरितां ते शिरवळास गेले. तेथें दोन दिवस मुक्काम करून नसरापुरावरून ता. २२ रोजीं ते मंडळींसह वेल्यास गेले. तेथें दोनतीन दिवसांनंतर जिजीसाहेबांची प्रकृति प्लेगनें एकाएकीं बिघडली व त्यामुळें सर्वांचीं मनें अस्वस्थ झालीं. लगेच पुण्यास स्वार पाठवून डॉ. चोबे यांना वेल्यास नेलें. त्या वेळीं मोटारची सोय नसल्यामुळें घोड्याच्या गाडीनें प्रवास करावा लागे. पुण्याहून वेलें ४० मैल आहे. स्वार जाऊन डॉक्टर येण्यास एक दिवस लागला. डॉ. चोबे यांनीं "ताप प्लेगचा आहे, तरी भिण्याचें कारण नाहीं" असें सांगितलें. तेव्हां रावसाहेबांच्या व इतर मंडळींच्या मनास थोडा धीर आला. जिजीसाहेबांचे बंधु बाळासाहेब विंचुरकर विंचुरास होते व श्रीमंत बाबासाहेब मुंबईस होते. त्यांना पुण्याहून तारा करण्यांत आल्या. श्रीमंत बाबासाहेब यांना तार पोंचतांच त्यांच्या मनास धक्काच बसला. त्यांना आधार म्हणजे जिजीसाहेबांचा. एक क्षणाचाहि विलंब न करतां मुंबईहून कै. डॉ. काशिनाथ नारायण गोखले यांना बरोबर घेऊन ते पुण्यास आले. डॉ. काशिनाथ नारायण गोखले हे पूर्वी १८९६ पासून १९०० पर्यंत भोरास चीफ मेडिकल ऑफिसर

असून प्लेगच्या ऐन धामधुमीच्या काळांत त्यांनीं भोर येथें लोकांना फारच प्रेमळपणें वागविल्यामुळें त्यांच्याबद्दल भोरच्या नागरिकांच्या मनांत फार आदर वसत असे. श्रीमंत बाबासाहेबांचेंहि त्यांच्याबद्दल फारच चांगलें मत होतें. सन १९०० नंतर त्यांनीं मुंबईस स्वतंत्र दवाखाना काढून तेथेंहि त्यांनीं नांवलौकिक मिळविला होता. श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना जिजीसाहेबांच्या आजाराची बातमी सांगून वेल्यास येण्याबद्दल कळवितांच ते तावडतोब त्यांच्याबरोबर निघाले. श्रीमंत बाबासाहेब डॉक्टरसह पुण्यास आले. त्याच दिवशीं विंचुरहून बाळासाहेबहि तेथें आले. नंतर सर्व मंडळी वेल्यास गेली. डॉ. गोखले यांनीं " जिजीसाहेबांची प्रकृति तपासली व ताप जरी प्लेगचा असला तरी तो अगदीं सौम्य स्वरूपाचा आहे; काळजी करण्याचें मुळींच कारण नाहीं; तीनचार दिवसांत आराम वाटेल." असें जेव्हां सांगितलें तेव्हां श्रीमंत बाबासाहेबांच्या जिवांत जीव आला. तोंपर्यंत त्यांच्या तोंडचें पाणी पळालें होतें, व त्यांची अशी स्थिति होणें अगदीं स्वाभाविक होतें. परमेश्वरकृपेनें जिजीसाहेबांना लवकर आराम पडत चालला व ता. २८ रोजीं सर्व मंडळी नसरापुरास आली. तेथें तीनचार दिवस मुक्काम करून ता. २ डिसेंबर रोजीं सर्व मंडळी पुण्यास गेली. पुण्यास गेल्यावर जिजीसाहेबांची प्रकृति चांगली सुधारली व सर्वांना अत्यानंद झाला. बाळासाहेब विंचुरास गेले व श्रीमंत बाबासाहेब मुंबईस गेले. डॉ. गोखले व डॉ. चोबे यांना यश आलें.

## बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांचें भोरास आगमन

रावसाहेबांच्या विनंतीवरून श्रीमंत सयाजीराव यांनीं ता. ८ सप्टेंबर सन १९०७ रोजीं भोरास भेट दिली. रावसाहेबांनीं श्रीमंत सयाजीराव यांचा उत्तम प्रकारें बंदोबस्त ठेवून मानमरातब राखिला होता. श्रीमंत बाबासाहेबांना या भेटीमुळें फारच लाभ झाला. म्युनिसिपॅलिटीच्या मानपत्रास उत्तर देतांना व भोर येथील हायस्कुलांत श्रीमंत सयाजीराव यांनीं सर्वांना उद्देशून जीं सुविचारपरिप्लुत, मार्गदर्शक, बोधप्रद भाषणें केलीं त्यांचा श्रीमंत बाबासाहेबांच्या मनावर फारच परिणाम होऊन तीं भाषणें पुढें त्यांना आपलें ध्येय ठरविण्यास कारणीभूत झालीं. या भाषणांतील कांहीं महत्त्वाचे उतारे खालीं देत आहें. मानपत्राच्या उत्तरांत राजेलोकांना उद्देशून ते म्हणाले :

" चांगलेपणा हा मनुष्याच्या कृतीनें प्राप्त होतो. राजाचें मुख्य कर्तव्य प्रजेचें कल्याण करणें हें होय. आणि एतद्देशीय संस्थानिकांनीं अशाच प्रकारचें वर्तन ठेविलें पाहिजे. आमचीं कर्तव्यें, आमची प्रजेविषयींची कळकळ आणि दक्षता हीं आम्हीं बजाविलीं पाहिजेत. आम्हीं रयतेचें अज्ञान काढून टाकून तिला सज्ञान केलें पाहिजे. राजाच्या चुका त्याच प्रजेच्या चुका आहेत. तर प्रजेनें व राजानें एकमतानें वागलें पाहिजे. राजा, प्रजा व अम्मलदार या तिघांवर राज्याची जबाबदारी सारखीच आहे,—हिंदुस्थान देशाची सुधारणा करण्याकडे सर्वांचें लक्ष लागलें पाहिजे,—सर्वांना सारखें मानून व जाती, धर्म, वर्ण वगैरे लक्षांत न आणतां सर्वांस सारखें शिक्षण मिळालें पाहिजे. आपणांस लढण्याची शक्ति नाहीं, आपण निःशस्त्र आहोंत, परंतु ज्ञानरूपी शस्त्रानें आपणांस आपल्या देशाचें हित साधतां येईल. "

हायस्कुलांतील भाषणांत अधिकारीवर्गास उद्देशून ते म्हणाले,

" पंतसाहेब कोठारी आहेत. ते अम्मलदारांस कोठारांतील धान्य देतात. परंतु अन्न, मालमसाला घालून शिजविणें व चांगल्या रीतीनें तयार करणें हें अम्मलदारांच्या हुषारीचें व शहाणपणाचें काम आहे. "

स्त्री-शिक्षणाचें महत्त्व सांगून ते म्हणाले,

" आपण शिवाजीमहाराजांचें उदाहरण घेऊं या. त्यांच्या प्रिय जननी जिजाबाई या स्वतः नीतिमान् व समंजस असल्यामुळें त्याचा परिणाम शिवाजीमहाराजांच्या मनावर चांगला झाला, आणि त्यामुळें त्यांच्या हातून चांगलीं कृत्यें घडलीं, हें तुम्हां सर्वांस इतिहासावरून कळून चुकलेंच आहे. प्रत्येकजण शिवाजी होणार नाहीं; परंतु, मुलांनो, तुम्हांपैकीं प्रत्येकजण लहान-लहान शिवाजी बनेल अशी मला सबळ आशा आहे. प्रत्येकानें नीतिशुद्ध, व्यवहारशुद्ध व निर्मळ अंतःकरण ठेवून वर्तन केलें पाहिजे. कारण प्रजा ज्या ठिकाणीं विद्वान्, धैर्यवान् व नीतिमान् असेल त्या ठिकाणीं कायद्याची बिल-कुल गरज लागत नाहीं, व कडक कायद्यानें त्यांच्या स्वतंत्रतेवर धाड येण्याचा मुळींच संभव नाहीं. "

ब्राह्मणांसंबंधानें त्यांनीं पुढील विचार प्रकट केले :

" ब्राह्मण विद्वान् आहेत; पण देशाची सुधारणा होणें असेल तर ब्राह्मणांच्या विद्वत्तेबरोबर त्यांचे विचारहि सुधारले पाहिजेत. ब्राह्मण-भिक्षुकवर्ग यांचें कर्तव्य किती महत्त्वाचें आहे याचा विचार करा. परंतु ते आपल्यावरील जबाबदारी ओळखीत नाहींत, ही गोष्ट फार वाईट आहे. मी खरें आहे तें बोलतों याचा कोणीं राग मानूं नये. बैलावर साखरेची अगर मातीची गोणी घातली तरी त्याला सारखीच, त्याप्रमाणें भिक्षुकवर्गाची स्थिति झाली आहे. भिक्षुकांचें नुसतें पोपटपंचीचें ज्ञान बिलकुल उपयोगाचें नाहीं. असा श्रेष्ठ वर्ग जर अडाणी राहिला तर देशाचें कोणत्याहि प्रकारें कल्याण होणार नाहीं. सुशिक्षित शास्त्री संस्कृत पाठ म्हणूं शकतात; परंतु मातृभाषेंत आपले विचार त्यांस सांगतां येत नाहींत. धर्माचा उपदेश देणारे लोक चांगले समजदार असले पाहिजेत. जुने रिवाज मोडणें शक्य व कायदेशीर असेल तर राजानें धैर्यानें त्यांत फेरफार केला पाहिजे."

शिक्षणाच्या बाबतींत संस्थानिकांचे कर्तव्याबद्दल ते म्हणाले,

" शेतकरीवर्गास शिक्षण देऊन त्यांची सुधारणा केली पाहिजे. देश, काल, जाती यांचा भेदभाव मनांत न आणतां आपण देशाच्या फायद्याकरितां झटलें पाहिजे. इंग्रज सरकार जरी आपल्या शिक्षणाकरितां प्रयत्न करीत आहे तरी आपल्या एतद्देशीय संस्थानिकांवर त्यांच्यापेक्षां केवढी मोठी जबाबदारी आहे व इंग्रज सरकारापेक्षां देशी संस्थानिकांपासून शिक्षण मिळविण्याची अपेक्षा करणें हें किती साहजिक आहे हें सांगणें नको. पंतसाहेबांनीं सक्तीचें व फुकट शिक्षण देण्याबद्दल मी त्यांना विनंति करीत आहें व ते आपल्या आयुष्यक्रमांत हें कार्य करतील अशी मजला सबळ आशा आहे."

श्रीमंत सयाजीराव यांचें सर्वच भाषण फार महत्त्वाचें होतें, व श्रीमंत बाबासाहेबांच्या मनावर ह्या भाषणाचा चांगला परिणाम झाला. तो इतका झाला कीं, त्यांनीं आजपर्यंत जीं भाषणें केलीं आहेत त्यांतील कांहीं भाषणांतून या भाषणांतील विचार आले आहेत. इतकेंच नव्हे तर, श्रीमंत सयाजीरावांचे हे विचार यथाशक्ति आपल्या कृतींतहि त्यांनीं आणिले आहेत. " आधीं केलें मग सांगितलें " या समर्थांच्या उक्तीप्रमाणेंच श्रीमंत सयाजीराव यांचें भाषण असल्यामुळें तें परिणामकारक होणें अगदीं स्वाभाविक होतें.

श्रीमंत बाबासाहेब उन्हाळयानिमित्त सन १९०९ च्या मे महिन्यांत महाबळेश्वरास गेले होते. श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांचा मुक्काम त्या वेळीं तेथें होता. एके दिवशीं त्यांनीं पूर्वी न कळवितां श्रीमंत बाबासाहेबांच्या बंगल्यावर येऊन त्यांना अचानक भेट दिली. तेव्हां निरभिमानवृत्तीनें मोकळे-पणानें वागण्यांत खरें प्रेम व सौख्य किती असतें ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबांना चांगलीच पटली असली पाहिजे. या गोष्टीचा श्रीमंत बाबासाहेबांच्या मनावर चांगला ठसा उमटल्यावांचून राहिला नाहीं. श्रीमंत बाबासाहेब जून महिन्यांत पुण्यास गेले. श्रीमंत सयाजीरावहि तेथें असल्याचें कळल्यावरून ते त्यांच्या बंगल्यावर मुद्दाम आपण होऊनच गेले व त्यांची भेट घेतली.

## श्रीमंत बाबासाहेब यांच्या प्रथम प्रिय पत्नी श्री. सौ. गंगूताईसाहेब यांचें अकालीं शोचनीय निधन

श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब यांना बाळंतपणाकरितां मुंबईस नेण्यांत आलें होतें. ता. १० नोव्हेंबर १९०७ रोजीं त्या प्रसूत होऊन कन्या झाली. परंतु हें नूतन अपत्य तीन दिवसांनींच कालवश झालें. त्यामुळें श्रीमंत बाबासाहेब व श्री. सौ. गंगूताईसाहेब यांना फार दुःख झालें. प्रसूती-नंतर सुमारें १८ दिवस श्री. सौ. गंगूताईसाहेब यांची प्रकृति अतिसारामुळें बिघडली होती ती जास्तच बिघडली. डॉ. भालचंद्र, डॉ. पुरोहित, डॉ. देशमुख यांना प्रकृति दाखविण्यांत येऊन सर्वांच्या विचारें औषधोपचार चालू होते. दैवी उपायहि सुरू होते. परंतु सर्व प्रयत्न निष्फळ होऊन त्याच आजारांत शेवटीं वात होऊन त्या विकारानें ता. २८ रोजीं त्या कालवश झाल्या.

सौ. गंगूताईसाहेब निवर्तल्या त्या वेळीं त्यांचें वय अवघें २१ वर्षांचें होतें. त्यांच्या निधनानें श्रीमंत बाबासाहेबांच्यावर दुःखाचा डोंगरच कोसळल्या-सारखें झालें. श्री. सौ. गंगूताईसाहेब अत्यंत सुशील, देखण्या असून व्यवहार-चतुर व दक्ष होत्या. त्यांचें वय जरी लहान होतें, तरी त्यांच्या अंगच्या अनेक बहुमोल गुणांमुळें श्रीमंत बाबासाहेबांच्यावर त्यांनीं आपलें चांगलें वजन ठेवलें होतें. त्यांच्या अकालीं निधनामुळें श्री. बाबासाहेब यांच्या मनास मोठा धक्का बसून त्यांच्या ठिकाणीं औदासीन्य उत्पन्न झालें व त्यांच्या प्रकृतीवरहि बराच परिणाम झाला. तेव्हांपासून रोज गीता वाचण्याचा त्यांना नाद लागला.

प्रपंचांत मनःस्वास्थ्य कायम ठेवून अनेक संकटांना तोंड देऊन कर्तव्यकर्म करण्यास प्रवृत्त करणारा जगांत भगवद्गीतेशिवाय दुसरा कोणताहि ग्रंथ नाहीं. अशा या अद्वितीय ग्रंथाची निवड करण्यांत श्रीमंत बाबासाहेबांच्या मनाचा कल कसा होता हें दिसून येतें. अद्यापहि त्यांचें गीतावाचन नित्य चालूच असतें. त्या वेळेपासून त्यांच्या मनांत इतर धार्मिक ग्रंथांच्या वाचनाचीहि अभिरुचि उत्पन्न झाली. श्री. सौ. गंगूताईसाहेबांना कै. श्री. सौ. ताईसाहेब व श्रीमंत भाऊसाहेब अशीं दोन अपत्यें असून त्यांच्या निधनसमयीं तीं दोन्हीं अल्पवयी होतीं. श्रीमंत भाऊसाहेब यांचें वय त्या वेळीं तीन वर्षांचें होतें. ते जन्मापासून श्रीमंत बाबासाहेब यांच्याजवळ असल्यामुळें व मातृहीन झाल्यामुळें तेव्हांपासून त्यांची सर्व जबाबदारी श्रीमंत बाबासाहेबांच्यावरच येऊन पडली. Time is the best healer या न्यायानें कांहीं दिवस गेल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांचा पत्नीवियोगाचा दुःखभार कमी होत गेला, तेव्हां चातुर्मास संपल्यानंतर त्यांच्या इष्टमित्रांनीं त्यांच्याजवळ लग्न करण्याची गोष्ट काढण्यास सुरुवात केली. "पुन्हां लग्न करावयाचें नाहीं" असा श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या मनाचा निश्चय करून ठेविला असल्यामुळें ज्यांनीं ज्यांनीं त्यांच्याजवळ लग्नाची गोष्ट काढली, त्या सर्वांची त्यांना निराशा करणें भाग पडलें.

प्रिय पत्नीच्या विरहामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत अनेक विचारांचें काहूर माजलें होतें. पुन्हां लग्नाच्या भानगडींत न पडतां पुढील आयुष्य जगाचा प्रवास करण्यांत व सार्वजनिक कामांत घालवावें असे विचार त्यांच्या मनांत येत व आपल्या मित्रांजवळ या प्रकारचे विचार ते बोलूनहि दाखवीत. शेवटीं त्यांच्या परमपूज्य मातोश्रींनीं त्यांना उपदेश केला कीं, "पुन्हां लग्न करणें हाच श्रेयस्कर मार्ग आहे." त्या म्हणाल्या, "बाबासाहेब, तुमचें वय कांहीं फार नाहीं. तुम्हांस तिसावेंच वर्ष आहे, लग्नाचें वय आहे. आज जरी तुमचा लग्न न करण्याचा निश्चय असला तरी पुढें तुम्हांस पश्चात्ताप झाल्यावांचून राहणार नाहीं. वेळेवर लग्न करणें चांगलें." इत्यादि अनेक प्रकारें त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांची समजूत घातली, व पुन्हां लग्न करण्याबद्दल आग्रह केला. रावसाहेबांचें मतहि श्रीमंत बाबासाहेबांनीं लग्न करावें असेंच होतें, व त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांचें मन वळविण्याची कामगिरी जिजीसाहेबांच्याकडे

सोंपविली होती व ती जिजीसाहेबांनीं मोठ्या कुशलतेनें बजाविली. श्रीमंत बाबासाहेब निस्सीम मातृभक्त असल्यामुळें त्यांनीं आपला निश्चय बाजूला ठेवून आपल्या वडिलांच्या व मातोश्रींच्या म्हणण्यास रुकार दिला व पुन्हां लग्न करण्याचें त्यांनीं मान्य केलें.

## श्रीमंत बाबासाहेबांचा द्वितीय विवाह

श्रीमंत बाबासाहेब दुसरें लग्न करणार ही बातमी कळतांच मुली सांगून येऊं लागल्या. श्रीमंत बाबासाहेब लग्न करतात कीं नाहीं, या गोष्टीकडे पुष्कळ लोकांचे डोळे लागून राहिले होते. मध्यस्थ लोक ही संधि मिळण्याची वाट पाहत होते. पत्रिका पटवून देण्यास ज्योतिषीहि तयार होते. रावसाहेबांच्याकडे पुष्कळ भिडा येऊं लागल्या. परंतु त्यांनीं स्पष्ट सांगितलें कीं, मुलगी पसंत करण्याचें काम आम्हीं श्रीमंत बाबासाहेबांकडे सोंपविलें आहे. ते जी मुलगी पसंत करतील ती आम्हांस मान्य आहे. मुलगी मध्यम स्थितींतील गृहस्थाची कां असेना पण घराणें कुलशीलवान् पाहिजे, असें श्रीमंत बाबासाहेबांनीं ठरविलें होतें. पत्रिकेवर विशेष विश्वास नव्हताच. गोत्रापलीकडे पत्रिका पाहावयाची नाहीं, असें त्यांनीं सांगितलें होतें. यामुळें ज्योतिषांना आपली डाळ शिजण्याचा मुळींच संभव दिसेना. श्रीमंत बाबासाहेबांनीं बऱ्याच मुली पाहिल्या. शेवटीं त्या वेळीं ब्रम्हदेशांत अकौंटंटच्या जागीं काम करीत असलेले रा. रा. वासुदेव गोपाळ पुराणिक यांची मुलगी त्यांना दाखविण्यांत आली. पुराणिकांचें घराणें प्रसिद्ध आहे. पूर्वीं सिंधमध्यें कराची येथें जी कांहीं महाराष्ट्रीय मंडळी गेली त्यांत रा. रा. वासुदेवरावांचे वडील प्रमुख होते. त्यांनीं तेथें महत्त्वाची कामगिरी केली होती. पुराणिकांच्या घराण्याची चौकशी केल्यावर घराणें नांवलौकिकवान् असल्याचें श्रीमंत बाबासाहेबांना कळलें. मुलीचें वय जरी बारा वर्षांचें होतें तरी ती सोळा वर्षें वयाची दिसत होती. तिचा धडधाकट बांधा व निकोप प्रकृति पाहून श्रीमंत बाबासाहेबांनीं मुलगी पसंत केली, व तिच्याबरोबर त्यांचा विवाह भोर येथें ता. २० मे १९०८ इ. रोजीं झाला व त्यामुळें श्रीमंत रावसाहेब व जिजीसाहेब या उभयतांनाहि आनंद झाला. लग्न झाल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब लगेच आपल्या नूतन भार्येसह महाबळेश्वरास गेले व जून महिन्यांत परभारें पुण्यास गेले.

## मुंबईचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क, नंतरचे लॉर्ड सिडनहॅम, यांचें भोरास आगमन

सर जॉर्ज क्लार्क मुंबईचे गव्हर्नर झाल्यानंतर रावसाहेबांनीं त्यांना भोरास येण्याबद्दल विनंति केली होती. त्याप्रमाणें याच सालीं म्हणजे सन १९०८ सालीं नोव्हेंबर महिन्यांत त्यांनीं भोरास येण्याचें कबूल केलें होतें. श्रीमंत बाबासाहेब पुण्यास होते. ते नोव्हेंबर महिन्यांत गव्हर्नरसाहेब भोरास येणार असल्यामुळें भोरास आले. ठरल्याप्रमाणें ता. ३ नोव्हेंबर रोजीं सर जॉर्ज क्लार्क भोरास आले. त्या वेळीं रावसाहेबांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेब रामबागेंत त्यांना सामोरे गेले होते. लॉर्ड लॅमिंग्टन यांनीं विलायतेस जाण्यापूर्वी श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल जें लिहून ठेविलें होतें तें सर जॉर्ज क्लार्क यांच्या अव-लोकनांत आल्यामुळें व पुढें त्यांना श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल सर्व माहिती प्रत्यक्ष झाल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्याविषयीं त्यांचा अनुकूल ग्रह झालेला होता. सर जॉर्ज क्लार्क यांना भोर म्युनिसिपॅलिटीतर्फे मानपत्र देण्यांत आलें. त्या मानपत्राच्या उत्तराच्या भाषणांत सर जॉर्ज क्लार्क यांनीं श्रीमंत बाबासाहेबांबद्दल त्याच मानपत्रांत उल्लेख नसतांनाहि पुढील उद्गार काढले होते :

"I am glad to think that his son (Shrimant Babasaheb) has received a training adapted to fit him to be a worthy successor."

श्रीमंत बाबासाहेबांच्याविषयीं हा उल्लेख करण्यांत रावसाहेबांनीं त्यांना कांहींतरी अधिकार देऊन राज्यकारभारांत घ्यावें, असा सर जॉर्ज क्लार्क यांचा हेतु स्पष्ट दिसून आला. या भेटीच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांच्या अंगचे अनेक गुण सर जॉर्ज क्लार्क यांच्या दृष्टोत्पत्तीस येऊन त्यांनीं आपल्या पंचवार्षिक कारकीर्दीच्या अखेरपर्यंत श्रीमंत बाबासाहेबांच्या हिताकडे सारखें लक्ष पुरविलें होतें, हें पुढील हकीकतीवरून समजून येणार आहे. इतकेंच नव्हे, तर पुढें विलायतेस गेल्यानंतर सुद्धां श्रीमंत बाबासाहेब यांच्या हिताकडे त्यांचें लक्ष असे. सर जॉर्ज क्लार्क यांच्याबरोबर त्यांची कन्या मिस् क्लार्क याहि होत्या. भोर येथील गव्हर्नरसाहेबांच्या सन्मानार्थ होणारे सर्व समारंभ आटोपल्यावर गव्हर्नरसाहेब मुंबईस गेले, व त्यांची कन्या महाबळेश्वरास गेली. श्रीमंत बाबासाहेब दिपवाळी-करितां सहकुटुंब भोरास राहिले व दिपवाळीनंतर पुण्यास गेले.

## उत्तर हिंदुस्थानांतील पहिला स्वतंत्र प्रवास

श्रीमंत रावसाहेबांना यात्रेचा फार नाद असे. उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व यात्रा त्यांनीं केल्या होत्या. श्रीमंत बाबासाहेबांनाहि अगदीं लहानपणापासून ते आपल्याबरोबर नेत असत. त्यामुळें त्यांच्या ठिकाणींहि प्रवासाची आवड उत्पन्न झाली होती. रावसाहेबांचा प्रवास करण्याचा मुख्य हेतु पवित्र क्षेत्रीं धार्मिक विधि करण्याचा असल्यामुळें त्यांचा कार्यक्रम धार्मिक दृष्टीनें आंखण्यांत आलेला असे. त्यांत प्रवासाची आधुनिक दृष्टि नव्हती. त्यामुळें रावसाहेबांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबांना पुण्यक्षेत्राचें दर्शन होऊन त्या ठिकाणच्या क्षेत्रमाहात्म्याचीच फक्त माहिती मिळत असे. स्वतंत्र अवलोकनापासून जो फायदा होतो तो त्यांना मिळत नसे.

खाजगी खर्चाची नेमणूक करून घेतल्यानंतर त्यांना स्वतंत्रपणें वागतां येऊं लागलें. तेव्हां त्यांच्या मनांत उत्तर हिंदुस्थानचा प्रवास करून आपल्या ज्ञानांत प्रवासजन्य ज्ञानाची भर टाकण्याचा विचार आला. परंतु सन १९०८ सालापर्यंत मध्यंतरीं आलेल्या आपत्तींमुळें त्यांना आपला हेतु सिद्धीस नेतां आला नाहीं. सन १९०८ सालअखेर त्यांना बरेंच चित्तस्वास्थ्य लाभल्यामुळें त्यांनीं सन १९०९ सालीं दोन महिने प्रवासांत घालविण्याचें ठरविलें, व प्रवासाचा कार्यक्रम तयार करून खर्चाचें १२,००० रुपयांचें एस्टिमेट तयार करून ही जादा रक्कम देण्याबद्दल सन १९०८ च्या डिसेंबरांत श्रीमंत रावसाहेबांना विनंति केली.

खाजगी खर्चाची नेमणूक करून घेतल्यापासून श्रीमंत बाबासाहेबांनीं जादा खर्चाची मागणी केल्यास ती मागणी श्री. रावसाहेब एकदम मान्य करीत नसत. त्यांचें म्हणणें "नेमणुकीच्या खर्चांतूनच प्रवासाचा खर्च कां भागवूं नये ?" परंतु नेमणुकीच्या खर्चांतूनच शिल्लक टाकून खर्च भागविणें शक्य नाहीं, हें जेव्हां रावसाहेबांना पटवून दिलें तेव्हां त्यांनीं १०,००० रुपयांची मंजुरी दिली. ही रक्कम मिळण्याचे कामींहि त्या वेळचे पो. ए. मि. जी. कार्मायकेल (Mr. G. Carmichæl) यांनीं मध्यस्थी केली होती.

ही रक्कम मिळाल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रवासाची तयारी केली. सर्व तयारी झाल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब आपल्या नूतन पत्नीसह ता. २१

फेब्रुवारी १९०९ रोजीं पुण्याहून निघून बडोदें, अहमदाबाद, अबूचा पहाड, अजमीर, जयपूर, भरतपूर, आग्रा, मथुरा, सिमला, बनारस, अयोध्या, परत काशी वगैरे शहरें व तेथील प्रेक्षणीय स्थळें प्रत्येक ठिकाणीं ४।६ दिवस मुक्काम करून पाहत पाहत ता. १८ एप्रिल रोजीं भोर येथें सुमारें दोन महिन्यांनीं परत आले. बडोदें येथें श्रीमंत बाबासाहेब श्री. सयाजीराव महाराज यांचे पाहुणे म्हणून राहिले होते. या प्रवासांत त्यांनीं कोठें किती मुक्काम केला व तेथील कोणकोणतीं स्थळें पाहिलीं याची त्रोटक हकीकत परिशिष्ट 'ग' मध्यें दिली आहे. शिवाय या प्रवासाचें 'सफर पहिली' या नांवाचें विस्तृत प्रवासवर्णन लिहून श्रीमंत राजेसाहेब यांनीं छापून प्रसिद्ध केलें आहे.

भोर येथें सुमारें तीन आठवडे मुक्काम करून ता. ९ मे रोजीं कुटुंबासह श्रीमंत बाबासाहेब महाबळेश्वरास गेले, व प्रवासामुळें आलेला शिणवटा विश्रांति घेऊन घालविण्याकरितां तेथें कांहीं दिवस राहण्याचें त्यांनीं ठरविलें.

मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांनीं याच सालीं म्हणजे १९०९ इ. सालीं सप्टेंबर महिन्यांत ता. २९ रोजीं शेतकीसंबंधानें विचार करण्याकरितां दक्षिणेंतील संस्थानिकांची सभा पुण्यास भरविली होती. या सभेस कोल्हापूरचे महाराज, सांगली, मिरज, पटवर्धन वगैरे संस्थानिक आले होते. त्या वेळीं श्रीमंत सयाजीराव महाराज यांचा मुक्काम पुण्यांतच असल्यामुळें तेहि या सभेस हजर राहिले होते.

श्रीमंत रावसाहेब या सभेस गेले होते. सभेंत शेतकीसंबंधीं उपयुक्त चर्चा होणार असल्यामुळें व त्यापासून बराच फायदा होईल असें वाटून श्रीमंत बाबासाहेब यांनींहि या संधीचा फायदा घेतला. नंतर दसऱ्याकरितां ते भोरास गेले. भोरास कांहीं दिवस राहून दिपवाळीकरितां ते मुंबईस गेले. श्रीमंत रावसाहेबहि मुंबईस लॉर्ड मिंटो येणार असल्यामुळें तेथें गेले होते. लॉर्ड मिंटो यांच्या मुंबईच्या मुक्कामांत स्वागतार्थ जे समारंभ झाले त्या सर्व समारंभांच्या वेळीं श्रीमंत रावसाहेबांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबहि हजर होते.

## वार्षिक खर्चाच्या रकमेंत आणखी ५००० रुपयांची वाढ

हवापालट केल्यानें प्रकृतीस चांगला फायदा होतो, ही गोष्ट सन १९०९ सालच्या प्रवासानें श्रीमंत बाबासाहेबांच्या अनुभवास आली होती.

दरसाल हवापालट करण्याकरितां कोठेंतरी प्रवास करतां यावा म्हणून श्रीमंत बाबासाहेबांच्या आग्रहावरून व त्यांच्या डॉक्टरांच्या सल्ल्यावरून पो. ए. मि. स्विफ्ट यांच्या मध्यस्थीनें श्रीमंत रावसाहेबांनीं त्यांच्या वार्षिक खर्चांत आणखी रु. ५००० ची वाढ करून दिली. म्हणजे त्यांना जे वार्षिक पंचवीस हजार रुपये मिळत ते तीस हजार रुपये मिळूं लागले.

वार्षिक प्रवासाकरितां जादा नेमणूक मिळाल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांची प्रकृति चांगली नसल्यामुळें श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांनीं त्यांना हवापालट करण्याकरितां मनमाडास बोलाविलें होतें, त्याप्रमाणें श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत भाऊसाहेब यांना घेऊन मनमाडास कांहीं दिवस राहण्यास गेले होते. याप्रमाणें ते दरसाल कांहीं दिवस हवेच्या ठिकाणीं घालवीत असत.

## पुण्यांतील कालक्रमण

ऑनररी मॅजिस्ट्रेटचें काम असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब आपल्या कुटुंबासह बहुतकरून पुण्यासच राहत असत. कांहीं विशेष समारंभानिमित्तानें ते भोरास येत असत. पुण्यांत असतांना कायद्याचें वाचन पहिल्या प्रथम रा. व्यंकटराव रामचंद्र, डेक्कन कॉलेजचे लॉ लेक्चरर, व पुढें रा. व्यंकटराव द्रवीड यांजबरोबर करीत होते. सार्वजनिक ज्या सभा होत त्यांस श्रीमंत बाबासाहेब जात व यथाशक्ति मदत करीत. पहिलें कुटुंब वारल्यापासून त्यांना धार्मिक ग्रंथ वाचनाची आवड उत्पन्न झाली असल्यामुळें दररोज अशा ग्रंथवाचनांत ते कांहीं वेळ तरी घालवीत असत. त्यांचा अत्यंत आवडीचा ग्रंथ म्हणजे भगवद्गीता हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. भगवद्गीतेचे रोज निदान एकदोन अध्याय वाचल्याशिवाय ते राहत नसत. धार्मिक तत्त्वज्ञानग्रंथांशिवाय ऐतिहासिक ग्रंथ व कायद्याचीं पुस्तकें वाचण्यांतहि त्यांचा कांहीं काल जात असे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे "काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्" या शिष्टसंमत मार्गाचा त्यांनीं स्वीकार केल्यामुळें त्यांचा काल सदुपयोगांत जात असे.

शीलसंरक्षणाविषयीं ते अत्यंत दक्ष असल्यामुळें "व्यसनेन तु मूर्खाणां निद्रया कलहेन वा" या दुसऱ्या निंद्य मार्गाचें त्यांनीं कधींहि अवलंबन केलें नाहीं. थोर विद्वान् लोकांचा परिचय करून घेऊन त्यांच्याशीं विचारविनिमय करून घेण्याची जेव्हां जेव्हां संधि येई तेव्हां तेव्हां त्या संधीचा पूर्ण फायदा

चित्रांक ३३



१ श्री. कुमारी जान्हवीबाई, २ श्री. भाऊसाहेब, ३ श्री. कुमारी काशीताईसाहेब.

[ सं. पा. १२३

करून घेण्यास ते कधीं चुकत नसत. अशा रीतीनें काल घालवीत असतां त्यांचें मन:स्वास्थ्य बिघडविणारी अशी एक गोष्ट घडून आल्यामुळें सुमारें दोन वर्षें त्यांना अत्यंत काळजींत घालवावीं लागलीं. ती गोष्ट म्हणजे श्रीमंत भाऊसाहेब यांचा आजार होय.

## श्रीमंत भाऊसाहेब यांचा आजार

श्रीमंत भाऊसाहेब यांना पुणें येथें सन १९११ च्या फेब्रुवारींत प्रथम ताप येऊं लागला. तो ताप दोषिक ( टायफॉइड ) ठरला व तीस दिवसपर्यंत ताप व खोकला विशेष होता. पुढें कांहीं दिवस थोडें बरें वाटलें. त्या वेळीं डॉ. व्ही. डी. भागवत व डॉ. जी. के. गद्रे यांचें औषध सुरू होतें. पुन्हां थंडी वाजून ताप वाढूं लागला तेव्हां तापाचें बरोबर निदान करण्याकरितां मुंबईहून डॉ. स्मिथ व डॉ. मेयर यांना बोलाविलें. त्यांनीं परीक्षा करून हा ताप साधारणपणें टयुबरक्युलॉसिसचा ( क्षयाचा ) असावा असें आपलें मत दिलें. तेव्हां श्रीमंत बाबासाहेब अत्यंत घाबरून जाऊन त्यांच्या तोंडचें पाणी पळालें. श्रीमंत भाऊसाहेब मातृहीन झाल्यापासून श्रीमंत बाबासाहेब त्यांना अगदीं जीव कीं प्राण करीत असत. टयुबरक्युलॉसिस हें नांव ऐकतांच त्यांचे हातपाय गळाले. तथापि वाटेल तितका पैसा खर्च झाला तरी दैवी व मानवी प्रयत्नांची शिकस्त केल्यावांचून राहावयाचें नाहीं असा निश्चय करून ते उद्योगास लागले. डॉ. स्मिथ व डॉ. मेयर यांनीं आपलें मत दिलें तेव्हां डॉ. चोबे रोज येतच असत. त्यांच्या विचारें ऑटो-व्हॅक्सिन इंजेक्शन देण्याकरितां डॉ. शिरगांवकर यांना एप्रिल, मे व जून महिन्यांत बोलाविलें होतें. त्यांनीं एकंदर चौदा इंजेक्शनें दिलीं, परंतु उपयोग झाला नाहीं. मे महिन्यांत श्रीमंत भाऊसाहेबांच्या शरीरांत पू होऊन गळवें ( ॲब्सेस ) होऊं लागलीं. तेव्हां ऑपरेशन करण्याकरितां मिरजेहून डॉ. व्हेल यांना बोलाविलें होतें. त्यांनीं रोगाचें निदान करून असें सांगितलें कीं, हा रोग Post-Typhoid Pyae'mia आहे व असे विकार मीं अमेरिकेंत पाहिले आहेत. Typhoid चा जोर जर जास्त असला तर असे विकार होतात. त्यांनीं एक ऑपरेशन केलें. तेव्हां थोडें बरें वाटलें. परंतु थोडक्यांच दिवसांत पुन्हां ताप जास्त येऊं लागला व ऑपरेशन केलेली जागा सुजली. म्हणून डॉ. व्हेल यांना पुन्हां जून महिन्यांत बोलावून ऑपरेशन

केलें, परंतु उपयोग झाला नाहीं. जुलै महिन्यांत पुन्हां बोलावून दोन जागीं ऑपरेशन केलें. त्याचाहि उपयोग झाला नाहीं. मध्यंतरीं डॉ. राव यांनाहि प्रकृति दाखविण्याकरितां आणलें होतें. ऑगस्ट महिन्यांत डॉ. हॅमिल्टन यांच्याकडून दोन ठिकाणीं ऑपरेशन्स करविलीं. व ड्रेसिंगचें काम डॉ. वुइल्यम्सन यांजकडे सोपविलें. परंतु ड्रेसिंग नीट न झाल्यामुळें ऑपरेशन्स व्यर्थ झालीं. पुढें ऑक्टोबर महिन्यांत डॉ. हॅमिल्टन यांनीं दोन ठिकाणीं ऑपरेशन्स करून ड्रेसिंग वगैरे स्वतः केलें. तेव्हांपासून श्रीमंत भाऊसाहेबांची प्रकृति सुधारण्याच्या मार्गास लागली. गळवें पायास होत असत व त्यांवरच ऑपरेशन्स करावीं लागत. पांच सहा महिने अंथरुणावर पडून राहिल्यामुळें एक पाय अगदीं हलत नसे. त्यामुळें गळवें बरीं होऊन प्रकृति सुधारूं लागली तरी त्यांना बसतां येत नसे. परंतु थोडक्याच दिवसांनीं पायास चलनवलन सुरू होऊन त्यांना बसतां येऊं लागलें व उभेंहि राहतां येऊं लागलें. तथापि तो पाय आंखडला गेल्यामुळें नीट बसतां येत नसे. पाय नीट सरळ करण्यास काय उपाय केला पाहिजे हें ठरविण्याकरितां डॉ. वानलेस यांना मिरजेहून बोलावून आणलें. त्यांचें मत असें पडलें कीं, Pelvic bones ( कमरेचीं हाडें ) चिकटलीं असल्यामुळें ऑपरेशन केल्याशिवाय पाय नीट होणार नाहीं. क्लोरोफॉर्म देऊन ऑपरेशननें पाय नीट करतां येण्यासारखा आहे, असें डॉ. हॅमिल्टन यांचें मत होतें. पायांत कोठें काय झालें आहे हें पाहण्याकरितां एक्सरेजनें फोटोहि घेण्यांत आले होते.

पुढें श्रीमंत भाऊसाहेब यांच्या प्रकृतीस बराच आराम पडल्यावर सन १९१२ च्या मार्च महिन्यांत पाय सुधारण्याच्या बाबतींत आणखी कांहीं डॉक्टरांचीं मतें घेण्याकरितां श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत भाऊसाहेबांना घेऊन मुंबईस गेले. तेथें डॉ. भाजेकर, डॉ. स्ट्रीट व डॉ. मसीना यांना पाय दाखविला. डॉ. स्ट्रीटचें मत पडलें कीं, ऑपरेशन केल्यापासून अपाय होणार नाहीं. ऑपरेशन धोक्याचें असल्यामुळें तें करूं नये असें डॉ. मसीना व डॉ. भाजेकर यांनीं मत दिलें. मुंबईहून श्रीमंत बाबासाहेब पुण्यास आले व कांहीं दिवसांनीं सांगलीस गेले. तेथें डॉ. वानलेस यांनीं पूर्वी ऑपरेशन केलें पाहिजे असें जरी मत दिलें होतें तरी, या वेळीं ऑपरेशन न करणेंच चांगलें असें त्यांनींहि आपलें मत दिलें.

म्हणून ऑपरेशन करण्याचा विचार कायमचा रहित करावा लागला व त्यांचा पायहि कांहीं दिवसांनीं पुष्कळच सुधारला.

श्रीमंत भाऊसाहेब यांच्या या आजारांत श्रीमंत बाबासाहेबांनीं पाण्यासारखा पैसा खर्च करण्यांत मागेंपुढें पाहिलें नाहीं. कसा खर्च होत आहे हें श्रीमंत रावसाहेबांना दिसत नव्हतें असें नाहीं. तथापि ते खर्चाच्या बाबतींत तपास करीत नव्हते. श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या नेमणुकींतून खर्च करावा असें त्यांचें मत होतें. श्रीमंत भाऊसाहेब आजारी पडल्यापासून जुलैअखेरपर्यंत सहा महिन्यांतच सुमारें १४००० रुपये खर्च झाला होता. इतकी मोठी रक्कम नेमणुकींतून खर्च करणें श्रीमंत बाबासाहेबांना शक्यच नव्हतें. रावसाहेबांच्याकडून जादा रक्कम मिळणें जरूर होतें. रावसाहेबांचें आपल्या नातवावर प्रेम नव्हतें असें नाहीं. पण इतका खर्च करणें त्यांना प्रशस्त वाटत नव्हतें.

सर्व लोक श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रयत्नांची तारीफ करीत. श्रीमंत बाबासाहेब दैववादी नाहींत असें नाहीं. त्यांचाहि दैवावर विश्वास आहे. परंतु ते नेहमीं म्हणत असतात कीं, कोणत्याहि गोष्टींत मिळणाऱ्या यशांत दैवाचा अंश फार अल्प आहे. यशःप्राप्तींत प्रयत्नच मुख्यतः कारणीभूत होत असतात. कोणत्याहि बाबतींत शक्य तितके प्रयत्न केल्यावांचून राहावयाचें नाहीं असा हल्लींहि त्यांचा नियम आहे. श्रीमंत भाऊसाहेबांच्या आजाराच्या वेळींहि त्यांनीं असाच निश्चय केला होता. अमुक एक उपाय करावयाचा शिल्लक राहिला असें कोणासहि म्हणतां येऊं नये असें त्यांना वाटत होतें. ते नेहमीं म्हणतात कीं, "यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः" यत्न करूनहि यश न आलें तर आपल्याकडे दोष नाहीं. ईश्वरकृपेनें त्यांच्या प्रयत्नांस यश येऊन श्रीमंत भाऊसाहेबांची प्रकृति सुधारली व त्याबद्दल सर्वांना आनंद वाटूं लागला. श्रीमंत भाऊसाहेब यांच्या प्रकृतीस गुण येण्यास श्रीधरशास्त्री वैद्य, डॉ. चोबे आणि डॉ. भागवत यांचे औषधोपचार व डॉ. हॅमिल्टन यांच्या शस्त्रक्रिया हींच विशेषतः कारणीभूत झालीं, ही गोष्ट येथें प्रामुख्यानें नमूद करणें जरूर आहे.

मागें सांगण्यांत आलेंच आहे कीं, जुलैअखेरपर्यंत सहा महिन्यांत सुमारें १४००० रुपये खर्च झाला होता. श्रीमंत सौ. जिजीसाहेबांनीं, श्रीमंत बाबा-

साहेबांना ही रक्कम द्यावी म्हणून रावसाहेबांना अनेक वेळां विनंति करून पाहिली; पण व्यर्थ. रावसाहेब म्हणत कीं, खर्च करतेवेळीं आम्हांस कोठें विचारलें होतें ? आतां आम्हीं पैसे कां द्यावेत ? रावसाहेबांच्या विचाराप्रमाणें चालले असते तर त्यांनीं एकदोन अनुष्ठानें सुरू ठेवून एखाद्या वैद्याचें औषध सुरू ठेविलें असतें. फार तर एखाद्या डॉक्टरास दाखविलें असतें व दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसले असते. यापलीकडे त्यांनीं कांहींएक करण्यास संमति दिली नसती, अशी श्रीमंत बाबासाहेबांची खात्री असल्यामुळें त्यांनीं रावसाहेबांचा सल्ला न घेतां औषधोपचाराची सर्व जबाबदारी आपल्यावर घेऊन उपाय सुरू ठेविले होते. जीविताचा प्रश्न आला म्हणजे सामान्य मनुष्यहि कर्ज काढूनसुद्धां शक्य ते उपाय करण्यास कमी करीत नाहीं. भाऊसाहेबांच्या बाबतींत तर पैशाचा विचार करण्याचें कारणच नव्हतें. योग्य प्रसंगीं योग्य रीतीनें आपण पैसा खर्च करीत आहोंत, तो आपल्या वडिलांकडून आपणांस मिळालाच पाहिजे, असा श्रीमंत बाबासाहेबांना आत्मविश्वास वाटत असल्यामुळें त्यांनीं सर्व उपलब्ध साधनांचा उपयोग करून घेतला. त्यांची ही अपेक्षा खोटी ठरली नाहीं. श्रीमंत बाबासाहेबांना श्रीमंत भाऊसाहेबांच्या आजारांत एकंदर १९००० रुपये खर्च आला. श्रीमंत रावसाहेबांना आजारीपणामुळें विशेष खर्च झाल्यानें खाजगी खर्चास फार अडचण भासूं लागली हें कळविल्यावर आणि मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडनहॅम यांनीं रक्कम देण्याबाबत शिफारस केल्यावर त्यांनीं वरील रक्कम दिली.

श्रीमंत बाबासाहेबांनीं एक वर्षांत आपल्या पुत्राच्या आरोग्यप्राप्त्यर्थ १९००० रुपये खर्च करून खर्चाचा ताळेबंद आपल्या वडिलांकडे पाठविला होता. त्यावरून खर्च कोणत्या बाबतींत किती झाला त्याचें टिपण खालीं दिल्याप्रमाणें आहे :

जानेवारी सन १९११ तागाईत जानेवारी सन १९१२

| | | रु. आ. पै. |
|---|---|---|
| १ | देवस्थानखर्च .... .... .... | १०११–१०– ० |
| १ | धर्मादायखर्च .... .... .... | ४३२– ९– ४ |
| १ | खाजगी खर्च .... .... .... | ७२–११–१० |

| | | |
|---|---|---|
| १ | मुलकी खर्च .... .... .... | ८–१५– ० |
| १ | कोठी .... .... .... | ११९०– ०– ६ |
| १ | अनुष्ठान व इतर .... .... .... | ४७८–११– ६ |
| १ | फरासखाना .... .... ... | १४१– ८– ६ |
| १ | रोषणाई .... .... .... | ५४– ४– ६ |
| १ | मजालसखर्च .... .... .... | ५२–१५– ० |
| १ | औषधखर्च .... .... .... | १३२६३– ७–११ |
| १ | भाडेंखर्च | |
| | रेल्वेभाडें .... .... ... | ८२३–१२– ६ |
| | बंगला व इतर .... .... .... | ८४२–१०– ० |
| १ | बाजेखर्च .... .... .... | ७८– १– ० |
| | चित्रें .... .... .... | १८६– ०– ६ |
| | इतर .... .... .... | ३३६– ५– ० |
| १ | ओवाळणी ... .... .... | १२–१२– ४ |
| १ | देणगी .... .... .... | १५३–१२– ० |
| १ | इतर .... .... .... | ८०– ३– ० |
| १ | मजुरी .... .... .... | २०– ६– ० |
| १ | किरकोळ .... .... .... | १– ९– ६ |
| | | १९२४२– ५–११ |

हें टिपण पाहिलें असतां दिसून येईल कीं, डॉक्टरांची फी व औषध-खर्च मिळून तेरा हजार रुपयांपेक्षां जास्त खर्च झालेला आहे. दैवी उपायांवरहि श्री. सौ. जिजीसाहेब यांचा व श्रीमंत बाबासाहेबांचा विश्वास असल्यामुळें त्याकडेहि जवळजवळ दीड हजार रुपये खर्च झाले आहेत. श्रीमंत भाऊसाहेबांच्या आजाराच्या मानानें इतका खर्च म्हणजे कांहींच नव्हे असें कोणाहि विचारी माणसास वाटल्यावांचून राहणार नाहीं. यापेक्षांहि जास्त खर्च झाला असता तरी कोणीं नांवें ठेविलीं असतीं असें वाटत नाहीं.

श्रीमंत भाऊसाहेब यांची प्रकृति बरी झाली तरी पुढें कांहीं वर्षें थोडे श्रम झाले, व थोडी थंडी झाली कीं ताप व खोकला येत असे; व तो बरा

होण्यास पुष्कळ दिवस लागून अशक्तपणा येत असे. अशी स्थिति सुमारें सातआठ वर्षे चालू होती. त्यानंतर मात्र त्यांची प्रकृति चांगली सुधारून त्यांना आरोग्यलाभ मिळत आहे.

## पुणें येथील शेतकी कॉलेजचा उद्घाटनसमारंभ

मुंबई इलाख्यांत शेतीची सुधारणा करण्याकरितां शेतकी शिक्षणाची आवश्यकता होती. हें शिक्षण देण्याकरितां पुण्यास एक शेतकी कॉलेज स्थापून त्यांत शेतकीचें सशास्त्र शिक्षण देण्याची सोय करण्याचें सरकारनें ठरविलें, व त्या कॉलेजची इमारत बांधण्यांत आली. या इमारतीचा उद्घाटनसमारंभ ता. १८ जुलै सन १९११ इ. रोजीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांच्या हस्तें झाला. या समारंभास श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब यांना निमंत्रण आलें होतें. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब सदर समारंभास हजर राहिले होते. या कॉलेजांतून शेतकी पदवीधर आजपर्यंत पुष्कळ तयार होऊन त्यांच्या हातून शेतकी सुधारण्याचे बरेच प्रयत्न झाले आहेत. वरील समारंभास हजर राहिल्यामुळें त्या वेळीं शेतकीविषयासंबंधीं जीं भाषणें झालीं त्यांवरून शेतकी हा विषय किती महत्त्वाचा आहे ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेब यांच्या लक्षांत आली व तेव्हांपासून शेती सुधारण्याच्या प्रश्नाकडे त्यांचें लक्ष जाऊं लागलें.

## सन १९११ सालचा दिल्ली दरबार

ता. ६ मे सन १९१० इ. रोजीं बादशहा सातवे एडवर्ड हे ख्रिस्तवासी होऊन इंग्लंडच्या गादीवर पंचम जॉर्ज आरूढ झाले. त्या वेळीं इंग्लंडांत त्यांचा राज्यारोहणसमारंभ झाला होता. त्या समारंभास हिंदुस्थानांतील कांहीं मोठे संस्थानिक गेले होते. परंतु बाकीच्या संस्थानिकांना व इतर प्रजेला राजदर्शनलाभ व्हावा म्हणून बादशहा महाराणींसह हिंदुस्थानांत येऊन दरबार भरविणार असें जाहीर करण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें सन १९११ च्या डिसेंबर महिन्यांत दिल्ली येथें दरबार भरविण्याचें ठरवून दरबारच्या तयारीस सुरुवात करण्यांत आली. सुमारें एक वर्ष तयारी चालली होती. दिल्ली दरबारास व तन्निमित्त होणाऱ्या विविध समारंभांस येण्याबद्दल श्रीमंत रावसाहेब यांना निमंत्रण आलें होतें. दिल्ली शहराच्या आसपास प्रांतानिहाय त्या त्या प्रांतांतील संस्थानिकांना आपआपलें कँप तयार करण्याकरितां जागा नेमून दिल्या

चित्रांक ३४



General View Mussoorie, looking East ( From Fenlol ).

[ सं. पा. १३०

होत्या. श्रीमंत रावसाहेबांनीं आपला कँप तयार करण्याकरितां कांहीं कामगार-मंडळी पुढें पाठविली होती. त्यांनीं कँप तयार करून त्याच कँपांत श्रीमंत बाबासाहेबांची स्वतंत्रपणें राहण्याची सोय केली होती. नोव्हेंबरअखेर दरबाराकरितां मंडळी दिल्लीस जमूं लागली. श्रीमंत बाबासाहेब तेथें ता. २८ नोव्हेंबर रोजीं जाऊन पोहोंचले, व श्रीमंत रावसाहेब ता. १ डिसेंबर रोजीं तेथें गेले. उभयतां श्रीमंतांच्या स्वाऱ्या सड्याच गेल्या होत्या. बायकामंडळी कोणी बरोबर नव्हती. या वेळीं श्रीमंत भाऊसाहेब यांची प्रकृति बरोबर नसल्यामुळें ते भोरासच राहिले, व त्यांच्याजवळ श्रीमंत सौ. जिजीसाहेब राहिल्या. या दिल्ली दरबाराच्या खर्चाकरितां श्रीमंत रावसाहेब यांनीं मे. स्विफ्टसाहेब यांच्या विचारानें श्रीमंत बाबासाहेब यांस नेमणुकीपेक्षां रु. ३००० जास्त दिले.

ता. ७ डिसेंबर रोजीं सकाळीं दहा वाजतां महाराज्ञी व स्टेट सेक्रेटरी लॉर्ड क्र्यू वगैरेंसह बादशहांची स्वारी स्पेशल ट्रेननें दिल्ली येथें फोर्टजवळ नवीन केलेल्या स्टेशनावर येऊन दाखल झाली. तेथून सर्व राजेलोकांची ओळख करून देण्यांत आल्यावर त्यांची थाटाची मिरवणूक निघून ते रॉयल कँपांत गेले. मिरवणुकींत सर्व संस्थानिक होते. श्रीमंत रावसाहेबांबरोबर श्रीमंत बाबासाहेब घोड्याच्या गार्डांत मिरवणुकींत होते. मिरवणूक फारच प्रेक्षणीय होती. तथापि पूर्वीं १९०२ सालच्या दरबाराच्या वेळीं जी हत्तीवरची मिरवणूक निघाली होती तिच्याइतकी ही मिरवणूक प्रेक्षणीय नव्हती.

ता. ८ रोजीं दुपारीं दिल्ली येथील किल्ल्याच्या पटांगणांत एडवर्ड बादशहांच्या स्मारकाच्या इमारतीच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ बादशहांच्या हस्तें झाला. या समारंभास श्रीमंत रावसाहेबांबरोबर श्री. बाबासाहेब गेले होते.

ता. १२ डिसेंबर हा दिवस दरबारचा मुख्य दिवस होता. त्या दिवशीं दुपारीं बारा वाजतां दरबार भरला. दरबाराकरितां प्रचंड अँफिथिएटर तयार करण्यांत आलें होतें. दरबारांत बादशहांचें भाषण होऊन राजकीय देणग्या जाहीर करण्यांत आल्या. बादशहांनीं आपल्या शेवटच्या भाषणांत दिल्ली ही हिंदुस्थानची राजधानी करण्यांत आल्याचें जाहीर केलें. या प्रसंगानिमित्त बादशहांनीं दिलेल्या पदव्या, किताब, मान वगैरेंची यादी व्हाइसरॉयसाहेबांनीं वाचून दाखविली.

संस्थानिकांसंबंधीं राजकीय देणगीचा त्यांच्या भाषणांत पुढील उल्लेख होता:

"In his Gracious solicitude for the welfare of his Royal Indian Princes His Imperial Majesty has commended me to proclaim that from henceforth no Nazarana payments shall be made upon succession to their States."

श्रीमंत रावसाहेब यांना मागील दिल्ली दरबारच्या वेळीं नऊ तोफांच्या सलामीचा वैयक्तिक मान मिळाला होता. या वेळीं मुंबई सरकारच्या शिफारशी-वरून त्यांना आणखी दोन तोफांचा वैयक्तिक मान देण्यांत येऊन 'हिज हायनेस' ही पदवी मिळाली. या मानामुळें त्यांचें वैयक्तिक महत्त्व वाढलें.

श्रीमंत रावसाहेबांनीं वैयक्तिक श्रेष्ठत्वाच्या भावनेला वश न होतां संस्थानच्या अखंड हिताकडे लक्ष दिलें असतें तर त्यांना संस्थानास नऊ तोफांच्या सलामीचा वंशपरंपरेचा मान संपादन करून घेण्यास व दोन तोफा वैयक्तिक करून घेण्यास ही उत्तम संधि होती, असें त्या वेळचे कारभारी रा. ब. सातभाई यांचे सांगण्यांत येत होतें. ती संधि त्यांनीं घालविल्यामुळें पुढें जेव्हां नरेन्द्रमंडळाची घटना झाली तेव्हां संस्थानास वंशपरंपरेचा तोफांच्या सलामीचा मान नसल्यामुळें त्यांना नरेन्द्रमंडळांत कायमच्या सभासदत्वाच्या जागेस मुकावें लागलें. त्याबद्दल त्यांनाहि पुढें वाईट वाटत होतें. पायापुरतें पाहण्याच्या त्यांच्या वृत्तीचा हा परिणाम झाला.

ता. १३ रोजीं बादशहांनीं किल्ल्यांत गार्डन पार्टी दिली, त्या पार्टीस श्रीमंत बाबासाहेब गेले होते.

ता. १४ रोजीं बादशहा व महाराज्ञी यांच्या समोर पन्नास हजार फौजेची कवाईत झाली. ती पाहण्यास श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

ता. १५ रोजीं दिल्ली राजधानी झाल्यामुळें राजधानीच्या पायाचा दगड बादशहांनीं बसविला. त्या समारंभासहि श्रीमंत बाबासाहेब उपस्थित होते. पुढें एंजिनिअरच्या मताप्रमाणें ही जागा राजधानीकरितां नापसंत झाल्यामुळें दुसरी-कडे म्हणजे हल्लीं जेथें नवी दिल्ली वसविली आहे तें ठिकाण पसंत केलें गेलें.

दिल्लींतील दरबारानिमित्त सर्व कार्यक्रम संपल्यावर श्रीमंत बाबासाहेब हरिद्वारास गेले. तेथून डेहराडून, मसूरी, लखनौ, कानपूर, प्रयाग, काशी भोपाळ व सांची या ठिकाणीं जाऊन तेथील प्रेक्षणीय स्थळें पाहून ता. ९ रोजीं

मुंबईस आले व तेथें कांहीं दिवस मुक्काम करून भोरास आले. भोपाळ, सांची येथील व्यवस्था Her late Highness the Begum of Bhopal यांनीं केली होती. भोपाळ येथेंच त्यांच्याहि भेटीचा योग श्रीमंत बाबासाहेबांना आला. या प्रवासाची संक्षिप्त हकीकत परिशिष्ट 'घ'मध्यें दिली आहे.

वरील ठिकाणीं प्रवास करून पुण्यास परत आल्यानंतर पुढें कांहीं महिन्यांनीं या दरबारानिमित्त मुंबई सरकारतर्फे त्या वेळचे पो. ए. मि. स्विफ्ट यांच्या हस्तें श्रीमंत रावसाहेबांना सोन्याचें पदक व श्रीमंत बाबासाहेबांना चांदीचें पदक अर्पण करण्यांत आलें.

या दरबारच्या वेळीं टाइम्स ऑफ इंडियानें ' इंडियन प्रिन्सेस ॲण्ड दि क्राउन ' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. त्यांत माजी हिज हायनेस श्रीमंत शंकरराव यांच्याबद्दल माहिती दिली असून त्यांतच श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल उल्लेख केला आहे. सदर पुस्तकांतील हा उतारा पुढें दिला आहे.

The following extract is taken from the life-sketch of H. H. Late Shrimant Shankarrao published in the above book.

"The present Chief (Shrimant Shankarrao) enjoying as he does the high respect and affection of his subjects, is still further blessed in having a most loyal son in Shrimant Raghunathrao Shankarrao alias Babasaheb Pant-Sachiv. This young noble is now 34 years of age. He has been educated on modern lines, has passed the Matriculation Examination of the Bombay University and in addition to this has received a College education. During the visit of H. E. Sir George Clerk to Bhor in 1908, the Bombay Governor, in reply to the Bhor Municipal Address said, "I was very glad to see that Shrimant Babasaheb had received training adapted to fit him to be a worthy successor to his father." He is known to be endowed with good administrative abilities and has very satisfactorily performed magisterial work entrusted to him by the British Government. He has ever before him the great lesson of his father's wise example and there is no doubt that he is fully qualified to take up the reigns of the State when that time comes."

## पो. ए. मि. स्विफ्ट यांचें भोरास आगमन

ता. २५ मार्च रोजीं मि. स्विफ्ट यांची स्वारी भोरास आली. चालीप्रमाणें त्यांचें स्वागत करण्यांत आलें. मि. स्विफ्ट यांचा भोर संस्थानशीं १० वर्षें संबंध असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्याकडे ते आपुलकीच्या भावनेनें पाहत असत. त्यांच्या शिफारशीमुळेंच पुण्यांतील मॅजिस्ट्रेटच्या बेंचांत काम करण्याची व इतरहि पुष्कळ मदत झाली. भोरच्या मुक्कामांत मि. स्विफ्ट यांनीं श्रीमंत बाबासाहेबांची स्वतंत्रपणें भेट घेतली. त्यांना श्रीमंत बाबासाहेबांची योग्यता पूर्णपणें माहीत असल्यामुळें संस्थानांत त्यांना कांहीं अधिकार मिळावेत असें नेहमीं वाटत असे. या भेटीपासून श्रीमंत बाबासाहेबांस पुष्कळ फायदा झाला.

## श्रीमंत बाबासाहेब यांची कन्या काशीताईसाहेब यांचा विवाह

श्रीमंत काशीताईसाहेबांना चौदावें वर्ष लागल्यानंतर श्रीमंत रावसाहेबांनीं वरशोधनास सुरुवात केली. पुष्कळ स्थळें पाहिलीं. शेवटीं श्रीमंत राजश्री अप्पासाहेब बुध्याळकर, बुध्याळचे इनामदार, यांचे चिरंजीव राजश्री गणपतराव भय्यासाहेब यांना पसंत करून लग्न ठरविलें. लग्नसमारंभ पुणें येथें ता. २८ एप्रिल सन १९१२ इ. रोजीं मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. लग्नसमारंभांत पुढारीपण श्रीमंत बाबासाहेबांकडेच होतें. श्रीमंत बाबासाहेब यांनीं आण्णासाहेब कुरुंदवाडकर, श्रीमंत सांगलीकर, सर मोरोपंत जोशी, सरदार बाळासाहेब पानसे, रा. ब. कुमटेकर व दादासाहेब कुमटेकर ही विशेष अगत्याची मंडळी स्वतंत्र भोजनास बोलाविली होती.

## गव्हर्नरसाहेबांस पार्टी

ता. २३ जुलै रोजीं श्रीमंत रावसाहेबांनीं ११ तोफांची सलामी मिळाल्याबद्दल मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांना बंड गार्डनजवळील खांडवानी मॅन्शनमध्यें मोठ्या थाटाची पार्टी दिली. या पार्टीस बरेच संस्थानिक, युरोपियन व नेटिव्ह अधिकारी, पुण्यांतील सरदार व बडे लोक हजर होते. मंडळींची व्यवस्था ठेवण्यांत श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रमुख भाग घेतला होता. श्री. रावसाहेबांचें भाषण व त्यास उत्तरादाखल गव्हर्नरसाहेबांचें भाषण झाल्यावर श्रीमंत रावसाहेबांनीं व श्रीमंत बाबासाहेबांनीं गव्हर्नरसाहेबांस पुष्पहार घातले.

चित्रांक ३५



श्रीमंत बाबासाहेबांचे जामात श्रीमंत गणपतराव ऊर्फ भय्यासाहेब बुध्याळकर आणि कन्या श्री. सौ. काशीताईसाहेब.

[सं. पा. १३२

## निजाम राज्यांत प्रवास

सन १९१२ अखेर कै. श्रीमंत राजे राय रायन, हल्लींच्या राजेसाहेबांचे वडील, मनमाड मुक्कामीं फार आजारी असल्यामुळें व त्यांची व श्रीमंत बाबा-साहेबांची विशेष ओळख असल्यामुळें त्यांच्या समाचारास मनमाडास गेले; व तेथून पुढें औरंगाबाद, दौलताबाद, वेरूळचीं लेणीं, हैद्राबाद (डेक्कन), सिकंदराबाद, गोवळकोंडा व पंढरपूर पाहून परत पुण्यास आले. याचें संक्षिप्त वर्णन परिशिष्ट 'ङ'मध्यें दिलें आहे.

## सार्वजनिक कार्य
## १९०६ ते १९१२ पर्यंत

पुण्यास डेक्कन कॉलेजांत असतांनाच श्रीमंत बाबासाहेबांचा तेथील अनेक लोकोपयोगी संस्थांशीं संबंध येऊं लागला होता. अशा संस्थांशीं संबंध ठेवावयाचा म्हणजे त्यांना कांहींतरी मदत देणें आवश्यक असतें, याची त्यांना पूर्ण जाणीव होती. परंतु पैसा खर्च करण्याचें स्वातंत्र्य नसल्यामुळें आपणांस कांहीं करतां येत नाहीं याचें त्यांना वाईट वाटत असे. त्यांनीं पुढें कॉलेज सुटल्यानंतर खर्चाची नेमणूक करून घेतली. त्यांत वरील अडचणी दूर करण्याचाहि त्यांचा एक हेतु होता. सार्वजनिक कार्यांत भाग घेण्याची त्यांना प्रथमपासून हौस असल्यामुळें खर्चाची नेमणूक करून घेतल्यानंतर त्यांना आपल्या इच्छेप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य मिळालें. तेव्हां नेमणुकीच्या रकमेंतून काटकसर करून सार्वजनिक कार्यास आपणांस यथाशक्ति कांहींतरी सक्रिय सहानुभूति दाखवितां येईल असें वाटून त्यांना आनंद वाटूं लागला व संकल्पित हेतूप्रमाणें वागण्याचा त्यांनीं उपक्रम सुरू केला. तो पुढें देण्यांत येत आहे.

### किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटल

बादशहा सातवे एडवर्ड यांच्या निधनानंतर थोड्याच दिवसांनीं ता. १२ सप्टेंबर सन १९१० रोजीं बादशहांच्या स्मारकाचा विचार करण्या-करितां पुणें येथें किर्लोस्कर थिएटरांत मि. जॉर्ज कर्टिस यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्यांतील नागरिकांची सभा भरून एक कमिटी नेमण्यांत आली. प्रजेच्या आरोग्याकडे बादशहांचें सतत लक्ष असे. म्हणून स्त्रिया व मुलें यांच्याकरितां

एक हॉस्पिटल स्थापन केलें तर त्यांचें उत्कृष्ट स्मारक होईल असें कमिटीनें ठरविलें. कारण अशा हॉस्पिटलची पुण्यांत अत्यंत आवश्यकता होती. या कार्याकरितां कमिटीनें सार्वजनिक फंड उभारण्याचें ठरविलें. कमिटीच्या प्रयत्नास यश येऊन ( १,३२,००० ) एक लक्ष, बत्तीस हजार रुपयांचीं अभिवचनें मिळालीं. श्रीमंत रावसाहेब यांनीं या फंडास (५०,०००) पन्नास हजार रुपये दिले. फंडाची रक्कम जमल्यानंतर ता. ४ ऑक्टोबर सन १९१२ रोजीं सायंकाळीं इस्पितळ व दवाखाना यांच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांच्या हस्तें झाला. या समारंभास श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब हजर होते. श्रीमंत बाबासाहेबांनीं फंडास ५०० रुपये दिले होते. त्यांनीं त्याशिवाय या संस्थेच्या चालू खर्चाकरितां १० वर्षेंपर्यंत सालीना १२५ रुपये देण्याचें कबूल केलें.

प्रिन्सिपॉल डॉ. सेल्बी यांचें स्मारक

डॉ. एफ्. जी. सेल्बी, एम्.ए., एल्‌एल्.डी., सी. आय. ई., यांच्या तैलचित्राचा अनावरणसमारंभ, ता. २५ जुलै १९१३ रोजीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांच्या हस्तें झाला.

प्रि. डॉ. सेल्बी हे डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन झाल्यानंतर त्यांचें स्मारक करण्याकरितां पुणें येथें जॉन स्मॉल मेमोरिअल हॉलमध्यें स्मारकाचा विचार करण्याकरितां सर फेरोजशहा मेथा यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २३ जून सन १९०७ सालीं सभा भरली होती. सभेंत स्मारकाकरितां फंड उभारण्याचें ठरून वर्गणी जमा करण्याकरितां मॅनेजिंग कमिटी नेमण्यांत आली. या कमिटींत ऑनरेबल मि. जी. के. गोखले, ऑ. मि. सी. एच्. सेटलवाड, प्रिन्स शिवाजीराव गायकवाड, श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव, ऑ. प्रिन्सिपॉल आर्. पी. परांजपे ही मंडळी होती. कमिटीनें वर्गणी जमा करण्याचें काम नेटानें सुरू केलें व बराच फंड जमा झाला. सन १९०९ सालीं डॉ. सेल्बी विलायतेस गेले, त्या वेळीं मुंबई ग्रॅज्युएट ॲसोसिएशननें त्यांना पार्टी (Entertainment) दिली. या पार्टीस मदत म्हणून वरील फंडांतून २०० रुपये दिले होते. फंडाच्या रकमेपैकीं तत्त्वज्ञानाच्या अध्ययनास उत्तेजन देण्याकरितां डॉ. सेल्बी यांच्या नांवें युनि-व्हर्सिटीच्या स्वाधीन ५००० रुपये करून त्या रकमेच्या व्याजाची एक

शिष्यवृत्ति देण्याचें ठरलें, व त्यांचें एक तैलचित्र तयार करण्याकरितां १५०० रुपये खर्च करण्याचें ठरलें. या ठरावाप्रमाणें रु. ५००० युनिव्हर्सिटीच्या स्वाधीन करण्यांत आले व लंडन येथील मेसर्स डब्ल्यू. जी. पारकर कंपनीकडे तैलचित्र तयार करण्याचें काम दिलें. हें तैलचित्र डेक्कन कॉलेजांत ठेवण्याचें ठरलें. तैलचित्र तयार होऊन आल्यावर त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांच्या हस्तें सदर चित्राचा अनावरणसमारंभ झाला. त्या वेळीं मि. एफ. डब्ल्यू. बेन हे प्रिन्सिपॉल होते. श्रीमंत बाबासाहेब हे फंडाच्या मॅनेजिंग कमिटीचे सभासद असल्यामुळें ते गव्हर्नरसाहेबांचें स्वागत करण्यास हजर होते. ते डेक्कन कॉलेजचे विद्यार्थी असल्यामुळें त्यांनीं या स्मारकाच्या कामीं उत्साहानें काम केलें होतें. डॉ. सेल्बी यांच्याबद्दल त्यांना फार आदर वाटत असे व अद्यापहि त्यांच्या अंगच्या गुणांची त्यांना आठवण होत असते. या स्मारक-फंडास प्रथमच म्हणजे १९०७ सालीं त्यांनीं रु. १०० वर्गणी दिली होती.

लॉर्ड सिडेनहॅम यांची मुदत संपून ते विलायतेस जाणार असल्यामुळें ता. २९ रोजीं त्यांना पार्टी व मानपत्र देण्यासंबंधानें ना. कर्टिससाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें किर्लोस्कर थिएटरांत पुणें नागरिकांची सभा भरली होती. या सभेस श्रीमंत बाबासाहेब हजर राहिले होते. या सभेंत गव्हर्नर-साहेबांना पार्टी व मानपत्र देण्याचा ठराव पास झाला.

वरील दोन समारंभांखेरीज श्रीमंत बाबासाहेबांनीं मे. शेपर्डसाहेब यांना मुंबई येथें १९०७च्या फेब्रुवारी महिन्यांत मावजी शेट यांच्या बंगल्यांत पार्टी दिली. त्या वेळीं बरेच युरोपिअन ऑफिसर्स व हिंदु मित्र मंडळी बोलाविली होती.

## संस्थानच्या राज्यकारभारांत कांहीं अधिकार मिळविण्याविषयीं प्रयत्न

ता. १२ जून सन १९०५ इ. रोजीं रावसाहेबांच्या विनंतीवरून त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन हे भोरास आले होते. त्यांच्या बंदोबस्ता-करितां पो. ए. मि. स्विफ्ट हेहि आदल्या दिवशीं आले होते. स्विफ्टसाहेबांचा श्रीमंत बाबासाहेबांवर लोभ असून त्यांच्या सल्ल्यानें ते त्या वेळीं पुण्यास सिटी मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत फौजदारी काम कसें चालतें याची माहिती घेत होते. त्यांनीं भोरास लॉर्ड लॅमिंग्टन यांना श्रीमंत बाबासाहेब यांच्या शिक्षणाची माहिती

देऊन त्यांच्या अंगच्या गुणांचीहि माहिती दिली होती. गव्हर्नरसाहेब यांची व श्रीमंत बाबासाहेब यांची भेट झाली त्या वेळीं संभाषण-प्रसंगानें त्यांच्याबद्दल गव्हर्नरसाहेबांचा फारच अनुकूल ग्रह झाला होता.

सन १९०६ सालापासून श्रीमंत बाबासाहेब पुण्यांत ऑनररी मॅजिस्ट्रेटचें काम करूं लागले हे सांगण्यांत आलेंच आहे. सन १९०७ सालीं लॉर्ड लॅमिंग्टन यांच्या कानीं श्रीमंत बाबासाहेबांच्या ऑनररी मॅजिस्ट्रेटच्या कामाबद्दल प्रशंसापर उद्गार गेले तेव्हां त्यांच्या मनांत, श्रीमंत बाबासाहेबांनीं पुण्यास काम करीत बसण्यापेक्षां संस्थानांतच कामाची माहिती करून घेतल्यास पुढें फायदेशीर होईल, असे विचार येऊन त्यांनीं रावसाहेबांना श्रीमंत बाबासाहेबांस संस्थानांत कांहीं अधिकार देण्याबद्दल सुचविलें. तेव्हां काय अधिकार द्यावेत याबद्दल रावसाहेब विचारांत पडले होते, परंतु गव्हर्नरसाहेबांच्या कुटुंबाची प्रकृति एकाएकीं बिघडल्याची तार आल्यामुळें त्यांना ता. २६ जुलै सन १९०७ इ. रोजीं आपल्या जागेचा राजीनामा देऊन विलायतेस जाणें भाग पडलें. त्यामुळें त्यांच्या इच्छेप्रमाणें श्रीमंत बाबासाहेबांना संस्थानांत कांहीं अधिकार मिळाल्याचें पाहण्यास त्यांना संधि मिळाली नाहीं. तथापि श्रीमंत बाबासाहेबांना कांहीं तरी अधिकार मिळावेत असें विलायतेस जाण्यापूर्वीं त्यांनीं आपलें मत नमूद करून ठेविलें होतें.

श्रीमंत बाबासाहेब यांच्या मनांत, संस्थानांतच कांहीं अधिकार मिळाले तर संस्थानची माहिती होऊन कांहीं कामगिरी करून दाखवितां येईल असें फार होतें, व लॉर्ड लॅमिंग्टन जर गेले नसते तर त्यांची इच्छा लवकरच पूर्ण झाली असती. तथापि लॉर्ड लॅमिंग्टन यांनीं त्यांच्याबद्दल जें लिहून ठेविलें होतें, त्याचाच त्यांना पुढें उपयोग झाला. लॉर्ड लॅमिंग्टन एकदम गेल्यामुळें त्यांच्या जागेचा चार्ज कांहीं महिने मूर-मॅकेन्झी यांच्याकडे देण्यांत आला होता. लॉर्ड लॅमिंग्टन यांच्या जागीं सर जॉर्ज क्लार्क यांची नेमणूक होऊन ते ऑक्टोबर ता. १८ रोजीं मुंबईस येऊन त्यांनीं गव्हर्नरच्या जागेचा चार्ज घेतला. त्यांच्या स्वागतार्थ गेलेल्या बड्या मंडळींत श्रीमंत बाबासाहेब होतेच.

लॉर्ड लॅमिंग्टन यांनीं जाण्यापूर्वीं श्रीमंत बाबासाहेब यांच्याबद्दल जो आपला अनुकूल अभिप्राय नमूद करून ठेविला होता व जी शिफारस केली

होती ती त्यांच्या मागून आलेले गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क यांच्या अवलोकनांत आल्यामुळें सर जॉर्ज क्लार्क यांचेंहि या गोष्टीकडे लक्ष होतें. श्रीमंत रावसाहेब यांना श्रीमंत बाबासाहेबांना कांहीं अधिकार देऊं नयेत असें वाटत नव्हतें, परंतु अधिकार दिले असतां कांहीं प्रसंगीं मतभेद झाला असतां विनाकारण त्रास उत्पन्न होण्याची त्यांना भीति वाटत होती. गव्हर्नरसाहेब यांना मात्र मुळींच तसें वाटत नव्हतें. कारण त्यांस श्रीमंत बाबासाहेब यांचा कोणत्याहि मतभेदाच्या वेळीं पड खाऊन मिळतें घेण्याचा स्वभाव माहीत होता. श्रीमंत रावसाहेबांना नाखूष ठेवून अधिकार घेण्याची श्रीमंत बाबासाहेबांची केव्हांहि इच्छा नव्हती. श्रीमंत रावसाहेबांनीं खुषीनें अधिकार दिले तरच ते त्यांना हवे होते. यामुळें हा प्रश्न रेंगाळत पडला होता. श्रीमंत बाबासाहेबांचें पहिलें कुटुंब याच सुमारास निवर्तल्यावर कांहीं कालपर्यंत त्यांच्या मनावर औदासीन्याची छाया पसरली होती. त्या वेळीं अधिकाराचा विचार त्यांच्या मनांतून बहुतेक नाहींसा झाला होता. मुंबई सरकारनें मात्र हा प्रश्न अगदीं दृष्टीआड केला होता असें नाहीं. पोलिटिकल एजंटांना श्रीमंत बाबासाहेबांची संकुचित वृत्ति, भिडस्त स्वभाव हीं माहीत असल्यामुळें त्यांच्याकडून श्रीमंत रावसाहेबांना मधून मधून शिफारशी करण्यांत येत. दिल्ली दरबारानंतर या प्रश्नास विशेष रीतीनें चालना मिळाली. या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांची प्रकृति चांगली असून श्रीमंत भाऊसाहेबांचीहि प्रकृति सुधारल्यामुळें त्यांना मनःस्वास्थ्य प्राप्त झालें होतें. प्रकृति उत्तम राहण्याकरितां मन कोणत्या तरी चांगल्या कामांत गुंतविलेलें ठेवणें हितावह असतें असें डॉक्टरांचेंहि त्यांना सांगणें असे. म्हणून त्यानीं संस्थानांत कांहीं अधिकार देण्याबद्दल रावसाहेबांना विनंति केली होती. हा आपला हेतु त्यांनीं गव्हर्नरसाहेबांनाहि कळविला होता; त्यावरून ता. २९ ऑक्टोबर रोजीं गव्हर्नरसाहेबांनीं रावसाहेबांना पत्र पाठवून त्यांत श्रीमंत बाबासाहेबांना कांहीं अधिकार देण्याची शिफारस केली होती. त्या पत्रांत त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांची विनंति मान्य केल्यास रावसाहेबांच्या इभ्रतीस आणि अधिकारास कोणत्याहि प्रकारें कमीपणा येणार नाहीं असें रावसाहेबांना कळविलें होतें. त्यावर कोणते अधिकार द्यावेत हें ठरविण्याचें काम श्रीमंत रावसाहेबांनीं मुंबई सरकारवरच सोंपविलें. मुंबई सरकारनें श्रीमंत बाबासाहेबांची इच्छा सर क्लॉड

हिलमार्फत समजून घेऊन श्रीमंत रावसाहेबांना ता. ३१ मे सन १९१२ इ. रोजीं डेमी-ऑफिशिअल पत्र पाठवून त्यांत श्रीमंत बाबासाहेबांना शिरवळ तालुक्याचे कलेक्टर, डिस्ट्रिक्ट जज्ज व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट नेमावें असें सुचविलें होतें. ही योजना श्रीमंत रावसाहेबांनीं मान्य केली; परंतु त्यांचें इतकेंच म्हणणें होतें कीं, एकदम इतके अधिकार न देतां असिस्टंट कलेक्टर, सबडिव्हिजनल् मॅजिस्ट्रेट व असिस्टंट जज्जाचे अधिकार द्यावेत. श्रीमंत बाबासाहेब यांचा स्वभाव दुराग्रही नसल्यामुळें व आपल्या परमपूज्य वडिलांच्या इच्छेबाहेर कधींहि जाण्याची त्यांची इच्छा नसल्यामुळें त्यांनीं त्यांच्या हेतूस आपली मान्यता असल्याचें डॉ. शंकर अमृत चोबे व रा. ब. सातभाई यांच्यामार्फत दर्शविलें. सन १९१३ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत पो. ए. मि. स्विफ्ट यांच्याशीं श्रीमंत रावसाहेब यांनीं विचारविनिमय करून त्यांच्या सल्ल्यानें श्रीमंत बाबासाहेब यांस वरील अधिकार ता. १ मार्च सन १९१३ इसवीपासून देण्याचें मंजूर केलें.

मि. स्विफ्ट यांना आपला फार दिवसांचा हेतु सफल झाल्याचें पाहून आनंद वाटला, व त्यांनीं श्रीमंत रावसाहेबांचें व श्रीमंत बाबासाहेबांचें अभिनंदन केलें. मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यांनाहि आपल्या कार-कीर्दींत श्रीमंत बाबासाहेबांना अधिकार मिळाला याबद्दल अभिमान व संतोष वाटला.

---

## प्रकरण ५ वें

# शिरवळ तालुक्याचे अधिकार

### मार्च सन १९१३ ते जुलै सन १९२२ पर्यंत

भोर संस्थानच्या पांच तालुक्यांपैकीं शिरवळ तालुका ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना प्रथम याच तालुक्याचा पूर्वी ठरल्याप्रमाणें अधिकार मिळाल्यानें साभिमान आनंद झाला.

छत्रपति शिवाजीमहाराज यांच्या मनांत मराठी राज्य स्थापण्याचे विचार आल्यानंतर त्यांनीं प्रथम ज्या हालचाली सुरू केल्या त्या या तालुक्याच्या पश्चिम भागांत केल्या होत्या. या भागांत रायरेश्वराचा डोंगर असून त्याच्या पायथ्याशीं स्वराज्यस्थापनेच्या कामीं शिवाजीमहाराजांबरोबर सहकार्य करणाऱ्यांनीं शपथा घेतल्या होत्या. ज्या जेधे व बांदल देशमुखांनीं, त्याचप्रमाणें बाजी प्रभू देशपांड्यासारख्या रणशूर पराक्रमी पुरुषांनीं स्वराज्यप्राप्तीकरितां आपले देह खर्ची घालून महाराष्ट्राच्या इतिहासांत आपलीं नांवें अजरामर करून ठेविलीं आहेत त्या सर्वांचीं जन्मग्रामें याच तालुक्यांत आहेत. रोहिडा किल्ला व भोर संस्थानचे मूळ संपादक श्री. शंकराजी नारायण यांच्या आंबवडें येथील समाधीचें स्थान हीं दोन्ही याच भागांत आहेत.

तालुक्याच्या या पश्चिम भागाप्रमाणें पूर्व भागहि कमी महत्त्वाचा आहे असें नाहीं. याच भागांत तालुक्याच्या ठाण्याचें ठिकाण शिरवळ हा गांव असून त्याच्या पश्चिम अंगानें पुणें-सातारा रस्ता व दक्षिण अंगानें महाप्रळ-पंढरपूर रस्ता असे दोन मोठे रस्ते गेले असून उत्तर अंगास नीरा नदी आहे. हा गांव देशभागांत मोडत असून भोंवतालीं सपाट प्रदेश आहे. मुसलमानी अंमलांत बारा मावळांचा मुख्य अंमलदार याच ठिकाणीं राहत असल्यामुळें त्या वेळीं या गांवास फार महत्त्व होतें. भोर दरबारच्या संग्रहीं असलेले दोन ताम्रपट १९३५ सालींच भारत इतिहास-संशोधक मंडळानें बनारस युनिव्हर्सिटीचे प्रोफेसर अनंत सदाशिव आळतेकर यांच्या मदतीनें प्रसिद्ध केले आहेत; व ते ताम्रपट हल्लीं भोर येथील वाड्यांत म्यूझिअममध्यें ठेवण्यांत

आलेले आहेत. हे ताम्रपट उजेडांत आणण्याचें श्रेय श्रीमंत बाबासाहेब यांनाच आहे. त्यांनींच ते इतिहास-संशोधक मंडळाकडे पाठविलेले होते. एक ताम्रपट राष्ट्रकूटांच्या वेळचा असून तो ध्रुव राजानें सन ७८० सालीं कऱ्हाडच्या वासुदेवभट्ट नांवाच्या एका ब्राह्मणास दिला असून त्यांत लघुविंग हा गांव सदर ब्राह्मणास इनाम दिल्याचा उल्लेख आहे. या गांवच्या चतु:सीमा पुढीलप्रमाणें आहेत:—पूर्वेस श्रीमल, पश्चिमेस बृहत्विंग, उत्तरेस नीरा नदी व दक्षिणेस लयनगिरी. श्रीमल प्रांतांत लघुविंग असल्याचा उल्लेख आहे. हल्लीं भोरच्या पूर्वेस जो विंग गांव आहे तोच पूर्वींचा लघुविंग गांव असून श्रीमल हें हल्लींच्या शिरवळचें नांव होतें हें या ताम्रपटावरून सिद्ध झालें असून या भागांत राष्ट्रकूटांची प्रबळ राजसत्ता होती हें दिसून येतें. विंग हा गांव हल्लीं पंतसचिवांना भाटघर धरणाच्या मोबदल्यांत इनाम करून देण्यांत आलेला आहे. दुसरा ताम्रपट याच गांवचा चालुक्यांच्या वेळच्या चालुक्य खंबदेव राजानें सन १०७९ सालीं दिलेला असून त्यांत ३०० वर्षांपूर्वी दिलेला इनाम गांव पुढें चालू ठेविल्याचा उल्लेख आहे. त्यांत सिरिवलयाचा अधिपति खंबदेव असें म्हटलें आहे. सिरिवलय म्हणजे अर्थातच शिरवळचें नांव होतें, व शिरवळ प्रांताचा अधिपति खंबदेव होता. यावरून ९०० वर्षांपूर्वींहि चालुक्यांच्या राजवटींत शिरवळ गांवाचें महत्त्व फार असून तो भरभराटीचे स्थितींत असला पाहिजे. या दोन्ही ताम्रपटांवरून शिरवळ गांवचें ऐतिहासिक महत्त्व फार प्राचीन कालापासून असल्याचें उघड होत आहे.

भोर संस्थानच्या राजधानीचें ठिकाण भोर हा गांव न करतां शिरवळ गांव जर केलें असतें तर तोच गांव अनेक दृष्टींनीं राजधानी होण्यास योग्य होता, असें श्रीमंत बाबासाहेब यांचें मत आहे. तेथील हवापाणी उत्तम असून शहराचा विस्तार होण्यास विपुल जागा आहे. व्यापारवाढ होण्यासहि तें उत्तम ठिकाण होतें. शिरवळ गांव राजधानीचें ठिकाण केलें असतें तर हल्लीं भोरला राजधानी म्हणून जें वैभव प्राप्त झालें आहे त्याच्या किती तरी पटीनें शिरवळला वैभवाचा लाभ होऊन त्याला शहराचें स्वरूप प्राप्त झालें असतें.

इतिहाससंशोधकांना या तालुक्यांत त्यांच्या संशोधक दृष्टीला प्राचीन इतिहास सांगणारीं अनेक स्थळें आढळतील. या भागांत छत्रपति शिवाजी-

चित्रांक २६



सन १९१२ सालच्या प्रवासांत हैद्राबाद येथें घेतलेला फोटो. [सं. पा. १३३

१ विनायकशास्त्री चिरपुटकर; २ श्री. के. भिडे; ३ न. गो. आंबेकर; ४ श्रीमंत बाबासाहेब; ५ श्री. शामराज; ६ रा. नरहरराव.

महाराजांचा सर्वत्र सतत संचार चालू असल्यामुळें सर्व प्रदेश त्यांच्या चरणधूलीनें पवित्र झाला होता; म्हणून मराठी साम्राज्याभिमानी भक्तांना हा प्रांत पवित्र क्षेत्राप्रमाणें वाटला तर त्यांत कांहीं नवल नाहीं.

पांच तालुक्यांपैकीं जमीनबाबीमध्यें उत्पन्नाच्या दृष्टीनें हाच तालुका मोठा आहे. या तालुक्याचें क्षेत्रफळ २१२ चौरस मैल असून त्यांत ११२ गांवें आहेत. राजधानीचें ठिकाण भोर हेंहि याच तालुक्यांत नीरा नदीच्या कांठीं आहे. तालुक्याचे पूर्व व पश्चिम असे दोन विभाग असून पूर्व विभागांत देशभाग व पश्चिम विभागांत मावळ भाग आहे. देशभागांत मुख्यत्वेंकरून ज्वारी, बाजरी, गहूं, हरबरा, मूग व उडीद हीं धान्यें पिकतात. कांहीं जमीन बागाईत असून तींत मुख्य पीक कांद्याचें आहे. भात, नाचणी, वरी हीं मावळ भागांतील मुख्य पिकें असून कांहीं ठिकाणीं अल्प प्रमाणांत ज्वारी व गहूं हींहि पिकें होतात. तसेंच ह्या तालुक्यामध्यें अंबाडखिंड व शिरगांव हीं पांचगणीसारखीं थंड हवेचीं ठिकाणें आहेत.

अशा या इतिहासप्रसिद्ध व संस्थानांतील सर्वांत मोठ्या तालुक्याचा प्रथमच अधिकार मिळाला याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांना धन्यता वाटली यांत आश्चर्य नाहीं.

या तालुक्याचे अधिकार ता. १ मार्च सन १९१३ इसवीपासून देण्याचें ठरलें असल्यामुळें ता. २८ फेब्रुवारी रोजीं सकाळीं ते सहकुटुंब आंबवडें येथें गेले व तेथें श्री. शंकराजी नारायण यांच्या समाधीचें दर्शन घेऊन परत आले. दुपारीं आपल्या परमप्रिय मातोश्रींना नमस्कार करून व त्यांचा आशीर्वाद घेऊन रावसाहेबांचाहि आशीर्वाद घेतला.

ता. १ मार्च रोजीं श्रीमंत बाबासाहेब आपल्या कामाचा चार्ज घेण्याकरितां शिरवळास गेले. तेथील रहदारी बंगल्यापर्यंत (डाक बंगला) गांवांतील प्रमुख गृहस्थ रा. ब. नारायण गणेश देशपांडे, ब्रिटिश पेन्शनर डे. कलेक्टर, व इतर सभ्य गृहस्थ, त्याचप्रमाणें अंमलदार, शेट सावकार वगैरे मंडळी श्रीमंत बाबासाहेबांना सामोरी आली होती. सर्वांच्या भेटी होऊन हक्कदार वगैरे लोकांनीं त्यांना नजराणे दिले. नंतर, पानसुपारी झाली. श्रीमंतांचे आप्त रा. रा. नरहर गोपाळ अंबेकर हेहि नाशिकहून मुद्दाम

आले होते. त्यांनीं त्यांना पुष्पहार घातला. नंतर श्रीमंत गांवांत येण्यास निघाले. वाटेंत विठोबाच्या देवालयांत थोडा वेळ थांबले होते. तेथें शाळेंतील मुलांनीं स्वागतपर पद्यें म्हटल्यावर रा. ब. देशपांडे यांनीं थोडेंसें भाषण केलें. पानसुपारी झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब तेथून सर्व मंडळींसह पायींच सरकारी वाड्यांत गेले. तेथें कचेरी भरविण्यांत आली होती. दरबारांत ते स्थानापन्न झाल्यावर प्रजाजनांच्या तर्फे ब्रिटिश पेन्शनर सब-एंजिनिअर रा. सीताराम केशव देशपांडे यांनीं पुढील मानपत्र वाचून दाखविलें.

## शिरवळचें मानपत्र

श्रीमंत बाबासाहेब,

आपले परमपूज्य व दयावंत सरकार हिज हायनेस श्रीमंत पंतसाहेब सचिव यांच्या आज्ञेनें आपले लोकप्रिय आणि विद्यासंपन्न युवराज श्रीमंत बाबासाहेब यांजला आजपासून शिरवळ तालुक्यापुरते असिस्टंट कलेक्टर व सबडिव्हिजनल (Sub-divisional) मॅजिस्ट्रेट आणि असिस्टंट सेशन्स् जज्ज (Asstt. Sessions Judge) अशा तीन हुद्यांचे अधिकार मिळाले आहेत हें आतां सर्व लोकांस विदित झालेंच आहे. या आनंददायक गोष्टी-बद्दल आपला संतोष व्यक्त करून श्रीमंत बाबासाहेब यांचा अभिनंदनपर गौरव करण्याकरितां आणि श्रीमंत सरकारांविषयीं आपली कृतज्ञता आभार-पूर्वक प्रदर्शित करण्याकरितां आपण संस्थानचे राजनिष्ठ प्रजाजन व नोकर-लोक कर्तव्यभावनेनें या मंगल प्रसंगीं येथें जमलेले आहोंत. मानवी आयुष्य-क्रमांत जे थोडेबहुत आनंदाचे दिवस परम कारुणिक जगच्चालक प्रभूच्या कृपेनें लोकांस लाभतात त्यांपैकीं आजचा दिवस हा अत्यंत आनंदाचा असा परमेश्वरानें आपल्यास दाखविला आहे यांत शंका नाहीं. आपले सरकार हिज हायनेस श्रीमंत पंतसाहेब सचिव यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांस मोठ्या आस्थेनें आधुनिक पद्धतीचे शिक्षणाचा लाभ करून दिला आहे. आपले वडिलांचे इच्छेनुरूप श्रीमंत बाबासाहेबांनींहि मोठ्या उत्साहानें आणि काळजीपूर्वक अभ्यास करून मुंबई युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेंत सन १८९९ सालीं यश संपादन केलें ही गोष्ट आपणां सर्वांच्या स्मरणांत असेलच. त्यानंतर श्रीमंत बाबासाहेब यांचा गौरव करण्याचे बाबतींत हा दुसरा प्रसंग आपले भाग्यानें

प्राप्त झालेला आहे. आपण युनिव्हर्सिटीचे पदवीधर व्हावें अशी श्रीमंत बाबासाहेब यांची फार इच्छा होती. परंतु दृष्टीच्या दुर्बलतेमुळें तो नाद सोडून देण्याविषयीं डॉक्टरांचा अत्यंत आग्रहाचा अभिप्राय पडल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब यांस डेक्कन कॉलेजांतील आपला अभ्यासक्रम पुढें चालवितां आला नाहीं. तथापि कॉलेजचा अभ्यासक्रम सुटल्यानंतर श्रीमंतांनीं संस्थानचा कारभार करण्यास अवश्य असलेलें ज्ञान संपादन करण्याचे कामीं बिलकुल कसूर केलेली नाहीं हें पुणें येथें त्यांनीं सात आठ वर्षे उत्तम प्रकारें केलेल्या ऑनररी बेंच मॅजिस्ट्रेटचे कामावरून आपल्यास ठाऊकच आहे. श्रीमंत बाबासाहेब यांचें काम वरिष्ठ सरकारासहि पूर्णपणें पसंत झालें आहे. " श्रीमंत बाबासाहेब यांचें शिक्षण उत्तम प्रकारचें झालें आहे व ते आपल्या संस्थानचा कारभार पाहण्यास आतां योग्य झाले आहेत. याबद्दल मला फार आनंद होत आहे. " असे जे नामदार गव्हर्नरसाहेब लॉर्ड सिडेनहॅम यांनीं भोर म्युनिसिपॅलिटीच्या मानपत्रास उत्तर देतांना श्रीमंत बाबासाहेब यांचे संबंधानें उद्गार काढले त्यांवरून वरील गोष्ट विशेष रीतीनें व्यक्त होत आहे. पाश्चात्य देशांत प्रवास हें शिक्षणाचें महत्त्वाचें व आवश्यक असें अंग समजलें जातें. त्यास अनुसरून श्रीमंत बाबासाहेब यांनीं उत्तर हिंदुस्थान, बडोदें, सिमला, ग्वाल्हेर, दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें आणि हैद्राबाद इत्यादि ठिकाणीं प्रवास केला असून ठिकठिकाणच्या लोकरीति आणि राज्यव्यवस्था यांशीं परिचय करून घेऊन बहुश्रुतपणा संपादन केलेला आहे. श्रीमंत बाबासाहेब यांनीं पुणें वगैरे ठिकाणच्या लोकोपयोगी संस्थांस मोठमोठ्या देणग्या दिल्याबद्दल अनेक वेळां आपल्या वाचण्यांत वर्तमानपत्रांतून आलेलें आहे. त्यावरून श्रीमंतांचे अंगीं लोककल्याणाविषयीं किती कळकळ बाणलेली आहे, याबद्दलची कल्पना होणार आहे.

श्रीमंतांची वरील प्रकारची एकंदर कर्तबगारी लक्षांत घेऊन कारभाराची माहिती होण्याकरितां श्रीमंत सरकारांनीं श्रीमंत बाबासाहेब यांस जबाबदारीचे अधिकार देण्याची जी योजना केली आहे ती अत्यंत स्तुत्य असून परिणामीं सर्वांस फार फायदेशीर झाल्यावांचून राहणार नाहीं.

श्रीमंत बाबासाहेब, आपण आज जबाबदारीच्या हुद्दयाचे अधिकाराचा चार्ज घेतला आहे याबद्दल आपलें मनःपूर्वक व मोठ्या नम्रतेनें अभिनंदन

करण्याची आम्ही आपले चरणांपाशीं परवानगी मागतों. चार्ज घेण्याचे बाबतींत आपलें या तालुक्याचे मुख्य ठिकाणीं आज प्रथम आगमन झालें आहे तत्संबंधीं आम्ही आपलें अत्यंत निष्ठेनें आणि प्रेमानें स्वागत करितों. आपल्या वडिलांनीं आम्हां प्रजाजनांचें व नोकरलोकांचें आजवर पुत्रवत् पालन केलें आणि रयतेचे हितासाठीं शक्य त्या तजविजी केल्या. त्याचप्रमाणें ममतेनें आपणहि आमचा सांभाळ करावा अशी श्रीमंतांचे चरणीं नम्र विज्ञप्ति आहे. हरएक कामांत आम्ही श्रीमंतांस राजनिष्ठापूर्वक मदत करूं अशी श्रीमंतांनीं खात्री बाळगावी. शेवटीं ज्या रामप्रभूच्या कृपेनें आजचा आनंदाचा दिवस प्राप्त झाला आहे त्या सर्वशक्तिमान् परमेश्वराचे व तीर्थरूपांचे आशीर्वादानें आपल्यावर पडलेली जबाबदारी सर्वांस सुखप्रद होईल अशा प्रकारें उत्तम रीतीनें पार पाडण्याचें सामर्थ्य व दीर्घायुष्य आपल्यास प्राप्त होऊन आपला उत्तरोत्तर उत्कर्ष होवो अशी आम्हां रयत लोकांची सच्चिद्घन जगन्नियंत्यापाशीं सविनय प्रार्थना आहे."

वरील मानपत्रास उत्तरादाखल श्रीमंत बाबासाहेबांनीं पुढील आशयाचें भाषण केलें. ते म्हणाले, "आपण सर्वांनीं मिळून माझें एकदिलानें, राजनिष्ठेनें, उत्साहानें व प्रेमानें स्वागत करून अंतःकरणपूर्वक अभिनंदन केलें, याबद्दल आणि मजविषयीं प्रेमपूर्वक जे आनंदोद्गार प्रदर्शित केले त्यांबद्दल मी आपला फार आभारी आहें.

"आमचे वडील हिज हायनेस श्रीमंत पंतसाहेब यांनीं मला कामाची माहिती व्हावी म्हणून या तालुक्याचे कांहीं स्वतंत्र अधिकार दिलेले आहेत. त्यासंबंधानें मी त्यांचा, तसेंच मे. स्विफ्टसाहेब बहादुर पो. एजंट यांनीं मला वेळोवेळीं जो सल्ला दिला व जी मदत केली त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें. ज्या संस्थानांत माझा जन्म झाला त्या संस्थानच्या लोकांचे कल्याणाकरितां आपण झटावें हा माझा हेतु परमेश्वरकृपेनें व आपल्या सर्वांच्या मदतीनें तडीस जाईल अशी मला आशा आहे. हिज हायनेस श्रीमंत पंतसाहेब यांस व प्रजाजनांस संतोष होईल अशाच रीतीनें मजवर सोंपविलेलें जबाबदारीचें काम करण्याची माझी उत्कट इच्छा असून ती इच्छा सफल होण्यास आपल्या सहानुभूतीची मला फार मदत होणार आहे. प्रामाणिकपणानें व निरलसपणानें जे नोकर झटून काम करतील त्यांचेबद्दल माझी पूर्ण सहानुभूति राहील."

चित्रांक ३७



श्रीमंत युवराज सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब.

[सं. पा. १८०

( समग्र भाषण शेवटीं परिशिष्ट ' च ' मध्यें दिलें आहे. )

श्रीमंत बाबासाहेब यांच्या हातीं अधिकार आल्यामुळें शिरवळ गांवची सर्व प्रकारें भरभराट करून घेतां येईल अशी शक्याशक्यतेचा विचार न करतां शिरवळ येथील नागरिकांनीं आशा बाळगून ती मानपत्रांत प्रकट केली होती. परंतु रावसाहेबांच्या इच्छेप्रमाणें वागून आपणांस कितपत कार्य करतां येईल याची श्रीमंत बाबासाहेबांना योग्य कल्पना असल्यामुळें त्यांनीं मानपत्रास जें उत्तर दिलें त्यावरून त्यांची सावधगिरी व दूरदर्शीपणा व्यक्त होत आहे. अधिकार मिळाल्याबरोबर हुरळून जाऊन त्यांनीं वाटेल तीं आश्वासनें देऊन लोकांच्या मनांत भलत्याच आकांक्षा उत्पन्न होऊं दिल्या नाहींत, यांत त्यांच्या अंगच्या मुत्सद्दीपणाचें धोरण दिसून येतें.

या समारंभांत शिरवळचे रहिवासी रा. ब. नारायण गणेश देशपांडे यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. त्यांनीं इंग्रज सरकारांत मोठीं हुद्याचीं कामें करून कांहीं दिवस त्यांना इंग्रज सरकारांतून सांगली संस्थानांत कै. श्रीमंत तात्यासाहेब सांगलीकर यांच्या कारकीर्दीच्या अखेरच्या दिवसांत ॲडमिनिस्ट्रेटर म्हणून नेमिलें होतें. त्या वेळीं त्यांनीं सांगली संस्थानांत जी कामगिरी बजाविली तीबद्दल तेथें त्यांची ख्याति आहे. सांगली संस्थानांतील काम संपल्यावर ते कारवार येथें हुजूर डेप्युटि कलेक्टर झाले व त्या जागेवर काम करीत असतांनाच त्यांनीं पेन्शन घेतलें. पेन्शन घेतल्यावर ते शिरवळपासून दोन मैलांवर आपल्या शेतांत सडकेच्या कडेला बंगला बांधून तेथें राहूं लागले. ते फार करारी व कर्तृत्ववान् पुरुष होते. त्यांना शेतीची फार आवड असल्यामुळें त्यांनीं आपल्या बंगल्यानजीक पेरू, डाळिंबें वगैरे फळांचा उत्तम बाग तयार केला होता व बागेंत ते स्वत: काम करीत. आळसांत वेळ घालविणें त्यांना बिलकुल खपत नसे. श्रीमंत बाबासाहेबांना त्यांच्या अनुभवाचा चांगला फायदा मिळूं लागला. रावसाहेबांनाहि विशेष महत्त्वाच्या कामीं त्यांच्या सल्लामसलतीचा उपयोग होत असे. सन १९१८ सालीं त्यांचें देहावसान झालें. तोंपर्यंत राज्यकारभाराचे बिकट प्रश्न सोडविण्याच्या कामीं श्रीमंत बाबासाहेब त्यांचें मत घेत असत, व तेहि निर्भीडपणें सरळ मार्ग दाखवीत असत.

संध्याकाळीं त्यांच्याकडे गेलें असतांना करमणूक होऊन त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा श्रीमंतांना मिळत असे.

श्रीमंत बाबासाहेब यांनीं शिरवळ तालुक्याचें काम पाहण्यास सुरुवात केल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांनीं ब्रिटिश पेन्शनर रावसाहेब पुरुषोत्तम बापूजी फडके यांची पर्सनल असिस्टंटच्या जागीं नेमणूक केली. रावसाहेब फडके यांनीं ब्रिटिश सरकारांत चांगला नांवलौकिक मिळविला असून ते मोठे तडफदार होते. त्यानंतर लौकरच श्रीमंत बाबासाहेबांनीं योग्य इसमांची निवड करून आपल्या नवीन ऑफिसांतील सर्व जागा भरल्या.

मार्च महिना शिरवळास राहून त्यांनीं कामाची व्यवस्था लाविली व मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम विलायतेस जाणार असल्यामुळें त्या महिन्याच्या अखेरीस ते मुंबईस गेले. हिंदुस्थानचे बादशहा मुंबईस प्रथम ज्या पालवें बंदरावर उतरले त्या ठिकाणीं त्यांच्या स्मारकाच्या इमारतीच्या पायाचा दगड बसविण्याचा समारंभ ता. ३१ मार्च रोजीं सायंकाळीं लॉर्ड सिडेनहॅम यांच्या हस्तें झाला. त्या समारंभास रावसाहेबांच्या बरोबर श्रीमंत बाबासाहेबहि हजर होते. समारंभ प्रेक्षणीय झाला. या इमारतीस पुढें Gate-way of India (हिंदुस्थानचें प्रवेशद्वार) हें नांव देण्यांत आलें. लॉर्ड सिडेनहॅम यांनीं आपल्या पंचवार्षिक कारकीर्दींत सहानुभूतिपूर्वक राज्यकारभाराचें जें धोरण ठेविलें होतें, त्यामुळें त्यांनीं जनतेचीं मनें आकर्षण करून लोकप्रियता संपादन केली होती. ते विलायतेस जाणार म्हणून मुंबई कॉर्पोरेशननें त्यांना ता. २ एप्रिल रोजीं राजाबाई टॉवरच्या बंगल्यांत मोठ्या थाटाची मेजवानी दिली. या समारंभास पुष्कळ राजेरजवाडे जमले होते. श्रीमंत बाबासाहेबहि हजर होते. लॉर्ड सिडेनहॅम मुंबईचे गव्हर्नर झाल्यापासून त्यांचें श्रीमंत बाबासाहेबांच्या हिताकडे सारखें लक्ष असे. आपला एक हितकर्ता जाणार म्हणून श्रीमंत बाबासाहेबांना साहजिकच फार वाईट वाटलें.

मुंबईचे नवे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन हे ता. ४ एप्रिल रोजीं मुंबईस आले, व ता. ५ रोजीं लॉर्ड सिडेनहॅम विलायतेस रवाना झाले. नवीन गव्हर्नरांचा स्वागतसमारंभ व मानपत्रसमारंभ, त्याचप्रमाणें जुन्या गव्हर्नरांचा

निरोपाचा व मानपत्राचा समारंभ असे समारंभ झाले. सर्व समारंभांस श्रीमंत बाबासाहेब उपस्थित होते.

मुंबईंतील कार्यक्रम संपल्यावर श्रीमंत बाबासाहेब श्रीरामनवमीच्या उत्सवाकरितां भोरास आले. रामनवमीचा उत्सव झाल्यावर ते ता. २२ एप्रिल रोजीं श्री. भाऊसाहेबांसह उन्हाळ्यानिमित्त महाबळेश्वरास गेले. तेथें त्यांचा वेळ हिंडण्याफिरण्यांत व मोठमोठ्या लोकांच्या भेटी घेण्यांत जात असे. मेअखेर ते भोरास परत आले. नवीन गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन आपल्या पत्नीसह महाबळेश्वराहून ता. ९ जून रोजीं शिरवळावरून पुण्यास जाणार होते. त्या संधीचा फायदा घेऊन श्रीमंत बाबासाहेबांनीं शिरवळ येथें चहा व पानसुपारी घेण्याबद्दल गव्हर्नरसाहेबांना विनंति केली व ती त्यांनीं मान्य केली म्हणून श्रीमंत बाबासाहेब ता. ८ रोजींच शिरवळास गेले; व गव्हर्नरसाहेबांच्या स्वागतार्थ उत्तम तयारी केली. संस्थानांत त्यांचें स्वागत करण्याचा हा पहिलाच प्रसंग असून तो आपल्या तालुक्याच्या मुख्य ठिकाणीं आला याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांना फार आनंद वाटला. ठरल्याप्रमाणें ता. ९ रोजीं लॉर्ड विलिंग्डन आपल्या पत्नीसह शिरवळास आले. श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांचें स्वागत केल्यावर चहापान झालें. चहापान चालू असतांना गव्हर्नरसाहेब व लेडीसाहेब यांच्याबरोबर संभाषण करण्याची श्रीमंत बाबासाहेबांना अनायासेंच संधि मिळाली. त्यांनीं गव्हर्नरसाहेबांना आपल्या तालुक्याची थोडक्यांत माहिती दिली. संभाषणप्रसंगानें गव्हर्नरसाहेब व लेडीसाहेब यांचा श्रीमंत बाबासाहेब यांच्याबद्दल अनुकूल ग्रह झाला व पुढें त्यांच्या सहानुभूतीचा लाभ श्रीमंत बाबासाहेबांना झाल्यावांचून राहिला नाहीं. चहापानानंतर गव्हर्नरसाहेबांना व लेडीसाहेबांना पुष्पहार, पानसुपारी, अत्तर-गुलाब देण्यांत आल्यावर उभयतां स्वाऱ्या पुण्यास रवाना झाल्या.

यापुढें श्रीमंत बाबासाहेब दीड दोन महिने पुण्यासच होते. ता. १३ ऑगस्ट रोजीं ते सहकुटुंब शिरवळास गेले व तेथें एक महिना तालुक्याचें कामकाज पाहून ता. ३ सप्टेंबर रोजीं भोरास श्रीगणपती-उत्सवा-करितां गेले. तेथें विजयादशमी होईपर्यंत त्यांनीं मुक्काम केला व नंतर ते शिरवळास गेले.

## शिरवळ तालुक्याची जमाबंदी

श्रीमंत बाबासाहेबांनीं शिरवळ तालुक्याचें काम पाहण्यास सुरुवात केल्यानंतर तालुक्यांतील सर्व गांवें समक्ष पाहून लोकस्थिति समजावून घेण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. पर्जन्यकाल संपल्यानंतर जमाबंदीचे दिवस आल्यावर त्यांनीं गांवगन्ना फिरण्याचा कार्यक्रम तयार करून फिरतीची तयारी केली. कोणकोणत्या ठिकाणीं मुक्काम ठेवून तेथून कोणकोणतीं गांवें पाहावयाचीं हेंहि त्यांनीं निश्चित केलें.

त्याप्रमाणें ता. ४ डिसेंबर रोजीं सकाळीं श्रीमंत बाबासाहेब फिरतीवर जाण्यास निघाले व पहिला मुक्काम आंबवडें येथें केला. आंबवडें गांवची तपासणी केली. तेथील शाळेस भेट दिली. ता. ६ रोजीं सायंकाळीं घोड्या-वरून कर्नवड व वावेघर या दोन गांवांस जाऊन आले. ता. ७ रोजीं सायंकाळीं रावडी या गांवची पाहणी केली व परत आंबवड्यास आले. ता. ८ रोजीं थिटेघर व चिखलगांव हे दोन गांव तपासले. ता. ९ रोजीं करंजें व सांगवी ह्या गांवांस भेट दिली. ता. १० रोजीं नाझरें व पानवहाळ, ता. ११ रोजीं म्हाकोशी, वडतुंबी व कोर्लें या तीन गांवांची पाहणी केली. नंतर ता. १२ रोजीं ते घोड्यावरून भोरास आले. येतांना वाटेंत नाटंबी व आंबेघर या गांवांची पाहणी केली. यापुढील जमाबंदीचें काम, श्रीमंत बाबासाहेबांना श्रीमंत सौ. जिजीसाहेब यांच्याबरोबर काशी, प्रयागकडे यात्रेस जाण्याबद्दल श्रीमंत रावसाहेबांकडून निरोप आल्यामुळें, तसेंच अर्धवट सोडून भोरास यावें लागलें. हें अपुरें राहिलेलें काम यात्रेहून परत आल्यावर ता. २८ जानेवारी पासून १८ फेब्रुवारीपर्यंत पुन्हां दौरा काढून त्यांनीं पुरें केलें.

ता. २८ जानेवारी ते ता. १८ फेब्रुवारीपर्यंत श्रीमंत बाबासाहेबांनीं ठरविलेल्या गांवांपैकीं बाकी राहिलेल्या २३ गांवांची तपासणी केली.

पहिला मुक्काम भोर येथें केला. तेथून येवली व सांगवी या गांवांची तपासणी फेब्रुवारी ता. ३ रोजीं केली. ता. ४ रोजीं उत्रवली व वडगांव या दोन गांवांची तपासणी केली. वडगांवच्या देशमुखांनीं पानसुपारी केली. ता. ५ रोजीं वेनवडी, पोंबर्डी व शिरवली हीं तीन गांवें व ता. ७ रोजीं खानापूर व भाबवडी हीं गांवें तपासलीं.

ता. ९ रोजीं घोड्यावर बसून श्रीमंत भाऊसाहेब यांच्यासह हतनोशी हा गांव पाहून मुक्कामास स्वाऱ्या बाजारवाडीस गेल्या. दुसऱ्या दिवशीं सकाळीं विचित्रगड किल्ल्यावर गेले. तेथें तंबूमध्यें मुक्काम केला. किल्ल्यावर एक दिवस राहून तेथील स्थळें पाहून दुसऱ्या दिवशीं परत बाजारवाडीस आले. ता. १२ रोजीं धावडी व पळसोशी हीं गांवें तपासलीं.

सायंकाळीं सात वाजतां निघून स्वाऱ्या मुक्कामास नेरें येथें आल्या. ता. १३ रोजीं निळकंठ व गोकवडी या गांवांस भेट दिली व मुक्काम नेरें येथेंच केला. दुसऱ्या दिवशीं सर्व बरोबरच्या मंडळींसह स्वाऱ्या अंबाडखिंडीवर गेल्या. सायंकाळीं मांढरदेवीचे दर्शनास स्वाऱ्या गेल्या होत्या. ता. १५ रोजीं सायंकाळीं अंबाडखिंडीच्या डोंगरावरील तांब्याच्या खाणी पाहून श्रीसोमेश्वराचें दर्शन घेऊन स्वाऱ्या खिंडीवर परत मुक्कामास आल्या.

ता. १६ रोजीं अंबाडखिंडीवरून उतरून वाटेंतील अंबाडें गांव तपासून मुक्काम पालें येथें केला. तेथून दुसऱ्या दिवशीं तीन वऱ्हवड्या तपासून ता. १८ रोजीं स्वाऱ्या भोरास परत आल्या. भोराहून सायंकाळीं ते भोलावडें व किवत हीं गांवें तपासून आले. कार्यक्रमाप्रमाणें वरील सर्व गांवें तपासून झाल्यावर श्रीमंत बाबासाहेब ता. २१ रोजीं सकाळीं शिरवळ येथें परत गेले.

याप्रमाणें दरसाल तालुक्यांत जमाबंदीनिमित्त दौरा काढून निरनिराळ्या गांवांची त्या त्या ठिकाणीं समक्ष जाऊन पाहणी करण्याचा प्रघात श्रीमंत बाबासाहेबांनीं ठेविला होता. त्यामुळें तीनचार वर्षांत त्यांच्या ताब्यांत असलेल्या तालुक्यांतील सर्व गांवांची त्यांना माहिती करून घेतां आली. प्रत्येक गांवांतील लोकांना आपल्या राजेसाहेबांची पायधूळ आपल्या गांवास लागली याबद्दल धन्यता वाटून ते त्यांचें अत्यंत प्रेमानें, भक्तीनें व राजनिष्ठापूर्वक प्रत्येक ठिकाणीं स्वागत करीत असत. प्रत्येक ठिकाणीं श्रीमंत बाबासाहेब स्वतः हिंडून गांवांत लोकांशीं मनमोकळेपणानें बोलून त्यांचीं सुखदुःखें समजून घेत. लोकहि आपल्या अडचणी काय आहेत हें त्यांना निर्भय मनानें सांगत असत. याप्रमाणें त्यांचें तपासणीचें काम चालत असे, व काय सुधारणा केल्या पाहिजेत याबद्दल ते प्रतिवर्षी हुजूरकडे रिपोर्ट करीत असत. भोर येथें नीरा नदीवर पूल नसल्यामुळें दरसाल पावसाळ्यांत अपघात होत असल्याचें त्यांना

माहीत होतें. शिवाय भोर शहराशीं नदीच्या पलीकडील भागांतील लोकांचें पावसाळ्यांत कांहीं दिवस तरी दळणवळण बंद होऊन त्यांचे हाल होत असत. या पुलाची आवश्यकता श्रीमंत बाबासाहेबांच्या लक्षांत येऊन त्यांनीं आपल्या पहिल्या वर्षाच्या रिपोर्टांत या पुलाचें काम शक्य तितक्या लवकर हातीं घेण्याबद्दल हुजुरांना शिफारस केली होती. शिरवळ तालुक्याचें काम पाहण्यास सुरुवात केल्यानंतर श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या कारभाराचा अहवाल दरसाल तयार करून त्याची एक प्रत हुजूर व एक प्रत हुजूरमार्फत पोलिटिकल एजंट व कमिशनरमार्फत मुंबई सरकारकडे पाठविण्याची वहिवाट ठेविली होती. हा उपक्रम कोणत्याहि संस्थानांत झालेला नव्हता. त्या अहवालावरहि कलेक्टर-कमिशनरचे शेरे होऊन सरकारी ठरावहि होऊं लागले. वर लिहिल्याप्रमाणें पहिल्या सालच्या रिपोर्टांतच वरील पुलाची सूचना केलेली आहे. परंतु हें काम श्रीमंत रावसाहेबांना अनेक अडचणींमुळें हातीं घेतां आलें नाहीं.

नीरेवर पूल बांधण्यासंबंधानें व शिरवळ येथें म्युनिसिपालिटी स्थापन करण्यासंबंधांत पोलिटिकल एजंटांचें येणेंप्रमाणें मत होतें :

No. P. P. P. R. B. 22/1
Poona 1st August 1916.

5. During the year the State paid a contribution of Rs. 25000 towards the construction of a bridge over the Gunjavani river. With the bridge built and a way for carriages secured over the New Bhatghar Dam, the need for a bridge over the Nira opposite the town of Bhor will become urgent. There is probably no public work that could be undertaken in the Bhor State which would be of greater utility.

7. A separate report for the Shirval Taluka submitted by Meherban Raghunathrao, the Chief's son and heir, is attached. It is well written and deals with several matters of interest. At Shirval, an important market town, with a population of 2506, there is certainly room for more progressive municipal administration, the first essential to revise the schedule of taxation When this has been done and a substantial balance

of income over expenditure provided, then the Municipality might well apply to the State for a loan and a grant-in-aid to enable them to obtain their chief desideratum viz: a pure water supply."

G. W. Hatch,
Political Agent.

No. Genl. 1133 of 1916.
Poona 14th August 1916.

Submitted to the Government in the Political Department.

2. The attention of His Highness may also be invited to the need of a bridge over the Nira opposite Bhor.

C. N. Seddon,
Commissioner, C. D.

The Government is pleased to make the following resolution upon the administration report of the Bhor State together with that of Srimant Babasaheb's charge for the year 1915-16.

Government of Bombay,
Political Department,
Resolution No. 7530.
Bombay Castle, 17th October 1916.

Resolution—The State enjoyed a prosperous year and its report is a record of careful administration. The Governor-in-Council desires to commend to the consideration of His Highness the Chief Commissioners' suggestions in connection with the Police and the bridge over the Nira. The Political Agent's suggestions as regards the Shirval Municipality also appear deserving of attention.

2. The Governor-in-Council is glad to notice that His Highness has placed his son in charge of a definite portion of the State in the management of which Shrimant Babasaheb appears to take a lively interest.

A. F. Kinderslay,
Under-Secretary to Government.

शिरवळ गांव पुणें-सातारा-महाबळेश्वर या रहदारीच्या रस्त्यावर असून तेथील लोकसंख्याहि २ हजारांच्या वर आहे. शिवाय हा गांव तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. या ठिकाणीं दवाखान्याची सोय नव्हती, यामुळें लोकांची फार गैरसोय होत होती. ही उणीव दूर करण्याकरितां श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या सालींच दवाखान्याची मागणी केली. कै. श्रीमंत रावसाहेबांनीं ही मागणी तत्काळ मान्य करून सन १९१४ सालीं शिरवळ येथें दवाखाना सुरू केला, व त्यावर एका एल्. सी. पी. एस्. पास झालेल्या डॉक्टरची नेमणूक करण्यांत आली.

हा दवाखाना सुरू केल्यामुळें शिरवळ व आसपासच्या गांवांतील लोकांची औषधोपचार वगैरेंची चांगली सोय झाली. सन १९१७ सालीं भोर येथें प्लेग सुरू झाला. त्या वेळीं शिरवळ गांव भोरपासून सुमारें १० मैलच लांब असल्यानें तेथें प्लेग होण्याचा संभव होता. म्हणून श्रीमंत बाबासाहेबांनीं तेथें श्रीमंत रावसाहेबांच्या परवानगीनें प्रतिबंधक उपाय म्हणून इनॉक्युलेशन सुरू करण्याचें ठरविलें, व शिरवळ येथें ता. १ सप्टेंबर सन १९१७ रोजीं आपल्या अध्यक्षतेखालीं सभा भरविली. या सभेंत संस्थानचे त्या वेळचे चीफ मेडिकल ऑफिसर डॉ. आर. पी. दिवाण हेहि हजर होते. डॉ. दिवाण यांनीं इनॉक्युलेशनपासून काय फायदे आहेत तें लोकांना समजावून दिलें व लोकांची भीति दूर होण्याकरितां त्यांनीं जमलेल्या लोकांसमक्ष चारपांच इसमांना टोंचलें. पुढें टोंचलेल्या इसमांना कांहीं त्रास झाला नाहीं, असें पाहून १५३ लोकांनीं टोंचून घेतलें. त्यानंतर शिरवळ येथेंहि प्लेग सुरू झाला. त्या वेळीं १५३ लोकांपैकीं कोणीहि दगावलें नाहीं. यामुळें इनॉक्युलेशनवर लोकांची श्रद्धा बसली.

## मुलकी, दिवाणी, व फौजदारी अधिकारांची अंमलबजावणी

राज्यकारभारपद्धतींतील दोष जरी श्रीमंत बाबासाहेबांच्या लक्षांत आले होते व कांहीं सुधारणा करणें जरी त्यांना इष्ट वाटत होतें तरी त्या वेळीं प्रचलित असलेल्या पद्धतींत कोणत्याहि प्रकारें फेरफार करण्याचा त्यांना अधिकार नव्हता. जी पद्धति चालू होती त्या पद्धतीला अनुसरूनच चालणें त्यांना भाग होतें. त्याप्रमाणें वागण्याचें धोरण ठेवून आपल्या ताब्यांतील रयतेवर जुलूम, जबरदस्ती न होऊं देणें, रयतेला योग्य न्याय मिळणें, रयतेच्या

योग्य तक्रारींची दाद घेणें, इत्यादि गोष्टींबद्दल ते फार दक्ष असत. ज्या गांव-कामगारांचें वर्तन अयोग्य व हलगर्जीपणाचें आढळून आलें व ज्या नोकरांची आपल्या कामांत कसूर दिसून आली त्यांना योग्य शासन करण्यास त्यांनीं कधीं कमी केलें नाहीं. याचा परिणाम होऊन प्रत्येक नोकर आपलें काम दक्षतेनें करूं लागला व लोकांची दाद लवकर लागूं लागली.

खातेदार मयत झाला असून त्याच्या वारसाचें नांव दाखल करण्यांत येत नाहीं ही स्थिति श्रीमंत बाबासाहेबांच्या लक्षांत आली, तेव्हां खातेदार मयत होतांच रिपोर्ट करून खातीं बदलण्याबद्दल कुळकर्ण्यांना सक्तीचे हुकूम देण्यांत आले. मामलेदार यांच्याकडून रयतेला सारा भरण्याचीं पावतीबुकें पुरविण्यांत येत नसत. ही स्थिति अनिष्ट वाटून कुळांनीं पावतीबुकें ठेवलींच पाहिजेत असे सक्तीचे हुकूम देण्यांत आले.

रयतेला आपल्या गरजा काय आहेत त्या मांडण्याकरितां संस्थानांत लोकल बोर्डस् स्थापन करण्याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांनीं हुजूर शिफारस केली होती. परंतु शिफारशीचा उपयोग आला नाहीं.

शिरवळ येथें म्युनिसिपालिटी होती; पण नियम वगैरे कांहीं नव्हते. अगदीं क्षुल्लक खर्चाच्या बाबीसहि हुजूर मंजुरी लागत असे. ही स्थिति सुधारण्याकरितां मि. माउंटफोर्ड हे शिरवळास आले होते त्या वेळीं त्यांनीं कांहीं सूचना केल्या होत्या. त्यांच्या शिफारशींप्रमाणें श्रीमंत बाबासाहेबांनीं कमिटीचा कारभार पद्धतशीर चालण्याकरितां नियम तयार करून ते हुजूरकडे पाठविले होते.

दिवाणी व फौजदारी कामांत लोकांना योग्य न्याय मिळावा याबद्दल ते फारच काळजी घेत असत. पहिल्या सालींच त्यांच्यापुढें एक खुनाचा खटला आला. त्या वेळीं संस्थानास फांशीची शिक्षा देण्याचा अधिकार नव्हता. खटल्याची पूर्व चौकशी करून अखेर-निकालाकरितां खटला पोलिटिकल एजंटकडे पाठवावा लागत असे. कमिटिंग मॅजिस्ट्रेट या नात्यानें श्री. बाबा-साहेब यांनीं वरील खुनाच्या खटल्याचें काम चालवून तो खटला त्या वेळचे पोलिटिकल एजंट मि. माउंटफोर्डसाहेब यांच्याकडे पाठविला. मि. माउंटफोर्ड-साहेबांनीं सदर खटल्याचें काम चालवून खुनी इसमास फांशीची शिक्षा

दिली. त्या वेळीं त्यांनीं आपल्या निकालांत श्रीमंत बाबासाहेब यांच्या न्याय-निपुणतेबद्दल पुढील उद्‌गार काढले आहेत :

"The Lower Court tried the case carefully and showed a proper appreciation of the evidence."

दिवाणी कामांतहि रयतेला योग्य न्याय मिळण्याविषयीं त्यांचा फार कटाक्ष असे. कांहीं शायलॉकी सावकारांच्या कचाट्यांत सांपडून कुळें कशीं धुळीस मिळतात याची त्यांना पूर्ण कल्पना असल्यामुळें दिवाणी दाव्यांतील पुराव्याची छाननी करून सत्य निवडून काढण्याकडे त्यांची नेहमीं प्रवृत्ति असे, व त्यामुळें अनेक कुळांचा बचाव झालेला आहे. सावकारांच्या रीतसर येण्याची काळजी घेण्याकडेहि त्यांचें लक्ष असे.

दिवाणी अपिलांचा निकाल देतांना त्यांनीं कोणाचीहि भीड कधीं ऐकिली नाहीं. त्यांच्यापुढें जीं दिवाणी अपिलें आलीं त्यांत कितीएक मित्र व आप्तेष्ट वगैरेंचीं होतीं. श्रीमंत बाबासाहेबांनीं न्याय देण्याच्या कामीं मैत्री, आप्तपणा वगैरे संबंध बिलकुल लक्षांत न घेतां त्यांच्या विरुद्ध निकाल दिले. यामुळें त्यांच्या न्यायनिष्ठुरतेचीहि सर्वत्र प्रशंसा झाली.

गरीब व अशिक्षित लोकांच्या हिताकरितां संस्थानांत ट्रान्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्ट लागू करण्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांनीं श्रीमंत रावसाहेबांना शिफारस केली होती. त्याप्रमाणें संस्थानांत तो ॲक्ट लागू करण्यांत आला व आपल्या शिफारशीचा उपयोग झालेला पाहून श्रीमंत बाबासाहेबांना समाधान वाटलें. भोर येथील मुनसफ कोर्टाची त्यांना तपासणी करण्याची परवानगी मिळाल्यावर त्यांनीं कोर्टाच्या कामकाजाच्या पद्धतींत कांहीं सुधारणा घडवून आणल्या. त्यांच्याच शिफारशीवरून आंगठे घेण्याची पद्धति संस्थानांत सुरू करण्यांत आली.

श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या तालुक्याच्या ९ वर्षांच्या कारकीर्दींत आपलें काम किती चोख रीतीनें बजाविलें होतें हें त्यांच्या कामाबद्दल दरसाल पोलिटिकल एजंट, कमिशनर व मुंबई गव्हर्न्मेंट यांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या वार्षिक रिपोर्टांवर जे प्रशंसापर उल्लेख केले आहेत त्यांवरून दिसून येईल. त्यांपैकीं कांहीं महत्त्वाचे उल्लेख खालीं दिले आहेत :

Remarks of Mr. A. S. A. Westroppe, Political Agent, Bhor,
No. P. P. P. R. B. 22-3
Poona, 4th Aug. 1917.

Forwarded with compliments to the Commissioner, C.D.

"9. Shrimant Raghunathrao, the Chief's son and heir, has furnished the Political Agent with a copy of his annual Administration Report relating to his work in the Shirval Taluka of the State, the administration of which has been entrusted to his charge by His Highness. The report is most carefully compiled and gives an interesting account of the writer's activities during the year. It evidences an earnest desire for the welfare of the people and a close personal knowledge of the details of administration. Shrimant Raghunathrao has shown industry and public spirit and it is hoped that he will not relax his efforts, which are already bearing fruit, to secure the orderly progress of the institution entrusted to his charge."

Remarks of Mr. C. N. Seddon, Commissioner, C. D.

No. A 1242 of 1917
Poona, 16th August 1917.

Submitted to Government in the Political Department.

"6. The Commissioner agrees with the Political Agent in his appreciation of the continued good administration of the Shirwal Taluka by Shrimant Raghunathrao, the Chief's son, a copy of whose report is also attached."

Government Resolution.

Resolution No. 7577.
Government of Bombay.
Political Department,
Bombay Castle, 8th October 1917.

Resolution......

"4. Shrimant Raghunathrao has submitted a careful report on the administration of the Shirwal Taluka, which has been entrusted to him by His Highness. His progressive ideas and devotion to public interests should be of much assistance to His Highness."

Remarks on the Administration Report for 1920-21 made by the Political Agent Mr. W. F. Hudson.

No. P. P./P. R. B./22/11
Dated 11th August 1921.

"The Administration Report of the Vichitragad is, as usual, submitted to Government herewith. It shows that Shrimant Raghunathrao in his capacity as Asst. Collector and Asst. Judge is acquiring useful experience and making the most of his rather restricted opportunities."

## युरोपांतील सन १९१४ ते १९१८ सालचें महायुद्ध व त्यांतील श्रीमंत बाबासाहेब यांची कामगिरी

सन १९१४ ते १९१८ हीं चार वर्षें युरोपांत अत्यंत धामधुमीचीं गेलीं. युरोपांतील प्रमुख राष्ट्रांराष्ट्रांत घनघोर महायुद्ध चार वर्षें चालू होतें. ता. २८ जुलै सन १९१४ इ. रोजीं महायुद्धास सुरुवात झाली. व ता. ११ नोव्हेंबर सन १९१८ इसवी रोजीं अर्मिस्टिसवर सह्या होऊन युद्ध समाप्त झालें.

या युद्धाचीं कारणें पुढीलप्रमाणें दिसून येतात: मूळ भांडण ऑस्ट्रिया, हंगेरी व सर्व्हिया यांच्या दरम्यान. ऑस्ट्रियाचे युवराज व युवराज्ञी यांचा सर्व्हियांत ता. २७ जून १९१४ रोजीं खून झाला. यामुळें ऑस्ट्रियानें सर्व्हियाविरुद्ध ता. २८ जुलै रोजीं युद्ध सुरू केलें. सर्व्हियास रशियाची मदत मिळाली. यामुळें जर्मनीनें ऑस्ट्रियाची बाजू घेतली. फ्रान्सचा रशियाशीं तह झाला असल्यामुळें जर्मनीनें फ्रान्सविरुद्ध युद्धाची तयारी केली व फ्रान्सवर बेल्जममधून जाऊन हल्ला करण्याचें ठरविलें. बेल्जमनें आपल्या राष्ट्रांतून जाण्यास विरोध केल्यामुळें जर्मनीनें प्रथम बेल्जमवर हल्ला केला. बेल्जमचें संरक्षण करण्याचें इंग्लंडनें अभिवचन दिलें असल्यामुळें इंग्लंडला या युद्धांत पडावें लागलें, व ता. ४ ऑगष्ट रोजीं इंग्लंडनें जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारलें. इंग्लंड युद्धांत पडल्यामुळें ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व देशांना इंग्लंडला मदत करणें हें त्यांचें कर्तव्य असल्यामुळें हिंदुस्थानचाहि या युद्धाशीं संबंध आला व ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानिक यांनीं सर्व प्रकारें इंग्लंडला त्या वेळीं मदत केली.

कै. हिज हायनेस रावसाहेब यांनीं एक लाख रुपये देण्याची इच्छा असल्याचें मुंबई सरकारास कळविलें. मुंबई सरकारनेंहि या देणगीचा साभार स्वीकार करून मुंबई शाखेच्या इंपीरिअल रिलीफ फंडास ही रक्कम देण्याबद्दल श्रीमंत रावसाहेबांना सुचविलें. त्याप्रमाणें श्रीमंत रावसाहेबांनीं ती रक्कम सदर फंडास दिली. श्रीमंत बाबासाहेबांना वास्तविक युद्धाच्या कामीं निराळी मदत करण्याचें कारण नव्हतें. तथापि सार्वभौम सरकारास अशा बिकट प्रसंगीं यथाशक्ति मदत करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे असें वाटून त्यांनीं मदत करण्याचें ठरविलें; व आपल्या खाजगी नेमणुकींतून एक हजार रुपये सदर फंडास पाठविले. त्याबद्दल मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींचें पुढील पत्र आलें.

Ganesh Khind,
23rd August, 1914.

My dear Sir,

I am desired by His Excellency to acknowledge your letter dated August, 1914 and to thank you for your generous subscription to the Imperial Indian Relief Fund.

Yours sincerely,
C. C. Watson.

पुढें महायुद्धाच्या फंडास निरनिराळ्या प्रकारांनीं मदत करण्याकरितां जे जे प्रसंग आले त्या त्या प्रसंगीं श्रीमंत बाबासाहेब हजर राहून यथाशक्ति हातभार लावण्यास नेहमीं तत्पर असत.

ता. ४ ऑगस्ट सन १९१४ इ. रोजीं इंग्लंड युद्धांत सामील झालें म्हणून युद्धसमाप्तीपर्यंत तो दिवस प्रतिवर्षीं प्रार्थनेचा दिवस म्हणून सर्व ब्रिटिश साम्राज्यांत पाळला जात असे. श्री. बाबासाहेबांनींहि या दिवशीं दरसाल शिरवळ येथें सभा भरवून इंग्लंड व इंग्लंडच्या बाजूनें लढणारीं राष्ट्रें यांना विजयश्रीनें माळ घालावी म्हणून परमेश्वराची प्रार्थना करण्याचा क्रम सुरू ठेविला होता.

ता. २८ जून सन १९१६ इ. रोजीं पुणें येथें बॉंबे प्रेसिडेन्सी वॉर रिलीफ फंडाच्या स्त्री-शाखेची सभा भरली होती. या सभेचें निमंत्रण आल्यावरून श्रीमंत बाबासाहेब सदर सभेस हजर राहिले. जखमी शिपायांना मदत करण्याचें काम चालविण्याकरितां लोकांची सक्रिय सहानुभूति संपादन केली

पाहिजे व त्याकरितां जोराचे प्रयत्न झाले पाहिजेत व तसे प्रयत्न सुरू करावेत हा या सभेचा हेतु होता. श्रीमंत बाबासाहेबांना हा स्तुत्य हेतु मान्य होऊन त्यांनीं आपल्या अध्यक्षतेखालीं शिरवळ येथें सदर फंडास मदत मिळविण्याकरितां ता. २६ जुलै सन १९१६ इ. रोजीं सभा भरवून जखमी शिपाई व त्यांचीं कुटुंबें यांना मदत करून त्यांचीं दुःखें निवारण करण्याची किती आवश्यकता आहे व हें काम किती पवित्र आहे हें त्यांनीं इतक्या हृदयभेदक शब्दांनीं सांगितलें कीं, जागच्या जागीं शिरवळसारख्या गरीब वस्तीच्या लहान गांवीं शंभर रुपये जमले. ते रुपये त्यांनीं पोलिटिकल एजंटमार्फत वरील फंडाकडे पाठविले. पोलिटिकल एजंटकडून श्रीमंत बाबासाहेबांच्या ह्या तळमळीच्या कार्याबद्दल त्यांना आभारप्रदर्शक पत्र आलें.

महायुद्धास सुरुवात झाल्यानंतर जर्मनीनें प्रथम बेल्जमवर हल्ला केला. या लहान राष्ट्राच्या संरक्षणार्थच इंग्लंडला या युद्धांत पडावें लागलें. जर्मनीच्या पहिल्या दमास बेल्जम बळी पडल्यामुळें त्या राष्ट्राचें अतोनात नुकसान झालें. नामूर, अँटवर्पसारखे दुर्भेद्य किल्ले जर्मनीच्या अजस्र तोफांच्या माऱ्यामुळें जमीनदोस्त झाले. अनेक कुटुंबें धुळीस मिळालीं. हजारों मुलें निराश्रित होऊन अनाथ झालीं. ह्या अनाथ मुलांच्या रक्षणार्थ हिंदुस्थानावरील व इतर देशांतील बालकवर्गाकडून वर्गणी जमविण्याचें ठरून ‘बेल्जम चिल्ड्रेन्स डे’ म्हणून एक दिवस नेमण्यांत आला होता. या दिवशीं ठिकठिकाणीं विद्यार्थिवर्गाला एकत्र जमवून त्यांना जर्मनीच्या राक्षसी वर्तनामुळें बेल्जममधील मुलांची कशी करुणास्पद स्थिति झाली आहे हें समजावून द्यावयाचें होतें. सन १९१६ सालांतील जुलै महिन्याची १० वी तारीख या कार्याकरितां ठरविण्यांत आली होती. भोर येथें हा दिवस श्रीमंत बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखालीं भोर हायस्कुलांत साजरा करण्यांत आला. या दिवशीं भोरांतील सर्व मुलें हायस्कूलच्या हॉलमध्यें जमलीं होतीं. या प्रसंगीं सर्व अधिकारीवर्ग व प्रमुख नागरिक हजर होते. श्रीमंत बाबासाहेब यांनीं जर्मनीच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेमुळें युद्ध सुरू होऊन त्यामुळें जगावर केवढें मोठें संकट ओढवलें आहे, निरपराधी बालकें उघडीं पडून त्यांचे कसे हाल होत आहेत, याचें यथातथ्य शब्दचित्र विद्यार्थ्यांपुढें उभें केलें. ( त्याचें समग्र भाषण परिशिष्ट ‘छ’ मध्यें दिलें आहे. )

तेव्हां विद्यार्थिवर्गाचीं अंतःकरणें या करुण कहाणीनें हादरून जाऊन त्यांनीं या अनाथ मुलांकरितां वर्गणी जमविण्याचें ठरविलें. हायस्कूल विद्यार्थ्यांनीं जागच्या जागीं ५० रु. वर्गणी जमा केली. श्रीमंत भाऊसाहेब हे त्या वेळचे हायस्कूलचे विद्यार्थी असून वरील प्रसंगीं हजर होते. त्यांनींहि वरील वर्गणींत आपल्या पंधरा रुपये वर्गणीची भर घातली. भोरप्रमाणें शिरवळच्या शाळेंतील मुलांकडूनहि त्याच दिवशीं वर्गणी जमा करण्यांत आली.

इंग्लंडला पैशाची मदत करण्याकरितां हिंदुस्थानांत कांहीं मुदतीचें युद्धकर्ज उभारण्याची हिंदुस्थान सरकारनें एक योजना तयार केली. गरीबांपासून श्रीमंतांपर्यंत सर्वांना या योजनेचा फायदा घेतां यावा म्हणून वॉर बॉन्डस् व पोस्टल कॅश सर्टिफिकिटें काढण्यांत आलीं. कै. हिज हायनेस श्रीमंत शंकरराव रावसाहेब यांनीं ५ लाखांचे वॉर बॉन्ड घेण्याचें ठरविलें व संस्थानच्या प्रत्येक तालुक्यांतील प्रजेंत १५००० रुपयांचे वॉर बॉन्ड व कॅश सर्टिफिकिटें खपविण्याकरितां त्या त्या तालुक्याच्या अंमलदारांस कळविलें होतें. भोर शहर सोडून शिरवळ तालुक्यांत १५ हजार रुपयांचें कर्ज उभारण्याची जबाबदारी अर्थातच श्रीमंत बाबासाहेबांच्यावर येऊन पडली, व ती त्यांनीं उत्तम रीतीनें पार पाडली. त्यांनीं शिरवळच्या व आसपासच्या गांवांतील लोकांची शिरवळ येथें प्रचंड सभा भरविली व सदर सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारून जमलेल्या लोकांना युद्धकर्जाची योजना चांगल्या रीतीनें समजावून दिली. ब्रिटिश सरकारला दिलेलें कर्ज सव्याज परत मिळणारें असून युद्धासारख्या आणीबाणीच्या प्रसंगीं सरकारला मदत केल्याचें श्रेयहि मिळणारें आहे, याकरितां सरकारनें काढलेले वॉर बॉंड व कॅश सर्टिफिकिटें घेण्यास कोणीहि भिण्याचें कारण नाहीं, अशा आशयाचें श्रीमंत बाबासाहेब यांचें उत्तेजनपर भाषण झालें. नंतर तालुक्यांत कर्जाची रक्कम जमा करण्याचें काम सुरू झालें, व पंधरा हजार रुपयांऐवजीं २६११४ रुपये युद्धकर्जाकरितां जमा झाले. त्यामध्यें श्रीमंत बाबासाहेबांनीं ५०० रुपयांचीं कॅश सर्टिफिकिटें घेतलीं. अपेक्षेपेक्षां अकरा हजार रुपये जास्त जमले याचें कारण श्रीमंत बाबासाहेबांनीं या कामीं पुढाकार घेतला होता हेंच होय.

ता. २ व ३ ऑगस्ट सन १९१७ इसवी या दोन दिवशीं पुणें येथें जिमखाना व लेडीज क्लबांत सोल्जरांच्या कलाकौशल्याचें प्रदर्शन व गार्डन-फेटहि ( मीना बाजार ) वॉर ॲण्ड रिलीफ फंडाच्या स्त्री-शाखेच्या मदतीकरितां भरविण्यांत आली होती. त्या वेळीं वरील फेट( मीना बाजार )करितां मिसेस वेस्ट्रॉप, पोलिटिकल एजंटसाहेब यांचें कुटुंब, यांनीं लकी बॅगची योजना केली होती. त्या लकी बॅगकरितां श्री. सौ. वहिनीसाहेब यांनीं चांदीच्या दोन फोटोफ्रेम्स दिल्या होत्या. या देणगीबद्दल मि. वेस्ट्राप यांचें श्रीमंत बाबासाहेब यांना पुढील पत्र आलें होतें:—

Dear Shrimant Babasaheb,

Very many thanks for the extremely nice frames. They are most acceptable and will form delightful prizes for the "Lucky Bag". Please convey our thanks to your wife.

With kind regards.

Yours sincerely,
A. S. A. Westroppe.

याच फंडाच्या मदतीकरितां सन १९१८ सालीं सप्टेंबर महिन्यांत लेडी विलिंग्डन यांनीं पुणें येथें मीनाबाजार ( फेट ) भरविला होता. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं तेथें जाऊन कांहीं जिनसा खरेदी केल्या. याच महिन्यांत दुसरें युद्धकर्ज उभारण्यांत आलें. त्या कर्जाचे श्रीमंत रावसाहेब यांनीं आणखी ३ लाख रुपयांचे वॉर बॉंड घेतले. याप्रमाणें युद्ध सुरू झाल्यापासून युद्धांतील आपद्ग्रस्तांना मदत करण्याकरितां जे जे उपाय योजण्यांत आले त्या त्या सर्व प्रसंगीं श्रीमंत बाबासाहेबांनीं यथाशक्ति सक्रिय सहानुभूति दाखविण्यास मागेंपुढें पाहिलें नाहीं.

सन १९१८ सालीं हिंदुस्थानांत सैन्यभरतीचें काम सुरू झालें. भोर दरबारकडे शक्य ते प्रयत्न करून रिक्रूट मिळवून देण्याबद्दल लिहून आलें होतें. त्याप्रमाणें संस्थानांत रिक्रूट मिळवून देण्याचें काम सुरू करण्यांत आलें. तथापि रिक्रूट्स मिळविण्याची खटपट जितक्या जोरानें व्हावयास पाहिजे होती तितकी श्रीमंत रावसाहेबांच्याकडून होत नाहीं ही गोष्ट पो. ए. यांच्या लक्षांत आली होती व श्रीमंत बाबासाहेबांना पुरेसें काम नव्हतें हेंहि त्यांना माहीत होतें.

ं. म्हणून सन १९१७-१८ सालचा शिरवळ तालुक्याचा जो रिपोर्ट श्रीमंत बाबासाहेबांनीं श्रीमंत रावसाहेबांमार्फत पोलिटिकल एजंटांकडे पाठविला होता, त्यावर पोलिटिकल एजंट मि. ए. एस्. ए. वेस्ट्रॉप यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांना रिक्रूटिंग ऑफिसर नेमावें असा शिफारसवजा शेरा करून तो गव्हर्न्मेंट-कडे पाठविला.

Remarks of Mr. A. S. A. Westroppe, I.C.S.,
Political Agent, Bhor, for the year 1917-18

No. P. P. P. R. B. 22-8,
Dated 12th Aug. 1918.

Forwarded with compliments to the Commissioner, C. D.

"10. Progress in recruiting has been slow, but the Political Agent fully appreciates the difficulties of the situation and feels confident that every effort will be made to bring about better results in future. He has on various occasions suggested for His Highness' consideration that his son Shrimant Raghunathrao might with advantage be entrusted with the duty of furthering the movement and be so placed in a position to do so adequately and no doubt this course will appear to His Highness as an effective means of gaining the confidence of possible recruits in the State concessions and the advantageous British terms offered to them.

11. Shrimant Raghunathrao, the Chief's son and heir, has as usual prepared an interesting well-arranged report on the administration of the Vichitragada Taluka, entrusted to his charge, which is forwarded herewith.

The charge hardly seems to give a young man of his ability and energy sufficient scope ; but in the small State of Bhor in which the Chief himself takes due pleasure in personally discharging all the responsibilities of his position, there is little room for more extended activities on the part of Shrimant Raghunathrao. The vital importance of the recruiting movement, however, would seem to offer an opportunity for the display of energy and hard work on the part of Shrimant Raghunathrao of which His Highness will no doubt be glad to avail himself."

वरील शिफारशींप्रमाणें भोर संस्थानाकरितां श्रीमंत बाबासाहेब यांची असिस्टंट रिक्रूटिंग ऑफिसर म्हणून नेमणूक करण्याचें ठरविल्याचें श्रीमंत रावसाहेबांनीं कमिशनर मि. सी. एन्. सेडॉन यांना कळविलें. त्यांचें मत व त्यावर मुंबई सरकारचा पुढील ठराव होऊन आला होता तो येणेंप्रमाणें :

Remarks of the Hon'ble Mr. C. N. Seddon,
Commissioner, C. D.
No. A 835
Dated the 5th September 1919.

"Submitted to Government in the Political Department. The Commissioner has little to add to the Political Agent's remarks.

2. With respect to paragraphs 10 and 11 of the Political Agent's review, the Commissioner may observe that His Highness has agreed to depute his son on recruiting work in the State, and it is hoped that this arrangement will be productive of good results."

Government Resolution,
Government of Bombay.
Political Department,
Review No. 10393.
Bombay Castle, 10th December 1918.

2. "The question of recruiting was one of very great importance and it is a matter of congratulation that His Highness decided to employ upon this work the energies of Shrimant Raghunathrao. They have noted with interest Shrimant Raghunathrao's account of his administration of the Shirwal Taluka."

वरील उताऱ्यांवरून श्रीमंत बाबासाहेबांच्या उत्साहाची, कर्तबगारीची व धडाडीची मुंबई सरकारास व पोलिटिकल अधिकाऱ्यांस पूर्ण जाणिव होती असें दिसून येतें.

श्रीमंत बाबासाहेबांची सर्व संस्थानाकरितां असिस्टंट रिक्रूटिंग ऑफिसर म्हणून ता. १३ ऑगस्ट सन १९१८ इ. पासून नेमणूक करण्यांत आली.

श्रीमंत बाबासाहेबांचा उत्साह दांडगा असल्यामुळें हें काम यशस्वी रीतीनें करण्याचा त्यांना आत्मविश्वास वाटत होता. सप्टेंबर महिन्यांत मुद्दाम पुण्यास जाऊन डि. रिक्रूटिंग ऑफिसर मि. डोमिंगो यांच्याकडून त्यांनीं रिक्रूटिंगच्या कामाची माहिती घेतली व संस्थानांत सर्व ठिकाणीं त्यांनीं दौरा काढण्याचें ठरविलें. परंतु दुर्दैवानें संस्थानांत इन्फ्ल्युएन्झाची सांथ उद्भवून ती सर्व खेड्यांतून पसरली. त्यामुळें रिक्रूट मिळण्याच्या कामीं मोठी अडचण उत्पन्न झाली. तथापि या उत्पन्न झालेल्या विघ्नास न जुमानतां अंगीकृत कार्य शेवटास नेण्याचा निश्चय करून त्यांनीं शिरवळ येथें ता. ३० सप्टेंबर रोजीं व नसरापूर येथें ता. २३ ऑक्टोबर रोजीं सभा भरविल्या. दोन्ही ठिकाणीं इन्फ्ल्युएन्झाची सांथ जोरांत चालू होती. तथापि दोन्ही ठिकाणीं बरेच लोक जमले होते. सैन्यांत नांव दाखल केल्यास संस्थानांतून कोणकोणत्या सवलती मिळतील, इंग्रजी सरकारांतूनहि कोणकोणते फायदे मिळणारे आहेत, या सर्व गोष्टी श्रीमंत बाबासाहेबांनीं जमलेल्या लोकांस सांगून सैन्यांत दाखल होण्याकरितां त्यांचीं मनें वळविण्याचा प्रयत्न केला. इतर तालुक्याच्या ठिकाणींहि अशाच सभा भरविण्याचें त्यांनीं योजिलें होतें. परंतु सुदैवानें ता. ११ माहे नोव्हेंबर सन १९१८ इ. रोजीं युद्ध तहकूब झाल्याचें सर्व साम्राज्यांत कळविण्यांत आलें. त्यामुळें रिक्रूट-भरतीचें काम बंद करण्याबद्दल श्रीमंत रावसाहेबांकडून श्रीमंत बाबासाहेबांना हुकूम गेला. त्या हुकुमाप्रमाणें त्यांनीं आपलें काम बंद ठेविलें. युद्ध थांबल्याबरोबर जगांत सर्व आनंदाचें वातावरण निर्माण झालें. श्रीमंत बाबासाहेबांना कार्य करून दाखविण्याची जी संधि मिळाली होती ती वायां गेल्यामुळें त्यांना यत्किंचित्हि वाईट न वाटतां जगांत शांतता प्रस्थापित झालेली पाहून अत्यानंद झाला. त्यांना फक्त शिरवळ तालुक्याचेच मर्यादित अधिकार असल्यामुळें आपल्या अंगचें कर्तृत्व दाखविण्यास तें क्षेत्र अगदींच अपुरें होतें व म्हणूनच त्यांनीं वरील कामगिरी मोठ्या आनंदानें व उत्साहानें पत्करली होती. त्या अवधींत रिक्रूट-भरतीचें कामहि त्यांनीं मोठ्या धडाडीनें केलें व बरेचसे रिक्रूट मिळवून दिले.

सार्वभौम सरकार व ब्रिटिश साम्राज्य आणि त्यांचे दोस्त यांना महा-युद्धाच्या वेळीं मदत करून त्यांच्याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांनीं जी राजनिष्ठा

दाखविली होती तीबद्दल मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर-इन-कौन्सिल यांनीं सन १९१९ सालच्या ता. १९ जानेवारी व ८ मे च्या गॅझेटमध्यें दोन वेळ गुणग्रहणपर उल्लेख केलेले आहेत.

सन १९१८ सालीं लॉर्ड लॅमिंग्टन यांजकडे श्रीमंत बाबासाहेब यांनीं आपल्या तालुक्याचा वार्षिक रिपोर्ट पाठविला होता. त्या वेळीं त्यांचें जें उत्तर आलें त्यांतहि श्रीमंत बाबासाहेबांच्या रिक्रूटिंगच्या कामाचा उल्लेख केला आहे. तें पत्र खालीं दिलें आहे :

My dear friend,

I have again to thank you for a letter and the accompanying report on your administration for 1917-18. I am glad to read the complimentary remarks of the Political Agent and to know you were successful in obtaining recruits. The outlook is not very assuring but please God peace may be secured.

I thank you for your kind remarks about my son whom God preserved.

With every kind wish for you and your family and thanking you for your expressing of good will.

I am,
Yours sincerely,
Lamington.

युद्धसमाप्तीनंतर मि. स्विफ्ट यांचें विलायतेहून ता. ७ मार्च १९१९चें पत्र आलें. मि. स्विफ्ट हे पूर्वी पुण्याचे कलेक्टर व भोरचे पोलिटिकल एजंट असून त्यांची श्रीमंत बाबासाहेबांना किती मदत झाली होती हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. महायुद्ध सुरू झाल्यावर ते युरोपांतील रणभूमीवर गेले व त्यांनीं बरींच शौर्याचीं कामें केलीं. त्यांनीं जें पत्र पाठविलें त्यांत प्रथम युद्धाच्या वेळच्या त्यांच्या अनेक हालचालींचें वर्णन करून शेवटीं श्रीमंत बाबासाहेबांच्या सैन्यभरतीच्या कामाबद्दल गौरवपूर्वक उल्लेख केला आहे. तो भाग खालीं दिला आहे.

"There is no doubt that England owes a great debt of gratitude to India as a whole for her attitude in the War, despite the efforts in certain quarters to cause trouble. It is a great

pleasure to me to hear good news from your father and yourself who both remember your old and true friends. I hope that your private and official affairs have been running smoothly and you are entitled to special credit for the valuable work you did as a recruiting officer."

सन १९१९ सालीं हिंदुस्थान सरकारचें अफगाणिस्थानाबरोबर युद्ध सुरू झालें. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं शिरवळ येथील नागरिकांची सभा भरवून या वेळींहि इंग्रज सरकारशीं सहकार्य करण्याचा ठराव पास केला व तो मुंबई सरकारकडे पाठविला. मुंबई सरकारास श्रीमंत बाबासाहेबांची ही तत्परता पाहून आनंद झाला व त्यांचेकडून पोलिटिकल एजंटमार्फत त्यांना पुढील पत्र आलें.

Poona
28th June, 1919

Sir,

I have the honour to convey to you as President of the public meeting held at Shirwal on the 28th ultimo the cordial appreciation of His Excellency the Governor-in-Council of your loyal message and assurance of co-operation in connection with the war of Afganistan.

महायुद्धाच्या सुरुवातीपासून अफगाण युद्धापर्यंत श्रीमंत बाबासाहेब यांनीं इंग्रज सरकारशीं प्रत्येक वेळीं सहकारिता किती उत्सुकतेनें केली हें आतांपर्यंतच्या हकीकतीवरून लक्षांत येणार आहे.

## पोकळ अधिकार

श्रीमंत बाबसाहेबांना शिरवळ तालुक्याचे अधिकार मिळाले तेव्हां आपण कांहीं तरी भरीव कामगिरी करून दाखवूं अशी त्यांना मोठी उमेद वाटत होती. परंतु एक वर्षाच्या अनुभवावरून ती त्यांची उमेद खचली. सन १९१४ च्या अखेरीस श्रीमंत रावसाहेबांकडून तालुक्याच्या मामलेदारास हुकूम गेला होता त्यांत पुढील कामें श्रीमंत बाबासाहेबांच्या मार्फत न पाठवितां परभारें पाठवीत जावीं असें होतें.

१ देवस्थानसंबंधीं कामें
१ पाटील नेमणुकीचीं कामें
१ संस्थान आंबवडें येथील कामें
१ शाळाखात्यासंबंधीं कामें
१ व्हॅक्सिनेशनसंबंधीं कामें
१ हिशेबी खात्याकडील कामें
ताळेबंद, वार्षिक माहिती वगैरे.
१ नांव दाखल करण्याचीं कामें.
१ खाजगी, वतनी, दास्तान, शेरी, व्यापार वगैरेकडील कामें
१ फॉरेस्टसंबंधीं कामें
१ अज्ञान इस्टेटींसंबंधीं कामें

वरील कामांची श्रीमंत बाबासाहेबांना माहिती देण्याचें बंद झाल्यामुळें मुलकी कामाची माहिती करून घेण्याचा त्यांचा मार्ग जवळ जवळ बंद करण्यांत आला होता. वरील निर्बंधामुळें त्यांना कामांत हुरूप वाटेनासा झाला. वडिलांनीं आपणांस मनापासून अधिकार दिला नाहीं असें त्यांना साहजिकपणें वाटूं लागलें. त्यांनीं सुचविलेल्या सुधारणा अमान्य होऊं लागल्या व अपमानकारक असे शेरे येऊं लागले. तेव्हां त्यांनीं असले अधिकार नकोत, म्हणून एकदां वडिलांना पत्रानें कळविलें. त्यावर, असें करूं नका, आपल्या म्हणण्याचा विचार केला जाईल, अशी श्रीमंत रावसाहेबांनीं त्या वेळचे त्या तालुक्याचे मामलेदार रा. माधवराव देशपांडे यांच्याकडून त्यांची समजूत घातली. श्रीमंत बाबासाहेबांच्या सुदैवानें त्यांना मामलेदार चांगले मिळाले होते. माधवराव देशपांडे यांचें श्रीमंत रावसाहेब यांच्या जवळ चागलें वजन होतें. ते तालुक्यांत लोकप्रिय होते. त्यांच्या अंगीं मुत्सद्दीपणा फार होता. तालुक्यांत लोक त्यांना महादूकाका म्हणत असत. त्यांचेवर रयतेचा फार विश्वास असे. ते रावसाहेबांना समजुतीच्या गोष्टी सांगून श्रीमंत बाबासाहेबांच्या मनाप्रमाणें एखादी तरी गोष्ट घडवून आणीत असत. श्रीमंत बाबासाहेबांचाहि त्यांच्यावर विश्वास असे. श्रीमंत रावसाहेबांच्या मर्जीप्रमाणें वागत गेल्यास हलके हलके आणखी अधिकार मिळतील, असें रा. माधवराव यांनीं सांगितल्यावरून श्री. बाबासाहेबांनीं आपलें काम सुरू ठेविलें. तथापि प्रत्येक गोष्टींत घालावी लागणारी जिकीर कमी होईना. भोर येथील सबरजिस्ट्रारचें ऑफिस तपासण्याची परवानगी असावी म्हणून श्रीमंत बाबासाहेबांनीं विनंति केली. त्यावर असिस्टंट कलेक्टरला हा अधिकार नाहीं, असें उत्तर मिळालें.

सब-रजिस्ट्रारचें ऑफिस तपासण्यासारख्या क्षुल्लक गोष्टी करण्याची परवानगी मिळण्यासहि मारामार पडत असे. यावरून श्रीमंत रावसाहेबांनीं अधिकार कितपत खुषीनें दिले होते हें उघड दिसून येतें. अगदीं बारीक-सारीक गोष्टींतहि त्रास होऊं लागला होता.

जीं कामें न पाहण्याबद्दल निर्बंध घालण्यांत आले होते ते महादूकाकांच्या मध्यस्थीनें थोडे थोडे कमी करण्यांत आले. रा. महादूकाकांच्या मध्यस्थीचा फारच उपयोग होत असे. हे शिरवळचेच रहिवासी असून त्यांचा स्वभाव अत्यंत दिलदार होता. जमाबंदीकरितां श्रीमंत बाबासाहेब जेव्हां तालुक्यांत फिरत असत तेव्हां ठिकठिकाणची व्यवस्था ठेवण्याचें काम रा. महादूकाकां-कडेच असे व तालुक्यांतील लोकांत त्यांचें चांगलें वजन असल्यामुळें त्यांना बंदोबस्त ठेवण्याचें काम मुळींच कठीण वाटत नसे. ते किती लोकप्रिय होते ही गोष्ट दौऱ्याच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांच्या नजरेस अनेक वेळां आली होती. त्यांचा स्वभाव अत्यंत गोड, मनमिळाऊ असून दुसऱ्यावर छाप बस-विण्याची कला त्यांना उत्तम साधली होती. ते सन १९१९ सालांत नोव्हेंबर महिन्यांत दिवंगत झाले. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांना आपला एक साहाय्यकर्ता गेला म्हणून फार वाईट वाटलें. त्यांच्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांचें काय मत होतें हें त्यांच्या डायरींतील पुढील उद्गारांवरून व्यक्त होणारें आहे.

21st Nov., 1919

I learnt afterwards with extreme sorrow the death of Mr. Mahadeo Govind Deshpande, the Mamlatdar of Shirval, which took place to-night at 7 p.m. at Shirwal at the age of about 65. Of all the Mamlatdars that have worked and are working in the Bhor State during the regime of my father, this Mamlatdar stands prominent in some respects i.e. in obliging nature, sweet tongue, influence with His Highness and the public and proficiency in Revenue work. Since I took over the charge of the Shirval Taluka he has been of inestimable use to me in using his influence with His Highness for removing my wants and difficulties and in arranging my tour programmes to my satisfaction. Since the death of his wife

which took place some three years ago, he had been sinking gradually. His brother's asking for partition told upon his sensitive mind and hastened his death soon.

वरील प्रकारच्या अनेक अडचणींतहि व कांहींहि स्वातंत्र्य नसतांना श्रीमंत बाबासाहेबांनीं तालुक्याचा कारभार यशस्वीपणें पार पाडला हें कोणालाहि नाकबूल करतां यावयाचें नाहीं.

## सुधागड तालुक्यांतील दौरा

श्रीमंत बाबासाहेबांची रिक्रूटिंग ऑफिसर म्हणून नेमणूक करण्यांत आल्यावर प्रत्येक तालुक्यांत दौरा काढून तालुक्याची माहिती करून घेण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. त्याप्रमाणें प्रथम त्यांनीं रिक्रूटिंगच्या कामास राजगड तालुक्यांत सुरुवात केल्याचें मागें सांगण्यांत आलेंच आहे. रिक्रूटिंगचें काम त्यांनीं जोरांत सुरू केलें होतें. परंतु ता. ११ नोव्हेंबर सन १९१८ रोजीं महायुद्ध तहकूब झाल्यामुळें रिक्रूटिंगचें कामहि बंद करण्यांत आलें. सर्व तालुक्यांतून दौरा काढण्याचा त्यांचा विचार त्यांना रहित करावा लागला. तथापि सर्व तालुके नाहींत तरी सुधागड तालुका पाहण्याचें त्यांनीं ठरविलें व आपला हेतु श्रीमंत रावसाहेबांना कळविला. कारण बाकीचे तालुके त्यांनीं पाहिले होते. श्रीमंत रावसाहेबांनीं संमति देऊन श्रीमंत बाबासाहेबांचा बंदोबस्त ठेवण्याबद्दल सुधागड तालुक्याच्या अंमलदारांना हुकूमहि दिले.

आपल्या तालुक्यांत श्रीमंत बाबासाहेबांची स्वारी येणार हें कळतांच लोकांत उत्साह उत्पन्न होऊन ते त्यांची मोठ्या आतुरतेनें मार्गप्रतीक्षा करीत होते. पालीचे रहिवासी व फर्ग्युसन कॉलेजांतील प्रसिद्ध प्रोफेसर कै. हरिभाऊ लिमये यांच्या विचारें श्रीमंत बाबासाहेबांनीं तालुक्यांतील कार्यक्रम ठरवून ते ता. ३ डिसेंबर सन १९१८ रोजीं सकाळीं मुंबईहून निघून कर्जतवरून खोपोलीस गेले. प्रो. हरिभाऊ लिमये यांना त्यांनीं आपल्याबरोबर घेतलें होतें. खोपोलीस दुपारचें भोजन झाल्यावर जवळच असलेलें टाटा पॉवर हाउस पाहण्यास गेले. पॉवर हाउस पाहून परत खोपोलीस येऊन रात्रीच्या मुक्कामास मढास गेले. मढ येथील गणपतीचें स्थान अष्टविनायकांपैकीं आहे. ता. ४ रोजीं सकाळीं तेथें देवपूजेनंतर भोजन करून मुक्कामास ते जांभुळपाड्यास गेले.

तेथील लोकांनीं त्यांना गांवांतून वाजतगाजत समारंभानें गांवांतील देवालयांत नेलें व मोठ्या थाटाची पानसुपारी केली.

पूर्वीं लहानपणीं श्रीमंत बाबासाहेब भोराईच्या दर्शनाकरितां सुधागडास गेले होते त्या वेळेपेक्षां या वेळीं दळणवळणाचें साधन फार सुखाचें झालें होतें. पूर्वीं लोणावळयास उतरून बोरघाटानें जांभुळपाड्यास जावें लागे. या वेळीं खोपोली-पेण सडकेस जोडून पालीपर्यंत सडक करण्यांत आल्यामुळें खोपोलीपासून पालीपर्यंत मोटारनें अगर घोड्याच्या गाडीनें जाण्याची सोय झाली होती. पालीस जातांना प्रथम जांभुळपाडा हा भोर संस्थानांतील मोठा गांव लागतो. श्रीमंत बाबासाहेब घोड्याच्या गाडींतूनच जांभुळपाड्यास गेले. इतर मंडळीकरितां टांगेहि ठेवण्यांत आले होते.

ता. ५ रोजीं सकाळीं जांभुळपाड्याहून निघून श्रीमंत बाबासाहेब घोडयावरून नाडसुरास गेले. नाडसुरास जाण्यास सडकेचा रस्ता नसल्यामुळें त्यांनीं घोडयावरून प्रवास केला. नाडसुरासहि त्यांचें थाटाचें स्वागत करण्यांत आलें. दुपारीं भोजन झालें. तेथें त्यांचा मुक्काम रा. रा. आबासाहेब आचार्य यांच्या घरीं होता. त्यांनीं उत्तम व्यवस्था ठेविली होती. सुधागड तालुक्यांत जाण्यापूर्वींच या तालुक्यांतील शाळांची वार्षिक परीक्षा झाली होती. म्हणून त्या दिवशीं सायंकाळीं नाडसूर येथील शाळेचा बक्षिस-समारंभ श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें करण्यांत आला. त्या वेळीं ज्ञानाचें महत्त्व किती आहे याविषयीं त्यांनीं विद्यार्थ्यांना चार शब्द सांगितले. याच दिवशीं तेथील रहिवासी व संस्थानचे नोकरींत असलेले रा. भिकाजीपंत करंदीकर यांनीं त्यांना पानसुपारी केली. ता. ६ रोजीं सकाळीं नाडसुराहून निघून श्रीमंत बाबासाहेब भोरपच्या किल्ल्यावर गेले. भोराई देवीची पूजा करून ब्राह्मणभोजन घातलें. या वेळीं त्यांना लहानपणीं या किल्ल्यावर आल्याची व त्या वेळच्या वृद्ध हवालदारानें सांगितलेल्या गोष्टीची आठवण झाली. किल्ल्यावरून स्वारी रात्रीच्या मुक्कामास नाडसुरास परत आली.

ता. ७ रोजीं सकाळीं श्रीमंत बाबासाहेब पालीस जाण्याकरितां नाडसुराहून घोड्यावर बसून निघाले. वाटेंत सिद्धेश्वर गांव लागतो. तेथें दोन तास थांबून भार्जेकर इनामदार गांगल यांच्या घरीं पानसुपारी घेऊन तेथील शाळेंतील

बक्षिस-समारंभ केला. नंतर ते पालीस गेले. पाली गांवाबाहेर सर्व प्रतिष्ठित ग्रामस्थ त्यांना सामोरे आले होते. त्यांनीं त्यांचें स्वागत केल्यानंतर त्यांची गांवांतून थाटाची मिरवणूक काढण्यांत आली होती. मिरवणुकीच्या रस्त्यावर जागोजाग कमानी उभारून तो उत्तम प्रकारें शृंगारण्यांत आला होता. पालीकरांच्या आनंदाला भरती आल्याचें दिसत होतें. पाली येथील सरकारी वाड्यांत श्रीमंतांची स्वारी पोहोंचल्यावर सर्व मंडळी आपआपल्या घरीं गेली. श्रीमंत बाबासाहेब यांनीं पालीच्या श्रीबल्लाळेश्वरास ११ ब्राह्मणांकडून लघुरुद्र करविला. दुपारीं त्या तालुक्याचे त्या वेळचे लोकप्रिय फौजदार रा. कोंडोपंत मिलगीर यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना मेजवानी दिली. दुपारीं सर्व अंमलदार लोकांच्या पानसुपाऱ्या झाल्या. सायंकाळीं सार्वजनिक लायब्ररींत त्यांना पानसुपारी करण्यांत आली. या ठिकाणीं त्यांनीं आपल्या भाषणांत शिक्षणप्रसाराच्या बाबतींत वाचनालयांना किती महत्त्व आहे याविषयीं विवेचन केलें. सदर वाचनालयास त्यांनीं ५० रुपयांची देणगी दिली.

ता. ८ रोजीं सकाळीं पालीपासून जवळ असलेलें उन्हेरें बुद्रुक येथें श्रीमंत बाबासाहेब गेले होते. हें गांव ब्रिटिश हद्दींत असून तें कुलाबा जिल्हा लोकल बोर्डाचे माजी लोकप्रिय कर्तबगार अध्यक्ष श्री. सीतारामपंत टिळक यांचें खोती गांव आहे. या ठिकाणीं गरम पाण्याचे झरे असून स्नानाकरितां कुंडें तयार केलेलीं आहेत. या गरम पाण्याच्या कुंडांत स्नान करण्याकरितां प्रतिवर्षी येथें हजारों लोक जात असतात. श्रीमंत बाबासाहेब येथें स्नानाकरितांच गेले होते. त्या वेळीं तेथील खोत श्री. सीतारामपंत टिळक तेथें त्यांच्या स्वागतार्थ मुद्दाम हजर होते. स्नानाच्या वेळीं संकल्प सांगण्यास आलेल्या तेथील उपाध्यायास भरपूर दक्षिणा देऊन त्याची ताबडतोब बोळवण केली. परंतु श्री. सीतारामपंत टिळक यांजपाशीं गरम झऱ्याचें उष्णतामान काय, तें सर्व ऋतूंत सारखेंच राहतें कीं त्यांत बदल होतो, त्याचें रासायनिक पृथःक्करण केलेलें आहे काय, त्याच्यासंबंधाच्या लोकांच्या धार्मिक कल्पना काय व त्यांतील स्नानानें लोकांस काय फायदा होतो वगैरे बाबतींत त्यांनीं नाना तऱ्हेचे प्रश्न विचारून माहिती करून घेण्यांत बराच वेळ खर्च केला व हल्लींच्या काळीं क्षेत्राच्या ठिकाणीं गेल्यावर नुसत्या धार्मिक विधींवरच समाधान न मानतां

तेथील अवांतर माहितीहि करून घेणें अधिक इष्ट आहे हें स्वतःच्या उदाहरणानें दाखवून दिलें. श्री. टिळक यांनीं संस्थानच्या रिवाजाप्रमाणें नजराणा, हार-तुरे वगैरेंची तजवीज केली होती. परंतु "हे उपचार संस्थानी हद्दींत जरी योग्य व अत्यावश्यक असले तरी संस्थानाबाहेरील मुलुखांत हे पाळण्याची तितकीशी आवश्यकता नाहीं" असें श्रीमंत बाबासाहेबांनीं श्री. टिळकांना सांगितलें. तथापि "आपल्यासारखे थोर पाहुणे आले असतां त्यांचा सन्मान करणें हें ब्रिटिश मुलुखांतील लोकहि आपलें कर्तव्य समजतात" असें म्हणून श्री. टिळक यांनीं श्रीमंत बाबासाहेबांचा यथोचित सत्कार केला. या वेळीं श्री. टिळक यांचा श्रीमंत बाबासाहेबांशीं जो परिचय झाला तो पुढें अनेक प्रसंगीं दृढ होत गेला व अद्यापहि त्यांच्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत आदर वसत आहे.

उन्हेरें येथें स्नान करून परत आल्यावर दुपारीं प्रोफेसर हरिभाऊ लिमये यांनीं आपल्या घरीं श्रीमंत बाबासाहेबांना मोठ्या थाटाची मेजवानी दिली. मेजवानीची सर्व व्यवस्था प्रो. हरिभाऊ लिमये यांचे पुतणे श्री. बापू-साहेब लिमये यांच्याकडे होती. त्या तालुक्यांत आदरसत्काराबद्दल श्री. बापू-साहेबांची ख्याति आहे. लिमये घराणें पालीस स्थायिक होण्यास संस्थानची नोकरीच कारणीभूत झालेली होती. श्रीमंत बाबासाहेबांचे आजे श्रीमंत नाना-साहेब यांच्या कारकीर्दींत श्री. बापूसाहेब यांचे आजे नोकरींत शिरले व त्यांनीं हुद्याचीं कामें करून ते पालीस स्थायिक झाले. त्यांच्यानंतर पुढें जरी नोकरीचा संबंध सुटला तरी लिमये घराणें संस्थानच्या राजघराण्याशीं अत्यंत आदरानें व कृतज्ञताबुद्धीनें वागत आलें आहे. प्रो. हरिभाऊ लिमये यांना आपल्या पुतण्यास जात्याच आदरसत्कारांची हौस असल्याचें माहीत असल्यामुळें श्रीमंत बाबा-साहेबांच्या मेजवानीचा बेत कसा काय राहील याची त्यांना मुळींच काळजी वाटत नव्हती. मेजवानीस गांवांतील बरेच प्रतिष्ठित लोक बोलाविले होते.

याच दिवशीं दुपारीं श्रीमंतांना गांवांत ठिकठिकाणीं पानसुपाऱ्या करण्यांत येऊन सायंकाळीं बल्लाळेश्वराच्या भव्य देवालयांत सुधागडच्या प्रजा-जनांनीं त्यांना रौप्यकरंडकांतून पुढील मानपत्र अर्पण केलें.

## सुधागड तालुक्याचें मानपत्र

**श्री**

श्रीमंत रघुनाथराव बाबासाहेब पंतसचिव, संस्थान भोर,

यांचे सेवेसी,

श्रीमंतांची स्वारी पाली येथें येण्याचा योग आला याबद्दल सुधागड तालुक्यांतील लोकांना फार आनंद होत आहे व या प्रसंगीं आम्ही सर्व श्रीमंतांचें मन:पूर्वक स्वागत करीत आहों.

साधारणपणें संस्थानिकांच्या कुमारांना पंचवीस-तीस वर्षांपूर्वी जें शिक्षण मिळत असे त्यापेक्षां चांगलें व विशेष तऱ्हेचें शिक्षण आपल्याला मिळालें याबद्दल आम्हांला फार आनंद वाटतो. श्रीमंत मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाले त्या वेळीं आम्हांला वाटत असलेला अभिमान आम्ही मानपत्राच्या द्वारें व्यक्त केलाच होता. श्रीमंतांची कॉलेजांतील पहिली परीक्षा पास झाली हें श्रीमंतांस भूषणावह आहे. सध्यांच्या दक्षिणेंतील राजकुमारांपैकीं फारच थोड्यांस अशा शिक्षणाचा लाभ मिळाला आहे. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें जरी श्रीमंतांना पुढें परीक्षेस जातां आलें नाहीं, तरी श्रीमंतांनीं आपला अभ्यास व कॉलेजांतील शिक्षणक्रम चालू ठेविला होता याबद्दल आम्हांला श्रीमंतांविषयीं फार आदर वाटतो. यामुळें आपल्या आयुष्यक्रमाचा प्रारंभ योग्य तऱ्हेनें होऊन तो आपल्याला व आम्हांलाहि सुखकर होईल अशी आम्हांला आशा वाटते.

कॉलेज सुटलें तरी श्रीमंतांनीं आपला व्यासंग सोडला नाहीं आणि अधिक ज्ञान आणि विस्तृत अनुभव मिळविण्याची संधि आपण वायां जाऊं दिली नाहीं. इतकेंच नव्हे, तर अशा तऱ्हेचे योग मुद्दाम घडवून आणले हें आपणांस भूषणावह आहे. राजपुताना व बंगाल, उत्तर हिंदुस्थान व निजाम हैद्राबाद इत्यादि दूरदूरच्या प्रदेशांत प्रवास करून श्रीमंतांनीं अनेक ठिकाणचे आचारविचार पाहिल्यानें व निरनिराळ्या तऱ्हांच्या, दर्जांच्या व स्वभावांच्या गृहस्थांच्या गांठी घेतल्यानें श्रीमंतांच्या मनास जी प्रगल्भता आली आहे तिच्या योगानें संस्थानच्या प्रजेचेंच अखेर कल्याण होणारें आहे. या संस्कारांचा उत्तम परिणामहि आम्हांला दिसत आहे. भोर येथें लोकांच्या उपयोगाकरितां

वाचनालय, क्रीडांगण वगैरे स्थापन झालीं तीं आपल्या प्रोत्साहनानें व आश्रयानें होत. त्यायोगानें भोरच्या लोकांना आपली बौद्धिक व शारीरिक उन्नति करून घेण्याची सोय उत्तम तऱ्हेनें करण्यांत आली याचें श्रेय आपल्याकडेच आहे. तसेंच संस्थानच्या बाहेरील निरनिराळया तऱ्हेच्या अनेक उपयुक्त संस्थांना देणग्या देऊन आपण आपली उदार वृत्ति सर्वांच्या अनुभवाला आणून दिलेली आहे.

कालनियमाप्रमाणें श्रीमंतांना मोठ्या पदावर व अधिकारावर यावयाचें आहे, व त्यासंबंधाचीं कर्तव्यें योग्य तऱ्हेनें बजाविण्याची जबाबदारी आपल्यावर येऊन पडेल ही गोष्ट पहिल्यापासून ओळखून आपण अशा तऱ्हेची आपली विशेष तयारीहि करून ठेविली आहे. पुणें शहरच्या मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत बसून आपण फौजदारी न्यायाच्या कामाची माहिती करून घेतली व नंतर तेथील ऑनररी मॅजिस्ट्रेटच्या बेन्चावर काम केलें तें याकरितां होय असें आम्हांस वाटतें. यामुळें असल्या महत्त्वाच्या कामाचा अनुभव आपल्याला आला व त्या कामामध्यें येणाऱ्या निरनिराळया अडचणी पाहून तें काम चांगल्या रीतीनें कसें पार पाडावें हें आपल्याला समजलें.

अलीकडे सुमारें सहा वर्षेपर्यंत श्रीमंतांकडे विचित्रगड तालुक्याचा सर्व कारभार सोंपविण्यांत आलेला आहे. त्यामुळें तर पुढें येणाऱ्या सर्व संस्थानच्या कारभाराची जबाबदारी अंगावर घेण्यास आपण थोडथोडा प्रारंभच केला आहेसें होतें. राज्यकारभाराचें अवघड, मोठ्या जबाबदारीचें व अत्यंत महत्त्वाचें काम शिकविण्याच्या शाळा नाहींत. प्रत्यक्ष अनुभवच त्यांची शाळा होय. काम करण्यानेंच कामांत प्रवीणता येते. श्रीमंतांचे वडील हिज हायनेस श्रीमंत शंकरराव रावसाहेब यांनीं आपल्या शिक्षणाची पहिल्यापासून विशेष काळजी घेतली, राज्यव्यवस्थेच्या कांहीं भागाची जबाबदारी आपल्या अंगावर टाकून आपलें शिक्षण पाय्राशुद्ध केलें व आपला अनुभव परिपक्व करून दिला हे थोरल्या सरकारचे संस्थानच्या प्रजेवर फार उपकार आहेत. विचित्रगड तालुक्याचा कारभार आपण फार काळजीनें व दक्षतेनें चालविला आहे व सार्वजनिक हिताचें ध्येय आपल्यापुढें ठेवून श्रीमंतांनीं प्रगतिपर धोरण अवलंबिलें आहे, त्यामुळें थोरले सरकार, पोलिटिकल एजंट व मुंबई सरकार

यांनीं प्रशंसापर उद्गार काढलेले पाहून आम्हांला फार आनंद होत आहे व आमचा श्रीमंतांविषयींचा आदर वाढत आहे.

अगदीं लहानपणीं श्रीमंतांची भेट या तालुक्याला झाली होती. त्यानंतर मोठेपणीं आपला इकडे येण्याचा हा पहिलाच प्रसंग आहे. असे प्रसंग वारंवार येवोत. येथील प्रजेच्या सोयी-गैरसोयी काय आहेत हें आपणांस प्रत्यक्ष समजो. आपला व सुधागड तालुक्यांतील लोकांचा विशेष संबंध जडो आणि श्रीमंतांचे वडील थोरले सरकार हिज हायनेस शंकरराव रावसाहेब, आपण व आपल्या कुटुंबांतील मंडळी यांचें सुख व आयुरारोग्य वृद्धिंगत होत जावो ही सुधागड तालुक्याच्या वतीनें आमची बल्लाळेश्वराजवळ प्रार्थना आहे.

पाली आपले

ता. ८ डिसेंबर सन १९१८ सुधागड तालुक्यांतील प्रजाजन.

श्रीमंत बाबासाहेब यांनीं पाली येथें सुधागडच्या प्रजाजनांनीं दिलेल्या मानपत्रास उत्तरादाखल दिलेल्या भाषणांतील महत्त्वाचा उतारा :

ते म्हणाले, "नाना प्रकारच्या आपत्तींतहि व माझ्या स्वतःच्या इच्छे-विरुद्धहि लोकांनीं एवढें थोरलें प्रेमपूर्वक स्वागत करून मला मानपत्र दिलें याबद्दल मी आपला फार आभारी आहें. मला जें अल्पस्वल्प शिक्षण मिळालें आहे व राज्यकारभारांत किंचित्सा अवसर मिळाला आहे त्याबद्दल हिज हायनेस श्रीमंत महाराज सरकार यांचा मी अत्यंत ऋणी आहें. आपला सुधागड तालुका संस्थानांतील इतर तालुक्यांच्या मानानें शिक्षण व इतर प्रगतीच्या बाबतींत फार पुढें गेला आहे, याबद्दल मला आनंद वाटतो." महायुद्धांत बादशहांना जय मिळाल्याबद्दल आनंद प्रदर्शित करून ते म्हणाले कीं, "या युद्धांत जय मिळविल्यानें इंग्रज सरकारचें कल्याण तर आहेच. परंतु हिंदुस्थानच्या लोकांचेहि फायदे होणार आहेत. राजकीय बाबतींत लवकरच सुधारणा घडून येऊन हिंदुस्थानचा दर्जा साम्राज्यांत फार मोठा होणार आहे. तसेंच या युद्धांत संस्थानिकांची इभ्रत वाढून तहनाम्यानुरूप त्यांचें स्वातंत्र्यहि इंग्रज सरकारनें कबूल केलें असून लवकरच राजेलोकांची एक नरेंद्रमंडळ नांवाची राजकीय संस्था (Chamber of Princes) निर्माण होणार आहे. या सर्व गोष्टींचा संस्थानच्या प्रजेलाहि फायदा मिळाल्यावांचून राहणार नाहीं. कारण

ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें अगदीं अलग राहणें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं. शिक्षण, कायदेकानू वगैरे बाबतींत जसे संस्थानिक इंग्रज सरकारचें अनुकरण करतात तसेंच राजकीय सुधारणेंतहि त्यांचें अनुकरण संस्थानिकांनीं करणें इष्ट आहे; व त्याप्रमाणें पुष्कळ संस्थानिक करूंहि लागले आहेत ही आनंदाची गोष्ट आहे; व बाकीचे लवकरच करतील अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. तेव्हां तिकडील प्रजेच्या प्रतिनिधींशीं रोज निकट संबंध आल्यानें संस्थानच्या प्रजेला क्रमाक्रमानें राजकीय हक्क मिळाल्यावांचून राहणार नाहींत. ज्या मानानें संस्थानिक प्रगमनशील असतील त्या मानानें ते हक्क तेथील प्रजेस लवकर मिळतील यांत शंका नाहीं." समग्र भाषण परिशिष्ट 'ज'मध्यें दिलें आहे.

श्रीमंत बाबासाहेबांच्या भाषणानंतर प्रो. हरिभाऊ लिमये यांनीं श्रीमंतांच्या आगमनाप्रीत्यर्थ आनंद व्यक्त करून श्रीमंतांचीं शिक्षणविषयक बाबतींत, तशींच राजकीय बाबतींतहि किती उच्च ध्येयें आहेत हें तेथें जमलेल्या लोकांस श्रीमंतांच्या भाषणावरूनच समजावून सांगितलें व तीं ध्येयें योग्य कालीं अंमलांत यावींत, म्हणून श्रीबल्लाळेश्वराची प्रार्थना करून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. शेवटीं रीतीप्रमाणें श्रीमंतांचे आभार मानण्यांत आल्यानंतर त्यांना पुष्पहार, अत्तरगुलाब, पानसुपारी वगैरे देण्यांत आली. या मानपत्राच्या वेळीं सुधागड तालुक्यांतील गांवोगांवचे बहुतेक प्रतिष्ठित विद्वान् व वजनदार एकत्र जमल्यामुळें त्यांचा परिचय करून घेण्याची संधि श्रीमंत बाबासाहेबांनीं वायां जाऊं दिली नाहीं.

पालीच्या दक्षिणेस सुमारें चार मैलांवर असलेल्या डोंगरावर वरदायिनी देवीचें स्थान आहे. ही देवी पालीची गांवदेवी म्हणून मानतात व पालींतील सर्व हिंदु लोकांचा वर्षांतून एकदां तरी तेथें जाऊन या देवीचें दर्शन घेण्याचा परिपाठ आहे. या देवीस सरकारांतूनहि कांहीं वार्षिक उत्पन्न आहे. हें स्थान रम्य असल्यामुळें तें पाहून देवीचें दर्शन घेण्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं अगोदर ठरविलें होतें. त्याप्रमाणें ता. ९ रोजीं सकाळीं ते आपल्या बरोबरची मंडळी व स्थानिक अधिकारी यांच्यासह घोड्यावरून त्या ठिकाणीं गेले. तेथील भोजनाची वगैरे सर्व व्यवस्था त्या तालुक्याचे त्या वेळचे जंगल इन्स्पेक्टर कै. वाळिंबे यांनीं आपल्याकडे घेतली होती. देऊळ लहान असल्यामुळें

विश्रांतीकरितां मंडप घालण्यांत आला होता. श्रीमंत बाबासाहेब तेथें गेल्यावर त्यांनीं तो मंडप पाहिला. त्याच्याजवळच एक प्रचंड आम्रवृक्ष होता व त्याची छायाहि दाट होती. मंडपांत कोंडून बसण्यापेक्षां त्या वृक्षाखालीं मोकळ्या हवेंत बसणें चांगलें असें वाटून त्यांनीं तेथें बैठकी घालण्यास सांगितलें. याप्रमाणें लगेच व्यवस्था करण्यांत आली. अल्पोपाहार झाल्यावर ते विश्रांती-करितां झाडाखालीं बसले. त्यांच्याबरोबर प्रो. हरिभाऊ लिमये, उन्हेरें येथील खोत श्री. सीतारामपंत टिळक वगैरे मंडळी होती. ती व अधिकारी मंडळी आपापल्या योग्यतेप्रमाणें त्यांच्या जवळ बसली होती. अधिकारीवर्गांत फौजदार रा. कोंडोपंत मिलगीर हे बंदोबस्ताकरितां हजर होते. हे फार विनोदी असून जुन्याचे कट्टे अभिमानी आहेत. प्रो. हरिभाऊ लिमये यांना त्यांचा स्वभाव माहीत होता. भोजनाची तयारी होईपर्यंत वेळ जाण्याकरितां कांहींतरी करमणूक व्हावी म्हणून प्रो. हरिभाऊ लिमये यांनीं आधुनिक सुधारणांचा काल, स्त्रीशिक्षण व जुनी-नवी पिढी वगैरे विषय काढून चर्चेस सुरुवात केली. चर्चा गंभीर स्वरूपाची नसून केवळ करमणुकीकरितांच होती. स्त्रीशिक्षणाचा विषय काढण्यांत प्रो. हरिभाऊ लिमये यांचा हेतु रा. कोंडोपंतां-सारख्या जुन्या पिढींतील पुरस्कर्त्यांचें तोंड जरा खुलें करण्याचा होता. प्रो. हरिभाऊ लिमये यांनी स्त्री-शिक्षणाची तारीफ करून पूर्वपक्ष काढून स्त्री-शिक्षणाच्या आधुनिक सुधारणांची खूपच तारीफ केली व कोंडोपंत यांच्या चेहेऱ्याकडे ते पाहूं लागले. कोंडोपंतांना स्फुरण चढलेलें दिसलें, परंतु आपल्या धन्यासमोर तोंड उघडण्याची त्यांची छाती होईना. प्रो. हरिभाऊ लिमये यांनीं त्यांना आपले विचार प्रदर्शित करण्यास सांगितलें. तेव्हां ते म्हणाले, "श्रीमंत सरकारांसमोर हा विषय न काढतां इतर ठिकाणीं काढला असता तर मीं योग्य उत्तर दिलें असतें. येथें मला बोलतां येत नाहीं. माझा नाइलाज आहे." श्रीमंत बाबासाहेबांना या वेळीं कांहींतरी करमणूक पाहिजेच होती. त्यांनीं रा. कोंडोपंतांना सांगितलें कीं, "संकोच न धरतां तुम्ही प्रो. हरिभाऊंना खुशाल हटवा." पडत्या फळाची आज्ञा मिळतांच कोंडोपंतांचा चेहरा लगेच खुलला. त्यांचा आवाज पहाडी असून विनोद कोणालाहि न बोंचणारा असतो व वक्तृत्वकला त्यांना चांगली साधली आहे. ती त्या वेळेपुरती परिणामकारक

असते. त्यांनीं शिक्षणावर खूप झोड उठविली. पूर्वीच्या व हल्लींच्या पिढींतील स्त्री-पुरुषांत दिसून येणारा फरक, हल्लींचे त्यांच्यांतील चोचले, अन्न तोळामासा मोजून खाणें, वाऱ्यानें उडून जाण्यासारखी शिकलेल्या मुलींची नाजुक देहयष्टि, दुर्बिणींतून दिसणारी कुंकवाची टिकली, वांकडेतिकडे भांग इत्यादि बारीकसारीक गोष्टींचें त्यांनीं रसभरित वर्णन करून खूपच हंशा पिकविला. शेवटीं श्रीमंत बाबासाहेबांची माफी मागून ते म्हणाले, “ कालच श्रीमंतांनीं आपल्या भाषणांत सांगितलें कीं, प्रत्येक गांवीं देवळाप्रमाणें शाळा होईल तेव्हांच देशाची खरी सुधारणा होईल. अशी स्थिति झाली तर गांवोगांव सर्वच शिकलेले होणार. पुरुष शिकलेले, बायकाहि शिकलेल्या, सर्वच वाचनांत दंग ! मग काम करणार कोण ? कामाला माणसें परदेशांतून आणावीं लागतील.” कोंडोपंतांनीं स्त्री-शिक्षणाची आपल्या समजुतीप्रमाणें यथास्थित टर उडवून ते विजयी मुद्रेनें प्रो. हरिभाऊ लिमये यांच्याकडे पाहूं लागले. हरिभाऊंना उत्तर द्यावयाचें नव्हतेंच. ते हंसतच म्हणाले, “ श्रीमंत बाबासाहेबांची चांगली करमणूक झाली. ” ते म्हणाले, “ कोंडोपंतांच्या म्हणण्यांत अगदींच ग्राह्यांश नाहीं असें नाहीं. स्त्री-शिक्षणांत त्यांच्या शारीरिक शिक्षणाची हेळसांड होत आहे व त्यामुळें त्यांच्या प्रकृतीवर परिणाम होत आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं.” इतक्यांत भोजनाची तयारी झाल्याची वर्दी आल्यामुळें सर्व मंडळी उठून आपआपल्या उद्योगास लागली. भोजन झाल्यावर श्रीमंत बाबासाहेबांनीं थोडीशी विश्रांति घेतली. नंतर ते सर्व मंडळीसह डोंगरमाथ्यावरून परत येण्यास निघाले. वर जातांना ते ज्या वाटेनें गेले होते त्या वाटेनें न येतां दुसऱ्या वाटेनें उतरूं लागले. या वाटेवर पाली येथील कुलकर्णी यांची गडदवणें नांवाची माडांची राई आहे. त्या ठिकाणीं त्यांनीं श्रीमंतांच्या स्वागताची तयारी ठेविली होती. श्रीमंतांना राई पाहावयाची असल्यामुळें त्यांनीं या वाटेनें येण्याचें कबूल केलें. सर्व मंडळी राईमध्यें आल्यावर श्रीमंतांनीं “ माडीचा रस कसा काढितात ? ” म्हणून विचारिलें. तेव्हां एका माडाच्या झाडाजवळ श्रीमंतांना झाडास लाविलेलें मडकें दाखविलें. इतक्यांत एका कातकऱ्यानें वानरासारखें झाडावर चढून तें मडकें खालीं आणलें. त्यांतील रस श्रीमंतांना दाखविण्यांत आला व सर्वांनीं त्या रसाचें आचमन केलें. या ताज्या रसास नीरा म्हणतात.

हा रस नारळाच्या पाण्यापेक्षांहि गोड लागला. याच रसाची माडी कशी होते वगैरेबद्दल तपशीलवार माहिती श्रीमंतांनीं करून घेतली. या तालुक्यांत कातकरी व ठाकर लोकांची वस्ती आहे. या दोन्ही जातींची, त्यांच्या राहणीची वगैरे माहिती प्रो. हरिभाऊ लिमये यांनीं त्यांना दिली. कातकऱ्यांपेक्षां ठाकरांची राहणी स्वच्छतेची असते. तेथें असलेल्या कातकऱ्यांशीं श्रीमंत बराच वेळ बोलत होते. चकमकीनें विस्तव कसा पाडतात हें कातकऱ्यानें त्यांना दाखविलें. याप्रमाणें माहिती घेण्यांत व कुळकर्णी यांच्या मंडपांत चहापान करण्यांत बराच वेळ गेल्यामुळें त्यांना डोंगराच्या पायथ्याशीं येण्यास रात्र झाली. रात्र झाल्यास अडचण पडूं नये म्हणून पालीहून गडकरी लोक मशाली व कंदील घेऊन श्रीमंतांची स्वारी ज्या वाटेनें गेली होती त्या वाटेनें गेले. परंतु श्रीमंतांची स्वारी दुसऱ्याच बाजूनें उतरल्यामुळें चुकामूक झाली. यामुळें काळोखांतून प्रवास करण्याचा प्रसंग श्रीमंतांना आला. कधीं संवय नसल्यामुळें त्यांना खांचखळग्यांतून चालण्याचा बराच त्रास झाला. तथापि त्यांनीं कोणत्याहि प्रकारें नापसंती न दर्शवितां ते म्हणाले, "प्रवासांतील सर्व तऱ्हेचे अनुभव आले तर फायदाच होतो." दिवाबत्तींची व्यवस्था न ठेविल्याबद्दल ते कोणाहि अंमलदारावर रागावले नाहींत. कारण चूक त्यांची नव्हती, हें त्यांना माहित होतें. श्रीमंतांची ही दिलदार वृत्ति पाहून बरोबरच्या मंडळींच्या मनावर त्यांच्याबद्दल अनुकूल परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. अंधारांतून वाट काढीत काढीत सुमारें ९ वाजतां सर्व मंडळी पालीस सुखरूपपणें पोहोंचली. परत येतांना श्रीमंतांनीं सर्व प्रवास पायींच केला.

ता. १० रोजीं श्रीमंतांनीं पालींतील व आसपासच्या गांवांतील शिष्टमंडळींस मोठ्या थाटाची मेजवानी दिली. त्या वेळीं लघुरुद्राचे ब्राह्मणहि भोजनास बोलाविण्यांत आले होते. दुपारीं पालीकरांचा निरोप घेऊन ते जांभुळपाड्यास येण्यास निघाले. वाटेंत गांवोगांवचे लोक सडकेवर ठिक-ठिकाणीं त्यांचें दर्शन घेण्याकरितां जमले होते. सायंकाळीं जांभुळपाड्यास येतांच तेथील शाळेंतील बक्षिससमारंभ त्यांच्या हस्तें झाला.

ता. ११ रोजीं जांभुळपाड्याहून निघून श्रीमंत बाबासाहेब खोपोलीस गेले व तेथें भोजन करून दुपारीं कर्जतवरून मुंबईस गेले.

भोरच्या राजघराण्यांतील युवराजांचा स्वतंत्र रीतीनें स्वागतसत्कार करण्याचा सुधागड तालुक्यांतील जनतेला हा पहिलाच प्रसंग होता. भोर संस्थानच्या इतिहासांत या वेळपर्यंत संस्थानच्या कोणत्याहि युवराजांचा स्वतंत्रपणें दौरा संस्थानांत निघालेला नव्हता. श्रीमंत बाबासाहेब युवराज असतांना ते लहानपणीं आपल्या वडील-मातोश्रींबरोबर या तालुक्यांत एकदां देवीच्या दर्शनास गेले होते; संस्थानची पाहणी करण्याच्या हेतूनें गेले नव्हते. या वेळीं त्यांनीं युवराज या नात्यानें जो दौरा काढिला होता तो या तालुक्याची सर्व प्रकारें माहिती करून घेण्याच्या हेतूनें काढिला होता. या दौऱ्यांत त्यांनीं आपल्या प्रेमळ, गोड व मनमिळाऊ वागण्यामुळें लोकांचीं मनें आकर्षून घेतलीं. सुधागड तालुक्यांतील लोकांविषयीं त्यांचें त्या वेळीं जें अनुकूल मत झालें तें अद्यापहि कायम आहे. या तालुक्यांतील अनेक कार्यकर्त्या लोकांशीं त्यांचा परिचय झाला.

प्रो. हरिभाऊ लिमये त्यांच्याबरोबर ते परत मुंबईस जाईपर्यंत होते. त्यांच्या मैत्रीचा त्यांना लाभ होऊन त्यांच्या मदतीनें अनेक सार्वजनिक कामांत भाग घेण्याचे विचार त्यांच्या मनांत घोळूं लागले होते. परंतु एक वर्षानंतरच प्रो. हरिभाऊ लिमये सन १९१९ सालच्या फेब्रुवारी महिन्यांत एकाएकीं कालवश झाले. श्रीमंत बाबासाहेबांना त्यांच्या निधनाबद्दल अत्यंत दुःख वाटून त्या वेळच्या डायरींत त्यांनीं त्यांच्याबद्दल पुढील मजकूर लिहिला आहे.

27th Feb., 1919

It was a painful surprise and shock to read the death of Prof. Hari Govind Limaye of the Fergusson College. Since my trip to Sudhagad I came in contact with his sound views formed considering both sides of Politics, his courteous behaviour, his talk, his educational attainments. I had been utilising his friendship in gaining a scope to work in public cause. I had made up my mind to make use of his educational attainments in acquiring sound knowledge in Politics and he had kindly promised to help me. But all my hopes are utterly frustrated at present by his sudden death which took place yesterday at Hirabag Club where he had gone to

play as usual. He had long been suffering from heart disease which gave sudden pain in his heart after playing in billiards for some time and heart-failure brought about his death instantaneously. In short I lost in him one of my best friends. May God give his soul ever-lasting peace.

## श्रीमंत भाऊसाहेब यांचा व्रतबंध

श्रीमंत भाऊसाहेबांना नववें वर्ष चालू होतें. तेव्हां रावसाहेबांनीं त्यांचा व्रतबंध करण्याचें ठरवून ज्येष्ठ शुद्ध १२, शके १८३५, ता. १५ जून सन १९१३ हा मुहूर्त कायम करून व्रतबंध पुणें येथें करण्याचें निश्चित केलें. ता. ९ जून रोजीं गव्हर्नरसाहेबांची स्वारी शिरवळाहून पुण्यास गेल्यावर ता. ११ रोजीं श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत भाऊसाहेब यांच्यासह मुंजीकरितां पुण्यास गेले. रावसाहेब व जिजीसाहेब यांच्या स्वाऱ्याहि भोराहून पुण्यास गेल्या. श्रीमंत भाऊसाहेब यांच्या मुंजीकरितां भोराहून ता. १३ रोजीं हत्ती, घोडे, पालखी वगैरे सर्व सरंजाम व लवाजमा घेऊन मंडळी पुण्यास गेली. या मुंजीच्या प्रसंगीं श्रीमंत भाऊसाहेब यांच्या मातोश्री हयात नसल्यामुळें श्रीमंत सौ. जिजीसाहेबांना व श्रीमंत बाबासाहेबांना फार वाईट वाटलें. तथापि श्रीमंत भाऊसाहेब यांचा पुनर्जन्म होऊन त्यांच्या उपनयनसमारंभाचा योग प्राप्त झाला याबद्दल त्यांना आनंद वाटल्यावांचून राहिला नाहीं. रावसाहेबांचें आपल्या नातवावर निरतिशय प्रेम असल्यामुळें या समारंभांत त्यांनीं कोणत्याहि प्रकारें न्यूनता पडूं न देण्याची खबरदारी घेतली होती. या समारंभाच्या खर्चाची सर्व जबाबदारी रावसाहेबांच्यावर होती. तथापि श्रीमंत बाबासाहेबांच्या कोणत्याहि सूचना अमान्य न करण्याचें धोरण त्यांनीं ठेविलें होतें. ता. १४ रोजीं श्रीमंत बाबासाहेबांच्या हस्तें मुंजीचें पुण्याहवाचन व देवप्रतिष्ठापना करण्यांत आली. ता. १५, ज्येष्ठ शु. १२ रोजीं सकाळीं ठरलेल्या मुहूर्तावर ८ वाजतां व्रतबंधविधि मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला. समारंभास मे. एल्. जे. माउंटफोर्ड, कलेक्टर व पोलिटिकल एजंट, वगैरे युरोपिअन ऑफिसर व पुण्यांतील सरदार, जहागिरदार व बडी बडी मंडळी उपस्थित होती. ता. १९ पर्यंत समारंभांतील निरनिराळे कार्यक्रम चालू होते. ता. २२ रोजीं पुण्यांतील बड्या लोकांस मुंजीसंबंधानें मोठ्या थाटाची मेजवानी देण्यांत येऊन सायंकाळीं सुमारें १५०

शास्त्री, वैदिक वगैरे ब्रह्मवृंदांची सभा झाली, व प्रत्येकास एक एक रुपया देऊन त्यांची संभावना करण्यांत आली. मेजवानीच्या वेळीं व विद्वानांच्या सभेच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं पुढाकार घेऊन उत्तम व्यवस्था ठेविली होती.

## श्रीमंत भाऊसाहेब यांचें शिक्षण

श्रीमंत भाऊसाहेबांचें शिक्षण श्रीमंत बाबासाहेबांच्या देखरेखीखालीं भोरासच चालू होतें. परंतु भोरपेक्षां पुणें येथें त्यांचें शिक्षण चांगल्या प्रकारें होईल असें श्रीमंत बाबासाहेबांना वाटत असल्यामुळें त्यांनीं श्री. भाऊसाहेबांना पुण्यासच ठेवून त्यांच्या खर्चाकरितां निदान वार्षिक सहा हजार रुपयांची जादा रक्कम देण्याबद्दल श्रीमंत रावसाहेबांना विनंति केली. श्रीमंत रावसाहेबांना बाहेरील शिक्षणाचे इष्ट परिणाम पटल्यामुळें व नेमणूक देण्याबाबत मि. एल. जे. माउंटफोर्ड यांनीं शिफारस केल्यावरून त्यांनीं सन १९१६ सालीं त्यांच्या खर्चाकरितां वार्षिक सहा हजार रुपये मंजूर करून त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था केली.

## सार्वजनिक कार्यें

## १९१३ ते १९२२ पर्यंत

### १. वांई येथील द्रवीड हायस्कुलास भेट

ता. ३ जून १९१३ रोजीं महाबळेश्वराहून शिरवळास जातांना श्रीमंत बाबासाहेब द्रवीड हायस्कूलच्या चालकांच्या विनंतीवरून सदर संस्था पाहण्याकरितां वांईस सुमारें एक तास थांबले होते. बादशहा पंचम जॉर्ज यांच्या वाढदिवसानिमित्त या दिवशीं जरी सुट्टी होती तरी शाळा भरवून मुलांना या दिवशीं मिठाई वांटण्याची वहिवाट असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांच्या हस्तेंच मिठाई वांटण्याचें चालकांनीं ठरविलें होतें. श्रीमंत बाबासाहेब शाळेजवळ आले तेव्हां त्यांना शाळेंत आणण्याकरितां प्रो. कानिटकर दरवाजापाशीं गेले व त्यांचें स्वागत करून तेथें वांईतील रा. पाटणकर, खटावकर, चितळे हेडमास्तर, भाऊराव वैद्य, शंभूराव लेले, बाबासाहेब गाडगीळ, ही प्रतिष्ठित मंडळी उभी होती, त्यांची ओळख करून देऊन त्यांना आंत घेऊन गेले. श्रीमंत बाबासाहेब शाळेच्या दरवाज्यापाशीं आल्यापासून आंत आपल्या जागेवर

बसेपर्यंत स्कूल बँड वाजत होता. श्रीमंत बाबासाहेबांच्या हस्तें मुलांना मिठाई वांटण्यांत आली. प्रो. कानिटकर यांनीं शाळेचा प्रसिद्ध झालेला रिपोर्ट देऊन संस्थेची सर्व हकीकत सांगितली. नंतर मंडळी उपाहारासाठीं उठली. उपाहार चालू असतां श्रीमंत बाबासाहेब शाळेसंबंधीं, म्युनिसिपॅलिटीसंबंधीं व एकंदर गांवासंबंधीं माहिती विचारीत होते. उपाहारानंतर पानसुपारी झाल्यावर मंडळींनीं केलेल्या स्वागताबद्दल आभार मानून श्रीमंत बाबासाहेब शिरवळास गेले.

## २. भोर येथें श्रीरामक्रीडाभुवन संस्थेची स्थापना

सन १९१५ सालपर्यंत भोर येथें उघड्या हवेंतील कोणत्याहि प्रकारच्या खेळाची सोय नव्हती. भोर येथें सन १८९७ सालीं हायस्कूल सुरू झाल्यापासून सुशिक्षितांची संख्या वाढूं लागली. इतर शहरांप्रमाणें येथेंहि क्रीडांगणें, वाचनालयें, वगैरे संस्था असाव्यात अशी सुशिक्षितांच्या मनांत साहजिकच इच्छा उत्पन्न होऊं लागली. वरील संस्थांच्या अभावीं तरुण पिढीला जीवन नीरस वाटूं लागलें. परंतु अशा संस्था स्थापन करण्याचें धाडस कोणास होत नसे, व सामान्य लोकांस पैशाची अडचण भासत होती. श्रीमंत बाबासाहेब शिरवळ तालुक्याचा कारभार पाहूं लागल्यानंतर थोड्याच दिवसांत तेथें त्यांनीं एक टेनिस कोर्ट तयार केलें. तेथें कांहीं दिवस शिरवळचे कांहीं रहिवासी खेळण्याकरितां जमत. परंतु शिरवळ येथील पांढरपेशा वर्गांतहि दुय्यम शिक्षण घेतलेले लोक फारच थोडे व तेहि शेतकी व व्यापारधंदा करणारे. टेनिससारख्या खेळांत त्यांना गोडी वाटत नसे. यामुळें तेथील टेनिस क्लब जोरांत चालण्याची आशा दिसेना. याच वेळीं भोर येथें त्या वेळचे सबजज्ज श्री. अनंत रामचंद्र जोशी, बी. ए., एल्एल्. बी., डॉ. रामचंद्र पांडुरंग दिवाण, एल्. एम्. ॲण्ड एस्., रा. रा. विनायक गोविंद रानडे, एम्.ए., एल्एल्.बी., शाळाधिकारी, व रा. रा. बा. ना. जोशी, हेडमास्तर, हायस्कूल, भोर, वगैरे कांहीं अधिकाऱ्यांच्या मनांत टेनिस क्लब स्थापन करण्याचें येऊन त्यांनीं जागा वगैरे पाहण्याचें काम सुरू केलें. श्रीमंत बाबासाहेबांना हें कळतांच त्यांनीं पुढाकार घेण्याचें कबूल केलें व वरील मंडळींस टेनिस क्लब स्थापण्यास उत्तेजन दिलें. त्यांचा हा पाठिंबा मिळाल्यामुळें मंडळींना हुरूप येऊन त्यांनीं मेंबर मिळवून वर्गणी जमा केली व रामबाग नाक्यासमोरची रा. वामनराव

चित्रांक ३८



भोर येथील श्रीरामक्रीडाभुवनाच्या स्थापनेच्या वेळचा सभासदांचा फोटो. [सं. पा. १८२

मध्यभागीं खुर्चीवरः---२ श्री. नानासाहेब गांडेकर; ३ श्रीमंत बाबासाहेब; ४ श्री. गो. वि. घायगुडे (कारभारी)

श्रीमंतांचे मागेंः---वा. ना. जोशी.

पाटणकर यांच्या मालकीची जागा पसंत करून ती संस्थेच्या हयातीपर्यंत दरसाल ९ रुपये भाडेपट्यानें घेऊन तेथें टेनिस कोर्ट तयार करण्याचें ठरविलें.

त्यानंतर संस्थेची घटना करण्याकरितां एक सभा भरविण्यांत आली होती. सभेचें अध्यक्षस्थान श्रीमंत बाबासाहेबांनीं स्वीकारलें होतें. या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं कोर्टाच्या प्राथमिक खर्चाकरितां रु. ३०० व दरसाल वर्गणी म्हणून रु. १२० आपण देणार असल्याचें जाहीर केलें. नंतर सदर संस्थेस कोणतें नांव द्यावें याबद्दल चर्चा सुरू झाली. त्या वेळीं संस्थेच्या पुरस्कर्त्यांपैकीं एक उत्साही पुरस्कर्ते कै. चित्रे यांनीं श्रीमंत बाबासाहेबांचें नांव द्यावें असें सुचविलें. परंतु श्रीमंत बाबासाहेबांना तें पसंत पडलें नाहीं. त्यांनीं आपल्या घराण्याचें कुलदैवत श्रीरामचंद्र यांचें नांव द्यावें असें सुचविलें व त्यांची ही कल्पना सर्वांना मान्य झाली. कोर्ट तयार झाल्यावर त्याचा उद्-घाटनसमारंभ ता. ८ नोव्हेंबर सन १९१५ इसवी रोजीं श्रीमंत बाबासाहेबांच्या हस्तें झाला. त्या वेळीं रावसाहेबांची संमति मिळवून या संस्थेचे अध्यक्ष होण्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं कबूल केलें. ( अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं केलेलें भाषण परिशिष्ट ‘ झ ’ यांत दिलें आहे. ) ही संस्था केवळ त्यांच्याच आश्रया-खालीं आजपर्यंत चालत आली आहे.

सदर संस्था निघाल्यामुळें व्यायामाची उत्तम सोय झाली आहे. श्रीमंत बाबासाहेबांनीं पुढाकार घेतल्यामुळेंच ही संस्था अस्तित्वांत येऊं शकली व तेच संस्थेचे अध्यक्ष असल्यामुळें शहरांतील धनिकांकडून वर्गणीच्या मोठमोठ्या रकमा मिळाल्या. या संस्थेच्या स्थापनेमुळें श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल नागरिकांच्या मनांत प्रेमभावना उत्पन्न झाली व तरुण पिढींत नवचैतन्य दिसूं लागलें. या वेळीं भाटघर धरणाचें काम सुरू होतें. भोर येथें टेनिस कोर्ट सुरू झाल्यावर भाटघर येथील एक्झिक्यूटिव्ह एंजिनिअर मि. सी. बी. पूली हे क्लबचे ऑनररी सभासद होऊन मधून मधून खेळावयास येत. ते भाटघर येथील आपल्या टेनिस कोर्टावर खेळण्यास मंडळींस बोलावीत असत. तेथील इतर अधि-कारीहि खेळावयास येत व क्लबास अनेक प्रकारें मदत करीत. श्रीमंत बाबासाहेब श्रीराम क्रीडाभुवनावर खेळावयास येत असत. त्यामुळें भोरांतील तरुण सुशिक्षितांना त्यांची ओळख करून घेण्याची व त्यांच्याशीं विचारविनिमय

करण्याची संधि मिळत असे. श्रीमंत बाबासाहेब या मंडळींत मिळून मिसळून वागूं लागल्यामुळें त्यांनाहि संस्थानांतील प्रजेच्या आकांक्षा काय आहेत हें तरुण सुशिक्षितांमार्फत कळून घेण्याची संधि मिळूं लागली. सामाजिक जीवन सुखमय करण्यास ही संस्था बऱ्याच अंशांनीं कारणीभूत झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. अशा प्रकारच्या सार्वजनिक हिताच्या संस्था असल्याखेरीज कोणत्याहि शहरास शोभा येत नाहीं, ही गोष्ट श्रीमंत बाबासाहेबांस माहीत असल्यामुळें भोरास अशी एकहि संस्था नसावी हें पाहून त्यांना वाईट वाटत असे; व म्हणूनच त्यांनीं पुढाकार घेऊन लोकांना उत्तेजन दिलें व ही पहिली संस्था स्थापन झाली. व्यापारीवर्गानेंहि या संस्थेस मदत दिली. भोरचे सुप्रसिद्ध कापडाचे व्यापारी नगरशेट रामदास किसनदास यांनीं एक हजार रुपये पुढें कांहीं दिवसांनीं दिले. या संस्थेस सर्वांत मोठी देणगी हीच होय.

## ३. सन १९१५ सालची राष्ट्रीय सभा

सन १९१५ सालची राष्ट्रीय सभा मुंबईस भरावयाचें ठरलें होतें. १९१५ हें साल हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासांतील सीमांत-रेषा समजण्यांत येतें. राष्ट्रीय सभेंत जे दोन पक्ष निर्माण झाले होते, त्यांच्यांत समेट घडवून आणून या सालची राष्ट्रीय सभा भरविण्याचे प्रयत्न जोरानें चालू होते. परंतु सर्व प्रयत्न अयशस्वी झाल्यामुळें या अधिवेशनास मुख्यतः नेमस्तच हजर राहावयाचे होते. सर सत्येन्द्रप्रसन्न सिंह यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें. त्यांचा सामाजिक दर्जा व त्यांची विद्वत्ता फार मोठी होती. ते हिंदुस्थान सरकारचे माजी कायदेमंत्री असून त्यांचें वजन फार दांडगें होतें.

सन १८९५ सालीं पुणें येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेस श्रीमंत बाबासाहेब गेले होते हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. नामांकित वक्त्यांचीं भाषणें ऐकण्याचा त्यांना नाद असल्यामुळें ते सन १९१५ सालच्या राष्ट्रीय सभेच्या पहिल्या दिवशीं ता. २७ डिसेंबर रोजीं हजर राहिले होते. थोर व प्रतिष्ठित गृहस्थांच्या बसण्याच्या जागेंत त्यांना जागा देण्यांत आली होती. दुसऱ्या दिवशींहि ते सभेस गेले होते.

## ४. राष्ट्रीय सामाजिक परिषद

याच वेळीं राष्ट्रीय सामाजिक परिषद् भरली होती. या परिषदेच्या स्वागतमंडळाचे ते सभासद झाले होते. ता. ३० डिसेंबर रोजीं ते या परिषदेसहि हजर राहिले होते. राष्ट्रीय सभेंत व सामाजिक परिषदेंतहि सर सत्येन्द्रप्रसन्न सिंह, सुरेन्द्रनाथ बानर्जी, पं. मदन मोहन मालवीय, देवी सरोजिनी नायडू, ॲनी बेझंट, चंदावरकर इत्यादि सुविख्यात वक्त्यांचीं भाषणें ऐकण्याची संधि त्यांना मिळाली.

## ५. गांधर्व महाविद्यालय

सन १९१६ सालीं श्रीमंत भाऊसाहेबांची प्रकृति बिघडली. तेव्हां मुंबईंतील डॉक्टरांकडून त्यांची प्रकृति तपासून घेऊन योग्य औषधोपचार सुरू करण्याच्या हेतूनें श्रीमंत बाबासाहेब त्यांना घेऊन मुंबईस गेले. तेथें त्यांना बरेच दिवस राहावें लागलें. तेथील मुक्कामांत गांधर्व महाविद्यालयांत चातुर्मासानिमित्त पंडित विष्णु दिगंबर पलुसकर यांचें तुलसीरामायणाचें वाचन सुरू होतें तें ऐकण्यास श्रीमंत बाबासाहेब मधून मधून जात असत. तुलसीरामायण-वाचनसमाप्तिसमारंभ ता. ६ नोव्हेंबर सन १९१६ रोजीं झाला. या समारंभाचें अध्यक्षस्थान श्रीमंत बाबासाहेब यांना देण्यांत आलें होतें. त्यांनीं विद्यालयाच्या कार्याची प्रशंसा करून रामायणवाचनाच्या जागेस 'श्रीराम-संगीतभवन' असें नांव दिल्याचें जाहीर केलें व विद्यालयाच्या संस्थेला ५०० रुपयांची देणगी दिली.

## ६. सातारा येथील ऐतिहासिक संग्रह व युनियन क्लब भेट

ता. २९ मे सन १९१७ रोजीं श्रीमंत बाबासाहेब रा. ब. डी. बी. पारसनीस यांच्या विनंतीवरून साताऱ्यास गेले होते. तेथें त्यांनीं रा. ब. पारसनीस यांनीं महत्प्रयासानें अनेक अडचणी सोसून जमा केलेला बहुमोल ऐतिहासिक संग्रह पाहिला.

दुसरे दिवशीं सातारा येथील युनियन क्लबनें श्रीमंत बाबासाहेबांना पानसुपारी केली. श्रीमंत बाबासाहेब पुणें हायस्कुलांत शिकत असतांना त्या वेळचे हेडमास्तर रा. ब. विठ्ठल नारायण पाठक या वेळीं सेवानिवृत्त होऊन

सातारा येथें राहत होते. ते वरील क्लबचे प्रमुख सभासद असून त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांची सभासदांना ओळख करून दिली. तेव्हां त्यांनीं पुढील भाषण केलें. त्यावरून त्यांचें श्रीमंत बाबासाहेबांसंबंधानें काय मत होतें तें कळून येणार आहे.

"I am glad to receive today Shrimant Babasaheb Pant Sachiv of Bhor. The Pant Sachiv was one of the eight ministers of Shrimant Chhatrapati (Shivaji) Maharaj of Satara and his successors. Shankaraji Narayan, the first Pant Sachiv, the illustrious ancestor of Shrimant Babasaheb, had, as you all know, sacrificed himself through his devotion to the then ruler. I know Shrimant Babasaheb since 1896 when he was my student in the Poona High School; and I am proud to say that he is unassuming, clever and a person of cool temperament and studious habits. As his tutor I love him most. I have a right to offer a few words of advice and so I ask him to discharge the onerous duties, which will fall upon him in due course of time, with due regard for the welfare of his subjects and with such devotion to the British Government, as would be befitting the tradition of his illustrious family."

## ७. First Conference of the Bombay Local Self-Government, ता. २७ जुलै १९१७

मुंबई इलाख्यांतील स्थानिक स्वराज्य संस्थांची पहिली परिषद् पुणें येथें ता. २७ जुलै १९१७ रोजीं भरली होती. परिषदेच्या चालकांच्या निमंत्रणावरून श्रीमंत बाबासाहेब परिषदेच्या पहिल्या दिवशीं हजर राहिले होते. त्या दिवशीं मि. ए. एम्. ए. वेस्ट्रॉप, कलेक्टर आणि पो. ए., कमिशनर मि. सेडन व आणखीहि बरेच मोठे अधिकारी आले होते. परिषदेचे अध्यक्ष मि. व्ही. जे. पटेल असून स्वागत कमिटीचे चेअरमन दिवाण बहादुर के. आर. गोडबोले होते. त्यांचें स्वागतपर भाषण झाल्यावर अध्यक्ष मि. पटेल यांचें भाषण झालें. दिवाण बहादुर आपल्या भाषणांत म्हणाले, " सन १९१५ सालच्या एप्रिलच्या २८ तारखेच्या ठरावांत हिंदुस्थान सरकारनें

चित्रांक २९



पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळ; या इमारतीच्या पश्चिम दालनाचा उद्‌घाटनसमारंभ श्रीमंत बाबासाहेब यांनीं ता. ३० मे सन १९१९ इ. रोजीं केला.

स्थानिक स्वराज्य संस्थांची प्रगति अधिक करण्याचें आपलें धोरण जाहीर केलें असून पुढें त्यांनीं असेंहि ठरविलें आहे कीं, तपशिलाच्या बाबतींत ढवळा-ढवळ न करतां स्थानिक स्वराज्य संस्थांतील लोकनियुक्त सभासदांवर अधिक विश्वास टाकावयाचा."

मि. पटेल यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत अशा परिषदेचें महत्त्व सांगून काय काय सुधारणा करून घेतल्या पाहिजेत तें सांगितलें. ते म्हणाले, "(अ) स्थानिक स्वराज्य संस्था सर्वस्वीं लोकनियुक्त असाव्या असा सामान्य नियम असला पाहिजे. (ब) स्थानिक स्वराज्य संस्थांत बिनसरकारी सभासदांनीं निवडलेला अध्यक्ष असावा."

परिषदेचें काम दोन दिवस चाललें होतें. ता. २९ रोजीं जमलेल्या प्रतिनिधींना (Delegates) ॲटहोम देण्यांत आलें. त्या वेळीं श्रीमंत बाबा-साहेबांना निमंत्रण आल्यावरून ते गेले होते.

परिषदेंत म्युनिसिपल व लोकल बोर्ड संस्था यांसंबंधींच चर्चा झाली.

## ८. कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय

श्रीराम क्रीडाभुवन संस्था स्थापन होण्यापूर्वीं भोरास जर कोणी एखादा पाहुणा आला तर त्यास दाखविण्यासारखी एकहि सार्वजनिक संस्था नव्हती. वरील संस्था अस्तित्वांत आल्यानंतर जे कोणी येथें येत त्यांना हा क्लब एक करमणुकीचें साधन झालें होतें. ज्यांना टेनिसची आवड असे त्यांना खेळ-ण्याची सोय झाली होती. पुढें श्रीमंत बाबासाहेबांच्या व इतर मंडळींच्या मनांत भोरास वाचनालय असावें असें येऊं लागलें. याच संधीस संस्थानचे पोलिटिकल एजंट मि. वेस्ट्रॉप यांनीं ता. १ फेब्रुवारी सन १९१८ इ. रोजीं भोरास भेट दिली. श्रीराम क्रीडाभुवनाच्या सभासदांच्या विनंतीवरून ते ता. २ फेब्रुवारी रोजीं श्रीमंत बाबासाहेबांसह टेनिस कोर्टवर गेले. तेथें संस्थानचे कारभारी व वरील संस्थेचे व्हाइस-प्रेसिडेंट रा. धायगुडे यांनीं व इतर सभासदांनीं साहेबबहादुरांचें स्वागत केलें. नंतर रा. धायगुडे यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांच्या प्रोत्साहनानें ही संस्था कशी अस्तित्वांत आली याबद्दलची सर्व हकीकत सांगून भोर येथें एक वाचनालय सुरू झाल्यास श्रीमंत बाबा-

साहेबांनीं आपला अमूल्य पुस्तकसंग्रह वाचनालयास देण्याचें आश्वासन दिलें असल्याचेंहि साहेबबहादुरांस निवेदन केलें.

या वेळीं साहेबबहादुरांनीं जें भाषण केलें व संस्थेच्या शेरेबुकांत जो शेरा लिहिला तो खालीं दिला आहे. त्यावरून भोर येथें वाचनालयाची किती आवश्यकता होती हें दिसून येईल.

Shrimant Babasaheb and Gentlemen,

I can only say that it is an unexpected pleasure to me and I thank you very heartily for the kind reception given to me this evening. I gather from the report that the origin of the Club lies in Shrimant Babasaheb's keenness of interest for athletic exercises and the foundation of the Club is solely due to him. I wish every success to the objects aimed at by the Club. I hope that Shrimant Babasaheb's fervour for out-door games will result in extending the activities of the Club in other directions also, such as the founding of a good Library at Bhor which the Club has in contemplation. I understand that Bhor does not possess an adequate library. If a library is established Shrimant Babasaheb promises to give over his valuable collection of books to it; and the people must feel greatly thankful to him for his munificent promise. When I shall visit Bhor next time I hope that the library would be existing and I shall directly be taken to the library hall and when I shall have a look round, I shall see the latest papers lying on the table. I again heartly thank Shrimant Babasaheb and the members of the Club for their kind reception of this evening."

( शेरा )

"Mrs. Westroppe and I spent a very pleasant hour at the Club watching tennis etc. I was very much interested to hear of the various projects which the enthusiastic founder and patron of the Club Shrimant Babasaheb has in view. I hope that the library which is a great desideratum for Bhor will soon be started in a good building with His Highness's

assistance; also that the Bhor school-boys will take up games and sports vigorously, encouraged and assisted by the enlightened gentlemen who form the members of the Club."

साहेबबहादुरांच्या वरील भाषणानें उत्तेजन येऊन श्रीराम क्रीडाभुवनाच्या चालकांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या आश्रयाखालीं वाचनालय सुरू करण्याचें ठरविलें. व श्रीमंत बाबासाहेब यांनीं वाचनालयास सुमारें दोन हजार रुपये किंमतीचा आपला पुस्तकसंग्रह देऊन शिवाय कपाटें वगैरेंच्या प्राथमिक खर्चाकरितां तीनशें रुपये देण्याचें कबूल केलें. या उदार देणगीनें उत्तेजित होऊन श्रीराम क्रीडाभुवन संस्थेच्या सभासदांनीं आपापसांत ३०० रुपये जमा करून भोर नागरिकांकडूनहि ३०० रुपये वर्गणी मिळविली. याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर एका भाड्याच्या जागेंत वाचनालय संस्था स्थापन करण्याचें ठरविण्यांत आलें. त्याप्रमाणें संस्था स्थापन होऊन तिचा उद्‌घाटन-समारंभ श्रीमंत बाबासाहेबांच्या हस्तें ता. ९ जून सन १९१८ इ. रोजीं झाला. त्या वेळीं सभासदांच्या इच्छेस श्रीमंत बाबासाहेबांनीं मान दिल्यामुळें सदर वाचनालयास श्रीमंत बाबासाहेब यांच्या प्रथम प्रिय पत्नी कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब यांचें नांव देण्यांत येऊन सदर संस्था ' कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचीव वाचनालय ' या नांवानें जाहीर करण्यांत आली व या संस्थेचेंहि अध्यक्षस्थान श्रीमंत बाबासाहेबांनीं संस्थेच्या सभासदांच्या विनंतीवरून स्वीकारलें.

या प्रसंगीं श्रीमंत बाबासाहेबांनीं वाचनालयाच्या उपयुक्ततेसंबंधीं जें विस्तृत भाषण केलें, त्यावरून वाचनालयासंबंधानें व आपल्या प्रथम प्रिय पत्नी-संबंधानें त्यांचे विचार कशा प्रकारचे आहेत हें दिसून येईल. ( समग्र भाषण परिशिष्ट 'न' मध्यें दिलें आहे. )

श्रीमंत बाबासाहेबांनीं पुढाकार घेतल्यामुळें व साहेबांनीं प्रोत्साहन देऊन अशा संस्थांची आवश्यकता पटवून दिल्यामुळें नागरिकांच्या शारीरिक, बौद्धिक व मानसिक विकासास उपयुक्त अशा श्रीराम क्रीडाभुवन व कै. श्री. सौ. गंगूताई वाचनालय या दोन संस्था स्थापन झाल्या.

## ९. सन १९१८ सालची इन्फ्ल्युएन्झाची सांथ

सन १९१८ सालीं ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांत इन्फ्ल्युएन्झा सांथीनें हिंदुस्थानांत लाखो लोकांचे बळी घेतले ही गोष्ट सर्वांना माहीतच आहे.

भोर संस्थान या सांथीच्या तडाक्यांतून सुटलें नव्हतें. भोर शहरांत या सांथीचा उद्भव होऊन लोक मृत्युमुखीं पडूं लागले. रोज मृत्युसंख्या वाढत चालली. या वेळीं सरकारी डॉक्टर रजेवर असल्यामुळें सरकारी दवाखान्यांत औषधोपचाराची सोय विशेष नव्हती. एखाद्या घरांतील सर्व मंडळी आजारी पडत तेव्हां औषध-पाणी करण्यास घरांत कोणीहि उभें नसल्यामुळें या मंडळींचे फारच हाल होत. सरकारांतून लोकांना मदत मिळण्याची कांहीं व्यवस्था करण्यांत आली नव्हती. दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसावें लागे. अशा बिकट प्रसंगीं कांहीं उत्साही मंडळींनीं लोकांना मदत करण्याचें ठरवून आरोग्य-मंडळ स्थापन केलें व एक फंडहि जमविला.

भोरचे सुप्रसिद्ध वैद्य रा. नारायणशास्त्री भावे यांनीं निःस्वार्थ बुद्धीनें मदत करण्याचें कबूल केलें व त्यांनीं एक अनुभवसिद्ध काढा लिहून दिला. त्याप्रमाणें रोज काढा तयार करण्याचें काम रा. वामनराव पाटणकर यांनीं पतकरिलें. रोज २०० शेर पाणी घालून ५० शेर काढा तयार करावा लागे. रा. पाटणकर रोज पहाटे काढा शिजत ठेवून सकाळीं सात वाजतां बाटल्या भरून ठेवीत. शहराचे भाग पाडून काढा प्रत्येक ठिकाणीं घरोघर देण्याकरितां स्वयंसेवक तयार झाले होते. छाती शेकण्याकरितां पोटिस तयार करण्यास जवसाचें पीठ तयार करून ठेविलें होतें. ज्यांना अनुकूलता नसेल त्यांना देण्याकरितां साळीच्या लाह्या, साखर, साबूदाणा व जवसाचें पीठ यांच्या पुड्या करून ठेवण्यांत येत. रोज सकाळीं स्वयंसेवक एकत्र जमून प्रत्येकजण स्वतः काढ्याचा एक डोस घेऊन नंतर काढ्याची एक बाटली व वरील जिनसांच्या पुड्या घेऊन बाहेर पडत व आपआपल्या भागांत जे आजारी असतील त्यांना काढा देत. महारवाडा, मांगवाडा इत्यादि अस्पृश्य ठिकाणें वगळण्यांत आलीं नव्हतीं. त्यांच्या वस्तींत जाऊन त्यांना काढा देण्यांत येत असे. वैद्य भावेशास्त्री स्वतः हिंडत असत. याप्रमाणें एक महिना सारखें काम सुरू होतें. काढा इतका परिणामकारक ठरला कीं, तो सुरू केल्यानंतर मृत्यु-संख्या कमी होत चालली व सात आठ दिवसांनंतर लागण जरी होत असे तरी सहसा कोणी दगावत नसे. काढ्याची इतकी प्रसिद्धि झाली कीं, आस-पासच्या खेड्यांतील लोकहि काढ्याकरितां भोरास येत. भोर येथील गवती चहा,

तुळशी व रिंगणमुळाचीं झाडें खलास झालीं तेव्हां या जिनसा आसपासच्या खेड्यांतून आणाव्या लागत. एका महिन्यांत सांथ नाहींशी झाली. योग्य वेळीं वरील उपाययोजना केल्यामुळें प्राणहानि फारशी झाली नाहीं.

या वेळीं रावसाहेब भोरासच होते. श्रीमंत बाबासाहेब रामबाग बंगल्यांत राहत होते. आरोग्य मंडळ स्थापन झाल्याची बातमी कळतांच त्यांना फार आनंद झाला व या कार्यास आपली पूर्ण सहानुभूति असल्याचें मंडळाच्या चालकांस कळवून त्यांनीं फंडास मदत दिली.

इन्फ्ल्युएन्झाची सांथ थांबल्यानंतर मंडळाच्या चालकांनीं श्रीमंत बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरविली होती. सभेंत ज्यांनीं ज्यांनीं फंडास मदत केली व ज्यांनीं स्वयंसेवकाचें काम पतकरून औषधें घरोघर वांटलीं त्या सर्वांचे आभार मानण्यांत आले. श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें वैद्य रा. नारायणशास्त्री भावे यांना त्यांच्या निर्हेतुक बहुमोल कामगिरीबद्दल ५० रुपयांची रक्कम अल्प पारितोषिक म्हणून देण्यांत आली. श्रीमंत बाबासाहेब यांनीं फंडास सढळ हातानें मदत करून कार्यकर्त्यांना जें उत्तेजन दिलें त्याबद्दल त्यांच्या विषयीं नागरिकांच्या मनांत आदर व प्रेम उत्पन्न होऊन त्यांना त्यांनीं धन्यवाद दिले.

आरोग्यरक्षणाच्या कामीं ज्यांनीं मदत केली त्यांपैकीं कांहींचीं नांवें: रा. वि. के. सामक, रा. ना. म. भिडे, रा. भाऊसाहेब जोशी, कै. स. र. चित्रे, वामनराव पाटणकर, श्री. अ. पाटणकर, हायस्कुलांतील वरील वर्गांतील विद्यार्थी व श्रीपतराव ऊर्फ बयाजीबोवा देशमुख, बिरवाडीकर, रा. ब. ग. वाळिंबे वगैरे.

शिरवळ येथेंहि या सांथीच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं त्यांचे पर्सनल क्लार्क रा. माधवराव सुभेदार यांच्या देखरेखीखालीं औषधोपचाराची तजवीज केली होती. तेथेंहि फंड उभारण्यांत येऊन त्यास त्यांनीं २० रुपये व म्युनिसिपालिटीचे ३० रुपये दिले होते. या साथींत श्रीमंत बाबासाहेबांचे दोन आप्त श्री. बाळासाहेब गांडेकर व श्री. भाऊसाहेब विंचुरकर यांचे बळी पडले.

## १०. भारत इतिहास-संशोधक मंडळ : सातवें संमेलन

मंडळाच्या चालकांच्या अनेक वर्षांच्या परिश्रमानें मंडळाच्या इमारतीचें पश्चिम दालन तयार झालें होतें. या दालनाचें उद्‌घाटन मंडळाच्या सातव्या

सम्मेलनाच्या वेळीं ता. ३० माहे मे सन १९१९ इ. रोजीं श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें करण्याचा समारंभ झाला. या समारंभास मंडळाचे सभासद व शहरांतील बरेच प्रमुख गृहस्थ हजर होते. मंडळाचे अध्यक्ष विद्वत्कुलशेखर रावबहादुर चिंतामणराव वैद्य यांनीं निमंत्रित पाहुण्यांचें व जमलेल्या मंडळींचें स्वागत केलें. ते आपल्या प्रास्ताविक भाषणांत म्हणाले, " ही संस्था अत्यंत उपयुक्त कार्य करीत आहे. जुने कागदपत्र धुंडाळून खरी ऐतिहासिक माहिती मिळविणें हें काम अत्यंत स्फूर्तिदायक व उपयुक्त आहे. ज्या राष्ट्राला मागील इतिहास नाहीं, त्या राष्ट्राला पुढील इतिहासहि नाहीं. आजचा दिवस या मंडळाच्या इतिहासांत महत्त्वाचा आहे. मंडळाच्या कार्यासाठीं त्याच्या मालकीची नवी इमारत बांधण्यास गेल्या सालीं सुरुवात झाली असून सदर इमारतीचें पश्चिम दालन तयार झालें आहे. तें उघडण्याचा समारंभ युवराज श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव यांच्या हस्तें आज व्हावयाचा आहे. राजाराम महाराजांच्या कारकीर्दींत महाराष्ट्रावर ओढवलेल्या दुर्धर प्रसंगांत ज्या कर्तृत्वशाली पुरुषांनीं हिंदुपदपादशाही कायम राखिली त्यांमध्यें पंतसचिव हे प्रमुख होते. तेव्हां त्यांच्याच वंशांतील पुरुष आजचा अनावरणसमारंभ करण्यास आपणांस लाभला हें आमचें सुदैव होय. "

वरील आशयाचें भाषण करून त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना अध्यक्षस्थान स्वीकारून इमारत उघडण्याबद्दल विनंति केली. तेव्हां श्रीमंत बाबासाहेबांनीं अध्यक्षस्थान स्वीकारून पुढील आशयाचें भाषण केलें. ते म्हणाले, " माझ्यापेक्षां अधिक योग्यतेचे गृहस्थ अध्यक्ष होण्यास लायक असतां मला हा मान देण्यांत संस्थेच्या चालकांचा एक हेतु असावा असें दिसतें. तो हा कीं, मीं आजपर्यंत इतिहासांत लक्ष घातलें नव्हतें तें घालणें मला भाग पडावें हा होय. म्हणून मी आपणांस या प्रसंगीं असें अभिवचन देतों कीं, मी या संस्थेस द्रव्यद्वारा व शरीरद्वारा मदत करीन. " नंतर त्यांनीं इतिहासाचे जे अनेक उपयोग आहेत त्यांवर विद्वत्तापूर्ण व विचारप्रवर्तक व उद्‌बोधक भाषण करून सन १८८४ पासून कै. रा. ब. कीर्तने, विष्णुशास्त्री चिपळूणकर, मोडक, साने, रानडे, वाड, राजवाडे, खरे, पारसनीस, इत्यादि इतिहासभक्तांनीं केलेल्या कामगिरीचा गौरवपूर्वक उल्लेख करून संघटित प्रयत्नांची

चित्रांक ४०



पुणें येथील सर भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमंदिर; या इमारतींत सर भांडारकर यांच्या अर्धपुतळ्याचा अनावरणसमारंभ श्रीमंत बाबासाहेबांचे हस्तें ता. ६ जुलै सन १९१९ रोजीं झाला.

[ सं. पा. १९३

किती आवश्यकता आहे याविषयीं विवेचन केलें. ते म्हणाले, " 'जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।' ही समर्थांची उक्ति सदैव लक्षांत बाळगून परकीयांवर विश्वासून राहूं नये." शेवटीं ते म्हणाले, " शके १८३२ पासून तात्यासाहेब मेहेंदळे यांनीं या संस्थेचें आपल्या वाड्यांत पितृवात्सल्यानें संगोपन केलें. या संस्थेनें आपल्या मालकीची इमारत तयार केली आहे व आज मालकीच्या घरांत प्रवेश झालेला मंगल समारंभ पाहण्यास आपण सर्व उत्सुक झालों आहों." अशा आशयाचें भाषण करून श्रीमंत बाबासाहेबांनीं इमारतीचें द्वार खुलें केलें. सदर संस्थेस श्रीमंत बाबासाहेबांनीं त्या वेळेस आपल्या ऐपतीप्रमाणें २५० रुपयांची लहानशी देणगी दिली. त्यांचें त्या वेळचें समग्र भाषण परिशिष्ट 'ट' मध्यें दिलें आहे. पुढें श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर भारत इतिहास-संशोधक मंडळास रुपये ३००० पर्यंत त्यांनीं मदत केली आहे.

## ११. डॉ. भांडारकरांच्या अर्धपुतळ्याचा अनावरण-समारंभ

ता. ६ जुलै १९१९ रोजीं पुणें येथील भांडारकर ओरिएण्टल रिचर्स इन्स्टिटयूटच्या इमारतींत डॉ. भांडारकर यांच्या अर्धपुतळ्याचा (bust) अनावरण-समारंभ श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें झाला. या संस्थेस रु. ३०० देऊन ते आजीव सभासद (Life Member) झाले.

प्रो. राजवाडे यांनीं संस्थेचा वार्षिक अहवाल १९१८–१९१९ सालचा वाचून दाखविला. डॉ. मॅन यांनीं प्रकाशक मंडळाचा अहवाल वाचून दाखविला. नंतर प्रो. विजापुरकर यांनीं डॉ. सर रामकृष्णपंत भांडारकर यांचा बस्ट ( अर्धपुतळा ) उघडण्याची अध्यक्षांना विनंति केली. हा पुतळा मुंबईचे मि. बी. व्ही. तालीम यांनीं तयार केला असून तो फारच उत्कृष्ट साधला आहे. याचा खर्च विजापूरचे रा. ब. राघवेन्द्रराव केंभावी यांनीं दिला आहे. श्रीमंत बाबासाहेब यांनीं पुतळ्याचें अनावरण केल्यावर भाषण केलें. ( तें परिशिष्ट ठ मध्यें दिलें आहे ) त्यांत त्यांनीं डॉ. भांडारकर यांची योग्यता व विद्वत्ता, संशोधनसंस्थेची आवश्यकता व वरील संस्थेचा इतिहास इत्यादि गोष्टींचें विवरण केलें.

## १२. भालचंद्र मेमोरिअल हॉलचा उद्‌घाटनसमारंभ

श्रीमंत आण्णासाहेब कुरुंदवाडकर सीनियर यांना सन १९१६ सालीं अर्धांग वायूचा विकार झाला होता. परंतु ईशकृपेनें ते या महत्संकटांतून पार पडले होते. त्यामुळें त्यांच्या प्रजाजनांस अत्यंत आनंद होऊन त्या आनंदाप्रीत्यर्थ श्रीमंत आण्णासाहेब यांचें कांहीं तरी स्मारक करावें असें त्यांनीं ठरविलें. त्या वेळीं कुरुंदवाड येथें सभा, व्याख्यानें, नाटकें इत्यादि सार्वजनिक कामांस उपयोगी पडेल अशी एकहि इमारत नव्हती. तेव्हां अशा प्रकारची इमारत फंड जमवून बांधण्याचें स्मारक कमिटीनें ठरवून त्या इमारतीस 'भालचंद्र मेमोरिअल हॉल' असें नांव देण्यास श्रीमंत आण्णासाहेब यांची संमति मिळविली. पुरेशी वर्गणी जमल्यावर इमारत बांधून तयार झाली. या इमारतीचा उद्‌घाटनसमारंभ व्हावयाचा होता. श्रीमंत बाबासाहेब हे कोल्हापुरास झालेल्या Princes Conference ला हजर राहण्यास या वेळीं गेले होते, व परत येतांना नरसोबावाडी, कुरुंदवाड, गोकाक, बेळगांव, पन्हाळा, वगैरे स्थळें पाहण्याचें त्यांनीं ठरविलें होतें. या त्यांच्या कुरुंदवाड येथील आगमनाचा फायदा घेण्याचें ठरवून स्मारक कमिटीनें संस्थानचे अधिपति श्रीमंत आण्णासाहेब यांच्या मार्फत सदर हॉलचा उद्‌घाटनसमारंभ करण्याविषयीं श्रीमंत बाबासाहेबांना विनंति केली तेव्हां ही गोड व आनंदाची कामगिरी करण्याचें त्यांनीं तत्काल मान्य केलें. ता. २८ ऑगस्ट सन १९१९ इ. रोजीं हा समारंभ श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें मोठ्या थाटानें साजरा झाला. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं श्रीमंत आण्णासाहेबांना ईशकृपेनें आरोग्य प्राप्त झाल्याबद्दल आनंद प्रदर्शित करून व संस्थानच्या प्रजाजनांनीं दाखविलेली राजनिष्ठा व कृतज्ञताबुद्धि यांबद्दल त्यांचे आभार मानून समयोचित भाषण केलें.

## १३. First Oriental Conference
## ता. ५ नोव्हेंबर, १९१९

पुणें येथें पहिली ओरिएन्टल कॉन्फरन्स भरविण्याचें ठरून स्वागत कमिटी नेमण्यांत आली होती. या कमिटीचे श्रीमंत बाबासाहेब सभासद होते. या कॉन्फरन्सच्या खर्चाकरितां श्रीमंत बाबासाहेब यांनीं रु. १०० दिले. सदर परिषदेची सुरुवात वरील तारखेस मुंबईचे माजी गव्हर्नर सर जॉर्ज

लॉइड यांनीं करून दिली, त्याबद्दल त्यांचे आभार मानण्याचा ठराव औंध संस्थानचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि यांनीं मांडला. त्यास श्रीमंत बाबासाहेब यांनीं दुजोरा दिला. ते म्हणाले,

"Your Excellency Sir George Lloyd, Ladies and Gentlemen,

As desired by the Conference Committee, I have to perform a very short but at the same time extremely pleasant duty of seconding the proposal of the vote of thanks put forward by Shrimant Balasaheb Pant Pratinidhi, the Chief of Aundh. In doing this pleasant duty I want to prominently point out the genuine interest and keen enthusiasm shown by His Excellency in ancient Oriental literature and other educational activities. My remarks would be still clearer when we remember, gentlemen, that inspite of the multifarious activities of greater importance, engaging the attention of His Excellency and inspite of his being in Kashmir very lately, he could find time to specially come down here to open this grand unique conference—the first of its kind in the educational history of India. We all know that His Excellency is ever ready to promote the cause of education along with the political, social and industrial problems, to make all-sided progress of this Presidency complete. On seeing this vast galaxy of the literary stars from all quarters of India with His Excellency at the head, one is reminded of the Ancient Historical Assembly of the great Pandits at the time of the King Vikramaditya, as described in ancient history.

Gentlemen, now you will all cordially join me in seconding the hearty vote of thanks to His Excellency and kindly allow me to resume my seat."

## १४. नूतन मराठी विद्यालय माजी विद्यार्थि-मंडळाची सभा

### ता. २७ जुलै १९२०

या संस्थेचा वार्षिक समारंभ ता. २७ जुलै सन १९२० इ. रोजीं न्यू पूना कॉलेजांत श्रीमंत बाबासाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला. त्या वेळीं त्यांनीं जें भाषण केलें त्यांत ते म्हणाले :

" आजपर्यंत या समारंभाचें अध्यक्षस्थान ज्या सद्गृहस्थांनीं स्वीकारलें ते शिक्षणामध्यें माझ्यापेक्षां जास्त विद्वान् असल्यामुळें व तसेंच येथील विद्यार्थि-वर्गांनीं आजपर्यंत उत्तम वक्त्यांचीं भाषणें ऐकलीं असल्यामुळें हें अध्यक्षस्थान स्वीकारून भाषण करावें कीं नाहीं याची प्रथम मला शंका आली. परंतु लोकोपयोगी काम करण्याचा प्रसंग आला असतां तो टाळूं नये असा माझा निश्चय असल्यामुळें मीं हें काम करण्याचें पत्करिलें. "

अशा रीतीनें प्रस्तावना करून त्यांनीं विद्यार्थ्यांना उपदेशपर असें भाषण केलें. त्यांच्या भाषणांत शारीरिक शिक्षणाची महति व संस्थेची उपयुक्तता हे दोन मुख्य मुद्दे होते. भाषणानंतर त्यांनीं यशस्वी उमेदवारांना पारितोषिकें दिलीं व संस्थेस १०० रुपयांची देणगी देऊन ते संस्थेचे पेट्रन झाले.

## १५. इतर सार्वजनिक संस्थांशीं श्रीमंत बाबासाहेब यांचा संबंध

सन १९२०-२१ सालीं श्रीमंत बाबासाहेबांना किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटल व पी. वाय. सी. ( Poona Young Cricketers Club ) हिंदु जिमखान्याचे व्हाइस-प्रेसिडेंट निवडण्यांत आलें व याच सालीं सेवासदन, पुणें, या संस्थेच्या बोर्ड ऑफ ॲडव्हायजर्सचे ते सभासद म्हणून निवडून आले.

श्रीमंत बाबासाहेब किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटलचे व्हाइस-प्रेसिडेंट झाल्यापासून जेव्हां जेव्हां त्यांचा मुक्काम पुण्यांत असे तेव्हां तेव्हां ह्या संस्थेच्या मॅनेजिंग कमिटीच्या समारंभाच्या वेळेस हजर राहत असत व कधीं कधीं अध्यक्षस्थान पत्करीत असत.

ता. ११ फेब्रुवारी सन १९२१ रोजीं पुणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाचे उत्साही सेक्रेटरी रा. आण्णासाहेब पावगी यांच्या निमंत्रणावरून श्रीमंत बाबा-साहेब यांनीं सदर ग्रंथालयास भेट दिली व १०० रुपयांची देणगी देऊन ते या संस्थेचे सभासद झाले. याच संस्थेला मदत देण्याकरितां ता. ११ फेब्रुवारी रोजीं पुणें येथील सोशल क्लबनें 'सत्त्व-परीक्षा' या नाटकाचा श्रीमंत बाबासाहेब यांच्या आश्रयाखालीं खेळ करून दाखविला. खर्च वजा जातां या खेळाचे ५०० रुपये शिल्लक राहिले. ही रक्कम सोशल क्लबनें ग्रंथालयास दिली. ग्रंथालयाच्या इमारतीसाठीं जो फंड उभारण्यांत येणार होता त्याचा आरंभ या रकमेनें करण्यांत आला.

याच महिन्यांत श्रीमंत बाबासाहेबांनीं रा. जी. के. देवधर यांच्याबरोबर सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी व सेवासदन या संस्थांना भेटी दिल्या व अल्प मदत म्हणून सेवासदनास १०० रुपयांची देणगी दिली.

ता. २५ ऑगस्ट सन १९२१ रोजीं सर विठ्ठलदास ठाकरसी यांनीं इमारतीचा उद्घाटनसमारंभ गव्हर्नरसाहेब यांच्या हस्तें करविला. ही इमारत त्यांनीं आपल्या परमपूज्य कै. मातोश्रींच्या स्मरणार्थ बांधून तिला श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी आश्रम असें नांव देऊन ती पुणें येथील सेवासदन सोसायटीस देण्यांत आली आहे. या समारंभाच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

ता. ६ सप्टेंबर सन १९२१ रोजीं फर्ग्युसन कॉलेजच्या क्रीडांगणावर पुणें येथील कॉलेजांतील विविध खेळांचे सामने झाले त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब तेथें हजर होते. खेळांच्या शेवटीं निरनिराळ्या लोकांनीं ठरविलेलीं बक्षिसें गव्हर्नरसाहेब यांच्या हस्तें वांटण्यांत आलीं. त्या बक्षिसांत श्रीमंत बाबासाहेबांनींहि टग-ऑफ-वॉर चँपियनशिपकरितां ७५ रुपयांचें एक बक्षिस ठेविलें होतें.

सन १९२१ सालीं पुणें येथें स्थापन झालेल्या विद्याप्रसारिणी सभेचे अध्यक्ष म्हणून श्रीमंत बाबासाहेबांना निवडण्यांत आलें. ज्या हायस्कुलांत श्रीमंत बाबासाहेबांचें शिक्षण झालें होतें तें पूना हायस्कूल बंद झाल्यामुळें मोठी उणीव भासत होती. ती भरून काढण्याकरितां नवीन हायस्कूल स्थापन करण्याचा वरील सभेचा मुख्य हेतु होता व त्या हेतूप्रमाणें भारत हायस्कूल या नांवानें नवीन हायस्कूल काढण्यांत आलें.

## सत्कार, समारंभ, पार्टी

### १. पोलिटिकल एजंट मि. एल. सी. स्विफ्ट यांना पार्टी

पोलिटिकल एजंट या नात्यानें मे. स्विफ्टसाहेब यांचा भोर संस्थानशीं सुमारें नऊदहा वर्षें संबंध होता. इतका दीर्घ काल संबंध दुसऱ्या कोणत्याहि पोलिटिकल एजंटाचा आलेला नव्हता. मि. स्विफ्टसाहेबांना भोरच्या अंतर्गत कारभाराची खडान्खडा माहिती झाली असल्यामुळें प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं ते योग्य सल्ला देत असत. श्रीमंत बाबासाहेबांना तर त्यांचा फारच उपयोग होत असे व त्यांना त्यांचा मोठा आधार होता. श्रीमंत बाबासाहेबांना विचित्र-

गड तालुक्याचे अधिकार मिळाल्यानंतर लवकरच म्हणजे एक महिन्यांतच मि. स्विफ्टसाहेब यांची सोलापूरच्या कलेक्टरच्या जागीं बदली झाली. तेव्हां त्यांचा व आपला आतां वियोग होणार या कल्पनेनें साहजिकच त्यांना वाईट वाटलें. सोलापुरास जाण्यापूर्वीं श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना पुणें येथें ता. १० एप्रिल १९१३ रोजीं निरोपाची चहापार्टी दिली. त्या वेळीं सरदार बाळासाहेब पानसे, रिटायर्ड कलेक्टर, श्रीधरपंत नातू, रा. ब. कुमठेकर, डॉ. चोभे, रा. कोंडोपंत ऊर्फ दादासाहेब कुमठेकर वगैरे मंडळी पार्टीस बोलाविली होती. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं साहेबांचें स्वागत करून पुढील भाषण केलें. ते म्हणाले,

Mr. Swifte and Gentlemen,

I am sure I echo the feelings not only of those who are present here but also those of the people in the Poona District when I say we are all very sorry that you are going away from amongst us. I shall feel the pang of separation much more keenly than most because your relations with me and my father were very cordial. I feel I am losing a kind adviser and, if you will permit me, I may say a most valuable friend. Our long acquaintance with you ranging over the last eleven years has ripened into a sort of friendship and it would not be too much if I say that I have been greatly benefitted by your kindly advice that you very willingly and sympathetically offered to me from time to time. I am also much obliged to you for your having given me an opportunity to gain experience of magisterial work by appointing me an Honorary Magistrate here and I am sure the experience that I gained here will be of great use to me in the discharge of my new functions with which I have been entrusted by my father. I am very much pleased to find that I have thus got an opportunity of showing to my father and to Government how I perform those duties. When I undertook the new responsibility I counted upon your constant help and advice and I must therefore say, that though now you are leaving us, you will not cease to take the same active interest in me and the

चित्रांक ४



भोरचे पो. ए. मि. एल्. सी. स्विफ्ट यांना पुणें येथें श्री. बाबासाहेब यांनीं सन १९१३ मध्यें चहापार्टी दिली त्या वेळचा फोटो. [सं. पा. १९८

१ डॉ. चोभे; २ रा. ब. तात्यासाहेब कुमठेकर; ३ सरदार बाळासाहेब पानसे; ४ मि. एल्. सी. स्विफ्ट;
५ श्री. बाबासाहेब; ७ श्री. बाळासाहेब नातू; ८ कॉ. म. कुमठेकर.

public of Poona in general who have found in you a quiet, patient and considerate officer.

यावर मे. स्विफ्टसाहेब म्हणाले :

Shrimant Babasaheb and Gentlemen,

Government Officers should not, as a rule, receive public hospitalities, parties etc., at the time either of transfer of office or of retirement. But I have accepted this day's party as it is a private one. It is my only wish to see Bhor State flourishing. His Highness Shrimant Pant Saheb is loyal to the Imperial Government and rules over his State efficiently for the welfare of his subjects. I hope Shrimant Babasaheb will try his best for the welfare of the Bhor State and his knowledge and experience will be of much more use to them, when he will be called to the Gadi of his predecessors. Shrimant Babasaheb's love for knowledge is very great and the labour which he takes for knowledge's sake will be very useful in discharging the responsibilities which he is destined to be called for. The matter of giving him some powers in the State administration was under consideration for a long time and I am very happy to mention here that the question has been ultimately decided satisfactorily during my term of office.

वरील आशयाचें भाषण झाल्यावर हारतुरे, पानसुपारी व फोटो वगैरे झाल्यावर हा समारंभ समाप्त झाला.

## २. मि. एल्. जे. माउंट फोर्डसाहेबांची शिरवळास व भोरास भेट

मि. स्विफ्ट यांच्या जागीं माउंटफोर्डसाहेब आले. श्रीमंत बाबासाहेबांच्या विनयशील, आदरयुक्त व निर्व्याज वर्तनानें आणि गोड भाषणानें कोणाहि नवीन इसमावर सहज छाप बसते व त्यांच्या सहवासांत येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या मनांत त्यांच्याबद्दल आदर व आपलेपणा उत्पन्न झाल्यावांचून राहत नाहीं. माउंटफोर्डसाहेबांची व त्यांची जेव्हां जून महिन्यांत प्रथम भेट झाली तेव्हांच श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या सौजन्यानें त्यांचें मन आकर्षिलें होतें. रावसाहेबांच्या विनंतीवरून माउंटफोर्डसाहेबांनीं ता. ११ ऑक्टोबर सन १९१३ रोजीं भोरास येण्याचें कबूल केलें होतें. ते शिरवळवरून येणार

असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेब दसऱ्याचा समारंभ झाल्यावर शिरवळास गेले. ता. १० रोजीं माउंटफोर्डसाहेब शिरवळास गेले. तेथें श्रीमंत बाबासाहेबांच्याबरोबर जाऊन त्यांनीं अँग्लो-व्हर्नाक्युलर स्कूलमध्यें पानसुपारी घेतली व सर्व गांवांत हिंडून गांवाची स्थिति पाहिली, व श्रीमंत बाबासाहेबांच्या ऑफिसांत जाऊन त्यांच्या कामाची व्यवस्थाहि पाहिली. तेथें श्रीमंत बाबासाहेबांचा पाहुणचार घेऊन दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. ११ रोजीं सकाळीं ते भोरास आले. त्यांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबहि आले. भोरास साहेबांच्या स्वागतार्थ आंखलेल्या सर्व कार्यक्रमप्रसंगीं श्रीमंत बाबासाहेब हजर राहून दुसऱ्या दिवशीं सकाळीं साहेबांच्याबरोबर भाटघर धरण पाहण्यास गेले. या वेळीं भाटघरच्या नवीन धरणास नुकतीच सुरुवात झाली होती. नवीन धरणामुळें संस्थानचें कसें नुकसान होणार आहे याची श्रीमंत बाबासाहेबांनीं माउंटफोर्डसाहेबांना योग्य जाणीव करून दिली. संस्थानच्या हितरक्षणार्थ श्रीमंत बाबासाहेबांनीं दाखविलेल्या या दक्षतेचा माउंटफोर्डसाहेबांच्या मनावर परिणाम होऊन राज्यकर्त्यास अवश्य लागणारे गुण श्रीमंत बाबासाहेबांच्या अंगीं आहेत, असें त्यांनीं बोलूनहि दाखविलें. भाटघर धरण पाहून भोरास परत आल्यावर माउंटफोर्डसाहेबांना निरोप देण्याकरितां रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब रामबाग बंगल्यावर गेले व तेथें त्यांना निरोप दिला. भोरच्या मुक्कामांत माउंटफोर्डसाहेबांनीं रावसाहेबांच्या जवळ श्रीमंत बाबासाहेबांच्या कारभाराची तारीफ केली व पुढें कांहीं दिवसांनीं शिरवळ म्युनिसिपॅलिटीचा कारभार उत्तम चालण्याकरितां श्रीमंत बाबासाहेबांना म्युनिसिपॅलिटीच्या अध्यक्षाचे सर्व अधिकार देण्याबद्दल सुचविलें व आणखी कांहीं अधिकार देण्याबद्दलहि शिफारशी केल्या.

## ३. पोलिटिकल एजंट मि. माउंटफोर्ड यांना ॲटहोम पार्टी

मि. माउंटफोर्ड रजेवर जाणार असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना पुणें येथें लष्करांतील एका बंगल्यांत ता. १७ फेब्रुवारी सन १९१५ रोजीं सायंकाळीं ॲटहोम पार्टी दिली. या पार्टीस मिस्टर व मिसेस कीटिंग्ज्, मि. किंकेड, सरदार पानसे, रा. ब. गोडबोले, डॉ. चोभे वगैरे मंडळी हजर

होती. उपाहाराच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं जमलेल्या सर्व मंडळींचे आभार मानून भाषण केलें. त्यांत ते म्हणाले,

Mr. L. J. Mountford, Ladies and Gentlemen,

Words fail short to adequately express my feelings of joy, pleasure and sincere gratitude to your kind self for the honour you have done to me this evening in so graciously complying with my request.

I cannot but express on this occasion the genuine feelings of sincere gratitude for all the kindness you have been pleased to show towards me, and the keen interest evinced by you in my welfare and advancement by giving me every possible help and timely suggestions which enabled me to carry out successfully the duties of the administration of the Shirwal Taluka of the Bhor State. I regard it a high privilege to work under my revered father and under a sympathetic and noble-hearted Political Agent in your good self. The advice that my father and I myself received from time to time at your hands was so valuable and useful to both of us that not only did it enable me to carry out the administration of my charge very satisfactorily but also encouraged me to do my work with great interest and energy. I feel confident that though you will be away from us for some time you will be pleased to continue to take the same interest in, and to show the same kindness to me as you have been doing upto this time. I shall always be glad to occasionally hear the well-being of yourself and your family.

I first propose the toast to the excellent health of our most beloved excellent Majesty the King Emperor George V and let us all pray that God Almighty may grant brilliant success to the British arms.

Now I, with a very grateful heart, propose the toast of good health, long life and ever lasting happiness to your kind self, my well-wisher, and sincerely wish you God speed.

मे. माउंटफोर्टसाहेब यांनीं खालील आशयाचें भाषण केलें :

In replying to the toast proposed by Shrimant Babasaheb Mr. Mountford expressed his satisfaction at finding himself in such a distinguished assembly as the one that had been called together at Shrimant Babasaheb's invitation. Referring to the European War, he said he was sure that the sentiments in Shrimant Babasaheb's speech that every one of us should pray for the success of British Arms would commend itself to every one present.

Speaking of Shrimant Babasaheb's administration of the Shirwal Taluka, Mr. Mountford paid a high tribute to the Administrative capacity of Shrimant Babasaheb who, he was glad to find, had excellently proved his fitness in the exercise of powers of an Assistant Collector recently conferred on him by His Highness.

It was in the Poona High School that Shrimant Babasaheb received an education, that has made him what he is. And his son too, Mr. Mountford hoped, would receive, if not better, equipment in the matter of education. At the close of his remarks Mr. Mountford thanked Shrimant Babasaheb for the cordial welcome accorded to him on the occasion.

नंतर पानसुपारी, अत्तर गुलाब वगैरे देण्यांत आल्यावर समारंभ आटोपला.

## ४. रावबहादुर आण्णासाहेब सातभाई यांना शिरवळास मानपत्र

रा. ब. आण्णासाहेब सातभाई, भोर संस्थानचे लोकप्रिय कारभारी, हे सेवानिवृत्त होणार असल्यामुळें शिरवळच्या रहिवाशांची सभा शिरवळ येथील राममंदिरांत ता. १ मे १९१५ इसवी रोजीं श्रीमंत बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. या सभेंत रा. ब. सातभाई यांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें.

रा. ब. सातभाई हे अहमदनगरचे रहिवासी असून त्यांच्या वडिलांनीं अव्वल इंग्रजींत सदरअमीनाच्या हुद्याचें काम केलें होतें. आण्णासाहेब सातभाई यांनींहि इंग्रजींत हुद्याचीं कामें करून पेन्शन घेतलें होतें. जंजिरा संस्थानांत त्यांनीं कांहीं दिवस सर्व्हे सेटलमेन्टचें काम केलें होतें. भोर

चित्रांक ४२



मि. एल्. जे. मौंटफोर्ड पो. ए. साहेब यांनीं सन १९१३ मध्यें शिरवळास भेट दिली त्या वेळचा फोटो.
१ रा. सा. काकासाहेब फडके; २ मि. मौंटफोर्ड; ३ श्री. बाबासाहेब; ४ श्री. भाऊसाहेब. [ सं. पा. २००

संस्थानांत प्रथम त्यांना सुधागड तालुक्यांत खोतो सेटलमेन्ट ऑफिसर म्हणून नेमण्यांत आलें होतें. पुढें ते सन १८९५ सालीं संस्थानचे कारभारी झाले. तेव्हांपासून सन १९१५ मेअखेरपर्यंत २० वर्षें त्यांनीं कारभाऱ्याचें काम केलें. आण्णासाहेब सातभाई हे अत्यंत धोरणी, मधुरभाषणी, आर्जवी असून धन्याच्या मर्जीप्रमाणें वागण्यांत मोठे कुशल होते. युरोपिअन अंमलदारांत यांचें फार वजन होतें. त्यांच्या वजनाचा श्रीमंत बाबासाहेबांना फार उपयोग होई. रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब या उभयतांनाहि राजी राखण्याचें अत्यंत बिकट काम त्यांनीं मोठ्या मुत्सद्देगिरीनें व कुशलतेनें पार पाडलें होतें. यामुळें श्रीमंत बाबासाहेब त्यांना फार मान देत असत.

या समारंभास शिरवळचे रहिवाशी ब्रिटिश पेन्शनर रा. ब. नारायण गणेश देशपांडे, व सी. के. देशपांडे आणि शिरवळांतील सर्व प्रमुख मंडळी हजर होती. शिरवळकरांतर्फे श्री. वा. ना. देशपांडे, बी. ए., यांनीं मानपत्र वाचून दाखविलें व तें चांदीच्या करंडकांतून रा. ब. सातभाई यांना अर्पण केलें. त्यानंतर रा. ब. सातभाई आपल्या भाषणांत म्हणाले, "श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब यांनीं आम्हांस प्रेमानें वागवून रावसाहेबांनीं आम्हांस पेन्शन देऊन आमच्या अल्प सेवेचें चीज केलें याबद्दल उभयतां श्रीमंतांचे आम्ही सदैव ऋणी आहों. श्रीमंत बाबासाहेब या तालुक्याचें काम दक्षतेनें पाहत असून त्यांच्या प्रयत्नानेंच येथें दवाखाना सुरू करण्यांत येऊन लोकांच्या आरोग्याची काळजी घेण्यांत येत आहे."

रा. ब. आण्णासाहेब सातभाई यांच्या भाषणानंतर शिरवळकरांनीं या समारंभाचें अध्यक्षस्थान दिल्याबद्दल प्रथम त्यांचे आभार मानून श्रीमंत बाबासाहेबांनीं पुढील आशयाचें भाषण केलें. ते म्हणाले, "अशा समारंभानें लोकांची गुणग्राहकता व्यक्त होते. मानपत्रांत वर्णिल्याप्रमाणें सर्वांना संतुष्ट ठेवण्याचें कठीण काम रा. ब. आण्णासाहेबांना बऱ्याच अंशीं साधलें होतें हें आजच्या समारंभावरून स्पष्ट होत आहे. ब्रिटिश सरकारचा त्यांच्यावर विश्वास असून त्यांचें काम पसंत पडत असे म्हणूनच त्यांना रावबहादुर हा बहुमानाचा किताब मिळाला आहे. ब्रिटिश व संस्थानी संबंध चांगले राखण्यांत अनेक महत्त्वाचीं कामें त्यांनीं मोठ्या कुशलतेनें बजाविलीं आहेत. ते सेवानिवृत्त होत

असल्यानें त्यांची उणीव संस्थानला बरेच दिवस भासल्याशिवाय राहणार नाहीं, असें आमचें मत आहे. ”

श्रीमंत बाबासाहेबांच्या भाषणानंतर पानसुपारी होऊन समारंभ खलास झाला. रा. ब. सातभाई सेवानिवृत्त झाले तरी ते आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत संस्थानच्या हिताकडे लक्ष ठेवून नेहमीं योग्य सल्लामसलत देत असत. श्रीमंत बाबासाहेबांना त्यांचा फार उपयोग होत असे.

श्री. बाबासाहेब पुढें गादीवर आल्यावरहि अनेक प्रसंगीं त्यांचा सल्ला घेत असत. श्रीमंत बाबासाहेब पुढें सन १९३० इ. सालीं जेव्हां विलायतेस गेले तेव्हां हिंदुस्थानांतून सेवानिवृत्त होऊन तिकडे गेलेल्या बऱ्याच बड्या अधिकाऱ्यांशीं त्यांचा परिचय असल्यामुळें त्यांनीं आण्णासाहेबांना बरोबर घेतलें होतें. आण्णासाहेबांची जरी ऐंशी उलटून गेली होती तरी मोठ्या आनंदानें त्यांनीं हा लांबचा दीर्घ प्रवास केला. त्यांची स्वामिनिष्ठा अवर्णनीय होती; त्यांची चिकाटी व उत्साह तरुणांनाहि लाजविण्यासारखा होता. ते अहमदनगर येथें आपल्या घरीं वयाच्या ८३ व्या वर्षी ता. ८ मार्च सन १९३२ सालीं परलोकवासी झाले.

## ५. रा. बा. पां. ठकार यांचा सत्कार

वाचनालय स्थापन झाल्यानंतर त्याच सालीं (सन १९१५) ऑगस्टच्या १४ तारखेस सदर वाचनालयांत एक समारंभ साजरा करण्याचा योग आला. महाभारत, रामायण, योगवासिष्ठ इत्यादि संस्कृत ग्रंथांच्या मराठी सुरस भाषांतराचे प्रकाशक चिपळुणकर आणि मंडळी महाराष्ट्रांत सर्वांच्या परिचयाची झालेली आहे. सदर मंडळी मूळची भोरची. त्यांनीं पुण्यास जाऊन संस्कृत ग्रंथांचें मराठी भाषांतर प्रसिद्ध करण्याचें काम सुरू केलें. भागवत, रामायणाचें भाषांतर पुरें करून महाभारताचे तीन भाग पुरे होईपर्यंत कंपनीपैकीं रा. बाळकृष्ण पांडुरंग ठकार यांच्याशिवाय सर्व भागीदार मृत्युमुखीं पडले. रा. ठकार हेच काय ते एकटे शिल्लक राहिले. हे भोरचेच रहिवासी असून सचिवांचे आश्रित आहेत. त्यांनीं कंपनीनें सुरू केलेलें काम अर्धवट न टाकतां पुरें करण्याची महत्त्वाकांक्षा धरून अनेक आपत्तींना कौतुकास्पद धैर्यानें तोंड देऊन महाभारताचें प्रचंड कामं पुरें केलें. मुंबई सरकारनें त्यांच्या ह्या कामाचा

गौरव करून त्यांना उदार आश्रय दिला होता. त्याचप्रमाणें बडोदें, धार, देवास वगैरे संस्थानिकांचाहि आश्रय त्यांना मिळाला होता. महाभारत, रामायण इत्यादि राष्ट्रीय ग्रंथांचें मराठींत भाषांतर करून त्या ग्रंथांतील ज्ञान-भांडार मराठी वाचकवर्गास खुलें करून देण्याची किती आवश्यकता होती याची रावसाहेबांना कल्पना नसावी असें दिसतें. रा. ठकार यांच्या कार्याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांना मात्र साभिमान आदर वाटे. परंतु त्या वेळीं त्यांना प्रोत्साहन देण्यापलीकडे कांहीं करतां येणें शक्य नव्हतें. एकदां अडचणीच्या प्रसंगीं त्यांनीं रा. ठकार यांना ७५ रु. दिले होते. तथापि पुढें श्रीमंत बाबासाहेब गादीवर आल्यानंतर त्यांनीं रा. ठकार यांस एकंदर रु. ७००० पर्यंत मदत केली आहे. भोर येथें वाचनालय सुरू झाल्यानंतर त्या ठिकाणीं राजश्री ठकार यांना पानसुपारी करून त्यांच्या कार्याचा गौरव करण्याचें वाचनालयाच्या सभासदांच्या मनांत येऊन त्यांनीं संस्थेचे अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब यांना आपली इच्छा कळविली. श्रीमंत बाबासाहेबांनाहि श्री. ठकार यांचा बहुमान व्हावा असें नेहमीं वाटत असे. सभासदांची वरील इच्छा तत्काळ मान्य करून समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें त्यांनीं कबूल केलें. हा समारंभ वरील तारखेस वाचनालयांत झाला. संस्थेचे व्हाइस-प्रेसिडेंट श्री. वा. ना. जोशी यांनीं रा. ठकार यांच्या कार्याची सविस्तर माहिती सांगून रा. ठकार यांच्या-बद्दल भोरकरांना कां अभिमान वाटत असला पाहिजे हेंहि सांगितलें. त्यावर राजश्री ठकारशास्त्री यांचा कंठ भरून येऊन ते म्हणाले : " 'जेथें पिकतें तेथें विकत नाहीं,' ही म्हण आज माझ्या नगरबांधवांनीं खोटी ठरवून मीं आजपर्यंत केलेल्या अल्प कार्याचा जो गौरव केला त्याबद्दल मला काय वाटत आहे हें बोलून दाखवितां येत नाहीं. माझ्या सर्व श्रमांचें चीज झालें असें मला वाटत आहे."

त्यानंतर अध्यक्ष श्रीमंत बाबासाहेब यांनीं थोडक्यांत इतकेंच सांगितलें कीं, " श्री. ठकार यांच्यासारख्या उत्साही व धाडसी गृहस्थांशिवाय असलीं कामें होणें शक्य नसतें. हें राष्ट्रीय कार्य आपल्या येथील एका सामान्य गृहस्थानें तडीस नेलें याबद्दल आपणां सर्वांस अभिमान वाटला पाहिजे, व यथाशक्ति त्यांच्या कार्यास हातभार लावणें हें आपलें कर्तव्य आहे. माझ्या

आजच्या परिस्थितींत मला आज त्यांना कांहीं मदत करतां येत नाहीं याबद्दल मला वाईट वाटतें. तथापि, मला त्यांच्या कार्याची पूर्ण जाणीव आहे, हें दर्शविण्याकरितां मी आज त्यांना अल्प किंमतीचा कां असेना पोषाख देत आहें. त्याचा ते स्वीकार करतील अशी मला आशा आहे. ''

अशा आशयाचें उत्तेजनपर भाषण करून त्यांनीं रा. ठकार यांना ५० रुपये किंमतीचा पोषाख देऊन त्यांचा गौरव केला. पोषाखाचा अत्यंत विनयपूर्वक स्वीकार करून रा. ठकार म्हणाले, '' सरकार, आजपर्यंत बाहेर माझा गौरव झाला. परंतु आज माझ्या जन्मभूमीच्या शहरीं आमच्या अन्नदात्या प्रभूकडून माझ्या कार्याबद्दल जी प्रशंसा करण्यांत आली ती पाहून आज मी कृतकृत्य झालों असें वाटत आहे. श्रीमंतांनीं जरी विनयानें अल्प किंमतीचा पोषाख म्हटलें असलें तरी मला या देणगीची हजारों रुपये किंमत वाटत आहे. आजपर्यंत येथें जी गोष्ट कोणाच्या भाग्यास आली नाहीं ती मला प्राप्त झाली याबद्दल मला धन्यता वाटत आहे. सरकार, आपल्या आजच्या परिस्थितींत आपण जें करीत आहांत तें सर्वांना उत्साहोत्पादकच वाटत आहे. ' प्रसादचिन्हानि पुरःफलानि ' या कवीच्या उक्तीचा अनुभव सर्वांना आल्यावांचून राहणार नाहीं, याबद्दल मला खात्री आहे. ''

## ६. इचलकरंजीकरांना पानसुपारी

हा समारंभ झाल्यानंतर दोन महिन्यांनीं म्हणजे ता. २० नोव्हेंबर रोजीं वाचनालयांत इचलकरंजीकर संस्थानाधिपति श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर यांचा सत्कार करण्याचा योग आला. ते भाटघर धरण पाहण्यास आले होते. श्रीमंत बाबासाहेब यांच्या विनंतीवरून ते भोरास आले तेव्हां दरबार भरवून रावसाहेबांनीं त्यांचें स्वागत केलें. नंतर श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना टेनिस कोर्ट दाखवून वाचनालयांत आणलें. तेथें त्यांना पानसुपारी, हार वगैरे देण्यांत आले. त्यांनीं वाचनालय पाहून समाधान व्यक्त केलें व श्रीमंत बाबासाहेबांच्या आश्रयाखालीं सुरू झालेल्या संस्थेचा नागरिकांनीं योग्य फायदा घ्यावा अशी इच्छा प्रदर्शित केली.

## ७. नामदार शेपर्डसाहेबांना चहापार्टी

नामदार सर विल्यम शेपर्ड, आय. सी. एस., सी. आय. ई., यांची हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी यांचे कौन्सिलांत नेमणूक होऊन ते इंग्लंडला जाणार असल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांना मुंबई येथें शेट द्वारकादास गोवर्धनदास यांच्या बंगल्यांत ता. १९ मार्च सन १९१६ इसवी रोजीं चहा-पार्टी दिली. या प्रसंगीं मि. एल्. रॉबर्ट्सन, नामदार महादेव भास्कर चौबळ, डॉ. सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर, नामदार सर विठ्ठलदास ठाकरसी, सर प्रभाशंकर पट्टणी, मि. निसीम, शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी, शेट द्वारकादास गोवर्धनदास, रा. ब. एन्. टी. वैद्य, मि. एन्. व्ही. मंडलिक, मि. गो. कृ. देवधर, मि. के. एम्. कुमठेकर, डॉ. दाणी, डॉ. एल्. एन्. पुरोहित ही मंडळी श्रीमंत बाबासाहेबांच्या निमंत्रणावरून हजर होती. शेपर्डसाहेबांचे व निमंत्रित मंडळींचे आभार मानून श्रीमंत बाबासाहेब म्हणाले,

"It is with the genuine feelings of thankfulness that I express my very grateful sentiments for your having looked upon me with sincere feelings of parental affection and made my interests your own, from the very first auspicious day on which I had the good fortune to come in contact with your kind self. It is needless for me to say that I am deeply indebted to you for your having helped me all along in improving my position and status in life while you were our Political Agent and even after that.

I am also grateful to their Excellencies Lord and Lady Willingdon and their august predecessors Lord Lamington and Lord Sydenham and the Political Officers for the kindness shown to and the deep interest evinced in me in furthering my prospects and the valuable advice and help given to me from time to time in delicate matters.

I am also thankful to my kind father for his having allowed me a hand in the administration of the State to enable me to have an insight into it. I am also glad to say that the Government have appreciated my work.

I cannot sufficiently express how deeply I feel for the separation of my worthy well-wisher and benefactor in your kind self but at the same time am gratified to see that Your Honour is going to occupy a higher official position in the Council of the Secretary of State where I am sure that a sympathetic and liberal-minded officer like your kind self will be of great use in furthering the prospects of the Princes and people of India.

Before I conclude I propose the health of Their Imperial Majesties the King Emperor and the Queen Empress of India for their long and glorious life and the very successful termination of the present war.

Now I propose the health of the Hon'ble Mr. and Mrs. Sheppard and pray to God that He should pour His choicest blessings upon the Hon'ble Mr. and Mrs. Sheppard and children and grant them long and glorious life and I heartily wish them a bon voyage."

यावर शेपर्डसाहेबांनीं पुढील उत्तर दिलें :

"Shrimant Babasaheb of Bhor and Gentlemen,

I am not prepared for a speech. I have listened with very great pleasure to what you have said of me, but I really do not know whether I deserve all that praise. You were young when you were first introduced to me and although at that time you were in a poor state of health, you were very studious and I had formed very high expectations of you and I am glad to say to-day that you have fulfilled all my expectations.

It is a good thing that your father has given you some powers in the administration of the State. You have a very brilliant future before you when you succeed to the Gadi of your old father. Although I am leaving India very soon, I hope I shall have the pleasure of seeing you when you visit England. I thank you, Babasaheb of Bhor, very much for your having entertained such kind feelings of me."

नामदार शेपर्डसाहेब यांच्या भाषणानंतर पानसुपारी होऊन समारंभ समाप्त झाला.



सर विल्यम शेपर्ड यांच्या भेटीच्या वेळचा फोटो. [स. पा. २०७

बसलेले—१ श्रीमंत बाबासाहेब; ३ लेडी शेपर्ड; ४ सर विल्यम शेपर्ड; ५ श्री. भाऊसाहेब.

उभे—१ लक्ष्मण भणगे हुजरे; २ न. गो. आंबेकर; ३ रा. सा. काकासाहेब फडके; ४ महादू भेलका हुजरे.

## ८. पोलिटिकल सेक्रेटरी मि. एल्. रॉबर्ट्सन यांची शिरवळास भेट

मि. रॉबर्ट्सन, पोलिटिकल सेक्रेटरी, ता. १५ ऑक्टोबर रोजीं शिरवळास मुद्दाम शिकारीकरितां आले होते. श्रीमंत बाबासाहेब यांनीं त्यांची उत्तम व्यवस्था ठेविली होती. ता. १६ रोजीं त्यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांच्याबरोबर जाऊन शिरवळ येथील डिस्पेन्सरी पाहिली व शेरेबुकांत पुढील शेरा लिहिला :

"I visited the dispensary with Shrimant Babasaheb of Bhor who takes a great interest in it and at whose suggestion it has been recently opened by H. H. Pant Saheb. Everything is in order. Attendance is about 20 daily, small for the size of the town but which will no doubt increase as the people gain confidence."

दवाखाना तपासणीनंतर ते शिरवळ येथील अँग्लो-व्हर्नाक्युलर स्कूल पाहण्यास गेले. तेथें शिक्षकवर्ग व गांवांतील प्रमुख नागरिक यांनीं त्यांचें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. शाळेंत गेल्यावर मुलांचे इंग्रजी संवाद झाले. नंतर शाळेचें अहवाल-वाचन झाल्यावर मुलांमुलींना त्यांच्या हस्तें मिठाई वांटण्यांत आली. पानसुपारी, अत्तर, पुष्पहार वगैरे देण्यांत आल्यावर श्रीमंत बाबासाहेबांचा निरोप घेऊन ते परत पुण्यास गेले.

## ९. लॉर्ड व लेडी विलिंग्डन यांची भोरास भेट

लॉर्ड व लेडी विलिंग्डन यांनीं भोरास श्रीमंत पंतसाहेब यांच्या निमंत्रणावरून ता. २७ ऑक्टोबर सन १९१६ इ. रोजीं भेट दिली. त्या वेळीं भोर म्युनिसिपालिटीनें त्यांना मानपत्र दिलें. मानपत्रांत श्रीमंत बाबासाहेबांच्याबद्दल उल्लेख नव्हता, तरी मानपत्रास उत्तर देतांना गव्हर्नरसाहेबांनीं पुढील उद्गार काढले:

"It is sufficient for me to see such manifest signs of the happiness and prosperity you enjoy under His Highness' administration, in which, I am glad to learn, he has recently associated Shrimant Raghunathrao whose keen interest in the work of administration must be a matter of much satisfaction to His Highness."

वरील उद्गारांवरून श्रीमंत बाबासाहेबांचा विचित्रगड तालुक्याचा कारभार लॉर्ड विलिंग्डन यांना पसंत पडला होता हें स्पष्ट होत आहे.

## १०. मि. हॅच यांना चहापार्टी

ता. १८ जून सन १९१७ इसवी रोजीं मि. जि. डब्ल्यू, हॅच, पोलिटिकल एजंट, यांना बॉंबे पोर्ट ट्रस्टच्या डे. चेअरमनच्या जागीं बदली झाल्याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांनीं पुणें येथें पार्टी दिली.

## ११. ने. ना. सर जॉर्ज लॉइड यांना चहा

ता. १७ मे सन १९२० रोजीं सर जॉर्ज लॉइड, मुंबई इलाख्याचे ब्व्हर्नर, यांना शिरवळ येथें श्रीमंत बाबासाहेब यांनीं चहा दिला.

## १२. ड्यूक ऑफ कॅनॉट यांच्या स्वागतार्थ मुंबईस आगमन

नरेंद्रमंडळाचा (Chamber of Princes) आणि Legislative Council and Council of Stateचा उद्घाटनसमारंभ करण्याकरितां हिज रॉयल हायनेस ड्यूक ऑफ कॅनॉट सन १९२१ चे फेब्रुवारीला दिल्लीस गेले होते. तेथील कार्यक्रम आटोपल्यावर ते ता. २१ फेब्रुवारी रोजीं मुंबईस येणार होते. ठरल्याप्रमाणें ता. २१ रोजीं सकाळीं १० वाजतां ड्यूकसाहेबांची स्वारी व्हिक्टोरिया टर्मिनस स्टेशनवर दिल्लीहून येऊन उतरली. त्या वेळीं त्यांचें स्वागत करण्यास तेथें संस्थानिक व बडे अधिकारी जमले होते. श्रीमंत बाबासाहेबहि त्या वेळीं तेथें गेले होते. ता. २३ फेब्रुवारी रोजीं टाउन हॉलमध्यें ड्यूकसाहेबांच्या हस्तें नवीन कायदेमंडळाची सुरुवात करण्याचा समारंभ झाला. ह्या समारंभास श्रीमंत बाबासाहेब उपस्थित होते. ता. २४ रोजीं पुणें गायनसमाजातर्फे जें शिष्टमंडळ ड्यूकसाहेबांना मानपत्र अर्पण करण्यास गेलें होतें त्या शिष्टमंडळांत श्रीमंत बाबासाहेब होते. सरदार जी. एन. मुजुमदार यांनीं शिष्टमंडळाचें मानपत्र वाचून दाखवून तें बीनच्या आकाराच्या सुंदर रौप्यकरंडकांत घालून ड्यूकसाहेबांना अर्पण केलें. ता. २५ रोजीं श्रीमंत बाबासाहेब पुण्यास परत आले व तेथील रॉयल कॅनॉट बोट क्लबांत लेफ्टेनंट-जनरल सर वुइल्यम व लेडी मार्शल यांनीं ड्यूकसाहेबांना 'अॅट होम' पार्टी दिली; त्या पार्टीस श्रीमंत बाबासाहेब निमंत्रणावरून गेले होते. त्या ठिकाणीं त्यांची ड्यूकसाहेबांना ओळख करून देण्यांत आली. ओळख झाल्यावर एकाच टेबलावर ड्यूकसाहेबांच्याबरोबर श्रीमंत बाबासाहेबांचें चहापान झालें. याशिवाय जे दुसरे सत्कारसमारंभ, भेटी वगैरे झाल्या त्या परिशिष्ट 'ड' मध्यें दिल्या आहेत.

चित्रांक ४४



श्रीविश्वेश्वराचें सुवर्णमंदिर, काशी.

[ स. पा. २११

# प्रवास

## पूर्व हिंदुस्थानांतील प्रवास

श्रीमंत बाबासाहेब यांच्या द्वितीय पत्नी श्रीमंत सौ. वहिनीसाहेब व त्यांची कन्या श्रीमंत सौ. काशीताईसाहेब बुध्याळकर यांचीं वेणीदानें झालीं नव्हतीं, तीं प्रयाग येथें करण्याच्या हेतूनें रावसाहेब व जिजीसाहेब यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना व बुध्याळकरांना बरोबर घेतलें होतें. त्याप्रमाणें श्रीमंत बाबासाहेब श्रीमंत सौ. वहिनीसाहेबांसह शिरवळहून ता. १८ डिसेंबर रोजीं निघून मुंबईस गेले. रावसाहेब जिजीसाहेबांसह ता. २३ डिसेंबर रोजीं निघून मुंबईस येऊन दाखल झाले. ता. २४ रोजीं श्रीमंत सौ. जिजीसाहेब, श्रीमंत बाबासाहेब, श्रीमंत सौ. वहिनीसाहेब, श्रीमंत बाबासाहेबांचे व्याही श्रीमंत अप्पासाहेब बुध्याळकर, त्यांच्या पत्नी, जामात रा. भैय्यासाहेब व त्यांच्या पत्नी श्री. सौ. काशीताईसाहेब व श्रीमंत भाऊसाहेब ही सर्व मंडळी काशीस जाण्याकरितां निघाली. ती दुसरे दिवशीं काशीस जाऊन पोहोंचली. रावसाहेबहि मुंबईहून ता. २५ रोजीं निघून ता. २६ रोजीं काशीस गेले. रावसाहेबांचा काशीस बरेच दिवस मुक्काम व्हावयाचा असल्यामुळें तेथें राहून व्यर्थ कालक्षेप करण्यापेक्षां आसपासचा प्रवास करण्याचें श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत येऊन ते श्रीमंत भाऊसाहेबांना बरोबर घेऊन परस्परच कलकत्त्यास गेले. कलकत्ता येथें रामकिसनदास श्रावगीच्या धर्मशाळेंत ते उतरले होते. तेथील मुक्कामांत नवीन मार्केट, म्यूझिअम, शिव, श्रीशिलानाथ व श्रीपारसनाथ यांचीं देवळें, झूलॉजिकल गार्डन वगैरे स्थळें पाहून ते दार्जिलिंगला आले. तेथें पहिल्या दिवशीं ऑब्झरव्हेटरी हिलवरून कांचनगंगा व हिमालयाचीं इतर शिखरें, तसेंच बर्च हिल पार्क, जेलपट्टन अथवा वाघ-टेकडीचा मार्ग हीं पाहिलीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं बोटॅनिकल गार्डन वगैरे स्थळें पाहून कलकत्त्यास परत आले. कलकत्ता येथील या मुक्कामांत गव्हर्नमेंट हाउस, फोर्ट विल्यम, व्हिक्टोरिया मेमोरिअल एक्झिबिशन, ओल्ड फोर्ट विल्यम व ब्लॅक होलची जागा, इंपीरिअल लायब्ररी, मेटकाफ हॉल, डलहौसी स्क्वेअर, डलहौसी इन्स्टिटयूट, एडन गार्डन, कालीचें देऊळ व काली घांट वगैरे प्रेक्षणीय स्थळें व उपयुक्त संस्था पाहून ता. ६ जानेवारी सन १९१४ रोजीं काशीस परत आले. ते येण्यापूर्वी दोन दिवस

अगोदर त्यांचे मातुल श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर हे सहकुटुंब रावसाहेबांच्या बोलावण्यावरून तेथें आले होते. श्रीमंत रावसाहेब, विंचुरकर, बुध्याळकर यांच्या घराण्यांतील सर्व मंडळी या वेळीं काशीस एकत्र जमली होती. हा एक अपूर्व योग होता. रावसाहेबांचीं काशींतील सर्व धार्मिक कृत्यें झाल्यानंतर ते ता. १० रोजीं सर्व मंडळींसह प्रयागास गेले. तेथे त्यांचा मुक्काम दारागंजांत होळकर सरकारांच्या वाड्यांत होता. प्रयाग येथें तीन दिवस मुक्काम होता. पूर्वीं ठरल्याप्रमाणें त्रिवेणीवर श्रीमंत सौ. वहिनीसाहेब, श्रीमंत सौ. काशीताई-साहेब यांचीं वेणीदानें यथाविधि मोठ्या समारंभानें झालीं. प्रयागक्षेत्रांतील रावसाहेबांचे धार्मिक विधी झाले. नंतर श्रीमंत बाबासाहेबांना जबलपूर पाहावयाचें असल्यामुळें ते व श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर आपआपल्या मंडळींसह ता. १४ रोजीं जबलपुरास गेले. दुसऱ्या दिवशीं रावसाहेबहि बुध्याळकर मंडळींना घेऊन तेथें गेले. श्रीमंत बाबासाहेब ता. १५ रोजीं 'भेसा घाट' म्हणून प्रसिद्ध असलेली नर्मदा नदीची संगमरवरी दगडाची दरी पाहण्यास गेले. तें स्थान जबलपूरपासून १४ मैलांवर आहे. त्यांनीं डाक बंगल्यांत मुक्काम केला होता. रात्रीं अकरा वाजतां नावेंत बसून सुमारें तास दीड तास संगमरवरी दगडाच्या दरींतून सर्व मंडळी फिरून आली. सकाळीं धुवांधार अथवा क्यासकेड नांवाचें ठिकाण पाहिलें. पुन्हां नौकाविहार केला. ता. १७ रोजीं सर्व मंडळी तेथून निघून ता. १८ रोजीं नाशिकास आली व तेथून ता. १९ रोजीं पुण्यास येऊन पोहोंचली. त्याच दिवशीं पुण्याहून बुध्याळकर मंडळी बुध्याळास गेली व भोर येथील सर्व स्वाऱ्या भोरास आल्या.

## द्वारकेचा प्रवास

सन १९१४ च्या डिसेंबर महिन्यांत भोर येथें श्रीमंत बाबाहेब यांची प्रकृति जवळ जवळ एक महिनाभर तापानें आजारी होती. ताप थोडा कमी पडून बरें वाटूं लागल्यावर हवा पालट करण्याच्या हेतूनें त्यांनीं प्रवासास जाण्याचें ठरविलें. प्रवासाची सर्व तयारी झाल्यावर १९१५ च्या जानेवारी महिन्यांत श्रीमंत बाबासाहेब द्वारकेस गेले होते. बरोबर फक्त ५।६ च माणसें घेतलीं होतीं. मुंबईहून व्हिक्टोरिया डॉकवर 'लिंगा' नांवाच्या बोटींत बसून ते द्वारकेस जाण्यास निघाले. या प्रवासांत तुफान झालें असल्यामुळें

चित्रांक ४५



नदीच्या कांठीं असलेलीं देवालयें, उदेपूर. [ सं. पा. २१४

चित्रांक ४६



उदेपूर येथील जुन्या राजवाड्यांचा देखावा. [ सं. पा. २१४

श्रीमंत बाबासाहेब व त्यांचा हुजऱ्या नारायण जगदाळे यांखेरीज सर्व मंडळींना बोट लागून फार त्रास झाला. द्वारका येथें ता. १९ जानेवारी रोजीं १०-३० वाजतां पोहोंचले. तेथें पुरुषोत्तम विश्राम मावजी शेटच्या 'सिंधुसदन' नांवाच्या बंगल्यांत ते राहिले होते. शेटजींनीं येथें येण्याची व राहण्याची सर्व व्यवस्था उत्तम केली होती. बडोदें संस्थानच्या अमरेली प्रांताच्या ओखा-मंडळ या विभागांत द्वारका हें गांव आहे. यापूर्वी १८९१ सालीं श्रीमंत बाबासाहेब आपल्या वडील मातोश्रींबरोबर तेथें गेले होते. तेथील दवाखाना, वाचनालय पाहिलें. द्वारकाधिशाचें दर्शन घेतलें. ता. २१ रोजीं द्वारकाबेट अथवा शंखोद्धारबेट पाहण्यास श्रीमंत बाबासाहेब गेले होते. जातांना १२ ज्योतिर्लिंगांपैकीं नागनाथाचें दर्शन घेतलें. ता. २२ रोजीं हनुमानदांडी, शंखोद्धार, कल्पवृक्ष व द्वारकाधीश यांचें त्यांनीं दर्शन घेतलें. देवळांत शिरण्यापूर्वी प्रत्येकास येथें रु. १ कर द्यावा लागतो. ता. २३ रोजीं द्वारका-धिशाचें पूजन करून परत येण्यास निघाले. गोपीतलाव गांवीं गोपीभगवान व गोपीतलावदर्शन झालें. ता. २४ रोजीं द्वारकेस श्रीमंत बाबासाहेब परत आले. ता. २६ रोजीं द्वारकेहून निघून ता. २७ रोजीं ते मुंबईस येऊन पोहोंचले.

## दिल्ली–उदेपूरचा प्रवास

सन १९१७ च्या नोव्हेंबरच्या १ तारखेस श्रीमंत बाबासाहेब मुंबईहून दिल्लीस जाण्यास निघाले. वाटेंत मथुरा येथें एक दिवस मुक्काम करून तारीख ३ रोजीं दिल्लीस पोहोंचले. श्रीमंत रावसाहेब मथुरेपासून बरोबर होते. दिल्लीस मेटकाफ हाउसमध्यें मुक्काम केला. दिल्ली येथें ता. ४ ते १० पर्यंत राजे लोकांची कॉन्फरन्स झाली. त्यांपैकीं ४, ५, ६ व १० या तारखांस ते आपल्या वडिलांबरोबर कॉन्फरन्सला हजर होते. बाकीच्या तारखांना त्यांची प्रकृती बरी नसल्यामुळें ते हजर राहिले नव्हते. ता. ५ रोजीं रावसाहेबां-समवेत श्री. बाबासाहेब त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड व त्यांच्या पत्नी यांच्या भेटीस गेले होते. ता. ८ रोजीं इंपीरिअल वॉर कॉन्फरन्सला गेलेल्या हिंदी प्रतिनिधींना संस्थानिकांनीं दिलेल्या ( बँक्वेटला ) पार्टीला श्रीमंत बाबा-साहेब गेले होते. ता. १० रोजीं कॉन्फरन्सला हजर असलेल्या सर्व संस्थानि-कांचा फोटो घेण्यांत आला. त्या वेळीं बाबासाहेब हजर होते. ता. १३ रोजीं

श्रीमंत बाबासाहेब यांनीं सब्जी मंडी व दिल्लीचा किल्ला पाहिला. ता. १४ रोजीं दिल्लीहून निघून ते ता. १५ ला अजमीर येथें गेले. अजमीरहून ते चितोडगड येथें जाऊन ता. १६ रोजीं उदेपुरास जाऊन पोहोंचले. उदेपुरास गेस्टहाउसमध्यें ते दरबारचे पाहुणे म्हणून राहिले. उदेपूर येथील फत्तेसागर तलाव, जगदीश देवालय, सुहेलियाबारी बाग, सज्जनगड टेकडीवरील राजवाडा, सुरूपसागर व पिचोला तलाव, व त्या सरोवरांतील जगनिवास राजवाडा, गुलाब अथवा सज्जन निवास बाग, व्हिक्टोरिया गार्डन व वस्तु-संग्रहालय, शंभुनिवास व शिवनिवास राजवाडे, इत्यादि स्थळें श्रीमंतांनीं पाहिलीं. उदेपूरचे महाराज व तेथील रेसिडेंट यांच्या भेटी घेतल्या. उदेपुराहून चितोड-गडास येऊन तेथील किल्ला पाहिला. चितोडगडाहून ते रतलाम येथें गेले. तेथील बाग, व्हिला, चांदणी चौक, अमृतसागर लेकमधील वाडा इत्यादि पाहिले. रतलामहून निघून ता. २१ नोव्हेंबर रोजीं मुंबईस येऊन पोहोंचले. या प्रवासाकरितां रु. २००० रावसाहेब यांनीं दिले होते.

## श्री. सौ. जिजीसाहेब यांची बद्रीकेदार व बद्रीनारायणाची यात्रा

श्रीमंत सौभाग्यवती जिजीसाहेब यांनीं श्रीमंत रावसाहेबांच्या बरोबर हिमालयांतील गंगोत्री, जम्नोत्री व बद्रीकेदार या यात्रांशिवाय हिंदुस्थानांतील सर्व यात्रा केल्या होत्या. हिमालयांतील यात्रा अत्यंत बिकट असल्यामुळें त्या राहिल्या होत्या. श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत सौभाग्यवती जिजीसाहेब या दोघांचीहि साठी उलटून गेली असल्यामुळें या यात्रा आपल्या हातून घडणें अशक्य आहे असें श्रीमंत रावसाहेबांना वाटत होतें. दोघांचीहि देवाविषयीं भक्ति फार होती. सर्व नाहींत तरी बद्रीकेदारची व बद्रिनारायणाची यात्रा करून तेथील देवदर्शन घ्यावयाचें राहिलें आहे तें घ्यावें असें श्री. सौ. जिजीसाहेबांच्या मनांत फार असल्यामुळें ही यात्रा करण्याबद्दल त्या श्रीमंत रावसाहेबांना वरचेवर आग्रह करीत. वयाच्या मानानें ही यात्रा होणार नाहीं असें ते म्हणत. शेवटीं श्रीमंत सौ. जिजीसाहेबांनीं "मला एकटीला तरी परवानगी द्या" अशी श्रीमंत रावसाहेबांना विनंति केली. पतीच्या आज्ञेनें स्त्रीला एकटीला तीर्थयात्रा करतां येते असा शास्त्राधार मिळाला होता. म्हणून श्रीमंत रावसाहेबांनीं वरील यात्रेस जाण्याची त्यांना परवानगी दिली.

चित्रांक ४७



चितोडचा जयस्तंभ.

[ सं. पा. २१४

श्रीमंत सौ. जिजीसाहेबांना आपला हेतु सफल होणार म्हणून अत्यंत आनंद झाला. इतक्या उतार वयांत त्यांनीं हें धाडस करण्याचें ठरविलें हें पाहून त्यांच्या इच्छाशक्तीचें सर्वांना कौतुक वाटूं लागलें.

श्रीमंत रावसाहेबांनीं यात्रेच्या वाटेंत कोठें त्रास होऊं नये म्हणून पोलिटिकल एजंटमार्फत गव्हर्न्मेंटकडे त्यांच्या यात्रेचा कार्यक्रम कळविला. बरोबर कोणी तरी मायेचें माणूस पाहिजे म्हणून श्रीमंत सौ. जिजीसाहेबांचे बंधु सरदार श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर, व श्रीमंत सौ. वाराणशीबाई ( श्री. बाळासाहेबांचें कुटुंब ) यांना पाठविण्याचें ठरविलें. संस्थानचे माजी कारभारी रा. ब. आण्णासाहेब सातभाई यांनींहि त्यांच्याबरोबर जाण्याची श्रीमंत रावसाहेबांकडून परवानगी मिळविली. यांशिवाय उपाध्ये, वैद्य, खजिनदार, शिपाई, हुजरे, पालेकरणी वगैरे मंडळी नेमण्यांत आली. श्रीमंत सौ. जिजीसाहेबांचा यात्रेस जाण्याचा हा बेत जेव्हां भोरांतील लोकांस समजला तेव्हां अशी सोबत पुन्हां आपणांस मिळणार नाहीं असें वाटून भोरचे व परगांवचे पुरुष व बायका मिळून पन्नास मंडळींनीं यात्रेस जाण्याचा बेत करून तो त्यांनीं श्रीमंत रावसाहेबांस कळविला. तेव्हां श्रीमंत रावसाहेबांनीं त्यांना श्रीमंत सौ. जिजीसाहेबांच्या सोबतीनें जाण्यास परवानगी दिली.

श्रीमंत बाबासाहेबांच्या मनांत आपल्या मातोश्रींबरोबर या यात्रेस जावयाचें होतें व त्यांनीं आपला हेतु त्यांना कळविला होता. श्रीमंत सौ. जिजीसाहेबांनाहि आपल्याबरोबर श्रीमंत बाबासाहेब येणार हें पाहून आनंद वाटला होता. परंतु त्या निघण्याच्या अगोदरच कांहीं दिवस त्यांची प्रकृति वाताच्या विकारानें बिघडली व ती लवकर सुधारण्याचें चिन्ह दिसेना. प्रवास थंड हवेंत होणार असल्यामुळें वैद्यांनींहि न जाण्याचा सल्ला दिला. त्यामुळें त्यांना आपला बेत रहित करावा लागला. आपल्या परमपूज्य मातोश्रींबरोबर ही यात्रा करण्याची संधि आली असतांना ती आजारीपणामुळें वांया गेली याबद्दल त्यांना अजूनहि वाईट वाटतें.

या यात्रेस निघण्यापूर्वीं सरदार श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांनीं मृत्युपत्र तयार करून तें श्रीमंत बाबासाहेब यांच्या स्वाधीन केलें. त्या दिवशींच्या डायरींत श्रीमंत बाबासाहेब यांनीं खालीलप्रमाणें लिहून ठेविलें आहे.

27th May, 1919

I could not express the sorrow I felt when my uncle handed over to me a sealed packet containing his wishes to be carried out after him if any untoward circumstance would happen to him on the perilous pilgrimage to बद्रीकेदार व बद्रीनारायण. His friends had advised him to hand over that sealed packet to me with instructions to look after his family.

यावरून सरदार बाळासाहेब विंचुरकर यांचा आपल्या भाच्यावर किती विश्वास होता हें दिसून येतें. श्रीमंत बाबासाहेबांनाहि आपल्यावर आपल्या मामांचा इतका भरंवसा आहे हें पाहून धन्यता वाटली. सरदार श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांनीं मृत्युपत्र श्रीमंत बाबासाहेबांच्या हवालीं करून आपली नात सरोजिनीबाई, श्रीमंत बाबासाहेबांच्या हल्लींच्या सूनबाई, यांच्यावर लक्ष ठेवण्यास सांगितलें. सरोजिनीबाई त्या वेळीं लहान असून आजारी होत्या. त्यांची व्यवस्था श्रीमती शांताबाई यांच्यावर सोंपविली असल्यामुळें त्यांनाहि या यात्रेस जावयास सांपडलें नाहीं. सरोजिनीबाईंची सर्व प्रकारें काळजी घेण्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं पत्करल्यामुळें सरदार श्रीमंत बाळासाहेबांना निश्चिंत मनानें यात्रेस जातां आलें.

यात्रेची सर्व तयारी झाल्यावर श्रीमंत सौ. जिजीसाहेब बरोबरच्या सर्व मंडळींसह ता. २६ मे सन १९१९ इसवी रोजीं रात्रीच्या गाडीनें पुण्याहून निघून ता. २७ रोजीं सकाळीं मुंबईस गेल्या. मुंबई स्टेशनवर त्यांना पोहोंचविण्याकरितां श्रीमंत बाबासाहेब गेले होते. आपल्या मातोश्रींचा हा कठीण प्रवास निर्विघ्नपणें सुखकर होऊन त्या सुखरूप परत येवोत म्हणून त्यांनीं परमेश्वराची प्रार्थना करून मातोश्रींस वंदन केलें व त्यांना निरोप दिला. मुंबईहून श्रीमंत सौ. जिजीसाहेब ता. २८ रोजीं निघून मथुरा दिल्लीवरून ता. ३० रोजीं हरिद्वारास पोहोंचल्या. तेथें ३ दिवस मुक्काम करून ता. ३-६-१९१९ रोजीं तेथून निघून हृषीकेश, फुलवाडी, महादेवचट्टी, व्यासघाट, देवप्रयाग, राणीबाग, रामपूर, बिल्वकेश्वर, श्रीनगर, रुद्रप्रयाग, गुप्तकाशी, वगैरे ठिकाणीं मुक्काम करीत बदरीकेदारास गेल्या. तेथें सर्व धार्मिक कृत्यें झाल्यावर तेथून वाटेंत ठिकठिकाणीं मुक्काम करीत त्रिपुरी, बद्रीनारायण येथें

जाऊन तेथें धार्मिक कृत्यें केलीं. तेथून परत फिरून हरिद्वारावरून गोकुळ-वृंदावन, मथुरा, येथील यात्रा करून श्रीमंत सौ. जिजीसाहेबांची स्वारी बरोबरच्या सर्व मंडळींसह सुखरूपपणें मुंबईस ता. ९-८-१९१९ इसवी रोजीं दाखल झाली. श्रीमंत बाबासाहेब त्या वेळीं मुद्दाम मुंबईस गेले होते, व मातोश्रींची व मामांची भेट होतांच त्यांना आनंद झाला. या यात्रेस श्रीमंत सौभाग्यवती जिजीसाहेबांना पावणेतीन महिने लागले. हिमालयांत त्यांना अनेक त्रास व संकटें सहन करावीं लागलीं. तथापि त्यांनीं आपल्या कार्यक्रमांत व्यत्यय येऊं दिला नाहीं. हिमालयांत असतांना श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांना थोडा अर्धांगवाताचा विकार झाला. परंतु वैद्यकीय उपचार ताबडतोब झाल्या-मुळें ते लवकर बरे झाले. श्रीमंत सौ. जिजीसाहेब यांच्या अंगचे आत्मविश्वास, दृढ निश्चय, धर्मश्रद्धा इत्यादि अमोलिक गुण या यात्रेंत चांगलेच कसास लागले होते. बरोबरच्या सर्व मंडळींची त्या अत्यंत प्रेमानें काळजी घेत असत. त्यांना सर्वजण आईसाहेब म्हणत असत तें कांहीं खोटें नव्हतें. त्यांचें मातृवत् प्रेम स्वतंत्रपणानें प्रवास केल्यामुळें या वेळीं सर्वांस विशेष अनुभवास आलें व आई-साहेब हें त्यांचें नांव सार्थ असल्याचें सर्वांच्या निदर्शनास आलें.

ही यात्रा करण्याच्या पूर्वी सन १९१७ च्या फेब्रुवारी महिन्यांत श्रीमंत सौ. जिजीसाहेब यांनीं श्रीशैल्याची यात्रा केली होती. या यात्रेच्या वेळींहि त्यांच्या-बरोबर श्रीमंत रावसाहेब हे गेले नव्हते. परंतु त्या वेळीं त्यांच्याबरोबर श्रीमंत सौ. लक्ष्मीबाईसाहेब (श्री. बाबासाहेबांचें कुटुंब) व विंचुरकरांकडील मंडळी गेली होती. या वेळींहि श्रीमंत बाबासाहेबांना त्यांच्याबरोबर जातां आलें नाहीं.

## रामेश्वरची यात्रा

श्रीमंत बाबासाहेब यांना ता. ८ फेब्रुवारी, १९१९ रोजीं कन्या झाली; तिचें नांव स्नेहलता ठेवण्यांत आलें होतें. ती झाल्यापासून एक वर्षाच्या आंत म्हणजे ता. १९ नोव्हेंबर रोजीं निधन पावली. तिच्या निधनानंतर त्यांना व त्यांच्या पत्नी यांना मुळींच चैन पडेना. तेव्हां मनःस्वास्थ्य मिळविण्याकरितां कोठें तरी प्रवास करण्याचें त्यांच्या मनांत येऊन त्यांनीं दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास करण्याचें ठरविलें. या प्रवासाच्या खर्चाकरितां श्रीमंत रावसाहेबांकडून श्रीमंत बाबासाहेबांना ४५०० रुपयांची जादा रक्कम मिळाली होती. याबद्दल

त्यांना विशेष समाधान वाटलें. ता. ७ डिसेंबर १९१९ इसवी रोजीं ते आपल्या पत्नीसह या प्रवासाकरितां पुण्याहून निघाले. या प्रवासांत त्यांनीं मद्रास, तंजावर, रामेश्वर, म्हैसूर, श्रीरंगपट्टण, बंगलोर, विजयानगर, गोलघुमटामुळें प्रसिद्ध असलेलें विजापूर, बेळगांव, धारवाड हीं शहरें पाहिलीं. वरील ठिकाणचीं सर्व प्रेक्षणीय स्थळें पाहण्यांत त्यांचा वेळ जात असल्यामुळें त्यांना आपल्या दु:खाचा विसर पडत चालला होता. वाटेंत त्यांनीं कोलार येथील सोन्याच्या खाणी व गिरसप्पाचा धबधबा पाहिला. त्यांचा मद्रास येथें मुक्काम असतांना त्या वेळचे तेथील गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन व लेडी विलिंग्डन यांच्या भेटीचा त्यांना लाभ झाला. तंजावर येथें छत्रपति शिवाजीमहाराज यांचे बंधु व्यंकोजी यांच्या वंशांतील राजपुत्र श्रीमंत शिवाजी राजेसाहेब यांचे ते पाहुणे होते. ते तंजावराहून निघाले तेव्हां तेथील राजपुत्रानें त्यांना बहुमोल पोषाख देऊन त्यांचा गौरव केला. म्हैसूरच्या मुक्कामांत ते म्हैसूरच्या महाराजांचे पाहुणे म्हणून राहिले होते. तेथें महाराजांनीं त्यांची उत्तम व्यवस्था ठेविली होती. दक्षिण हिंदुस्थानचा हा प्रवास संपवून श्रीमंत बाबासाहेब आपल्या पत्नीसह ता. ११ फेब्रुवारी १९२० इ. रोजीं सुखरूपपणें पुण्यास परत आले. या दोन महिन्यांच्या प्रवासामुळें त्यांना चित्तस्वास्थ्य लाभून आपल्या कामाला लागण्यास उत्साह प्राप्त झाला.

या प्रवासाहून आल्यावर प्रवासाची हकीकत श्रीमंत बाबासाहेब यांनीं निरनिराळीं अशीं तीन व्याख्यानें भोर येथें देऊन सांगितली. ती परिशिष्ट 'ढ', 'ण', 'त', यांत दिली आहे. सदर प्रवासाची हकीकत त्यांनीं त्यानंतर 'चित्रमय जगत्'च्या सन १९२० सालच्या मे, जून व ऑगस्ट या तीन अंकांत प्रसिद्ध केली होती.

## काश्मीरचा प्रवास

श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या वडिलांबरोबर सन १९२० सालीं ता. २० ऑगस्टपासून ता. ५ ऑक्टोबरपर्यंत दीड महिना काश्मीर व वायव्य सरहद्द प्रांत यांत सहकुटुंब प्रवास केला. काश्मीरांत प्रवेश केल्यापासून काश्मीरच्या महाराजांनीं आपल्या संस्थानांत त्यांची उत्तम व्यवस्था ठेविली होती. काश्मीरची राजधानी श्रीनगर येथें काश्मीरच्या महाराजांनीं श्रीमंत

चित्रांक ४८



श्रीरामेश्वराचे देवालयांतील प्राकार.

[ सं. पा. २१८

रावसाहेबांच्या स्वागतार्थ दरबार भरविला होता. त्या दरबारास श्रीमंत बाबासाहेब आपल्या वडिलांबरोबर गेले होते. महाराजांचे पुतणे जनरल सर राजा हरिसिंग, हल्लींचे महाराज, यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना चहापार्टी दिली. श्रीमंत सौ. लक्ष्मीबाईसाहेब महाराणीसाहेबांच्या भेटीस गेल्या होत्या. त्या वेळीं त्यांना महाराणीसाहेबांनीं काश्मिरी कारागिरीचा सोनेरी नक्षीकाम केलेला चांदीचा चहाचा सेट नजर केला. काश्मीरांतील सर्व प्रेक्षणीय स्थळें पाहून झाल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब सहकुटुंब रावळपिंडीवरून वायव्य सरहद्द प्रांतांत गेले व श्रीमंत रावसाहेब मुंबईस परत आले.

वायव्य सरहद्द प्रांतांत श्रीमंत बाबासाहेबांनीं तक्षशीला ( अशोक-कालीन नाश पावलेलें बुद्ध शहर ) हें शहर पाहिलें. नंतर अकबरानें बांधिलेला अटक येथील इतिहासप्रसिद्ध किल्ला, लष्करी छावणीचें ठिकाण नौशेरा, पेशावर, खैबर व मलाकंड खिंडी इत्यादि स्थळें पाहिलीं. परत येतांना लाहोर, अमृतसर व तेथील शीख देवालयें आणि इतर ऐतिहासिक प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं व हा प्रवास संपवून ते पुण्यास ता. ५ ऑक्टोबर रोजीं परत आले. हा प्रवास त्यांच्या प्रकृतीस चांगला मानवला होता. या प्रवासाकरितां श्रीमंत रावसाहेब यांनीं रु. ४००० श्रीमंत बाबासाहेबांना दिले होते. नारायण जगदाळे या नांवाचा श्रीमंत बाबासाहेबांचा एक जुना विश्वासू हुजऱ्या होता. तो श्रीमंतांचें वय तीन वर्षें असतांना त्यांचेकडे नोकरीस ठेविला होता. तो या प्रवासाहून आल्यावर मरण पावला. त्याबद्दल श्रीमंतांना फार वाईट वाटलें.

भोर येथें ता. ११ नोव्हेंबर रोजीं श्रीमंत बाबासाहेबांच्या अध्यक्षतेखालीं श्रीराम-क्रीडाभुवन या संस्थेची सभा भरली होती. त्या वेळीं त्यांनीं काश्मीरच्या प्रवासांत जें पाहिलें होतें व त्यांच्या मनावर जे संस्कार झाले होते त्याची सविस्तर माहिती दिली. त्यांचें हें व्याख्यान श्रोत्यांना फारच मनोरंजक वाटून त्यांच्या सूक्ष्म अवलोकनशक्तीचें त्यांना कौतुक वाटल्यावांचून राहिलें नाहीं. ( तें भाषण परिशिष्ट ‘थ’ यांत दिलें आहे. ) या प्रवासाचें त्रोटक वर्णन श्रीमंत बाबासाहेबांनीं ‘चित्रमय-जगत्’च्या सन १९२२ च्या जानेवारीच्या अंकांत प्रसिद्ध केलें होतें.

## शोचनीय प्रसंग

### फडके यांचें निधन

श्रीमंत बाबासाहेब यांचे पहिले पर्सनल असिस्टंट रावसाहेब पुरुषोत्तम बापुजी फडके सन १९१४ च्या फेब्रुवारींत कालवश झाले. रावसाहेब फडके मोठे तडफदार असून श्रीमंत बाबासाहेबांना शिरवळ तालुक्याचे अधिकार चालविण्याच्या कामीं प्रथमचीं दोन वर्षेंपर्यंत त्यांची फारच मदत झाली होती. रावसाहेब फडके यांच्यासारखा कर्तव्यदक्ष अधिकारी मिळून तो फार दिवस लाभला नाहीं याबद्दल श्रीमंत बाबासाहेबांना फार वाईट वाटलें.

### श्री. सरदार बाळासाहेब पानसे यांचें निधन

पुणें येथील श्री. सरदार बाळासाहेब पानसे यांच्याशीं रा. ब. तात्या-साहेब कुमठेकर यांच्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांची ओळख झाली व पुढें ओळखीचें रूपांतर स्नेहांत झालें. श्री. सरदार बाळासाहेब यांचें शिक्षण फार झालेलें नव्हतें, तरी अव्वल इंग्रजीच्या काळांत सरकारी नोकरींत शिरून आपल्या हुशारीनें ते कलेक्टरच्या हुद्यावर चढले होते. त्यांनीं आपल्या चातुर्यानें साहेब लोकांवर वजन ठेवून आपला दर्जा कायम राहील अशी वर्तणूक ठेविली होती. त्यांनीं लोकप्रियताहि चांगलीच संपादन केली होती. नोकरींत असतांना त्यांनीं आपल्या वजनानें अनेक ओळखीच्या माणसांना नोकरी लावून देण्यांत व अन्य प्रकारांनीं शक्य तों फायदा करून दिला. कै. श्री. रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब यांमधील दुहीची त्यांना चांगलीच माहिती होती. साहेब लोकांना श्रीमंत बाबासाहेब यांचा स्वभाव व रावसाहेबांच्या वागणुकीनें त्यांना प्राप्त झालेली परिस्थिति योग्य प्रकारें समजावून सांगण्यांत श्रीमंतांना त्यांचा फार उपयोग झाला. ते १९१८ सालीं निधन पावले. त्या वेळीं त्यांचें वय ६८ वर्षांचें होतें. त्यांच्या निधनानें श्रीमंतांना फार दुःख झालें.

### कौटुंबिक आपत्ती

श्रीमंत बाबासाहेबांच्या प्रथम पत्नी श्रीमंत सौभाग्यवती गंगूबाईसाहेब दिवंगत झाल्यानंतर सुमारें ७-८ वर्षें मधून मधून श्रीमंत बाबासाहेबांची प्रकृति नादुरुस्त असे. तथापि एकंदरींत तीं वर्षें साधारणपणें सुखाचीं गेलीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु १९१५ सालापासून त्यांच्यावर एकामागून एक दुःखाचे डोंगरच कोसळत गेले.



झेलम नदीचें तीर, श्रीनगर; मध्यभागीं हाउस बोटस् आहेत.

[ सं. पा. २१९

## कन्या-वियोग

### श्रीमंत सौ. काशीताईसाहेब यांचें शोचनीय निधन

श्रीमंत सौ. काशीताईसाहेब सन १९१४ सालीं गरोदर होत्या. त्या पुण्यास आल्यावर त्यांची प्रकृति वांतीनें बिघडली होती. ती थोडी बरी झाल्यावर बाळंतपणाकरितां त्यांना भोरास आणलें होतें. प्रसूतीचे दिवस जवळ आल्यावर पुण्याहून श्रीमंत बाबासाहेब यांच्या सांगण्यावरून युरोपियन नर्स आणविण्यांत आल्या होत्या. वांतीनें त्यांची प्रकृति फारच अशक्त झाल्यामुळें सर्वांना काळजी वाटत होती. सुखप्रसूतीकरितां अनुष्ठानेंहि चालू ठेविलीं होतीं. ता. १९ डिसेंबर सन १९१४ इसवी रोजीं सायंकाळीं पांच वाजतां श्रीरामकृपेनें त्या सुप्रसूत होऊन रावसाहेबांना प्रपौत्री व श्रीमंत बाबासाहेबांना पौत्रीलाभ झाला. बारशाचा समारंभ होऊन मुलीचें नांव कमळाबाई ठेवण्यांत आलें. पण पुढें दुर्दैवानें श्रीमंत सौ. काशीताईसाहेबांना बाळंतरोग जडला. पुष्कळ औषधोपचार करण्यांत आले. परंतु सर्व प्रयत्न निष्फळ होऊन ता. ३१ मे सन १९१५ रोजीं त्या अकालीं कालवश झाल्या. सर्वांना अत्यंत दुःख झालें ! श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या रोजनिशींत आपल्या प्रिय कन्येबद्दल पुढील मजकूर लिहिला आहे. त्यांची मुलगी अगोदरच दिवंगत झाली होती.

"काशीताई जरी गर्भश्रीमंतींत वाढल्या होत्या तरी लग्न होतांच ज्या सामान्य स्थितींत त्या पडल्या होत्या त्या स्थितीशीं जुळेल असा आपला वर्तनक्रम त्यांनीं ठेविला होता. तो पाहून त्यांच्या पतीचे नातेवाईक आश्चर्यानें थक्कच झाले होते. धूर्तपणा व पतीला खूष ठेवण्याची कला हे त्यांच्या मातेच्या अंगचे दोन गुण त्यांच्यांत आले होते. नोकरवर्ग व इतर आप्त यांना राजी राखण्याचा त्यांच्या आजीच्या अंगचा गुणहि त्यांचे ठिकाणीं होता. त्या आपल्या मातोश्रीप्रमाणें देखण्या नव्हत्या, तरी सेवकांशीं सदयतेनें वागण्याच्या गुणांत त्या त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ होत्या. दुर्दैवानें त्या गरीब स्थितींत पडल्या होत्या. आपला जन्म श्रीमंत कुलांत झालाच नाहीं असें समजून त्या बुद्ध्याच सासरीं सासरच्या लोकांप्रमाणें वागत असत. मराठी लेखन-वाचनापलीकडे त्यांचें शिक्षण झालें नव्हतें. तथापि नवीन परिस्थितीचें झटकन् उत्तम रीतीनें आकलन करून त्यांनीं सर्वांचें प्रेम संपादन केलें. माझी कन्या म्हणून मी त्यांची स्तुति करीत

नाहीं. मीं लिहिलें हें वस्तुस्थितीपेक्षां अगदीं कमीच आहे. त्यांचें वय लहान असतांहि त्यांच्या अंगीं किती तरी अनेक चांगले गुण होते. ”

श्रीमंत सौ. काशीताईसाहेब यांचें वय निधनसमयीं १६ वर्षांचें होतें. त्यांचा विवाह होऊन तीनच वर्षें झालीं होतीं.

श्रीमंत सौ. काशीताईसाहेब तीनचार महिने आजारी होत्या. त्यांची व्यवस्था पहिल्यापासून श्रीमंत रावसाहेब व जिजीसाहेब यांच्या खास देखरेखीखालीं होती. श्रीमंत भाऊसाहेब यांच्या आजारीपणाच्या वेळीं जितकी आपण काळजी घेतली तितकी जर श्रीमंत सौ. काशीताईसाहेबांच्याबद्दल घेण्यास आपणांस परवानगी देण्यांत आली असती तर कदाचित् त्या बऱ्या झाल्या असत्या, असें श्रीमंत बाबासाहेब यांना वाटत होतें. “ प्रयत्नांची शिकस्त करून जर यश आलें नसतें तर मनाला हलगरज झाल्याबद्दल खात तरी राहिलें नसतें. ” असें ते म्हणत असत.

## भाऊसाहेब विंचुरकर यांचें शोचनीय निधन

श्रीमंत भाऊसाहेब विंचुरकर यांचा व श्रीमंत बाबासाहेब यांचा संबंध कशा प्रकारचा होता हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. ते सन १९११ सालीं बी. ए. च्या परिक्षेंत उत्तीर्ण झाले. त्यांचा स्वभाव अत्यंत गोड, मनमिळाऊ आणि उदार होता. देशी व विदेशी पाश्चात्य खेळांची त्यांना अतिशय आवड होती. क्रिकेट, टेनिस वगैरे खेळांत त्यांनीं नैपुण्य मिळविलें होतें. गायनासारख्या कलांची त्यांना गोडी होती. शिक्षणप्रसारासारख्या देशहिताच्या कामांत त्यांचें लक्ष असे. पुणें येथील पी. वाय. सी. हिंदु जिमखाना सर्वस्वीं त्यांच्या औदार्याचें आणि मेहेनतीचें फळ आहे. त्यांच्या संगतीपासून श्रीमंत बाबासाहेबांना पुष्कळ करमणूक व फायदा होत असे. त्यांच्या प्रोत्साहनानेंच श्रीमंत बाबासाहेबांनीं वरील जिमखान्यास उदार देणग्या दिल्या आहेत. राज्यकारभारविषयक प्रश्नांची माहिती होऊन पुढें देशहितासाठीं कांहीं करतां यावें या हेतूनें श्रीमंत भाऊसाहेब यांनीं इंदूर संस्थानांत नोकरी पत्करली होती व तेथें सुभ्याच्या हुद्दयावर काम करीत होते. इंदूर संस्थानांत ते आपल्या कर्तबगारीनें लोकप्रिय झाले होते. त्यांची महत्त्वाकांक्षा फार मोठी होती. परंतु सन १९१८ सालच्या इन्फ्ल्युएंझाच्या सांथीच्या तडाक्यांत ते सांपडले व

चित्रांक ५०



विंचुर येथें घेतलेला फोटो. [ सं. पा. २२२

उभे—१ श्री. भाऊराज; २ श्री. बाप्पाराजे; ३ श्रीमंत राजे शामराज; ४ श्री. बाळासाहेब विंचुरकर; ५ श्री. बाबासाहेब पंतसचिव; ६ श्री. भाऊसाहेब विंचुरकर; ७ श्री. बाबासाहेब चांदवडकर;

खुर्चीवर—१ शामराज यांच्या भगिनी; २ श्री. सौ. जान्हवीबाई; ३ श्री. सौ. बाराणशीबाई; ४ कु. सरोजिनी; ५ श्री. सौ. राणीसाहेब भोर; ६ श्री. सौ. गिरिजाबाईसाहेब विंचुरकर; ७ नानासाहेब चांदवडकर.

त्यांतच त्यांचा अंत झाला. त्यांच्या निधनामुळें त्यांच्या शेंकडों मित्रांस हळहळ वाटल्यावांचून राहिली नाहीं. आपला एक सन्मार्गदर्शक आप्त व मित्र नाहींसा झाला यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना अत्यंत दुःख झालें. त्यांच्याबद्दल त्यांनीं आपल्या डायरींत जें लिहिलें आहे तें पुढें दिलें आहे:

8th Nov., 1918

We learnt unexpectedly and with greatest sorrow the death of Shrimant Bhausaheb Vinchurkar which took place on the 5th Nov., 1918, in the morning at Khargane in the Indore State. He was suffering from double Pneumonia resulting after the severe attack of Influenza. He being very frank and social not only his death is deeply mourned by his parents but by his large circle of friends. By his intelligence, boldness and hard work he had pleased H. H. the Maharaja of Indore and the subjects alike, which is a very difficult task to perform at the same time. I have lost in him a near relative and a friend who was acquainted with me since I was 14 years of age. We lived in our younger days in the same Wada, studied together, played together. So the relationship—his sister being given to me and mine to him—turned into friendship which grew stronger and stronger as years advanced. He had gained the experience of the world. I am sure his place cannot be filled by any-body.

त्यांच्यामुळेंच श्रीमंत बाबासाहेबांना टेनिसची गोडी उत्पन्न झाली होती. त्यांनीं भोर येथें टेनिसकोर्ट (श्रीराम-क्रीडाभुवन) स्थापन करण्यास उत्तेजन देऊन जें द्रव्यसाहाय्य केलें त्यास कारण त्यांना त्या वेळीं टेनिसची उत्पन्न झालेली आवडच होय. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या मामांना म्हणजे सरदार बाळासाहेब विंचुरकर यांना जें सांत्वनपर पत्र पाठविलें तेंहि पुढें दिलें आहे.

श्रीमंत सरकार बाबासाहेब यांचें मामासाहेब विंचुरकर याना पत्र

ती. श्री. मामासाहेब यांस,

मी आपणांस व ती. सौ. मामीसाहेब यांना भेटलों, परंतु श्रीमंत भाऊ-साहेब यांचे निधनासंबंधानें आम्हां सर्वांस काय वाटलें तें कालचा हृदयद्रावक

देखावा पाहून बोलवेना. तें बोलण्याचा हेतु आपलें समाधान करण्याचा नव्हे. कारण दुःखाचा प्रसंग आला असतां तो सोसण्याच्या कामांत आपण फारच धैर्यवान व विचारी आहांत. परंतु तें व्यक्त करण्याचा हेतु जी व्यक्ति गेली आहे ती तरी आपले पाठीमागें नांव राहील असें वर्तन करून लोकांस चटका लावून गेली असें कळतें, अशा स्थितींत कांहीं अंशीं समाधानाला जागा असते. कारण मृत्युलोकची वस्ती, प्रत्येकाला लवकर वा उशीरां या जगांतील त्याची कामगिरी जशी संपेल त्याप्रमाणें संपवून, हें जग सोडून जावयाचेंच. परंतु त्यांनीं आपण जे त्यांच्या संरक्षणासंबंधानें श्रम घेतले त्यांचें चीज करून ते बी. ए. झाले व बाकीच्या श्रीमंतांच्या मुलांप्रमाणें ऐषआरामांत व चैनींत काल न दवडतां इंदूर संस्थानांत आपल्या साहाय्यानें नोकरी पतकरली, इतकेंच नव्हे, तर आपल्या बुद्धिसामर्थ्यानें, परिश्रमानें, मनमिळाऊ स्वभावानें महाराजांचें, व तसेंच रयतेचें प्रेम संपादन करणें ही जी अवघड गोष्ट ती त्यांनीं साध्य करून दाखविली. त्यांचा मनमिळाऊपणा, सार्वजनिक कामाची हौस ही येथील पी. वाय. सी. हिंदु जिमखाना व्यक्त करून दाखवीत आहे. ते गेल्यानें सार्वजनिक नुकसान होऊन आपलें सर्वस्वीं नुकसान तर झालेंच; पण शिवाय आमचे परमस्नेही नाहींसे झाले. लहानपणापासून आम्ही येथें एकाच वाड्यांत राहिलेलों व खेळलेलों, व निकट नातें असल्यामुळें पुढेंहि गांठीभेटींचा योग वरचेवर आल्यामुळें व त्यांचा स्वभाव मोकळा असल्यामुळें त्या ओळखीचें पर्यवसान स्नेहामध्यें झालें होतें, व अशा वयामध्यें स्नेही नाहींसे होणें ही कमी दुःखाची गोष्ट नाहीं. कारण स्नेही कांहीं ताबडतोब व वरचेवर होत नसतात.

## श्रीमंत बाळासाहेब गांडेकर यांचें निधन

इन्फ्ल्युएन्झाच्या सांथींत श्रीमंत बाबासाहेबांचे दुसरे कालवश झालेले आप्त म्हणजे बाळासाहेब गांडेकर हे होत. श्रीमंत बाळासाहेब ता. १४ ऑक्टोबर सन १९१८ इसवी रोजीं दिवंगत झाले. हे संस्थानचे दुय्यम कारभारी होते. हे श्रीमंत नानासाहेबांच्या पहिल्या घरचे धाकटे बंधु असून श्रीमंत रावसाहेबांचे चुलते होते. औदार्य, दिलदारपणा, मनाचा निर्मळपणा इत्यादि गुण त्यांच्या अंगीं असून ते अत्यंत लोकप्रिय होते. श्रीमंत बाबासाहेबांना

चित्रांक ५१



कै. श्री. सरदार शिवदेवराव ऊर्फ भाऊसाहेब विंचूरकर, श्रीमंतांचे मेहुणे.

[सं. पा. २२२

त्यांचा फार उपयोग होत असे. ते धर्मशील असून परोपकार करण्यास सदा तत्पर असत. त्यांच्या निधनानें आपला एक आधार गेला म्हणून श्रीमंत बाबासाहेबांना फार दु:ख झालें.

## द्वितीय भार्येस प्रथम अपत्य-कन्यारत्न व त्याचें निधन

श्रीमंत बाबासाहेब यांचें द्वितीय कुटुंब श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब यांच्या प्रथम बाळंतपणाच्या खर्चाकरितां श्रीमंत रावसाहेबांनीं नेमणुकीच्या रकमेपेक्षां तीन हजार रुपयांची जादा रक्कम श्रीमंत बाबासाहेबांना दिली होती. श्रीमंत सौ. लक्ष्मीबाईसाहेब पुणें येथील वाड्यांत ता. ८ फेब्रुवारी सन १९१९ इसवी रोजीं प्रसूत होऊन त्यांना कन्यारत्न झालें. त्याचें नांव स्नेहलता ठेविलें होतें. परंतु हें अपत्य फार दिवस लाभलें नाहीं. ही मुलगी जन्मापासून अशक्तच होती. तिला फिट्स येत असत. सातआठ महिन्यांनंतर तिला तापहि येऊं लागला. श्रीमंत बाबासाहेब त्या वेळीं सहकुटुंब पुण्यास होते. ता. १९ नोव्हेंबर रोजीं रात्रीं १० वाजतां १०५ डिग्री ताप भरला व त्यांतच जोराची फिट् येऊन तिचा अंत झाला. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब जवळ होते. त्या वेळचा प्रसंग त्यांनीं आपल्या डायरींत पुढीलप्रमाणें दिला आहे.

"तिला १०५ डिग्री ताप भरून फिट् येऊन तत्काल प्राणोत्क्रमण झालें. त्या वेळीं आम्ही उभयतां जवळ होतों. माझेपेक्षां माझे कुटुंबास अनिवार दु:ख झालें. लग्नानंतर ११ वर्षांनीं त्यांना पहिलें अपत्य झालें होतें. त्या स्वत: आजारी होत्या तरी मुलीची शुश्रूषा स्वत: करीत. मुलगी त्यांची फार लाडकी होती. यावरून त्यांना किती दु:ख झालें असेल त्याची कल्पना येते. त्यांचें समाधान करण्यास माझेशिवाय त्या वेळीं दुसरें कोणी जवळ नव्हतें. माझे मुलीचें प्राणोत्क्रमण होतेवेळचा तो देखावा मला फार भयंकर वाटला. असा देखावा मीं पूर्वीं कधीं पाहिला नव्हता. जन्मल्यापासून २८४ दिवसांनीं ती गेली. माझ्या व विशेषत: माझ्या कुटुंबाच्या हृदयांत उदासीनता उत्पन्न झाली. ती कधीं दूर होणार न कळे. एकामागें एक दु:खाचे प्रसंग येऊं लागले म्हणजे संसारत्याग करून आयुष्य ईश्वरचिंतनांत व जनसेवेंत घालवावें असें वाटूं लागतें."

## श्री. सौ. वाराणशीबाईसाहेब विंचुरकर यांचें निधन

श्रीमंत बाबासाहेबांच्या मामी श्रीमंत सौ. वाराणशीबाईसाहेब ( श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांचें कुटुंब ) या वर्षभर कॅन्सरच्या विकारानें आजारी होत्या. त्या ता. २८ ऑगस्ट सन १९२० इसवी रोजीं कालवश झाल्या. श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांना आपल्या पत्नीच्या निधनानें मोठाच धक्का बसला. श्रीमंत बाबासाहेब यांना ही हकीकत काश्मीर येथें प्रवास करीत असतांना समजली. त्यांनीं आपल्या डायरींत आपल्या मामींबद्दल पुढील मजकूर लिहिला आहे.

30th August, 1920

I am very sorry to learn the death of my loving aunt Shrimant Soubhagyavati Waranashibai Saheb Vinchurkar on the last Saturday, 28th August, 1920 at 8 p.m. whose end we all expected from the protracted illness for one year. Though expected, it must be a severe blow to my dear and noble and kind-hearted uncle who had that one kind of solace left upto now in her, when death had been snatching the members of the family from a long time since the death of my most beloved wife in 1907. In Mamisaheb I lost an affectionate aunt whose memory will always be fresh in my mind as one who treated me affectionately during my long stay at Manmad. To my uncle it is an irreparable loss during his declining years as she was an intelligent household-manager or house-wife to look after her husband and her children.

## राजकुमार रामनाथ यांचें निधन

श्रीमंत बाबासाहेबांना सन १९२० सालीं डिसेंबरच्या १३ तारखेस पुत्ररत्नाचा लाभ झाला होता. पुत्राचें नांव रामनाथ असें ठेविलें होतें. या बाळंतपणाकरितां श्रीमंत रावसाहेब यांनीं श्रीमंत बाबासाहेबांना ४००० रुपये दिले होते. या अपत्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना व त्यांच्या कुटुंबास स्नेहलतेच्या विरहाचा थोडा विसर पडला होता. परंतु ईश्वराच्या मनांतून त्यांना फार दिवस सुखाचा लाभ मिळूं द्यावयाचा नव्हता. एक वर्षानंतर ता. २९ डिसेंबर सन १९२१ इसवी रोजीं निर्घृण काळानें हें अपत्य हिरावून नेलें. यामुळें

चित्रांक ५२



श्री. बाबासाहेब आणि श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब ( कडेवर स्नेहलताबाई ). [ सं. पा. २२५

श्रीमंत बाबासाहेबांना व श्रीमंत सौ. लक्ष्मीबाईसाहेब यांना अनिवार दुःख होऊन आपल्या नशिबीं कोणत्याहि प्रकारचें सुख नाहीं असें त्यांना वाटूं लागलें. त्या दिवशींच्या डायरींत त्यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

29th December, 1921

Very sorry to record the death of younger son Ramnath which took place at about 7 p.m. I got six children in all, but excepting Bhausaheb all died, but no child drew forth so much sorrow from its death as this one did to me and to my wife. His death threw her into the wilderness of despair and made the world to us both devoid of any interest. Though a child, he showed as much intelligence as a child can do and besides he was very beautiful and healthy. We felt much for his death because my wife did not get children for the first ten years after the marriage, then she gave birth to a daughter who was weakling, still she felt great sorrow for her death. Then she got this son. He was born in December, 1920.

या पुत्राच्या निधनानंतर व एकंदर परिस्थितीमुळें श्रीमंत बाबासाहेबांना आपल्या जीविताचा इतका कंटाळा आला कीं, आपल्या कामाचा राजीनामा देऊन तीर्थयात्रा करण्यांत कालक्षेप करावा असे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले. पुढें त्यांनीं जरी प्रत्यक्ष राजीनामा दिला नाहीं तरी मनःस्वास्थ्य मिळावें म्हणून जानेवारी सन १९२२ इ. रोजींपासून श्रीमंत रावसाहेबांच्या संमतीनें कांहीं कालपर्यंत तालुक्याचें काम पाहण्याचें बंद ठेविलें व ते मिरजेस जाऊन नरसोबाचे वाडीस गेले. तेथून ते पुढें गोकर्णाच्या यात्रेस जाणार होते. परंतु त्यांच्या मातोश्री पुण्यास आजारी असल्यामुळें त्यांना आपला बेत रहित करून पुण्यास परत यावें लागलें.

## श्रीमंत सौ. जिजीसाहेब यांचें निधन

श्रीमंत सौ. जिजीसाहेब सुमारें दोन महिने आजारी होत्या. श्रीमंत बाबासाहेब जानेवारींत पुण्याहून मिरजेस गेले त्या वेळीं त्यांची प्रकृति काळजी करण्यासारखी नव्हती. परंतु त्या महिनाअखेर त्या थकत चालल्या व प्रकृति चिंताजनक झाली. श्रीमंत बाबासाहेबांना हें कळतांच ते आपला प्रवासाचा

वेत रहित करून पुण्यास परत आल्याचें सांगितलेंच आहे. फेब्रुवारीच्या पहिल्या आठवड्यांत त्यांच्याबद्दल निराशा वाटूं लागली. श्रीमंत रावसाहेब व श्रीमंत बाबासाहेब त्यांच्याजवळ बसून होते. वैद्यकीय उपाय चालू होते. कशाचाहि उपयोग न होतां त्या ता. १२ फेब्रुवारी रोजीं दुपारीं कैलासवासी झाल्या. रावसाहेबांच्या शोकास पारावार नव्हता. त्या वेळीं " आज आमची गृहलक्ष्मी गेली " असे उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडले. त्यांच्या मनास मोठाच धक्का बसला ! श्रीमंत बाबासाहेबांना काय वाटलें तें त्यांच्याच शब्दांत लिहिणें बरें असें वाटल्यावरून त्यांच्या डायरींतील उतारा पुढें दिला आहे.

12th Feb., 1922

Very anxious to see that my mother's health become critical and in the afternoon, she breathed her last to the grief of all those who knew her mild, unassuming and obliging nature. From her childhood she was most unfortunate in as much as she suffered from the hands of her mother-in-law, and of her husband as was said by the people. But she bore all this meakly which indicates her mildness of the characteristic quality of a Hindu lady who recognises her husband as God, of what nature he may be. When she was so much checked by my father's impetuous nature and when she ceased to find any happiness in the world she gave herself up to religious pursuits. Considering the period in which she lived she received good education in as much as she could read and write both Balbodh and Modi characters well. She could also ride well. At the desire of my father she left writing and riding. And in after-life she derived pleasures from religious observances of making pilgrimages to sacred places. After close associations with her husband she began to like her husband gradually and towards the close of her life the domestic interest of both husband and wife were identical; not because my father behaved according to her wishes, but because she lived according to his. Therefore my father felt most at the announcement of her death. To other relatives and servants and others she was as it were their mother,

sympathising with their afflictions and helping them within her limited means and influence. She was as it were an angel of peace between the uncompromising father and others. From her point of view as she expressed many a time she met with death at a most opportune time if expressed in popular language viz. त्यांचें सोनें झालें, when her son, grandson and affectionate brother are living and especially during the life-time of her husband at such an advanced age of 62. But to all others who know her it is an irreparable loss especially to me who have lost a mother which thing can only be got once and which once lost cannot be replaced. To a mother's love there is no parallel in the world—न मातुः पर दैवतम्. But I must resign to God's will and thank him for sparing her to me upto 43 years of my life.

पत्नीवियोगाचा श्रीमंत रावसाहेबांच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, दिवसेंदिवस ते थकत चालले. "आमचाहि काल आतां जवळच आला आहे" असे उद्गार वारंवार त्यांच्या तोंडून ऐकूं येऊं लागले.

श्रीमंत बाबासाहेबांनीं कांहीं दिवस विश्रांति घेतल्यानंतर मे महिन्यांत पुन्हां तालुक्याचें काम पाहण्याची रावसाहेबांची परवानगी घेऊन ता. १ जून पासून ते शिरवळ तालुक्याचें काम पुन्हां पाहूं लागले.

## श्रीमंत रावसाहेब यांचें निधन

श्रीमंत रावसाहेब या वर्षी उन्हाळयानिमित्त महाबळेश्वरास गेल्यावर तेथें त्यांची प्रकृति अतिसारानें बिघडली म्हणून ते जूनमध्यें परभारें पुण्यास गेले. तेथें दिवसानुदिवस त्यांची प्रकृति जास्तच बिघडत जाऊन ता. १७ जुलै १९२२ इसवी रोजीं सायंकाळीं सहा वाजतां वयाच्या ६९ व्या वर्षी त्यांचें देहावसान झालें. त्या वेळीं त्यांच्या नात्याची सर्व मंडळी तेथें हजर होती. पोलिटिकल एजंट मि. डब्ल्यू. एफ्. हडसन् यांच्या परवानगीनें श्रीमंत बाबासाहेब त्यांचें शव घेऊन त्याच रात्रीं भोरास आले, व दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुण्यांतील त्यांची सर्व आप्तमंडळी व स्नेही, अम्मलदार वगैरेंसह भोरास आली. ता. १८ रोजीं सकाळीं श्रीराममंडपांत जमलेल्या सर्व मंडळींसमोर श्रीमंत बाबासाहेबांच्या

आज्ञेनुसार राजश्री धायगुडे कारभारी यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं राज्य-कारभाराचीं सूत्रें हातीं घेतल्याचा जाहीरनामा वाचून दाखविला व तो पुढें प्रसिद्ध करण्यांत आला. तो खालीं लिहिल्याप्रमाणें :

## जाहीरनामा

स्वस्ति श्री शालिवाहन शके १८४४ दुंदुभिनाम संवत्सरे आषाढमासे कृष्णपक्षे नवम्यां तिथौ भौमवासरे तद्दिने श्रीमंत रघुनाथराव शंकरराव बाबासाहेब पंडित पंतसचिव संस्थानाधिपति भोर यांजकडून:—

या जाहीरनाम्याच्या द्वारें भोर संस्थानांतील आमच्या तमाम प्रजाजनांस जाहीर करण्यांत येतें कीं, आमचे परमप्रिय, परमपूज्य व प्रजावत्सल तीर्थरूप हिज हायनेस श्रीमंत शंकरराव चिमणाजी ऊर्फ रावसाहेब पंडित पंतसचिव हे काल रोजीं संध्याकाळीं ६ वाजतां पुणें मुक्कामीं कैलासवासी झाले. तीर्थरूपांच्या निधनाचा आमचेवर हा अत्यंत शोककारक प्रसंग गुदरला आहे. तथापि ज्याच्या इच्छेनें सर्व घडत आहे त्या जगन्नियंत्या परमेश्वराच्याच इच्छेनुरूप सांप्रत प्रसंगीं वागणें अवश्य झालें आहे. या दु:खद प्रसंगामुळें सर्व राज्यकारभार व प्रजाजनांचें यथायोग्य संरक्षण करण्याची जबाबदारी आमचेवर पडल्यामुळें आम्हीं सर्व राज्याधिकारसूत्रें लगेच हातीं घेतलीं असून राज्याचा पूर्ण अखत्यार घेतल्याचें आज म्हणजे आषाढ व॥ ९, शके १८४४, रोज मंगळवार, ता. १८ जुलै सन १९२२ इ. रोजीं जाहीर करीत आहोंत. धार्मिक कृत्य संपल्यावर समारंभ चालीप्रमाणें पुढें चालू होणार आहे.

आमची सर्व प्रजा सतत संतुष्ट राहून सुखी असावी व तिचे कल्याणांतच आमच्या राज्याची हरएक प्रकारें सदोदित भरभराट होत जावी अशी आमची उत्कट इच्छा आहे. हा आमचा हेतु परिपूर्ण करण्यास आमच्या पदरचे सर्व लहानथोर, दरकदार, आप्तेष्ट, मानकरी, इनामदार, कामगार आदिकरून अखिल प्रजानन शुद्ध अंत:करणपूर्वक मोठ्या राजनिष्ठेनें व आत्मीय भावनेनें आम्हांस साहाय्य करतील असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे, व आमच्या घराण्यांतील आजपर्यंतच्या परमपूज्य पुरुषांनीं ज्याप्रमाणें अहर्निश झटून प्रजाजनांचें कल्याण करून प्रेम संपादन केलें त्याचप्रमाणें वागण्याचा व ब्रिटिश साम्राज्याशीं आमचे संबंध पूर्ण सख्यत्वाचे व निष्ठेचे ठेवण्याचा आमचा दृढ निश्चय आहे.

आमचें पवित्र कर्तव्य पार पाडण्यास जगच्चालक प्रभू श्रीरामचंद्राचें साहाय्य मागून आमची कारकीर्द दीर्घकालपर्यंत प्रजाजनांस सर्व प्रकारें सुखकारक व्हावी अशी आम्ही त्याची अनन्यभावानें प्रार्थना करितों.

**रघुनाथराव बाबासाहेब पंडित पंतसचिव**
**संस्थानाधिपति, भोर**

ता. १८, माहे जुलै, सन १९२२ इसवी. भोर

हा जाहीरनामा काढल्याबद्दल गव्हर्मेन्टकडे तारेनें कळविण्यांत आलें. त्यास उत्तर म्हणून ता. १७ ऑगस्ट रोजीं पत्र आलें तें पुढें देण्यांत येणार आहे. जाहीरनामा वाचून दाखविल्यानंतर रावसाहेबांच्या शवाची दरबारी थाटाची मिरवणूक स्मशानापर्यंत काढण्यांत आली व त्यांना ११ तोफांची सलामी देऊन अग्निसंस्कार देण्याचा विधि करण्यांत आला.

## सार्वजनिक देणग्या

सन १९०७ ते १९२२ या १५ वर्षांत श्रीमंत बाबासाहेब यांनीं काटकसर करून आपल्या मर्यादित प्राप्तींतून पुढील महत्त्वाच्या देणग्या दिल्या.

रुपये

### सन १९०७

५० प्लेग रिलीफ फंड, पुणें, यास कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब यांच्या स्मरणार्थ मदत म्हणून दिले.

### सन १९०८

१०० सातारा येथील मि. आर्थरसाहेब यांच्या स्मारक-फंडास मदत.
१३८ हिंगणें येथील अनाथबालिकाश्रमास कै. श्री. सौ. गंगूताईसाहेब यांच्या स्मरणार्थ बक्षिस.
२५ चॅरिटेबल सोसायटी ऑफ सेन्ट व्हिन्सेन्ट डी. पॉल, पुणें.
३० पडघवली फायर रिलीफ सुधागड फंडास मदत.
१०० पुणें अनाथविद्यार्थिगृह.
२०० पुणें यंग क्रिकेटिअर्स क्लब (भाऊसाहेब विंचुरकर पॅव्हिलिअन फंड).
५० डेक्कन ॲग्रिकल्चरल सोसायटी, पुणें—वर्गणी देऊन लाइफ-मेंबर झाले.
४० महाराष्ट्र स्कूल आणि लायब्ररी, अजमीर.
१०० पुणें यंग क्रिकेटिअर्स क्लब-प्राइझ कप.

## सन १९१०

७५ वे. शा. सं. बाळकृष्ण पांडुरंग ठकार यांच्या चिपळूणकर आणि मंडळीस महाभारत ग्रंथाच्या प्रकाशनास.

९२ सांगली जिमखाना.

५० रानडे एकॉनॉमिक इन्स्टिटयूट, पुणें.

२५ डेक्कन जिमखाना, पुणें—शक्तीचे सामने.

५०० पुणें यंग क्रिकेटिअर्स क्लब ( टेनिस कोर्ट ).

६० पुणें हायस्कूल, पुअर बॉइज फंड, दरवर्षी, हायस्कूल बंद होईपर्यंत.

२५० डेक्कन जिमखाना, पुणें—लाइफ-मेंबर वर्गणी.

३० लेडी मूर-मॅकेन्झी पोर्ट्रेट-फंड.

## सन १९१२

२५० महाबळेश्वर हिंदु जिमखाना लाइफ-मेंबरशिपबद्दल.

## सन १९१३

१०० लॉर्ड सिडेनहॅम कॉलेज ऑफ कॉमर्स, मुंबई.

## सन १९१४

१००० इंपीरिअल इंडियन वॉर रिलीफ फंडास मदत.

## सन १९१५

३०० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, याच्या प्राथमिक खर्चाकरितां देणगी.

१२० श्रीराम-क्रीडाभुवनाची वार्षिक वर्गणी.

५० कँप एज्युकेशन सोसायटी, पुणें.

## सन १९१६

१०० मुंबई वॉर रिलीफ फंडाच्या स्त्री-शाखेस देणगी.

५० रामदास ऐक्यवर्धक क्लब लायब्ररी, शिरवळ.

५०० गांधर्व महाविद्यालय, मुंबई.

१२० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक वर्गणी.

## सन १९१७

६० वॉर रिलीफ फंडाच्या स्त्री-शाखेस मदत म्हणून ६० रु. किंमतीच्या चांदीच्या फ्रेम्स दोन कै. श्री. सौ. राणीसाहेब यांनीं दिल्या.

९० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, येथील टेनिस टूर्नामेन्टसमध्यें रु. ९० किंमतीचीं तीन बक्षिसें दिलीं.

१२० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक वर्गणी.

## सन १९१८

१५० श्रीमंत बाबासाहेब यांनीं आपल्या विद्यार्थिदशेंतील दिवसांची आठवण म्हणून डेक्कन कॉलेजच्या लायब्ररीकरितां एक ताजमहालचें मॉडेल नजर केलें.

१२० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक वर्गणी.

२३०० श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय, भोर, यास रु. २००० किमतीचीं पुस्तकें व रु. ३०० प्राथमिक खर्चाकरितां देणगी.

५० गणेश विष्णु चिपळूणकर आणि मंडळीचे चालक बाळकृष्ण पांडुरंग ठकार यांस संस्कृत ग्रंथांचें मराठी भाषेंत प्रकाशन करण्याचें काम हातीं घेतल्याबद्दल.

४५ श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक रिपोर्ट प्रसिद्ध करण्यांस.

५० इन्फ्ल्युएन्झा रिलीफ फंड : रु. ३० भोर; रु. २० शिरवळ.

५० पालीच्या लायब्ररीस मदत.

## सन १९१९

२५५ भारत इतिहास संशोधक मंडळाचे इमारत फंडास मदत.

५७ श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय यास भारत इतिहास संशोधक मंडळानें ऐतिहासिक पुस्तकांचा रु. ५७ किंमतीचा सेट दिला.

२५० भांडारकर ओरिएण्टल रीसर्च इन्स्टिटयूटला देणगी देऊन बेनिफॅक्टर झाले.

१०० हिंगणें येथील इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटी फंडास मदत.

१२० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक वर्गणी.

१०० श्री. सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय, भोर.

## सन १९२०

१०० नूतन मराठी विद्यालयांतील पास झालेल्या विद्यार्थ्यांस बक्षिस.

१२० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक वर्गणी.
१०० श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव वाचनालय, भोर.

## सन १९२१

१०१ मराठी ग्रंथालयाचे पेट्रन झाले.
२५० पुणें गायनसमाज.
१०१ पुणें सेवासदन देणगी.
७५ इंटर-कॉलेज स्पोर्ट्स् देणगी.
६० King Edward Memorial Hospital, Poona.
१२० श्रीराम-क्रीडाभुवन, भोर, वार्षिक वर्गणी.
१०० श्री. सौ. गंगुताईसाहेब पंतसचिव वाचनालय, भोर.

७३८४

## पहिल्या भागाचें समालोचन

श्रीमंत बाबासाहेबांना संस्थानचीं सूत्रें हातीं घेण्याची वेळ आली तेव्हां त्यांच्या वयाचीं ४३ वर्षें उलटून गेलीं होतीं. आयुष्याच्या त्रेचाळीस वर्षांचा काल म्हणजे ऐन उमेदीचा व कर्तबगारी करून दाखविण्याचा काल असतो. तो निघून गेला होता. हा काल त्यांनीं कशा रीतीनें घालविला हें आतांपर्यंत दिलेल्या माहितीवरून दिसून येणार आहे.

त्यांच्या बालपणचा विचार केला तर जन्मतःच त्यांची प्रकृति अशक्त असल्यामुळें वरचेवर त्यांना कांहीं ना कांहीं तरी दुखणीं येत. त्यामुळें आनंदी वृत्तीनें खेळण्याबागडण्यांत मुलांना जो हर्ष वाटत असतो तो त्यांच्या वांट्यास आला नाहीं. त्यांना समजूं लागल्यानंतर त्यांच्या प्रकृतींत थोडीथोडी सुधारणा होत गेली. वयाला १५ वर्षें होईपर्यंत त्यांचा काल भोरास गेला. या कालांत त्यांना वडील-मातोश्रींच्या बरोबर हिंदुस्थानांत प्रवास करण्याची संधि मिळाली; व या संधीमुळें त्यांच्या मनावर थोडाबहुत परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं. त्यांची अवलोकनशक्ति वयाच्या मानानें बऱ्यापैकीं असल्यानें त्यांनीं आपल्या प्रवासाची रोजनिशी लिहून ठेविली ती मागें देण्यांत आलीच आहे. भोरास असेपर्यंत श्रीमंत बाबासाहेब यांना त्यांचे शिष्य व हुजरे यांचाच सहवास असे. त्यामुळें त्यांच्या अंगीं दुसऱ्या चांगल्या नवीन संवयी जडण्यास

व असलेल्यांचा परिपोष होण्यासारखें वातावरणच तेथें नव्हतें. त्यांचा बहुतेक काल आपल्या धर्माचरणांत व क्षमाशील मातेच्या सान्निध्यांत गेला असल्यामुळें धर्मश्रद्धा, क्षमा, औदार्य इत्यादि गुणांचा त्यांच्या ठिकाणीं न कळत परिपोष होत होता व संधि आली असतां ते त्यांचे गुण प्रकट झाल्यावांचून राहत नसत. पुण्यास गेल्यावर तेथील हायस्कूलमधील त्यांच्या वयाचे व संवयीचे मित्र मिळाले व त्यांच्या सान्निध्यांत यांच्या अंगच्या गुणांची पूर्ण वाढ होण्यास योग्य अशी परिस्थिति प्राप्त झाली व एकलकोंडेपणा वगैरे दोष नाहींसे झाले. कॉलेजांत असतां त्यांनीं मोठमोठ्या विद्वान् लोकांचा परिचय करून घेतला. पोलिटिकल खात्यांतील अधिकाऱ्यांच्या भेटीचाहि प्रसंग येत असे. निर्मळ वर्तन, गोड स्वभाव, उदार बुद्धि, राजकुलास साजेशी सभ्य चालरीत, निगर्वीपणा इत्यादि त्यांच्या अंगच्या गुणांमुळें ते ब्रिटिश अधिकारीवर्गांत प्रिय झाले होते. त्यांचे वडील अत्यंत काटकसरी असून ते आपल्या मुलास चांगल्या रीतीनें वागवीत नाहींत व उभयतां पितापुत्रांत खर्चाच्या बाबतींत बेबनाव आहे, ही गोष्ट जगजाहीर झाली होती. श्रीमंत बाबासाहेब गरीब, भिडस्त व पापभीरु असल्यामुळें ते वडिलांचा जाच सहन करून मनांतल्या मनांत झुरत असतात, ही गोष्ट सर्व अधिकाऱ्यांना माहीत झाली असल्यामुळें त्यांच्याबद्दल सर्वांना सहानुभूति वाटत असे.

कॉलेज-शिक्षण पुरें करून एल्‌एल्‌.बी. होण्याची श्रीमंत बाबासाहेब यांची फार इच्छा होती. परंतु डोळे बिघडल्यामुळें त्यांना कॉलेज सोडावें लागलें. फार दिवस मनांत बाळगलेली इच्छा पुरी करण्याच्या मार्गांत विघ्न आल्यामुळें त्यांना अत्यंत वाईट वाटलें. कॉलेज कोर्स सोडावा लागला तरी कॉलेजांतील कायद्याच्या टर्म्स् ते भरीतच होते. History and Political Economy व Beacon's Advancement of Learning या विषयांसंबंधीं प्रो. बेन व प्रि. सेल्बी यांचीं व्याख्यानें ते ऐकत होते. सन १९०४ अखेर त्यांनीं कॉलेज सोडलें.

कॉलेज सोडल्यानंतर सुखानें राहतां यावें म्हणून त्यांना वार्षिक खर्चाची नेमणूक करून घ्यावी लागली.

नेमणूक करून घेतल्यानंतर श्रीमंत बाबासाहेब यांनीं आपला वेळ ऐषआरामांत न घालवितां खाजगी शिक्षक ठेवून १९०७ पर्यंत कायद्याचें

अध्ययन सुरू ठेविलें होतें. एक वर्ष मॅजिस्ट्रेटचें काम कसें चालतें हें पुण्याचे सिटी मॅजिस्ट्रेट मि. कार्व्हालो यांच्या कोर्टांत बसून पाहत होते. पूर्वतयारी म्हणून सन १९११ सालपर्यंत पांचसहा वर्षें त्यांनीं ऑनररी मॅजिस्ट्रेटचेंहि काम पुण्यांत केलें. शरीर निरोगी राहण्यास ज्याप्रमाणें व्यायाम त्याप्रमाणेंच मन शुद्ध व निर्दोष राहण्यास कांहीं तरी चांगल्या व्यवसायाची जरूर असते. “ An idle brain is Satan's work-shop.”—“ निरुद्योगी मन म्हणजे सैतानाचा कारखाना. ” असें होऊं नये म्हणून कोणत्याहि सत्कार्यांत ते आपल्या मनाला नेहमीं गुंतवीत असत.

सन १९०७ सालीं विलायतचा प्रवास करण्याचें त्यांच्या मनांत आलें. त्या वेळीं त्यांना मि. स्विफ्ट यांनीं राजपुत्राच्या दर्जास शोभेल अशा रीतीनें प्रवास करावयाचा झाल्यास एक लाख रुपये खर्च येईल असें त्यांना कळविलें. तेव्हां ‘ उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः ’ या न्यायानें त्यांनीं तो बेत रहित केला. पुढें मि. शेपर्ड सन १९१६ सालीं विलायतेस जाण्यापूर्वीं त्यांनीं पुन्हां तो बेत अमलांत आणण्याचें ठरवून आपली इच्छा वडिलांना कळविली. त्या वेळीं महायुद्ध जोरांत सुरू असल्यामुळें श्रीमंत रावसाहेबांना त्यांच्या बेतास मोडता घालण्यास चांगलीच संधि मिळाली. ते म्हणाले, “ प्रवासास जाण्यास परवानगी देण्यास हरकत नाहीं. पण वाटेनें सबमरीन्सचा (पाणबुड्या बोटींचा) संचार असल्यानें प्रवास धोक्याचा आहे. याकरितां पुढें युद्ध थांबल्यावर जातां येईल.” याप्रमाणें सांगून ‘ अशुभस्य कालहरणं ’ या न्यायानें त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांचें मन न दुखवितां ती वेळ मारून नेली.

श्रीमंत बाबासाहेब जरी ऑनररी मॅजिस्ट्रेटचें काम करीत होते तरी तें काम त्यांना पुरेसें वाटत नसे. फौजदारी कामाशिवाय इतर मुलकी, दिवाणी वगैरे कामांची माहिती तेथें मिळणारी नव्हती. संस्थानांतच कांहीं अधिकार मिळाला तर मन कामांत गुंतलेलें राहून चांगलें राहील, प्रकृति चांगली राहील व संस्थानांतील सर्व कामांची माहिती मिळेल, असें वाटून त्यांनीं आपली इच्छा सन १९०७ सालीं लॉर्ड लॅमिंग्टन यांच्या कारकीर्दींत श्रीमंत रावसाहेबांच्या कानांवर घातली व त्या वेळीं लॉर्ड लॅमिंग्टन एकाएकीं आकस्मिक कारणामुळें विलायतेस गेले नसते तर *त्यांना अधिकार मिळाले असते. पुढें पुष्कळ

वाटाघाटीनंतर त्यांना सन १९१३ सालीं शिरवळ तालुक्याचे असिस्टंट कलेक्टर व असिस्टंट जज्जाचे अधिकार मिळाले. त्या वेळीं आपण एक तरी तालुका नमुनेदार करून दाखवूं अशी त्यांना उमेद वाटत होती. कारण आपण अधिकारविरहित अधिकारी बनणार याची त्यांना प्रथम कल्पना आली नव्हती. एकदोन वर्षांत जेव्हां त्यांच्या अनुभवास आलें कीं, दिवाणी, फौजदारी कामांशिवाय आपणाला कोणतेहि अधिकार नाहींत, तेव्हां असला पोकळ अधिकार मिळाला नसता तरी बरें झालें असतें, असें त्यांना वाटूं लागलें. जमाबंदीनिमित्तानें ते तालुक्यांत फिरले त्या वेळीं लोकांची स्थिति काय आहे, त्यांच्या तक्रारी व अडचणी कोणत्या आहेत इत्यादि गोष्टी समजावून घेण्या-पलीकडे त्यांना कांहीं करतां येणें शक्य नव्हतें. दिवाणी अपिलांत रयतेला योग्य न्याय देण्याचें त्यांच्या हातांत होतें. तें काम मात्र त्यांनीं निःपक्षपातीपणानें आणि योग्य रीतीनें बजाविलें. त्यामुळें रयतेंत त्यांच्या न्यायप्रियतेची ख्याति झाली, व रयतेच्या मनांत त्यांच्याबद्दल आदर उत्पन्न होऊं लागला. मुलकी कामांत त्यांना कांहींच अधिकार ठेवले नव्हते. इतकेंच नव्हे, तर त्यांच्याकडे कोणतेंहि मुलकी काम जाऊं नये अशाबद्दल बंदोबस्त करण्यांत आला होता. शिरवळ येथें दवाखाना सुरू करण्याच्या कामीं व तेथील म्युनिसिपॅलिटींत कांहीं सुधारणा करण्याच्या कामीं त्यांच्या अंगच्या चिकाटीमुळें त्यांना श्रेय मिळालें. या दोन गोष्टींशिवाय रयतेच्या सुखसोयींच्या दृष्टीनें त्यांना तालुक्यांत कांहीं करतां आलें नाहीं. ते आपल्या वार्षिक रिपोर्टांत कांहीं शिफारसी करीत. त्याहि श्रीमंत रावसाहेबांना खपेनाशा झाल्या. तेव्हां शिफारशी करण्याचेंहि त्यांना बंद करावें लागलें. क्षुल्लक कारणावरून आपली मानखंडना होऊं नये व आपल्यामुळें वडिलांना त्रास होऊं नये म्हणून अधिकार सोडून तीर्थयात्रा करीत फिरण्याची आपली इच्छा असल्याचें श्रीमंत बाबासाहेबांनीं श्रीमंत रावसाहेबांना पत्रद्वारें कळविलेंहि होतें. शेवटीं राजीनामा देण्यापर्यंतहि पाळी आली होती. एकंदरींत अधिकारप्राप्ति सुखाला कारण न होतां मानसिक त्रास उत्पन्न होण्याला कारणीभूत झाली असेंच म्हणावें लागतें.

कौटुंबिक जीवनाविषयीं विचार केला तर तेंहि सुखमय होतें असें म्हणतां येत नाहीं. त्यांना आपल्या वडिलांच्या प्रेमाचा लाभ मिळाला नाहीं.

केवळ पैशामुळें प्रेमाऐवजीं ते आपल्या वडिलांच्या तिरस्कारास पात्र झाले होते. श्रीमंत बाबासाहेबांना मातृसुख मात्र पहिल्या प्रतीचें लाभलें होतें. मातृप्रेमाच्या जोरावरच त्यांना आपलें कष्टमय जीवित थोड्या तरी समाधानानें कंठितां आलें. सन १९०७ सालीं श्री. सौ. जिजीसाहेबांना प्लेगनें पछाडिलें, त्या वेळीं त्यांचें धाबें दणाणलें होतें. परंतु ईश्वरकृपेनें त्या त्यांतून निभावल्यामुळें त्यांचा आधार तुटला नाहीं.

वार्षिक खर्चाची नेमणूक करून घेतल्यावर ते व त्यांचें प्रथम कुटुंब श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब मोठ्या आनंदानें कालक्रमणा करूं लागले. आर्थिक पारतंत्र्य नाहींसें झाल्यामुळें उभयतांना आपल्या इच्छेप्रमाणें खर्च करतां येऊं लागला व त्यांचा संसार सुखांत चालला होता. परंतु हें सुखमय जीवन फार वर्षें टिकलें नाहीं. सन १९०७ सालीं त्यांच्या प्रिय पत्नी, एक कन्या व एक पुत्र मागें ठेवून दिवंगत झाल्या; संसाराची बसलेली घडी विस्कटली व श्रीमंत बाबासाहेब दुःखसागरांत हेलकावे खाऊं लागले. कालनियमानें कांहीं दिवसांनीं दुःखावेग कमी झाल्यावर त्यांनीं दुसरें लग्न करण्यास संमति दिली व सन १९०८ सालीं त्यांनीं दुसरें लग्न केलें. पहिल्या पत्नीची विस्मृति पाडण्यासारखी दुसरी सुशील पत्नी त्यांना सुदैवानें मिळाली, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय. दुसरें लग्न झाल्यावर एकच वर्ष सुखांत गेलें. सन १९१० सालीं श्रीमंत भाऊसाहेब आजारी पडल्यामुळें श्रीमंत बाबासाहेबांना सुमारें दोन वर्षें काळजींत काढावीं लागलीं. त्या वेळीं त्यांनीं पाण्यासारखा पैसा खर्च करून प्रयत्नांची जी पराकाष्ठा केली त्यामुळें त्यांचें पुत्रवात्सल्य उत्तम रीतीनें सर्वत्रांच्या निदर्शनास आलें. केलेल्या श्रमांचें चीज होऊन श्रीमंत भाऊसाहेबांचें गंडांतर टळलें, यामुळें त्यांना आनंद झाला. पुढें श्रीमंत भाऊसाहेबांचा व्रतबंध होऊन त्यांची भगिनी कुमारी श्रीमंत काशीताई-साहेब यांचा विवाहहि झाला. आपल्या कन्येस आपल्या योग्यतेचें स्थळ मिळालें नाहीं याबद्दल श्रीमंत बाबासाहेब यांना वाईट वाटत असे. तथापि त्यांतल्या त्यांत त्यांना समाधान वाटण्यासारखी गोष्ट म्हणजे तिच्या सासरचीं माणसें अत्यंत सालस, गरीब व प्रेमळ होतीं ही होय व अशीं माणसें मिळालीं असल्यामुळेंच श्रीमंत सौ. काशीताईसाहेबांनां आपल्या स्थितीबद्दल बिलकुल वाईट न वाटतां

चित्रांक ५३



हर हायनेस श्री. सौ. जिजीसाहेब, श्रीमंतांच्या मातोश्री. [ सं. पा. २२९

त्यांनींहि आपलें वर्तन आपल्या परिस्थितीला अनुरूप असें ठेवून सासरच्या सर्व मंडळींचें प्रेम संपादन केलें होतें. असलेल्या स्थितींत त्या सुखांत होत्या, हें पाहून श्रीमंत बाबासाहेबांना त्यांच्याबद्दल विशेष काळजी वाटत नव्हती.

सन १९१५ सालापासून श्रीमंत बाबासाहेबांच्यावर एकामागून एक दु:खाचे डोंगर कोसळण्यास सुरुवात झाली. सन १९१५ सालीं त्यांची लाडकी कन्या श्री. सौ. काशीताईसाहेब परलोकवासी झाल्या. पुढें सन १९१८ सालीं त्यांचे स्नेही व मेहुणे श्रीमंत भाऊसाहेब इन्फ्ल्युएन्झाच्या सांथीस बळी पडले व त्याच सालीं त्यांचे आप्त व साहाय्यकर्ते श्रीमंत बाळासाहेब गांडेकर दिवंगत झाले. श्रीमंत बाबासाहेबांचें द्वितीय कुटुंब श्रीमंत सौभाग्यवती लक्ष्मीबाईसाहेब यांना लग्न झाल्यावर दहा वर्षांनीं पहिलें अपत्य कन्यारत्न झालें होतें, तें एक वर्षाचें होऊन निवर्तलें. पुढें त्यांना पुत्ररत्न झालें तेंहि फार दिवस लाभलें नाहीं. सन १९२१ सालीं हें पुत्ररत्न कालवश झालें त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब व श्री. सौ. लक्ष्मीबाईसाहेब यांना नको हा संसार असें होऊन श्रीमंत बाबासाहेबांनीं आपल्या तालुक्याचा अधिकार कांहीं काल सोडून दिला. सन १९२२ सालीं फेब्रुवारी महिन्यांत श्रीमंत सौ. जिजीसाहेब कैलासवासी झाल्या, तेव्हां तर श्रीमंत बाबासाहेबांना आकाश फाटल्यासारखेंच झालें. प्रपंचांतील सुखदु:खाच्या गोष्टी सांगण्यास त्यांना जी एक जागा होती तीहि नाहींशी झाली. त्यांच्यावर एकामागून एक जी संकटपरंपरा येत गेली तीमुळें त्यांच्या प्रकृतीवरहि परिणाम होत गेला. श्रीमंत सौ. जिजीसाहेबांना जाऊन पांच महिने होतात तों श्रीमंत रावसाहेबांनींहि इहलोकची यात्रा संपविली व राज्यकारभाराची धुरा वाहण्याचें बिकट व जबाबदारीचें काम श्रीमंत बाबासाहेबांच्यावर येऊन पडलें. तालुक्याचे अधिकार मिळाल्यानें त्यांना सुख लागलें नाहीं, त्याचप्रमाणें कौटुंबिक सुखाचाहि त्यांना लाभ झाला नाहीं.

मनुष्यावर आपत्ती येऊं लागल्या म्हणजे त्याचें मन स्वाभाविकपणें परमार्थाकडे वळूं लागतें. प्रिय मातेच्या सहवासानें त्यांची वृत्ति लहानपणापासून धर्मप्रवण बनत चालली होती. धार्मिक ग्रंथवाचनाचा त्यांना नाद लागला होता. गीतेचें वाचन सुरू असे. लोकमान्य टिळकांचा गीतारहस्य ग्रंथ प्रसिद्ध होतांच तो त्यांनीं घेतला व त्याचें वाचन सुरू ठेविलें. हा ग्रंथ त्यांच्या

टेबलावर बहुधा असतोच. कोणत्याहि कारणानें चित्ताला व्यग्रता उत्पन्न होऊन हातपाय गळाले तर मनाला उत्तेजन देऊन कार्यप्रवृत्त करण्यास गीतारहस्या-सारखा दुसरा ग्रंथ नाहीं, असें ते नेहमीं म्हणत असतात. या एकट्या ग्रंथाचीं जर नेहमीं पारायणें केलीं तर चित्तस्वास्थ्य लाभून मनुष्य आनंदी वृत्तीनें प्राप्तकर्म करीत राहिलाच पाहिजे, असें त्यांचें मत आहे. अनेक अडचणींच्या वेळीं मन शांत ठेवण्यास हा ग्रंथ त्यांना फार उपयोगी पडत असे.

आर्थिक पारतंत्र्य दूर झाल्यावर श्रीमंत बाबासाहेबांनीं आपलें मन सार्वजनिक कार्यांत गुंतविलें, ही गोष्ट त्यांचें जीवन थोडें तरी सुखाचें होण्यास बऱ्याच अंशीं कारणीभूत झाली. पुण्यांत अशी एकहि संस्था नाहीं कीं जिच्याशीं त्यांचा कोणत्यातरी कारणानें संबंध येऊन त्यांनीं तिला सक्रिय सहानुभूति दाखविली नाहीं. कोणतेंहि लोकोपयोगी कार्य असो, त्यास थोडीफार मदत केल्यावांचून ते कधींहि राहत नसत. नूतन मराठी विद्या-लयाच्या माजी विद्यार्थिमंडळाच्या सभेच्या वेळीं ते अध्यक्ष होते. त्या वेळीं त्यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत सांगितलें कीं, "कोणींहि सार्वजनिक कार्याच्या वेळीं बोलाविलें असतां नाहीं म्हणावयाचें नाहीं असा आमचा निश्चय आहे." या निश्चयाप्रमाणेंच ते बहुतकरून वागत असत. भोर येथें श्रीराम क्रीडाभुवन व श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब वाचनालय या दोन संस्था स्थापून त्यांनीं भोर शहरवासीयांच्या नीरस जीवनांत उत्साह व नवचैतन्य उत्पन्न केलें. इन्फ्लु-एन्झाच्या सांथींत आरोग्यरक्षणार्थ त्यांनीं पुढाकार घेऊन भोरच्या तरुण पिढीस समाजसेवेची गोडी लाविली. ठराविक खर्चाच्या वार्षिक नेमणुकींतून काटकसर करून त्यांनीं किती संस्थांना मदत केली त्याची यादी मागें दिली आहे. ती पाहिली असतां प्रत्येक सार्वजनिक कामांत त्यांचा हुरूप, जिव्हाळा व तळमळ हीं दिसून येतात. वास्तविक पाहतां स्वतःच्या खर्चांत काटकसर करून अनेक संस्थांना मदत करण्याचें त्यांना कांहीं कारण नव्हतें. पण सामाजिक कार्यांत भाग घेण्याचें त्यांना व्यसनच जडल्यासारखें झालें होतें. बरेच धनिक लोक नाना प्रकारच्या दुर्व्यसनांच्या तावडींत सांपडून आपल्या जीविताची व शीलाची कशी राखरांगोळी करून घेतात हें पाहिलें म्हणजे श्रीमंत बाबासाहेबांनीं जो 'नाद लावून घेतला होता त्याबद्दल प्रत्येक जण

त्यांच्याबद्दल कौतुक व तारीफ केल्यावांचून राहील असें वाटत नाहीं. ते आपला काल विद्वत्समागमांत व सत्कार्यांत घालवीत होते, म्हणूनच कौटुंबिक स्थिति प्रतिकूल असतांहि त्यांना आपलें जीवित थोडें तरी सुखमय करून शीलसंरक्षण करतां आलें.

श्रीमंत बाबासाहेबांनीं उत्तर व दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास करून आपल्या ज्ञानांत भर घातली होती. बडोदें, म्हैसूरसारख्या पुढारलेल्या संस्थानांतील प्रगमनशील राज्यपद्धतींचें त्यांनीं सूक्ष्म रीतीनें अवलोकन केलें हें त्यांच्या भोर येथील ता. २८ मार्च १९२० च्या भाषणावरून समजून येणार आहे व तीं संस्थानें त्यांनीं पाहिलीं असल्यामुळें आपलें संस्थानहि वरील संस्थानांप्रमाणें नमुनेदार व्हावें असें त्यांना वाटत असे. दृष्टींतील संकोचितपणा नाहींसा होऊन ती विशाल झाली होती. "केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेंत संचार । शास्त्रग्रंथविलोकन मनुजा चातुर्य येतसे फार ॥" ही क्रमिक पुस्तकांतील आर्या त्यांनीं लहानपणीं पाठ केली होती. त्या वेळीं तिचें मर्म त्यांच्या लक्षांत येणें शक्य नव्हतें. आर्येंत वर्णिलेल्या सर्व गोष्टी मोठेपणीं त्यांच्याकडून घडत गेल्या व त्यामुळें त्यांच्या अंगीं बराच बहुश्रुतपणा व चातुर्य उत्पन्न झालें होतें.

महायुद्धामुळें देशांत जागृति उत्पन्न होऊन जी विचारक्रांति सुरू झाली होती तिच्याकडेहि त्यांनीं दुर्लक्ष केलें नाहीं. राष्ट्रांत जीं नवीन ध्येयें व नवीन आकांक्षा उदय पावत होत्या त्यांकडेहि त्यांचें लक्ष असे. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध होतांच तो त्यांनीं आस्थापूर्वक समग्र वाचून काढिला व त्यांत संस्थानिकांना उद्देशून लिहिलेला पुढील मजकूर त्यांनीं आपल्या नोट-बुकांत लिहून ठेवला होता. ते उतारे खालीं दिले आहेत :

"There is a stronger reason why the present stir in British India cannot be a matter of indifference to the Princes. Hopes and aspirations may overleap frontier lines like sparks across a street. There are in the native States men of like minds to those who have been active in spreading new ideas in India."

"We need not conceal our conviction that the processes at work in British India cannot leave the States untouched and must in time affect even those whose ideas and institutions are of the most conservative and feudal character."

लोकशाहीचे वारे वाहूं लागले होते. त्या सपाट्यांत राज्यपद्धति लोकमतानुवर्ती केल्याशिवाय एकतंत्री कारभाराचा टिकाव फार दिवस लागणार नाहीं, या गोष्टीची त्यांना जाणीव झाली होती. सुधागड तालुक्याच्या मानपत्रास त्यांनीं जें उत्तर दिलें त्यांत वरील उताऱ्यांच्या मथितार्थाचें व राष्ट्रांतील एकंदर परिस्थितीच्या अवलोकनाचें प्रतिबिंब पडलें नव्हतें असें कोण म्हणेल ? त्यांच्या त्या प्रगतिदर्शक भाषणाचा संस्थानी प्रजेच्या मनावर परिणाम होऊन तिला भावी सुखस्वप्नें पडूं लागलीं व सर्व जनता आशापूर्ण दृष्टीनें श्रीमंत बाबासाहेबांच्याकडे पाहूं लागली होती.

अधिकाराचीं सूत्रें हातीं घेण्याची पात्रता अंगीं येण्यास व श्रीमंत बाबासाहेबांच्या इच्छेप्रमाणें गोष्टी घडून येऊन त्यांना सुख वाटण्यास माजी गव्हर्नर्स लॉर्ड लॅमिंग्टन, लॉर्ड सिडेनहॅम, लॉर्ड विलिंग्डन व पोलिटिकल एजंटस् मि. कार्मायकेल, मि. शेपर्ड, मि. स्विफ्ट, मि. वेस्ट्रॉप व मि. हॅच या अधिकाऱ्यांची व त्याचप्रमाणें मि. मुल्लरसारख्या प्रोफेसरांची सहानुभूतीच कारणीभूत झाली होती, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं. वरील अधिकाऱ्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागण्याचें धोरण श्रीमंत रावसाहेब यांनीं ठेविलें होतें हीहि गोष्ट कमी महत्त्वाची मानतां येणार नाहीं. वरील अधिकाऱ्यांची व इतर थोर सद्गृहस्थांची सहानुभूति जर नसती तर श्रीमंत बाबासाहेबांच्या जीवनक्रमास कोणत्या प्रकारचें वळण लागलें असतें हें सांगतां येणें कठिण आहे. कांहीं तरी निराळा जीवनक्रम झाला असता ही गोष्ट मात्र निर्विवाद !

# परिशिष्ट क

श्री. बाबासाहेब यांच्या डायरींतील उतारा*

## वडील व मातोश्रींबरोबर पश्चिम व उत्तर हिंदुस्थानची यात्रा

### १८९०-१८९१

ता. १७ डिसेंबर सन १८९० इसवी. भोराहून महायात्रेस जाण्याकरितां पुण्यास गेलों.

ता. १८-१२-१८९० मुक्काम पुणें येथें. नातूंचें लग्न. त्याच बरोबर गाढवाचें चमत्कारिक लग्न झालें.

ता. २१ रोजीं बारा वाजतां आगगाडीनें सायंकाळीं सहा वाजतां मुंबईस आलों.

ता. २२ रोजीं शहर पाहिलें.

ता. २३ रोजीं रात्रीं ९ वाजतां गाडींतून ता. २५ रोजीं ११ वाजतां डाकूरास पोहोंचलों.

ता. २५-२६ रोजीं मुक्काम डाकूर. डाकुरजीचें दर्शन व पूजा केली.

ता. २७ रोजीं दिवसां बारा वाजतां डाकुराहून निघून अहमदाबादेस रात्रीं सहा वाजतां पोहोंचलों.

ता. २८ रोजीं अहमदाबाद शहर पाहिलें. एक मैलावर शहाआलम बादशहाची मशीद पाहिली. बाग व तेथील तळ्याचे मध्यावर बंगला पाहिला. शहर मोठें आहे. येथें रेशीमकाठी कापड चांगलें तयार होतें.

ता. २९ रोजीं सकाळीं ९ वाजतां निघून सायंकाळीं ९ वाजतां मुक्काम ढोला येथें पोहोंचलों.

ता. ३० रोजीं सायंकाळीं ५ वाजतां निघून सायंकाळीं ७ वाजतां पोरबंदर येथें पोहोंचलों.

ता. ३१ रोजीं मुक्काम पोरबंदर येथें शंकर पांडुरंग याची भेट झाली. ह्यांस इंग्रज सरकारनीं कारभारी नेमिलें.

ता. १ जानेवारी १८९१ इ. रोजीं पोरबंदराहून द्वारकेस जाणेकरितां निघालों. दोन प्रहरीं शिंगड्यास मुक्काम केला. तेथें एका देवालयांत राहिलों.

* ह्या व परिशिष्ट 'ख' मधील उतारा, श्रीमंत बाबासाहेब यांनीं वयाच्या १३ व्या वर्षी लिहिलेल्या डायरींतून घेतला आहे.

जागा मळीण होती. पाणी साधारण होतें. रात्रीं दुसरे ठिकाणीं तीन कोसांवर मुक्काम केला. तेथेंहि जागा साधारण होती.

ता. २ रोजीं पहाटेस निघून दोन प्रहरीं माटिया गांवीं मुक्कामास गेलों. तेथें जागा अगदीं खराब होती. दगडी धर्मशाळा असून तेथें अति केर वगैरे होता. तो मजुराकडून काढवून तेथें राहिलों.

ता. ३ रोजीं पहाटेस एक वाजतां निघालों. वाटेंत रेती व रण लागलें. कांहीं गाड्या रणांतून गेल्या व कांहीं बाजूनें गेल्या. द्वारकेच्या अलीकडे दोन कोसांवर दोन प्रहरीं राहून सायंकाळीं पांच वाजतां द्वारकेस गेलों. पोरबंदराहून द्वारकेस येईपर्यंत वाटेनें आमचे हाल फार झाले. तेथें शिरवळचा रघुनाथराव हा होता. त्यानें गायकवाडचे हुकुमानें व्यवस्था फार चांगली ठेवली. तेथें गेल्यावर श्रीकृष्णाचें दर्शन घेतलें. तें देवालय चांगलें असून अती उंच आहे. हवा फार चांगली आहे. समुद्र फार नजीक आहे.

ता. ४ जानेवारी रोजीं मुक्काम द्वारका. गोमतीचें स्नान. देवदर्शन घेऊन रात्रीं अकरा वाजतां गाडींत बसून बेटावर जाण्याकरितां निघालों. पांच वाजतां समुद्रकांठीं धक्क्यानजीक बंगला आहे तेथें आलों.

ता. ५ रोजीं पडावांत बसून बेटावर ९ वाजतां पोहोंचलों. धक्क्यानजीक एक चमत्कारिक किडा नजरेस पडला. दोन प्रहरीं देवदर्शन केलें. मध्यभागीं श्रीकृष्णाचें मंदिर असून बाजूनें अष्टनायकांचीं वगैरे मंदिरें आहेत. एकंदर देव १८ आहेत.

ता. ६ रोजीं सकाळीं दर्शन करून रात्रीं ७ वाजतां जहाजांत बसून निघालों. वाटेंत जहाज एका खडकावर लागलें. कारण भरती आली नव्हती. यामुळें तें फुटेल कीं काय अशी भीति खलाशांस वाटली. परंतु चंद्रोदयास भरती येऊन तें लवकरच धक्क्यावर लागलें. नंतर गाडींत बसून द्वारकेस आलों.

ता. ७ रोजीं द्वारकेस पहाटे चार वाजतां आलों. रघुनाथराव मुन्सफ शिरवळकर यानें आमची व्यवस्था फार चांगली ठेविली. हा स्वभावानें फार उत्तम व हुषार आहे. रात्रीं दहा वाजतां तेथून निघालों.

ता. ९ रोजीं आठ वाजतां शिंगड्यावर जेवण करून रात्रीं १२ वाजतां पोरबंदरावर आलों.

ता. १० रोजीं पोरबंदर येथें आलों तों आमचे बरोबरचा काशिनाथ जवळ याचा गाडींतून पडून पाय मोडला. तो तेथील दवाखान्यांत राहिला. शंकर पांडुरंग यांनीं संस्थानची व्यवस्था चांगले प्रकारची ठेविली.

ता. ११ रोजीं सकाळीं सहा वाजतां निघालों. वाटेंत जुनागड शहर लागलें. काठेवाड प्रांतांत या शहरासारखी हवा कोठें नाहीं. स्टेशनासभोंवतीं बाग चांगली आहे. प्रदेश चांगला, सुपीक आहे. हें शहर डोंगराचे पायथ्याशीं दक्षिणोत्तर लांबट पसरलें आहे. गांवाभोंवतीं तट असून आंतील इमारती व देवालयें फार चांगलीं दिसलीं. हें संस्थान ४० लक्षांचें आहे. सायंकाळीं साडे-पांच वाजतां वेरवळ स्टेशनावर उतरून सहा वाजतां सोमनाथास आलों.

ता. १२ रोजीं सोमनाथाचें दर्शन. तेथें गायकवाडचा सुभेदार होता. देवळाचे बाहेरील अंगास एक चौक आहे. देवळांत गेल्यावर डावे अंगचे दाराचे मागें जिना आहे. त्या वाटेनें भुयारांत शंकराचें स्थान आहे. देवाची पिंडी सुमारें दीड हात उंच आहे. पार्वतीची मूर्ति आहे. जुनें देवालय समुद्र-कांठीं पडीक आहे. गांवाभोंवतीं दोन खंदक आहेत व दगडाची भिंत आहे. पूर्वी महंमदानें याजवर स्वारी केली.

ता. १३ रोजीं तेथील मामलेदारानें पानसुपारी केली आणि ३ बुकें नजर केलीं.

ता. १४ रोजीं पहाटेस पांच वाजतां निघून सायंकाळीं सहा वाजतां ढोल्यास पोहोंचलों.

ता. १५ ढोल्याहून ११ वाजतां निघून अहमदाबादेस सायंकाळीं पोहोंचलों.

ता. १६ रोजीं अहमदाबादेस मुक्काम.

ता. १७ रोजीं सकाळीं नानासाहेब विंचुरकर भेटले, व ते बरोबर यात्रेस आले. दोन प्रहरीं पावणे तीन वाजतां निघून रात्रीं सात वाजतां सिद-पुरास पोहोंचलों. तेथें सन्मान चांगल्या प्रकारचा झाला. सरस्वती नदीचे कांठीं बंगला पाहिला होता. तो सोयीस्कर होता.

ता. १८–१९ मुक्काम सिदपूर. सरस्वती नदीचें पाणी बर्फाप्रमाणें गार लागत असे. तेथून पुढें थंडी लागूं लागली. नंतर एक मैलावर मात्र गयेचे

तीर्थांत स्नान केलें. तीर्थांचीं नांवें—१ ज्ञानवापी, २ अल्पा सरोवर, ३ बिंदु-सरोवर. नंतर सायंकाळीं सिदपुरास आलों.

ता. २० रोजीं सायंकाळीं सात वाजतां गाडींत बसून ता. २१ रोजीं १२ वाजतां अजमिरास आलों.

ता. २१ मुक्काम अजमीर. तेथील वस्ती पातळ असून अफाट आहे. शहर डोंगराचे पायथ्याशीं आहे. तेथें सागर नांवाचें सरोवर फार मोठें आहे. तेथील हवा थंड होती. अन्य जातीचे लोक फार. तेथें लोंकरीच्या धाबळ्या, कापूर यांचा व्यापार फार आहे. केशरी व लाल असे दोन बाग पाहिले. शहाजहान बादशहाची मशीद पाहण्यालायक आहे. दरोज्यावर सोन्याचा मुलामा आहे. कठड्यास रुप्याचा पत्रा आहे. रेल्वे कंपनीचा मोठा कारखाना आहे. भाषा हिंदुस्थानी.

ता. २२ रोजीं अजमीरचे पश्चिमेस ३ कोसांवर पुष्कर तीर्थ आहे. तेथें गेलों. तेथील हवा फार थंड होती. पुष्कर तीर्थाचें स्नान केलें. मुख्य ब्रह्मदेव, गायत्री हीं स्थानें आहेत. शिवाय पुष्कळ मोठमोठीं देवालयें आहेत.

ता. २३ रोजीं पुष्कराहून अजमिरास आलों.

ता. २४ रोजीं बारा वाजतां अजमिराहून निघून पांच वाजतां जय-पुरास पोहोंचलों.

ता. २५ रोजीं जयपूर शहर पाहिलें. बाग दोन मैलांचा असून अति उत्तम आहे. नाना प्रकारचीं जनावरें, पक्षी, वाघ, सिंह, अस्वल व शहामृग वगैरे आहेत. बागेचें नांव रामविलास.

बागेंत एक बंगला पाहण्यासारखा आहे. अनेक पदार्थांचें प्रदर्शन व पूर्वींचे राजांच्या तसबिरी ओळीनें आहेत. शहरची रचना फार चांगली आहे. चार गाड्या सारख्या ओळीनें जातील इतकी रुंदी सडकेची आहे. शिवाय चार मोठमोठे रस्ते आहेत. सडकेच्या दोन्ही बाजूंस पांच हात रुंदीची फरशी आहे. इमारती एकसारख्या रंगाच्या आहेत. रस्ते अगदीं सरळ आहेत. ह्यासारखें शहर हिंदुस्थानांत नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. शहरांत वाफेचे दिवे व नळाचें पाणी. बाजूस एक लहानसा किल्ला आहे. शहराचे मध्यावर वाडा राजाचा आहे. तो राजा रजपूत आहे. हें संस्थान दोन कोर्टांचें आहे.

राजवाड्याला तीन दरवाजे आहेत. प्रथमचा दरवाजा पितळेचा आहे. वाडा पाहण्यास राजाचे परवानगीचा पास काढावा लागतो. आम्ही आंत गेलों नाहीं, परंतु एकंदर वाडा एक मैलाचा असून फार चांगला आहे. नजीक घोड्यांची पागा आहे. तेथील घोडे पेगू, अरबी, काठेवाडी वगैरे प्रसिद्ध ठिकाणचे असून व्यवस्था अति उत्तम होती. दोन घोडे विलायतेहून आणले असून ते फार उंच असून चलाख होते. शहरांतील इमारती दगडी असून चार मजली उंच व प्रत्येक इमारतीवर गच्ची-चुनेगच्ची असे. संगमरवरी दगडांचीं व इतर दगडांचीं चित्रें फार चांगलीं होतीं. सर्व शहराभोंवतीं दगडी तट व शहरांत जाणेकरितां चार दरवाजे होते. एकंदर शहर पाहण्यासारखें आहे.

ता. २६ रोजीं पांच वाजतां गाडींत बसून ता. २७ रोजीं सकाळीं आग्र्यास पोहोंचलों.

ता. २७ रोजीं दोन प्रहरीं शहर पाहिलें. शहाजहान बादशहानें बांधिलेला संगमरवरी दगडांचा ताजमहाल पाहिला. तो यमुनेच्या कांठीं एक मैलावर आहे. ती इमारत फार मोठी असून फार खर्चाची आहे. मध्यभागीं घुमट असून त्यांत बादशहाचें व त्याच्या राणीचें कब्हर आहे. तें संगमरवरी दगडाचें असून मध्यें अनेक रंगांचे दगडाचे केले आहेत, ते हिऱ्याप्रमाणें चकाकतात. चार बाजूंस उंच मनोरे आहेत, याच्या पायऱ्या १५९ आहेत भोंवतीं चांगली बाग आहे. तीन दरवाजे आहेत. नंतर शहर पाहिलें. पुण्या-एवढी वस्ती आहे. सतरंज्या चांगल्या होतात.

ता. २८ किल्ला पाहून प्रयागास गेलों.

ता. २९ सकाळीं सात वाजतां प्रयागास पोहोंचलों. भोराहून आलेली मंडळी भेटली. त्रिवेणीचें स्नान व क्षौर केलें.

ता. ३० रोजीं प्रयागचा किल्ला पाहिला. वट दर्शन घेऊन यमुनेच्या पलीकडे दीड कोसांवर सोमेश्वराचे दर्शनास गेलों. रात्र झाली. काळोख पडला. वाट फार वाईट. तुरीचीं पिकें फार उंच. यामुळें फार त्रास झाला. रात्रीं ९ वाजतां प्रयागास आलों.

ता. ३१ रोजीं दिनकरराव राजवाडे भेटीकरितां आले. सभा होऊन ब्राह्मणांस संभावना झाली.

ता. १ फेब्रुवारी १८९१ इ. सात वाजतां गाडींतून विंध्याचलास उतरलों. तेथून तीन वाजतां निघून बनारस येथें रात्रीं नऊ वाजतां पोहोंचलों. मोगलसराईहून कांहीं मंडळी गयेस गेली. काशीस पंचगंगेच्या घाटावर फडणीस यांचे वाड्यांत उतरलों.

ता. २ रोजीं दोन प्रहरीं विश्वेश्वराचें दर्शन घेऊन काळभैरव, अन्नपूर्णा वगैरे देवांचीं दर्शनें घेतलीं. रस्ते बहुतकरून बोळाचे, फरसबंदी, दोन हात रुंदीचे होते. गाड्या वगैरे जाण्याची एक मोठी पेठ होती.

ता. ३-४ रोजीं घाटावर स्नान केलें. पंचगंगेच्या घाटावर बिंदु-माधवाचें स्थान असून नजीक दोन मनोरे उंच आहेत. पेशव्यांचा घाट, शिंद्यांचा घाट, मनकर्णिकेचा घाट वगैरे घाट आहेत. भागीरथीचें पाणी शांत होतें व फार खोल होतें. पाणी चांगलें होतें.

ता. ५-६ रोजीं सोवळे गऊबाईचें दर्शन घेऊन परत आलों. तों आमचे मंडळींपैकीं ३-४ इसम कॉलऱ्यानें आजारी झाल्याची बातमी ऐकली.

ता. ७ रोजीं नारू माळी उपद्रवानें मृत्यु पावला.

ता. ८ रोजीं ती. मा. आईसाहेबांची रुप्याची तुळा झाली. साडेचार हजार रुपये वजनांत मावले व नित्य यात्रा, देवदर्शन वगैरे केलीं. श्रीकाशी-विश्वेश्वराचे देवालयांत लिंगें फार व देवाचें शिखर हें सुवर्णाचें आहे. घरीं आलों तों विठू भेलके, आमचा हुजऱ्या, उपद्रवानें आजारी पडून रात्रीं बारा वाजतां मृत्यु पावला. तो स्वभावानें फार चांगला व भरंवशीक होता. तेणेंकरून आम्हांस फार वाईट वाटलें.

ता. ९ रोजीं उपद्रव फार झाल्यामुळें सकाळीं बारा वाजतां निघून सहा वाजतां अयोध्येस पोहोंचलों.

ता. १० रोजीं श्रीरामाचें दर्शन घेतलें. हनुमान् टेकडीवर मारुतीचें स्थान पाहण्यासारखें आहे. शहरांत माकडांचा उपद्रव होता. पिंजऱ्यांत एक अजगर फार मोठें होतें. शरयू नदीचें पात्र एक मैल रुंदीचें असून बारा महिने नावा चालतात. तेथून चारपांच कोसांवर फैजाबाद शहर फार मोठें आहे असें सांगतात.

ता. ११ रोजीं सायंकाळीं सहा वाजतां आगगाडींत बसलों.

ता. १२ रोजीं एक वाजतां हरिद्वारास पोहोंचलों. तेथील हवा थंड आहे. तिन्ही बाजूंस डोंगर आहेत. भागीरथीचे पाण्यास उतार असल्यामुळें अति वेगानें धावतें. पाणी अतिशय स्वच्छ असून गोडी फार चांगली. असें पाणी कधीं आमचे नजरेस आलें नाहीं. पात्र लहान आहे.

ता. १३, १४ रोजीं देवांचीं दर्शनें केलीं. शहर चांगलें आहे. काश्मिरी कापड चांगलें मिळतें. देवाच्या मूर्ती चांगल्या होतात. आबा खोपडा आजारी पडला. त्याजपाशीं तीन इसम ठेविले. माकडाचा उपद्रव होता.

ता. १५ रोजीं गाडींतून अंबाल्यास आलों.

ता. १६ रोजीं पहाटेस तीन वाजतां अंबाल्यास पोहोंचलों. तेथून दोन कोस लष्करची छावणी आहे. तेथून घोड्याची गाडी, तांगे, बैलगाड्या करून रात्रीं कुरुक्षेत्रास आलों.

ता. १७ रोजीं दहा वाजतां कुरुक्षेत्रास आलों. तेथील पाणी वाईट.

ता. १८ रोजीं देवदर्शन घेतलें. एकंदर चाळीस कोसांचें जंगल. सर्व झाडें पळसाचीं. ३६० तीर्थें आहेत. कौरवपांडवांची लढाई झाली तेव्हांची ही रणभूमि आहे. भीष्म शरपंजरीं पडले तें स्थान आहे.

ता. १९ रोजीं परत अंबाल्यास आलों. हवा फार थंड होती.

ता. २० रोजीं आगगाडींतून दिल्लीस आलों.

ता. २१ रोजीं पहाटेस चार वाजतां दिल्लीस पोहोंचलों. दिल्ली शहर मोठें आहे. जुम्मा मशीद पाहण्यासारखी आहे. दोन मनोरे आहेत. किल्ला पाहण्यासारखा आहे. परंतु पाहण्यांत आला नाहीं. जरीकाठी कापड चांगलें होतें. पायांतील जरीचे कलाबतूचे जोडे चांगले होतात. शालजोड्या चांगल्या होतात. पुण्याप्रमाणें सर्व जातींची फळफळावळ मिळते.

ता. २२ रोजीं दहा वाजतां गाडींतून रात्रीं सहा वाजतां मथुरेस पोहोंचलों.

ता. २३ रोजीं दोनप्रहरीं वृंदावनास गेलों. कृष्णानीं रासक्रीडा येथें केली. गोपींचीं चित्रें देवालयावर सर्व बाजूंस संगमरवरी दगडांचीं आहेत, आणि संगमरवरी दगडांचे खांब वेलासारखे आहेत. ज्या मनुष्यानें देवालय बांधलें आहे त्याचें चित्र काढलें आहे. माकडें फार आहेत. परत मथुरेस आलों.

ता. २४ रोजीं दोनप्रहरीं गोकुळास गेलों. तेथील रेती फार मऊ असे. श्रीकृष्ण यांनीं लहानपणीं येथें खेळ केले. पुन्हां मुक्कामास मथुरेस आलों. शहर फार मोठें आहे. येथें दुधाचे पदार्थ फार चांगले होतात. मथुरेस पेढे फार चांगले होतात. माकडांचा उपद्रव फार आहे. यमुनेंत कासवें फार आहेत. यमुनेचा पूल फार मोठा आहे.

ता. २५ रोजीं आगगाडींतून बसून आग्र्यास आलों. भोजन करून पांच वाजतां गाडींत बसून निघालों. ता. २६ रोजीं सकाळीं दहा वाजतां इटारशीवर आलों. तेथून थंडी कमी झाली. तेथें आमचे मंडळींची खानेसुमारी झाली. रात्रीं आमचे मंडळींपैकीं एका मुलीस व एका शिपायास एक मोठा विंचू चावला, तेणेंकरून आम्हांस झोंप आली नाहीं.

ता. २७ रोजीं परत हुसंगाबादेस नर्मदेचे स्नानास गेलों. भोजन करून सकाळचे साडेदहा वाजतां आगगाडींतून नाशिकास जाण्याकरितां निघालों.

ता. २८ रोजीं पहाटेस एक वाजतां नाशिकावर आलों. वाटेनें सात-पुड्याचें जंगल फार मोठें लागलें. पंचवटीस उतरलों होतों.

ता. १ मार्च १८९१ इसवी देवदर्शन व गोदावरीचें स्नान केलें. तेथें पितळेचीं भांडीं चांगलीं होतात. नदीचे दोन्ही अंगांस घाट असून घाटावर भांड्यांचीं दुकानें आहेत, तेणेंकरून शोभा फार चांगली दिसते. स्टेशनापासून गांव फार लांब असल्यामुळें ट्रामवेची सडक तयार केली—पांच तारखेस गव्हर्नर-साहेब यांचे हस्तें ट्रामवे सुरू करावयाची होती. नानासाहेब तेथें राहिले.

ता. २ मार्च सन १८९१ रोजीं रात्रीं भोजन करून बारा वाजतां निघालों आणि स्टेशनवर आलों. दोन वाजतां आगगाडींतून सायंकाळीं पांच वाजतां कल्याणास पोहोंचलों. रात्रीं अकरा वाजतां गाडींत बसलों.

ता. ३ मार्च रोजीं सकाळीं सहा वाजतां पुण्यास सुखरूप पोहोंचलों. एकंदर प्रवासानें मंडळी फार थकून गेली.

ता. ४, ५, ६ रोजीं विश्रांति घेण्यास पुण्यास मुक्काम केला.

ता. ६ रोजीं दोनप्रहरीं मंडळींची रवानगी करून ता. ७ मार्च रोजीं पहाटे तीन वाजतां निघून भौरास सकाळीं ९ वाजतां पोहोंचलों.

# परिशिष्ट ख

## श्री. बाबासाहेब यांच्या डायरींतील उतारा

## वडील व मातोश्रींबरोबर गोकर्णयात्रा, सन १८९१ इ.

ता. ५-११-१८९१ या दिवशीं दुपारीं आम्ही भोराहून निघालों आणि संध्याकाळीं लोणंदेस पोहोंचलों, आणि त्याच रात्रीं बारा वाजतां आगगाडींत बसलों.

ता. ६-११-१८९१ या दिवशीं सकाळीं दहा वाजतां गोकाकास पोहोंचलों. संध्याकाळीं तेथें गेल्यावर धबधबा पाहिला. तेथील तारेचा पूल लपलप हालत होता. गोकाकचीं चित्रें बरीं होतीं.

ता. ७-११-१८९१ या दिवशीं साडेदहा वाजतां गोकाकहून निघालों आणि बारा वाजतां बेळगांवास पोहोंचलों व संध्याकाळीं किल्ला पाहावयास गेलों. तो भुईकोट असून बरा होता. नंतर शहापुरास गेलों. बेळगांवापासून शहापूर अर्धा मैल आहे. शहापुरास व्यापार चांगला चालतो आणि तें सांगली-करांच्या ताब्यांत आहे.

ता. ९-११-१८९१ या दिवशीं बेळगांवाहून पावणेबारा वाजतां निघालों आणि सहा वाजतां हुबळीच्या स्टेशनवर उतरलों. तेथें सातभाई होते. त्यांनीं चांगली व्यवस्था केली. स्टेशनपासून हुबळी शहर एक मैल आहे. हुबळीस एक मोठा तलाव आहे. आम्ही ज्या वाड्यांत उतरलों होतों तो चांगला होता.

ता. ९-११-१८९१ या दिवशीं चार वाजतां हुबळीहून बैलगाडींतून निघालों. आमच्याबरोबर ४६ गाड्या होत्या. आम्ही साडेनऊ वाजतां कलघटगी मुक्कामीं पोहोंचलों. तेथील मामलेदार सडकेपर्यंत आले होते.

ता. १०-११-१८९१ या दिवशीं बारा वाजतां कलघटगीहून निघालों आणि सहा वाजतां किरवतीस आलों. तेथें जेवण करून गाडींत बसलों आणि रात्रीं एक वाजतां एल्लापुरास पोहोंचलों.

ता. ११-११-१८९१ रोजीं एल्लापुरास मुक्काम केला. जेवण वगैरे करून दोन वाजतां निघालों. तों अरबेल घाट लागला. घाटमाथ्यावर नारळीचीं

झाडें फार आहेत. वेलदोड्यांचीं झाडें हळदीचे झाडांप्रमाणें होतीं. तीं गार छायेस येतात. शिवाय घाटाची शोभा फार चांगली दिसत होती. सडकेच्या दोन्ही अंगांस दाट व उंच १५० फूट उंचीचे वृक्ष होते, आणि ते सरळ आणि उंच असे होते. एकंदर घाट सहासात मैल उतार होता. घाटाचे उतरणीवर वेताचीं झाडें फार आहेत.

ता. १२-११-१८९१ रोजीं अरबेलास पोहोंचलों. तेथें मारुतीचे देवाल्यांत उतरलों. नजीक युरोपिअन लोकांकरितां बंगला तयार केला होता, व दक्षिणेस ओढा होता. त्याचें पाणी दिसण्यांत फार चांगलें, परंतु तिकडील पाण्यांत बचनाग असल्यामुळें पाणी विकार करतें. दोनप्रहरीं दोन वाजतां निघून रात्रीं दहा वाजतां सुंगसाळ गांवीं पोहोंचलों.

ता. १३-११-१८९१ रोजीं सुंगसाळ येथें जेवण करून दोन वाजतां निघून रात्रीं दहा वाजतां अंकोलें मुक्कामीं पोहोंचलों. तेथें एका देवालयाचे-जवळ धर्मशाळा आहे तेथें उतरलों.

ता. १४-११-१८९१ अंकोल्यास जेवण करून निघालों. तेथें गारुड्याचा खेळ केला. देवाचा उत्साह झाला व तुळशीचीं लग्नें झालीं. ११ वाजतां निघालों. दोन वाजतां खाडीनजीक आलों. तेथें दोन नावा होत्या. सर्व गाड्या रात्रीं बारा वाजतां उतरल्या. सर्व मंडळी पहाटेस गोकर्णास पोहोंचली. आम्ही गोकर्णास सहा वाजतां आलों.

ता. १५-११-१८९१ रोजीं देवाचें दर्शन. कोटितीर्थाचें स्नान केलें. ज्या वाड्यांत आम्ही उतरलों होतों तो वाडा चांगला होता. गांवची वस्ती कोंकणपद्धतीवर होती.

ता. १६-११-१८९१ रोजीं रात्रीं साडेतीन वाजतां ग्रहण लागलें आणि सात वाजतां सुटलें. आम्ही चार वाजतां समुद्रकिनाऱ्यावर गेलों. किनाऱ्यावर उजेडाकरितां कंदील लावले होते. स्नान करून आम्ही घरीं आलों. येथें लांकडी चंदनाचीं कोरीव चित्रें चांगलीं होतात. दोनप्रहरीं देवाची पालखी गांवाबाहेर वनभोजनास गेली. रात्रीं आठ वाजतां परत आलों. समारंभ चांगला होता. सर्व देवालयांत दीपोत्सव केला. पालखीबरोबर ब्राह्मण वेद म्हणत होते. पुढें देवास वाहिलेल्या भाविणी नाच करीत होत्या. देवाची

पूजा व नैवेद्य तिन्ही वेळ होत असे. श्रीगोकर्णेश्वराची पालखी सर्व रुप्याची असे. पालखी देवालयांत गेल्यावर रथोत्सव झाला. दोन रथ आहेत, एक लहान आणि एक मोठा. लहान रथ प्रत्येक पौर्णिमेस आणि अमावास्येस निघत असतो. मोठा रथ महाशिवरात्रीचे दिवशीं मात्र निघत असतो. मध्यंतरीं रथ काढणें झाल्यास १०० रुपये कराबद्दल द्यावे लागतात.

ता. १७-११-१८९१ रोजीं एका सावकारानें रथ काढला. ते दिवशीं समारंभ साधारण होता. देवदर्शनाबद्दल दर इसमास एक आणा कर एक वेळ द्यावा लागतो.

ता. १८-११-१८९१ रोजीं आम्हीं १०० रुपये देऊन रथोत्सव केला. दारू वगैरे रोषणाई चांगली होती.

ता. १९-११-१८९१ रोजीं एक वाजतां निघालों. गंगावळी नामक खाडी उतरून रात्रीं ९ वाजतां अंकोल्यास आलों.

ता. २०-११-१८९१ रोजीं अंकोल्याहून निघालों.

ता. २१-११-१८९१ रोजीं सकाळीं साडेसात वाजतां सुंगसाळास पोहोंचलों. तेथें वेताच्या काठ्या व वेताच्या करंड्या वगैरे पुष्कळ लोकांनीं घेतल्या. रात्रीं बारा वाजतां निघालों.

ता. २२-११-१८९१ रोजीं सकाळीं अरबेलास पोहोंचलों. रात्रीं बारा वाजतां निघून येल्लापुरास घाट चढून आलों.

ता. २३-११-१८९१ रोजीं येल्लापुरास सकाळीं सहा वाजतां पोहोंचलों. दोनप्रहरीं पांच वाजतां तेथील लायब्ररींत गेलों. आमचा मान फार चांगला ठेवला. तेथें मिरें व वेलदोडे पिकतात. एक झाड बरोबर आणलें. रात्रीं ९ वाजतां निघालों.

ता. २४-११-१८९१ रोजीं ७ वाजतां कलघटगीस पोहोंचलों. तेथेंहि मामलेदारकचेरीस पानसुपारीकरितां गेलों. रात्रीं ९ वाजतां निघालों.

ता. २५-११-१८९१ रोजीं सकाळीं सात वाजतां धारवाडास पोहोंचलों. दोनप्रहरीं शहर पाहिलें. इंग्रजी व मराठी शाळेंत गेलों. व्यवस्था चांगली आहे. सातव्या इयत्तेपर्यंत अभ्यास चालतात. दरएक शाळेस पंचवीस रुपयेप्रमाणें दिले. नंतर शहर पाहिलें. वस्ती मोठी आहे. परंतु पाणी मात्र कमी आहे. सदर्न मराठा रेल्वेचें मुख्य ऑफिस आहे.

ता. २६-११-१८९१ रोजीं मुलींच्या शाळेंत गेलों. मुली कशिदा चांगला काढतात. तेथें पंचवीस रुपये दिले. नंतर संस्कृत शाळेंत गेलों. तेथेंहि व्यवस्था चांगली होती. त्यास पन्नास रुपये दिले. नंतर लायब्ररींत गेलों. तेथें पंचवीस रुपये दिले. नंतर कांहीं ठिकाणीं जाऊन घरीं आलों. वाडा बरा होता. नजीक एक उत्तम विहीर व धर्मशाळा होती. तेथें मंडळी उतरली होती.

ता. २५ रोजीं रात्रीं त्रावणकोरच्या एका इसमाचा खेळ केला. सायं-काळीं साडेपांच वाजतां आगगाडीनें निघून रात्रीं साडेअकरा वाजतां हरीहर येथें पोहोंचलों. कांहीं मंडळी हुबळीहून हॉसपेटास रवाना केली.

ता. २७-११-१८९१ इ. मुक्काम हरीहर. तुंगभद्रेचें स्नान केलें. हरीहराचें दर्शन घेतलें.

ता. २८-११-१८९१ रोजीं साडेदहा वाजतां गाडींत बसून साडे-अकरा वाजतां राणेब्बेन्नुरास उतरलों.

ता. २९-११-१८९१ रोजीं पहाटेस पावणेपांच वाजतां निघून पावणे-नऊ वाजतां कुंदगोळास पोहोंचलों. स्टेशनवर रोषणाई फारच चांगली केली होती. एक दिल्लीदरवाजा तयार केला होता. स्टेशननजीक धर्मशाळा होती तेथें आम्ही राहिलों. भोजनोत्तर मामलेदारकचेरी, कोर्ट वगैरे पाहून सायंकाळीं तीन वाजतां निघालों. हा गांव जमखिंडीकरांच्या ताब्यांत असून सातभाई मामलेदार आहेत. तेथें पाणी फार कमी होतें. सातभाई हुबळीपर्यंत आले होते. पांच वाजतां हुबळीस पोहोंचलों. तेथून आगगाडीनें रात्रीं बारा वाजतां हॉसपेटास उतरलों. नंतर बैलगाडीनें सहा मैल हंपी आहे तेथें गेलों.

ता. ३०-११-१८९१ मुक्काम हंपी विरूपाक्ष. येथें सकाळीं सहा वाजतां पोहोंचलों. ज्या देवालयांत आम्ही उतरलों त्यास दोन चौक असून देवालय फार मोठें व दगडी आहे. देवाचें नांव पंपापती. तुंगभद्रेच्या कालव्याचें पाणी बाहेरील चौकांत पाटानें आणलें होतें. तुंगभद्रेंत खडक फार आहेत व पाणी नजीकच आहे. दोन मोठीं गोपुरें आहेत. सर्व प्रदेश डोंगराळ असून मोठमोठे दगडाचे ढीग केल्याप्रमाणें डोंगर होते. जागोजाग मोठमोठ्या दगडी इमारती होत्या. अर्ध्या मैलावर तुंगभद्रेच्या कांठीं श्रीरामाच्या मूर्ती आहेत. चक्रतीर्थ आहे. मोगलांनीं कांहीं मूर्ती फोडल्या आहेत. वानरें व माकडें फार आहेत.

ता. १ माहे डिसेंबर सन १८९१ मु. हंपी. दोनप्रहरीं पंपा सरोवर पाहण्यास गेलों. हंपीपासून ४ मैलांवर आहे. सरोवरानजीक अंजनी पर्वत आहे. तेथें मारुतीचें स्थान आहे. रस्ता फार वाईट आहे. ही सुग्रीवाची किष्किंधा असें म्हणतात. देवास बारा हजारांचें उत्पन्न आहे.

ता. २-१२-१८९१ रोजीं हंपीहून पहाटेस निघून सकाळीं सात वाजतां हॉसपेटास पोहोंचलों. आम्ही मामलेदार यांच्या घरीं राहिलों, व मंडळी धर्मशाळेंत राहिली. तेथें पहारेकरी, जामदारखाना व बाया सर्व तेथें ठेवून कार्तिकस्वामी बारा कोस आहे, तेथें जाण्यास रात्रीं साडेदहा वाजतां निघालों. बैलगाड्या होत्या. रस्ता खराब होता. वाटेंत नरसू दीक्षित गाडी-खालीं सांपडून त्याचा हात मोडला.

ता. ३-१२-१८९१ सकाळीं साडेसहा वाजतां सोंडूर येथें पोहोंचलों. तेथील राजा विठ्ठलराव घोरपडे घोड्याचे गाडींत बसून सामोरे आले. आम्ही देवालयांत उतरलों. त्या राजास एक लक्षाची जहागीर आहे. फांशी देण्याचा अधिकारहि आहे. कारभारी युरोपिअन आहे. व्यवस्था फार चांगली आहे.

ता. ४-१२-१८९१ रोजीं पहाटे लोहाचळ पर्वतावर गेलों. तेथें कार्तिकस्वामीचें स्थान आहे. सोंडूरच्या राजानें एक मेणा व पांच घोडीं दिलीं होतीं. डोंगरचढाव सुमारें दीड मैल आहे. माथ्यावर कार्तिकस्वामीचें स्थान आहे. पूर्वेस तळें आहे. पार्वती, कार्तिकस्वामी, शंकर अशीं तीन देवालयें आहेत. तळ्यानजीक श्रीलक्ष्मीनारायण व एक ऋषि अशीं लहान देवालयें आहेत. तेथील हवा फार थंड. पाणी फारच गार आहे. कार्तिकस्वामीची मूर्ति फारच उत्तम आहे. नेहमीं पडदा लाविलेला असतो. कार्तिकी पौर्णिमेस तिसरे वर्षी मोठी यात्रा भरते. देवदर्शन, पूजन आणि भोजन करून सायंकाळीं सहा वाजतां सोंडुरास आलों.

ता. ५-१२-१८९१ रोजीं विठ्ठलराव घोरपडे यांनीं मेजवानीबद्दल सामान दिलें. जेवण करून दोन वाजतां निघालों तों रात्रीं १० वाजतां हॉस-पेटास पोहोंचलों.

ता. ६-१२-१८९१ हॉसपेटास जेवण करून दोन वाजतां गाडींत बसून रात्रीं दहा वाजतां गदग येथें पोहोंचलों. धर्मशाळेंत उतरलों. गांवांत

पानसुपारीस गेलों. तेथें चांगला सन्मान झाला. पहाटेस तीन वाजतां गाडींत बसून बारा वाजतां विजापूर येथें पोहोंचलों. भोजन झाल्यावर सर्व शहर पाहिलें. शहरची वस्ती फार ओसाड, भयंकर अशी आहे. दगडाची भिंत शहरच्या भोंवतीं आहे. गांवांत जागोजागीं आड आहेत. परंतु पाणी चांगलें नाहीं. तोफा जुनाट बऱ्याच आहेत. एक तोफ पंधरा हात लांबीची आहे ती पाहण्यासारखी आहे. शिवाय दगडी इमारती फार चांगल्या आहेत. गोलघुमटची इमारतहि फार उंच असून प्रतिध्वनि सात आठ वेळ होत असतो. ही इमारत स्टेशनच्या नजीक आहे. शिवाय जुम्मा मशीद वगैरे इमारती फार चांगल्या आहेत. येथें सुगंधी पदार्थ चांगले होतात.

ता. ८-१२-१८९१ दिवसा बारा वाजतां विजापुराहून निघालों. पांच वाजतां हुटगीस पोहोंचलों. बोजे सामानाचा डबा तेथेंच दोन दिवस राहिले. तेथून बैलगाडीनें सहा वाजतां निघून रात्रीं बारा वाजतां मुक्काम पुणें येथें पोहोंचलों. तेथें सर्व आजारी असल्यामुळें २०-२५ दिवस मुक्काम केला. पुढें जानेवारी सन १८९२ रोजीं भोरास सुखरूप पोहोंचलों.

## परिशिष्ट ग

### श्रीमंत बाबासाहेब यांचा १९०९ सालचा उत्तर हिंदुस्थानांतील प्रवास

श्रीमंत बाबासाहेब आपल्या नूतन पत्नीसह ता. २१ फेब्रुवारी सन १९०९ इ. रोजीं पुण्याहून निघून मुंबईस गेले. या प्रवासांत त्यांनीं आपल्याबरोबर आपले स्नेही श्रीयुत दादासाहेब कुमठेकर यांनाहि घेतलें होतें. मुंबईहून प्रथम ते बडोद्यास गेले. तेथें श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराज यांचे ते खास पाहुणे म्हणून राहिले होते. श्रीमंत सयाजीरावमहाराज भोरास आले होते त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेबांचा त्यांच्याशीं चांगला परिचय होऊन श्रीमंत सयाजीरावांनीं त्यांना त्याच वेळीं बडोद्यास येण्याचें निमंत्रण दिलें होतें. श्रीमंत बाबासाहेबांना बडोद्यास असतांना परकेपणा मुळींच न वाटतां तेथें ते अगदीं घरच्याप्रमाणें राहिले होते. श्रीमंत सयाजीरावांनीं त्यांना कोणत्याहि बाबतींत यत्किंचित्हि न्यूनता पडूं दिली नाहीं. श्रीमंत बाबासाहेबांनीं तेथील सर्व प्रेक्षणीय स्थळें, अनेक लोकोपयोगी संस्था व शिक्षणसंस्था पाहिल्या.

चित्रांक ५४



श्रीमंत बाबासाहेबांचा १९०९ सालच्या प्रवासांत अहमदाबाद येथें घेतलेला फोटो; मागें नारायण जगदाळे हुजरे उभा आहे.

[ सं. पा. २५७

येथील मुक्कामांत रा. शंकर कृष्ण पुराणिक ( श्रीमंत बाबासाहेब यांच्या श्वसुरांचे चुलते ) यांचा बराच उपयोग झाला. बडोद्याहून निघते वेळीं श्रीमंत सयाजीरावमहाराजांनीं त्यांना बहुमोल पोषाख अर्पण करून प्रेमाचा निरोप दिला.

बडोदा येथें श्रीमंत बाबासाहेब यांचा ता. २२ फेब्रुवारी ते ता. १ मार्चपर्यंत म्हणजे सुमारें एक आठवडा मुक्काम झाला, व तेथील मुक्कामांत नजरबागवाडा, त्यांतील जवाहीरखाना, तोफखाना व त्यांतील सोन्या-चांदीच्या तोफा, सार्वजनिक बाग, मकरपुरा राजवाडा, बडोद्यापासून बारा मैलांवर असलेला आजवा तलाव, मुलींची शाळा, लक्ष्मीविलास राजवाडा, मुलांची शाळा, कॉलेज, तुरुंग, हत्तीखाना, वगैरे प्रेक्षणीय स्थळें पाहून ते बडोद्याहून निघून अहमदाबादेस गेले.

अहमदाबाद येथें ता. १ ते ५ पर्यंत मुक्काम केला. वरील मुक्कामांत तेथील हत्तीसिंग देऊळ, शाही बाग, शहा आलमची कबर, कंकेरिया तलाव, त्यांतील नगीना उद्यान, व घंटामंडळ घाट, साखरेज, झुलते मनोरे, हीं प्रेक्षणीय व मनोवेधक स्थळें पाहून बरोबरच्या मंडळींसह श्रीमंत बाबासाहेब अबूचा पहाड पाहण्यास गेले.

अबूचे पहाडावर ता. ५ ते १० पर्यंत मुक्काम केला. त्या अवधींत तेथील सनसेट पॉइंट, दिलवाडा देवळें, आदिनाथ व नेमिनाथ या नांवचीं व दुसरीं तीन देवळें, ननरॉक, नखी तलाव, गोमुख व वसिष्ठाश्रम, अनाद्रा पॉइंट, अर्बुदा देवी, हीं प्रेक्षणीय स्थळें व सृष्टिसौन्दर्यानें युक्त अशीं अनेक रम्य ठिकाणें पाहिलीं. तेथील सृष्टिसौन्दर्य फार उत्कृष्ट आहे. अबूचा पहाड पाहणें झाल्यावर ता. १० रोजीं निघून श्रीमंत बाबासाहेब अजमिरास आले.

अजमीर येथें ता. १४ पर्यंत तीनचार दिवस मुक्काम केला. या मुक्कामांत अनासागर तलाव, अजमीरपासून सात मैलांवर असलेलें पुष्कर तीर्थ, मेयो कॉलेज, खाजा पीर अगर साधू चिस्ती याची कबर, अढाई दिनका झोपडा नांवाचें मंदिर, वगैरे उत्कृष्ट स्थळें पाहून त्यांनीं जयपुरास जाण्याकरितां अजमीर सोडलें.

ता. १४ रोजीं दुपारीं बारा वाजतां ते जयपुरास पोहोंचले. तेथें १८ तारखेपर्यंत चार दिवस मुक्काम केला. या मुक्कामांत श्रीमंत बाबासाहेब यांनीं

जयपूर शहरांतील रामनिवास उपवन, अल्बर्ट म्यूझियम ऊर्फ अजबखाना, चंद्रमहाल राजवाडा, जंतरमंतर ऊर्फ वेधशाळा, पागा, जयपूरहून ६ मैल लांबीवर असलेली अंबर नांवाची प्राचीन राजधानी, तेथील राजवाडा, दिवाण-ई-आम, जैनांचें देऊळ, गल्ता ऊर्फ गालव्य ऋषीचा आश्रम ( हा जयपुराहून सुमारें पांच मैल लांब आहे ), स्कूल ऑफ आर्ट, लायब्ररी, महाराजा कॉलेज, गणेशमंदिर इत्यादि ठिकाणें पाहून झाल्यावर ते भरतपुरास जाण्यास निघाले.

ता. १९ रोजीं भरतपुरास पहाटे पांच वाजतां श्रीमंत बाबासाहेब पोहोंचले. भरतपूर स्टेशनवर भरतपूरचे दिवाण व रेव्हिन्यू मेंबर रा. ब. गोविंदराव खांडेकर आले होते. तेथें दोन मुक्काम केले. त्या अवधींत कोठी, खास राजवाडा, मोती झील नांवाचें अतिथिगृह, चार बाग, क्ष किरणांची नवीन पद्धतीवर सोय केलेलें हॉस्पिटल व शिकार करण्याच्या जागा प्रामुख्यानें पाहण्यांत आल्या; व नंतर आग्र्यास जाण्यास त्यांनीं भरतपूर सोडलें.

ता. २० मार्च रोजीं ४-३० वाजतां श्रीमंत बाबासाहेब आग्रा येथें पोहोंचले. तेथें लाला जयकिसनदास यांच्या बालनिवास या बंगल्यांत ते उतरले होते. तेथें एकंदर ता. २४ पर्यंत चार दिवस मुक्काम केला. आग्रा येथें त्यांनीं आग्रा फोर्ट, मोती मशीद, मीना बाजार, दिवाण-इ-आम, मच्छी भवन, चितोर गेट, नवीना मशीद, हमामशाही दिवाण-ई-खास, मीना मशीद अगर स्वर्गीय मशीद, जस्मिन अगर सुमन बुरूज, किल्ल्यांतील अंगुरी बाग, शिशमहाल ऊर्फ ऐनेमहाल, खासमहाल ऊर्फ आरामगड, जामे मशीद, हमिमद्दौल्याची कबर, ताजमहाल, आग्र्यापासून सुमारें २२ मैलांवर असलेला फत्तेपूर-शिक्री हा गांव, तेथील राजवाडा, त्यांतील दिवाण-ई-खास, दर्गा मशीद, दप्तरखाना, जोधबाईचा वाडा, मरियाम कोठी अथवा सोनेरी मकाण, हरण मिनार, तुर्की राणीचें स्नानगृह, बिरबल व अबुलफजलचीं वसतिस्थानें, टांकसाळ, खजिना इत्यादि इतिहासप्रसिद्ध स्थळें पाहून आग्र्यास परत आले. दुसऱ्या दिवशीं आग्र्याहून पांचसहा मैलांवर असलेलें शिकंदरा नांवाचें ठिकाण पाहण्यास गेले. तेथें अकबर बादशहाची छत्री, डॉ. ई. एच. हँकीन यांचें प्रयोगालय, वगैरे स्थळें पाहिलीं व मथुरेस जाण्याकरितां आग्रा सोडला.

मथुरा येथें ता. २५ रोजीं पोंचले. तेथें भरतपूर महाराजांचे बंगल्यांत राहिले होते. रा. ब. खांडेकर यांच्या मदतीनें हा बंगला मिळाला. मथुरेंतील महावन, तेथील नंदाचा वाडा, एक मैलावर असलेलें गोकुळ, पुराणवस्तुसंग्रहालय ( Archæological Museum ), मथुरेहून आठ मैल असलेलें वृंदावन, तेथील गोविंद देव, गोपीनाथ, रंगजी, मदन मोहन, राधारमण, शिव-बन्सीधर, शिंदे सरकारचें देऊळ, शहाजीका मंदीर, मथुरेंतील यमुनेचा विश्रामघाट वगैरे स्थळें पाहून सिमल्यास जाण्याकरितां मथुरा शहर सोडलें.

ता. ३० रोजीं श्रीमंत बाबासाहेब व सर्व मंडळी सिमला येथें पोंचली. तेथें पतियाळाचे महाराजांच्या स्किप्टन व्हिला नांवाच्या बंगल्यांत मुक्काम केला.

सिमला येथें छोटा सिमला, अननडेल, गव्हर्मेन्ट हाउस, बोलाई-गंज, जॅक्को नांवाचें डोंगराचें शिखर, व सृष्टिसौंदर्यानें परिपूर्ण अशीं अनेक प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं.

ता. ५ एप्रिल रोजीं सिमल्याहून निघून ता. ७ रोजीं बनारस येथें पोंचले. तेथें कै. श्रीमंत रावसाहेब यांनीं शितळाघाटावर बांधलेल्या शिवा-शंकरेश्वर भोरकर मंदिर या नांवानें प्रसिद्ध असलेल्या स्वतःच्या देवळांत राहिले. काशी येथें तीन मुक्काम केले. येथें विश्वेश्वराचें व काळभैरवाचें देऊळ, मणकर्णिका घाट, कंपनीचा बाग, वगैरे स्थळें पाहून पुढील मुक्काम अयोध्येस केला.

अयोध्या येथें शरयूचे कांठीं श्रीगोरारामाचे देवळांत एक दिवस मुक्काम करून तेथील देवळें, श्रीरामचंद्राच्या वाड्याच्या पडीक भागाचे अवशेष, कुशानें स्थापन केलेलें शिवलिंग वगैरे पाहून श्रीमंत बाबासाहेब परत काशी येथें आले.

काशी येथें शिष्ट-संभावना, ब्राह्मणभोजन वगैरे करून काशीचा मुक्काम संपवून श्रीमंत बाबासाहेब भोरास परत येण्यास निघाले. भोरास येतांना वाटेंत मनमाड येथें कै. श्रीमंत बाळासाहेब विंचुरकर यांचेकडे एक दिवस राहून दुसरे दिवशीं सकाळीं पुण्यास आले, व ता. १८ रोजीं सकाळीं भोरास येऊन दाखल झाले.

प्रवासाहून परत आल्यानंतर पुढील मंडळींस गंगाप्रसाद पाठविण्यांत आला.

बडोदें

१ श्रीमंत चिंतामणराव ऊर्फ भाऊसाहेब मुजुमदार.

१ रा. शंकरराव कृष्ण काठेवाड दिवाणजी.

१ रा. शंकरराव कृष्ण पुराणिक.

१ रा. आचार्य वकील.

१ रा. बळवंतराव पुराणिक.

१ रा. गणेश भास्कर साने, वकील.

१ रा. रंगोपंत हरी कोठावळे.

१ रा. चिपळुणकर, वकील.

अहमदाबाद

१ रा. पाटील, वकील.

१ रा. सीताराम बाळकृष्ण करंदीकर.

१ अहमदाबाद येथील बंगल्याचे मालक.

अजमीर

१ रा. गणेश रामचंद्र ऊर्फ काकासाहेब खांडेकर.

१ रा. रघुनाथ भिमाजी फाटक.

भरतपूर

१ दि. ब. गोविंद रामचंद्र खांडेकर.

आग्रा

१ लाला जयकिसनदास.

मथुरा

१ पंडित राधाकृष्ण.

१ भरतपूर दरबार वकील.

अबू

१ शंकरराव बळवंत केळकर.

जयपूर

१ विश्वेश्वरशास्त्री द्रवीड.

सिमला

१ पतियाळा दरबार वकील.

१ शेट खेमराज श्रीकृष्णदास.
१ शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी.
१ श्रीमंत शिवदेवराव ऊर्फ भाऊसाहेब विंचुरकर.
१ श्रीमंत बाबासाहेब चांदवडकर.
१ श्री. विसूभाऊ साळवेकर, सरदारगृह मॅनेजर.
१ डॉ. लक्ष्मण नीलकण्ठ पुरोहित.

पुणें

१ रा. वासुदेव गोपाळ पुराणिक.
१ रा. ब. महादेव केशव ऊर्फ तात्यासाहेब कुमठेकर.
१ रा. कोंडो महादेव ऊर्फ दादासाहेब कुमठेकर.
१ श्री. सरदार गणपतराव ऊर्फ बाळासाहेब दामोदरराव पानसे.
१ श्रीमंत श्रीधर विठ्ठल ऊर्फ बाळासाहेब नातू.
१ रा. विठ्ठल नारायण करंदीकर.

सातारा

१ रा. ब. दत्तात्रय बळवंत ऊर्फ बापूसाहेब पारसनीस.
१ रा. गंगाधर बल्लाळ लेले, मास्तर, फलटण.
१ रा. ब. नारायण गणेश देशपांडे, शिरवळ.

वरील सर्व मंडळींना गंगाप्रसाद म्हणून व इतर सर्व नोकरवर्गास बक्षिस आणि श्रीक्षेत्र काशी व इतर तीर्थांचे ठिकाणीं भिक्षुकमंडळींना दक्षिणा दिली.

या प्रवासांत त्यांची प्रकृति उत्तम राहिली होती. यामुळें त्यांचे दिवस मोठ्या आनंदांत व मजेंत जाऊन त्यांचा पुष्कळ थोर लोकांशीं परिचय झाला.

श्रीमंत बाबासाहेब यांनीं हिंदुस्थानांतील पहिली सफर व दुसरी सफर हीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं असून पुढील सफरींचींहि पुस्तकें ते प्रसिद्ध करीत आहेत, यामुळें त्यांच्या हिंदुस्थानांतील सफरींची विस्तृत माहिती येथें दिली नाहीं.

या प्रवासाहून परत आल्यावर श्रीमंत बाबासाहेबांनीं प्रवासांत ज्या ज्या ठिकाणीं मुक्काम केला होता त्या त्या ठिकाणीं ज्यांचेकडून त्यांना मदत झाली होती त्या त्या ठिकाणीं मुद्दाम मनुष्य पाठवून तेथील मंडळीस तसेंच आजपर्यंत उपयोगी पडलेल्या मित्रमंडळीस गंगाप्रसाद वगैरे देणग्या देऊन आपली कृतज्ञताबुद्धि व्यक्त केली होती. त्यांच्या अंगचा हा थोरपणा पाहून तेथील मंडळीच्या मनांतहि त्यांचेबद्दल आदरभाव उत्पन्न झाल्यावांचून राहिला नाहीं. या प्रवासाचे खर्चाचा त्यांचा जो ताळेबंद तयार झाला होता त्यांत कोणते ठिकाणीं कोणास काय देणगी दिली तें नमूद केलें आहे. त्या ताळेबंदांतील देणगीचा उतारा वर आला आहे, त्यावरून त्यांची आपल्या नांवलौकिकास साजेल अशा रीतीनें पहिल्यापासून सढळ हातानें खर्च करण्याची त्यांची प्रवृत्ति दिसून येते.

## परिशिष्ट घ

### उत्तर हिंदुस्थानचा प्रवास, सन १९११–१२

१९११ च्या डिसेंबरमध्यें दिल्ली येथें राज्यारोहणाचा दरबार व त्यासंबंधीं सर्व कार्यक्रम संपल्यानंतर ता. १८ डिसेंबर रोजीं दिल्लीहून निघून श्रीमंत बाबासाहेब हरिद्वारला गेले. ता. १९ रोजीं तेथील गंगाद्वार, शंकराचार्यांचा मठ, भीमगोडा व सर्वनाथ हीं स्थळें पाहिलीं. ता. २० रोजीं गंगास्नान केलें, कनखल तीर्थ व दक्षेश्वर आणि सत्यनारायण यांचीं देवालयें पाहून देवदर्शन केलें. ता. २१ रोजीं डेहराडून येथें गेले. हरिद्वारपासून रेल्वेंत बरोबर इचलकरंजीचे चीफसाहेब श्री. नारायणराव ऊर्फ बाबासाहेब हे होते. डेहराडूनपासून ६ मैलांवर असलेल्या राजपुर नांवाच्या गांवीं श्री. बाबासाहेब गेले. तेथून मसुरीला चढून जावें लागतें. चढ ७२०० फूट आहे व राजपुरपासून ६ मैल लांब आहे. वरची हवा फार थंड असून देखावा मनोहर वाटला. तेथून परत डेहराडूनला येऊन हरिद्वारला ते १० वाजतां आले, व लखनौला दुसऱ्या दिवशीं सकाळीं आले. लखनौ येथें केसरबाग, बारादरी, सादतअल्लीखानाचें व त्याच्या स्त्रीचें थडगें, अजबखाना, डॉ. फॅराचें थडगें व मशीद, असफउद्दौल्याचा इमामबारा,

चित्रांक ५६



दिवाण-इ- समधील नक्षीकाम किल्ला.

स. पा. २६२

लायब्ररी, चित्रसंग्रहालय, हुसेनाबाद इमामबारा ( महमदअल्लीशहानें बांधलेला ), मच्छीभवन, छत्रमंझील, सादतअल्लीखानानें बांधलेली मोती मशीद इत्यादि स्थळें पाहिलीं. तेथून ते कानपूरला गेले. कानपूर येथें वेणीमाधव धर्मशाळेंत राहिले. रविवारची सुट्टी असल्यामुळें कांहीं पाहतां आलें नाहीं. दुसरे दिवशीं सतीचौरा घाट पाहून अलाहाबादेस गेले. होळकर कोठींत मुक्काम केला. अलाहाबाद येथें आल्फ्रेड पार्क, कंपनी गार्डन, म्युनी कॉलेज, अलाहाबादचा किल्ला, अकबराचा जुना वाडा, अशोकाचा स्तंभ, खुश्रूबाग, इत्यादि स्थळें पाहिलीं. येथें श्री. भाऊसाहेब विंचुरकर व रा. नरहरपंत आंबेकर हे बी. ए. ची परीक्षा पास झाल्याचें समजलें. झांशीला जाण्याचें ठरलें होतें, परंतु तेथें प्लेग असल्याचें समजलें म्हणून झांशीला गेले नाहींत. ता. २८ रोजीं यांनीं अलाहाबाद सोडलें व काशीस गेले. काशी येथें सेंट्रल हिंदु कॉलेज पाहिलें. ॲनी बेझंट यांच्या Ideals of Theosophy या विषयावरील व्याख्यानास श्री. बाबासाहेब गेले होते. विश्वेश्वर, दुर्गादेवी, धुंडीराज, भद्रकाळी, कालभैरव, अन्नपूर्णा, दंडपाणी इत्यादि देवतांचें दर्शन घेतलें. ता. ३१ डिसेंबर रोजीं बोटींत बसून जलविहार केला व शितळाघाट, ब्रह्मघाट, दुर्गाघाट, पंचगंगाघाट, जलसाईघाट अथवा Burning ghat, मनकर्णिकाघाट, दशाश्वमेधघाट, ज्ञानमंदिर अथवा Observatory, हरिश्चंद्रघाट, आशीघाट, नळघाट, पंचगंगाघाट इत्यादि घाट पाहिले. शिवाशंकरेश्वराचें पूजन केलें. दुपारीं ६ मैलांवर असलेले सारनाथ येथील बौद्धकालीन अवशेष पाहण्यास श्री. बाबासाहेब गेले होते. तेथें बुद्धाचा, अशोकाचा आणि जयतसिंगाच असे स्तूप पाहिले. कांहीं अवशेष इ. स. पूर्व २०० वर्षांचे आहेत. येतांना पंचक्रोशीचा कांहीं भाग पाहिला. वाटेनें दुतर्फा झाडें लाविलेलीं असून मधून मधून धर्मशाळा, विहिरी, देवालयें आहेत. बिंदुमाधवाचें दर्शन घेतलें. ता. १ जानेवारी १९१२ रोजीं श्री. बाबासाहेबांनीं काशी सोडली, व भोपाळला गेले. भोपाळ येथें बेगमसाहेबांचे पाहुणे म्हणून राहिले होते. ता. २ रोजीं त्यांची राज्यमंझीलमध्यें भेट झाली. भोपाळ येथील अर्सेनल, सिटाडेल, जामा मशीद, इंपीरिअल सर्व्हिस ट्रुप्स, इत्यादि पाहिलीं, ता. ४ रोजीं सांची येथें बुद्धाचे स्तूप पाहण्यास गेले होते. मोठ्या स्तूपाचें चैत्यगिरि असें नांव आहे. श्री. बाबासाहेब सांचीहून भोपाळ

येथें परत येऊन रेल्वेनें निघून मनमाडला गेले. श्रीमंतांच्या मामी व भाऊसाहेब हे विंचुर येथें होते, त्यांच्या भेटीस ते स्वत: विंचूरला गेले व बरोबरील कांहीं मंडळी भोरास पाठविली. विंचूर येथें एक दिवस मुक्काम करून ता. ८ रोजीं मुंबईस गेले. मुंबई येथें या वेळीं प्रदर्शन चालू होतें तें पाहिलें. ता. ११ जानेवारी रोजीं पुण्यास येऊन सायंकाळीं भोर येथें येऊन सुखरूप पोंचले.

## परिशिष्ट ङ

## निजामच्या राज्यांत प्रवास, सन १९१२–१३

श्रीमंत बाबासाहेबांनीं १९१२ सालच्या डिसेंबर महिन्यांत निजामांच्या राज्यांत प्रवास करून त्या राज्यांतील प्रेक्षणीय स्थळें व शहरें पाहिलीं.

प्रवासास जाण्याकरितां ता. २२ डिसेंबर रोजीं ते पुण्याहून निघाले. कल्याण स्टेशनवर मनमाड एक्स्प्रेसमध्यें बसून त्या दिवशीं रात्रीं मनमाडास पोहोंचले, सरदार विंचुरकर यांच्या वाड्यांत मुक्काम केला. हैद्राबादेस जाण्यापूर्वी विनायकशास्त्री चिरपुटकर यांना देवळालीस पुढील तजवीज करण्यास पाठविलें होतें. त्यांनीं देवळाली येथें राजे शामराज यांचे वडील राजा लक्ष्मणराज यांची भेट घेतली. त्यांनीं श्रीमंत बाबासाहेबांची हैद्राबाद येथें राहण्याची सर्व तजवीज करीत असल्याबद्दल सांगितलें. चिरपुटकर मनमाडला परत आले. त्यांनीं राजे लक्ष्मणराज सर्व तजवीज ठेवणार असल्याचें श्रीमंतांस सांगितलें. श्रीमंत मनमाडहून देवळालीस जाऊन राजे लक्ष्मणराज यांना भेटले. मनमाडहून ता.२५ रोजीं सकाळीं ८–३० वाजतां निघून दुपारीं १ वाजतां श्रीमंत बाबासाहेब बरोबरच्या मंडळींसह औरंगाबादेस पोहोंचले. तेथें निजामांच्या बंगल्यांत मुक्काम केला. येथें असलेलें औरंगजेबाच्या रबिया दुराणी नांवाच्या बायकोचें थडगें त्यांनीं पाहिलें. वाटेंत मक्का ब्रिज व मक्का गेट, त्याचप्रमाणें निपट-निरंजन साधूची समाधि, बुद्ध-गुहा, जामा मशीद, किल्ला इत्यादि स्थळें पाहिलीं. ता. २७ रोजीं श्रीमंत बाबासाहेब दौलताबादेस गेले. दौलताबादेस तेथील किल्ल्याच्या पायथ्याशीं असलेल्या प्रवासी बंगल्यांत मुक्काम केला. दुपारीं किल्ला पाहण्यास गेले. तेथील तळें, मशीद, चिनीमहाल, किलाशिकार नांवाची तोफ, बारादरी, जनार्दन स्वामींची समाधि वगैरे स्थळें पाहिलीं. किल्ल्यावरून

खालीं येऊन रोझा ऊर्फ खुल्दाबाद येथें गेले. तेथें डाक बंगल्यांत राहिले. ता. २८ रोजीं येथून जवळच असलेल्या वेरूळच्या लेण्या पाहण्यास श्रीमंत बाबासाहेब गेले. एक नंबरची लेणी व कैलास देवालय पाहिलें. तेथून परत आल्यावर खुल्दाबाद येथील करबाला (मुसलमानांचें पवित्र ठिकाण), औरंगजेब, निजाम-उल्-मुल्क, गोवळकोंड्याचा राजा हुसेनशहा व मलिकंबर इत्यादींचीं थडगीं पाहिलीं. तारीख २७ डिसेंबर रोजीं दुपारीं बारा ज्योतिर्लिंगांपैकीं वेरूळ येथील धृष्णेश्वराचें दर्शन घेऊन बाकीच्या सर्व लेण्या पाहिल्या. त्यांत जगन्नाथ सभा, इंद्र-सभा, छोटा कैलास, सिताकी नायकीण, कुंभारवाडा, इत्यादि प्रमुख लेण्या होत्या. एकंदर लेण्या ३२ आहेत. पैकीं १२ बुद्धांच्या, १५ ब्राह्मणांच्या व ५ जैनांच्या आहेत.

श्रीमंतांच्या पूर्वजांपैकीं शके १६६४ सालीं श्री. लक्ष्मीबाईसाहेब, शके १७७१ सालीं श्री. ताईसाहेब व शके १८०३ सालीं श्री. रावसाहेब वेरूळ येथें गेले असल्याबद्दल तेथील उपाध्यायांनीं त्यांचे लेख दाखविल्यावरून श्री. बाबासाहेबांनींहि उपाध्यायांना लेख दिला. ता. ३१ रोजीं श्रीमंत बाबासाहेब दौलताबादेस परत आले. दौलताबादेहून ११ वाजतां निघून ता. १ जानेवारी रोजीं हैद्राबादेस पोहोंचले. राजे लक्ष्मणराज देवळालीस आजारी असल्यानें त्यांनीं आपले चिरंजीव राजे शामराज यांना हैद्राबाद येथें श्रीमंत बाबासाहेबांच्या व्यवस्थेसाठीं पाठविलें होतें. हैद्राबादेस राय रायन् यांच्या देवडींत श्रीमंत बाबासाहेब राहिले. तेथें चार मिनार, आसफगंज ब्रिज, महिबूब बाग, फत्तेमैदान रेस कोर्स व हुसेनसागर तलाव इत्यादि पाहिलीं. राजे शामराज यांचा व श्रीमंत बाबासाहेब यांचा बरोबरच्या मंडळींसह फोटो घेण्यांत आला. ता. २ रोजीं शिकंदराबाद कॅन्टोनमेन्ट, परेड ग्राउंड, सेंट जॉर्ज चर्च, निजाम कॉलेज, किंगकोठी इत्यादि स्थळें पाहिलीं. ता. ३ रोजीं गोवळकोंड्याचा किल्ला पाहण्यास गेले होते. जातांना पुराणा ब्रिज, निजामांचें परेड-ग्राउंड, किल्ल्याच्या कोटांतील कुतुबशाही राज्याच्या राजधानीचे अवशेष, कुतुबशाही राजांचीं थडगीं वगैरे स्थळें पाहिलीं. दुपारीं हैद्राबादच्या रेसिडेन्टची श्रीमंतांनीं भेट घेतली. येतांना मक्का मशीद पाहिली. मशिदींत निजामांचीं थडगीं आहेत. ता. ४ रोजीं बाराहदरी वाडा ( बाशिरबाग ) पाहिला.

तेथून मिर अकम तळें, चहरनामा वाडा व फत्तरनामा वाडा पाहून परत आले. ता. ५ रोजीं निजामांचे मुख्य प्रधान हि. ए. नबाब सालरजंग बहादुर यांच्या भेटीस श्रीमंत बाबासाहेब गेले होते. सायंकाळीं ७ वाजतां हैद्राबाद सोडलें व ९ वाजतां कुर्डुवाडीस येऊन बार्शी लाइट रेल्वेनें पंढरपूर येथें गेले. पंढरपूर येथें श्रीमंत सांगलीकर यांच्या वाडयांत मुक्काम केला. रा. न. गो. आंबेकर येथें शाळेंत शिक्षक होते. ते श्रीमंतांना येऊन भेटले. श्रीविठ्ठलाचें दर्शन घेतलें. पंढरपूर येथील ऑर्फनेज व फॅमिली असायलम, गोपाळपुर, विष्णुपद इत्यादि स्थळें पाहिलीं. ता.८ रोजीं पंढरपूर येथील शाळेचा बक्षिस-समारंभ झाला. त्या समारंभास श्रीमंत गेले होते. ऑर्फनेज व फॅमिली असायलमला रु. २५ देणगी दिली. ता. १० जानेवारी रोजीं पंढरपुराहून निघून पुण्यास आले. एकंदर २० दिवस प्रवास झाला.

## परिशिष्ट च

शिरवळच्या नागरिकांनीं श्रीमंत बाबासाहेबांना ता.१ मार्च सन १९१३ रोजीं मानपत्र दिलें, त्यास श्रीमंतांनीं दिलेलें उत्तरः—

आपण सर्वांनीं मिळून माझें एकदिलानें, राजनिष्ठेनें, प्रेमानें व उत्साहानें स्वागत करून अंतःकरणपूर्वक अभिनंदन केलें याबद्दल आणि मजविषयीं प्रेमपूर्वक जे आनंदाचे उद्गार प्रदर्शित केले त्यांबद्दल मी आपला फार आभारी आहें.

आमचे वडील हिज हायनेस श्रीमंत पंतसाहेब यांनीं मला कामाची माहिती व्हावी म्हणून या तालुक्याचे कांहीं स्वतंत्र अधिकार दिलेले आहेत. त्यासंबंधानें मी त्यांचा फार ऋणी आहें.

तसेंच मे. स्विफ्टसाहेब बहादुर, पोलिटिकल एजंट, यांनीं मला वेळो-वेळीं जो सल्ला दिला व जी मदत केली त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. काम करण्यामध्यें माझा मुख्य हेतु असा आहे कीं, ज्या संस्थानामध्यें आपला जन्म झाला त्या संस्थानचे लोकांकरितां आपण झटावें व त्यांचें आपल्या हातून होईल तितकें कल्याण करावें येवढाच आहे व हा हेतु परमेश्वरकृपेनें व आपल्या सर्वांच्या मदतीनें तडीस जाणार आहे. हिज हायनेस श्रीमंत पंतसाहेब यांस व

चित्रांक ५७



वेरूळ येथील लेणीमधील सुताराच्या झोपडीचें दृश्य.

[ सं. पा. २६४

प्रजाजनांस संतोष होईल अशाच रीतीनें मजवर सोपविलेलें जबाबदारीचें काम करण्याची माझी उत्कट इच्छा असून ती इच्छा सफल होण्यास आपल्या सहानुभूतीची मला फार मदत होणार आहे. ज्यांत रयतेचें कल्याण, त्यांतच राज्याची उन्नति आहे हा जो सर्वसामान्य सिद्धान्त आहे तो माझ्या अंत:करणांत पुरतेपणीं वास करीत आहे; व तसें घडून येण्यासाठीं अविश्रांत श्रम करण्याच्या कामीं मजकडून यत्किंचितहि आळस होणार नाहीं.

माझी अशी इच्छा आहे कीं, ज्या ज्या कामगारांशीं माझा संबंध येत आहे त्या त्या कामगारांनीं व ताबेनोकरांनीं आपआपलीं कामें अंत:करणपूर्वक इमानेंइतबारें व मोठ्या उत्सुकतेनें करावींत. तसें केल्यानें मला मोठा संतोष होऊन त्यांसहि भूषणावह होणार आहे. प्रामाणिकपणानें व निरलसपणानें जे नोकर झटून काम करतील त्यांजविषयीं माझी पूर्ण सहानुभूति राहील, असें मी खात्रीनें सर्वांस सांगत आहें.

आपले लोकप्रिय व दयाळु गव्हर्नर नेक नामदार लॉर्ड सिडेनहॅम यांचा वियोग होण्याचा समय जवळ आलेला असल्यामुळें आपणां सर्वांस फार दिलगिरी वाटत आहे. त्यांनीं आपल्या राज्य-कारकीर्दीत आपणां सर्वांविषयीं प्रेम व सहानुभूति दाखवून आपल्या प्रजेचे कल्याणाकरितां जे अविश्रांत श्रम केले आहेत त्यांचें कृतज्ञतापूर्वक आपणां सर्वांस निरंतर स्मरण होणार आहे. माझे वडिलांस गेले दिल्ली दरबारचे प्रसंगीं जो मोठा बहुमान मिळालेला आहे तो केवळ त्यांच्या कृपेचें फळ आहे. नेक नामदारसाहेब यांनीं आमच्या घराण्यावर अतिशय प्रेम ठेवून आमचे कल्याणाविषयीं मन:पूर्वक कळकळ व विशेष कृपा दाखविली आहे. त्याजबद्दल आमचें संस्थान व आम्ही त्यांचे किती ऋणी आहोंत हें शब्दांनीं व्यक्त करण्यास मी अगदीं असमर्थ आहें. ते जरी जात आहेत तरी आमची त्यांजविषयींची पूज्यबुद्धि व आदर केव्हांहि कमी होणार नाहीं. अशी दयाळु व सुखकारक कारकीर्द आजपर्यंत क्वचितच झाली असेल, असें जें टाइम्स ऑफ इंडिया पत्रांत प्रतिपादन करण्यांत आलेलें आहे तें शब्दश: खरें आहे. प्रभु लॉर्ड व लेडी सिडेनहॅम यांस दीर्घायु करून निरंतर सुखी ठेवो व त्यांच्या सर्व इच्छा परिपूर्ण करो अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे.

रा. ब. तात्यासाहेब कुमठेकर यांचे चिरंजीव दादासाहेब कुमठेकर, बी. ए., एल्एल्. बी., हे माझे परमस्नेही असून त्यांनीं निरपेक्ष बुद्धीनें मला वेळोवेळीं सल्ला देऊन उत्तम प्रकारची मदत केलेली आहे. त्याजबद्दल त्यांचेहि अशा प्रसंगीं आभार मानणें इष्ट आहे असें मला वाटतें.

रा. ब. देशपांडे यांनीं गांवांत पाणी आणणें वगैरे ज्या सूचना केल्या त्या मी वडिलांचे कानावर घालीन व शक्य असल्यास त्या अमलांत आणण्या-संबंधानें शक्य ती खटपट करीन.

आपणां सर्वांची उन्नति होवो व त्या कामीं मजला प्रभु शक्ति व सामर्थ्य देवो अशी श्रीरामचरणीं प्रार्थना करून व आपण आज मला जो बहुमान दिलात त्याबद्दल आपले पुन्हां एकवार आभार मानून शेवटीं ज्यांचे राजसत्तेखालीं आपण शांततेचा व उन्नतीचा सुखोपभोग घेत आहों ते आपले परमप्रिय व दयाळु सार्वभौम बादशाह पंचम जॉर्जसाहेब व त्यांचे कुटुंबांतील सर्व मंडळी यांस श्रीराम दीर्घायु व सुखी करो अशी त्या जगन्नियंत्याजवळ आपण प्रार्थना करूं.

## परिशिष्ट छ

भोर येथें ता. १० जुलै सन १९१६ इ. रोजीं बेल्जिअन चिल्ड्रेन्स डे (Belgian Children's Day) साजरा करण्यांत आला, त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं केलेलें भाषणः—

श्रीमंत बाळासाहेब गांडेकर, रा. नानासाहेब धायगुडे, शिक्षक, विद्यार्थी व इतर सद्गृहस्थहो,

आजच्या प्रसंगीं अध्यक्षस्थान देऊन तुम्हीं जो माझा गौरव केलात व ज्या गोष्टीस श्रीमंत सरकारांनीं अनुमति दिली त्याबद्दल मी तुम्हां सर्वांचा व त्यांचा फार आभारी आहें. अध्यक्ष होण्याचें मीं कबूल करतांना माझ्या मनांत असा विचार आला कीं, आपल्या अध्यक्ष होण्यानेंच आपल्यास बेल्जमसंबंधानें कृतीनें सहानुभूति दाखवून दुसऱ्याहि कांहीं गोष्टी बोलून दाखविण्यास सुसंधि मिळणार आहे, व ह्याच विचारानें आजच्या समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें मीं मोठ्या आनंदानें कबूल केलें.

जर्मनीनें बेल्जमचा जो अमानुष छळ केला, शहरेंचीं शहरें जाळून उध्वस्त केलीं व सर्व देशास अन्नान्नदशा आणिली, अशा वेळीं बेल्जमच्या मुलांस सर्व प्रकारें मदत करणें किती आवश्यक आहे ह्याबद्दल आतांपर्यंतच्या वक्त्यांनीं सविस्तरपणें हृदयद्रावक कहाणी सांगितली आहेच. पुन्हां तिची पुनरुक्ति करून आपला वेळ घेण्याची माझी इच्छा नाहीं. बेल्जम लोकांमध्यें जे एकदोन गुण प्रमुखपणानें माझ्या नजरेस येतात त्या गुणांनींच ते सर्व जगाच्या स्तुतीस व दयेस पात्र झाले आहेत. लढाई सुरू होण्यापूर्वी जेव्हां जर्मनीनें फ्रान्सवर हल्ला करण्याकरितां बेल्जम देशांतून रस्ता मागितला तेव्हां बेल्जियम राष्ट्रास पक्कें समजून चुकलें कीं, जर्मनीस आपल्या देशांतून पार जाण्यास मार्ग दिला नाहीं तर आपल्याशींहि जर्मनी दोन हात करण्यास मागेंपुढें पाहणार नाहीं. जर्मनी हें बलिष्ठ राष्ट्र आहे, सर्व भौतिक साधनांचा तें स्वामी आहे; अशा स्थितींत त्याच्याशीं सामना करण्यांत आपला निभाव लागणार नाहीं, आपलीं घरेंदारें जमिनदोस्त होतील, लाखों लोक प्राणास मुकतील, लाखों लोकांना कष्टमय तुरुंगवास भोगावा लागेल असें राष्ट्रीय आपत्तीचें भयंकर चित्र त्याच्या डोळ्यांपुढें मूर्त स्वरूपांत दिसत असूनहि त्यानें तटस्थ राष्ट्राचा हक्क म्हणून स्वाभिमानपूर्वक नकारार्थी उत्तर पाठविलें. अशा स्वाभिमानप्रेरित स्वातंत्र्याच्या हक्करक्षणाकरितांच बेल्जम जर्मनीच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेस बळी पडलें आहे व त्यास विपन्नावस्था प्राप्त झाली आहे.

व्यक्तीप्रमाणेंच राष्ट्राचाहि जगांत नेहमीं मोठेपणा असतो असें नाहीं. जयापजय ही ईश्वराधीन गोष्ट आहे. पण आपल्या देशाकरितां कर्तव्य करणें ही जागृति व्यक्ति व राष्ट्र ह्यांत सारखीच उत्पन्न झाली पाहिजे, व गीतेमध्यें याप्रमाणेंच म्हटलेलें आहे. ‘हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्षसे महीम्।’ कर्तव्य करीत असतां त्यांत अपयश आलें तरी तें यशाइतकेंच भूषणावह आहे. परवां लॉर्ड किचनेर ह्यांस कर्तव्य करीत असतांच अपमृत्यु आला हें आपणां सर्वांच्या लक्षांत असेलच. बेल्जमची कर्तव्यनिष्ठा वाखाणण्यासारखी आहे. ह्यावरूनच बेल्जमच्या अनाथ लेकरांना मदत करणें आपलें पहिलें कर्तव्य आहे. येथें एखादा असमंजस मनुष्य असा प्रश्न विचारील कीं, बेल्जमला आम्हीं काय म्हणून मदत करावयाची? स्वाभिमान व कर्तव्यनिष्ठा

यांच्या वृथा भरीं भरून त्यानें विनाकारण ह्या लढाईंत आपणास गोवून घेतलें. पण असा प्रश्न विचारणारास स्वाभिमानी राष्ट्राचें हृद्गतच समजलें नाहीं असें म्हणावें लागतें. माझ्या मतें बेल्जमनें आत्मयज्ञाचें पवित्र कर्तव्य करून बिनमोल असें मित्रकार्यहि केलें आहे. त्यानें जर जर्मनीला आपल्या देशांतून फ्रान्समध्यें शिरण्याचा रस्ता मोकळा करून देण्याचा मूर्खपणा केला असता तर फ्रान्सच्या जीवित्वाचा प्रश्न युद्धाच्या पहिल्या एक दोन आठवड्यांत सुटला असता, व ब्रिटिश साम्राज्याच्या सामर्थ्यावरहि मोठेंच संकट गुदरलें असतें. बेल्जमनें परोपकारप्रेरित बुद्धीनें आपले पंचप्राण मित्रकार्याकरितां पणास लाविले आहेत. आपल्या साम्राज्याचा मित्र तोच आपला मित्र व त्याचा शत्रु तोच आपला शत्रु असें आपण समजलें पाहिजे. म्हणून बेल्जमच्या दुःखाचे वांटेकरी होणें यांत कर्तव्यापेक्षां आपण अधिक असें कांहीं करीत नाहीं.

आजच्या समारंभांत शिक्षक व विद्यार्थी यांनीं मेहेनत घेऊन जे नाटकांतील प्रयोग व शास्त्रीय प्रयोग करून दाखविले व दाखविणार आहेत ते फार चांगले [illegible] असा मला भरंवसा आहे. अशा प्रकारें त्यांनीं दाखविलेल्या उत्साहाबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे.

आजच्या मुलांच्या व शिक्षकांच्या उत्साहामुळें आजचा प्रसंग संस्थानच्या शाळाखात्याच्या इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारखा आहे. खरोखर आजचा समारंभ आमच्या शाळाखात्याच्या गेल्या वीस वर्षांच्या व विशेष आमच्या भोर हायस्कूलच्या प्रगतीचें तें चिन्ह आहे असें मी समजतों. सुमारें अठरा एकोणीस वर्षांपूर्वीं मी ह्याच हायस्कुलांत मॅट्रिकच्या क्लासांत होतों. त्या वेळच्या व आजच्या स्थितींत स्तुत्य असें महदंतर पडलें आहे. त्या वेळीं नुकतेंच भोर अँग्लो-व्हर्नाक्युलर स्कूलचें हायस्कुलांत रूपांतर झालें होतें, व ह्या शाळेंत अवघीं ८० मुलें इंग्रजी शिकत होतीं. तीं आज १७५ मुलें येथें शिकत असलेलीं आपणांस दिसतात. त्या वेळीं हायस्कुलांत शिक्षकांची संख्या ७ होती त्या ठिकाणीं आज ११ शिक्षक आहेत, व त्यांत त्या वेळेपेक्षां ग्रॅज्युएट व अंडर-ग्रॅज्युएट ह्यांची संख्या अधिक आहे. त्या वेळीं शास्त्रीय शिक्षणास उपकरणसामग्री अगदीं बेताची होती ती आज चांगली पुरेशी झाली आहे. त्या वेळीं मराठी शाळेंत १५० मुलें शिकत असत तेथें आज २५० वर संख्या

चित्रांक ५८



श्रीमंत बाबासाहेब आपल्या स्नेहीमंडळींसह एलेफंटा लेणीं पाहण्यास गेले त्या वेळीं लेणीनजीक घेतलेला फोटो. [सं. पा. २६४
डावे बाजचे सिंहाशेजारीं नं २ श्री. बाबासाहेब. मागचे बाजूस उभे कुमठेकर, श्रीमंतांचे उजवे बाजूस मावजीशेट व किबे.

झाली आहे. शिकणाऱ्या मुलींची संख्या तर दुपटीवर झाली आहे. पूर्वी एवढीच इमारत येथील मुलांमुलींचे शिक्षणास पुरेशी होत होती; पण आतां एकट्या हायस्कुलासच ती पुरेशी न होतां मराठी शाळा व मुलींचे वर्ग ह्यांची दुसरीकडे सोय करणें प्राप्त झालें आहे. पूर्वी संस्थानांत शाळांची संख्या फक्त ३२ होती तेथें आज ७३ शाळा शिक्षण देत आहेत. हें एकदम कोणास खरेंहि वाटणार नाहीं.

ह्या सर्व सुधारणांचें श्रेय श्रीमंत सरकारांचे विद्याभिरुचित्वाकडे आहे हें सांगावयास नकोच. अँग्लो-व्हर्नाक्युलर स्कूलचें हायस्कूल बनविण्याच्या कामीं रा. श्रीपाद केशव भिडे ह्यांची फारच मदत झाली आहे; व पुढें रा. वासुदेव नारायण जोशी, हल्लींचे शाळाधिकारी, ह्यांनीं व त्यांच्या मदतनिसांनीं गेल्या १०, ११ वर्षांत विविध सुधारणा घडवून आणण्याच्या कामीं ज्या कळकळीच्या शिफारशी केल्या त्यांबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. येथील शिक्षकवर्ग आपापलें काम मेहेनत घेऊन करीत असेलच. तथापि त्यांच्यापैकीं एक शिक्षक रा. रा. माधवराव गीतापाठी हे एक उत्तम शिक्षक आहेत असें, ते माझ्या चिरंजीवास गेले कांहीं दिवस शिकवीत असल्यावरून मला समजून आलें.

पूर्वीच्या व आजच्या शिक्षणाच्या कल्पनांत उत्क्रांतितत्त्वानुसार महदंतर पडलें आहे व तसें अंतर पडणें अगदीं स्वाभाविक व योग्य आहे. तीस चाळीस वर्षांपूर्वी नुसतें पोटाला अधिकाधिक मिळविण्याची पात्रता अंगीं आणणें व त्याकरितांच परीक्षा पास होणें व कांहीं विषयांची ठोकळ माहिती मिळविणें म्हणजे शिक्षणसंपादन झालें अशी सर्व सामान्य लोकांची समजूत असे. पण आतां ज्ञानाकरितां ज्ञान संपादन करणें, अंगी कार्यक्षमता व कर्तव्यनिष्ठा आणणें म्हणजेच खऱ्या शिक्षणाचें कार्य झालें असें समंजस लोक समजतात. तसें खरें शिक्षण द्यावयाचें म्हणजे हल्लींच्या शिक्षणास धार्मिक, शास्त्रीय, औद्योगिक व शारीरिक शिक्षणाची खंबीर जोड द्यावयास पाहिजे. तशा दृष्टीनें व सुधारलेल्या शिक्षणपद्धतीचा विचार करतां आपणांस बरीच मोठी मजल गांठावयाची आहे इकडे शिक्षक वर्ग लक्ष देतील व म्है बडोद्याप्रमाणें हें एक नमुनेदार संस्थान होईल अशी मला उमेद आहे.

येथील मुलांचा विद्याव्यासंग पाहून मला फारच संतोष होत आहे. मुलांनो, तुमच्या कर्तबगारीवरच देशाचा भाग्योदय अवलंबून आहे. तुमच्या बरे-वाईटपणावरच तुमच्या देशाचा उत्कर्ष व अपकर्ष होणारा आहे. आपलें कर्तव्य करण्यास शिका. तथापि सरकाराशीं विरोध न करितां त्यांच्या सहकारितेनें आपला देश ऊर्जित दशेस कसा आणितां येईल हें समजून घेण्याकरितां मीं तुम्हांस कै. ना. गोखले यांनीं मुंबई स्टूडंट्स् ब्रदरहुडपुढें ता. ९ ऑक्टोबर १९०९ रोजीं जें व्याख्यान दिलें तें मननपूर्वक वाचण्याची शिफारस करतों. माझें भाषण बरेंच लांबलें याबद्दल आपण मजवर रुष्ट होऊं नका व बेल्जमच्या मुलांस उत्साहानें मदत करा अशी विनंति करून मी आपलें भाषण संपवितों.

---

## परिशिष्ट ज

ता. ८ डिसेंबर सन १९१८ इ. रोजीं सुधागड तालुक्याच्या लोकांनीं श्रीमंत बाबासाहेबांना पाली येथें मानपत्र दिलें, त्यास उत्तरादाखल श्रीमंत बाबासाहेब यांनीं केलेलें भाषण:—

रा. रा. हरिभाऊ लिमये व इतर सभ्य गृहस्थहो,

आज आपण सर्व लोकांनीं माझा येथें मोठ्या प्रेमानें एवढा थोरला गौरव करून जाहीर रीतीनें मानपत्र दिलें त्याचा मी मोठ्या आनंदानें स्वीकार करतों. नुकतीच इन्फ्ल्युएन्झाची सांथ येऊन भयंकर प्राणहानि झाली आहे. त्याचप्रमाणें दुष्काळाचें उग्र स्वरूप भासूं लागलें आहे. ह्या सर्व आपत्ती मनांत येऊन माझे अंत:करणांत काय स्थिति होत आहे हें मला सांगतां येत नाहीं. परंतु आपण सर्वजण प्रत्यक्ष ह्या स्थितीचा भयंकर अनुभव घेत असूनहि ह्या प्रसंगीं तें सर्व विसरून व मी नको म्हणत असतांनाहि इतक्या प्रेमानें माझें ठिकठिकाणीं स्वागत करीत आहांत याबद्दल मीं आपले आभार कसे मानावेत हें मला समजत नाहीं.

मानपत्रांत आपण माझ्या शिक्षणासंबंधीं, त्याचप्रमाणें भोरांत निघालेल्या एक दोन संस्थांसंबंधीं व एकंदर माझ्या चारित्र्यासंबंधीं जे प्रशंसापर उद्गार काढले आहेत त्यांस मी खरोखर पात्र आहें कीं नाहीं ह्याची मला जबरदस्त शंका आहे. शिवाय मला जें अल्पस्वल्प शिक्षण मिळालें आहे त्याचें सर्व श्रेय माझे परमपूज्य वडील एच्. एच्. श्रीमंत सरकारांकडेच आहे. दुसरें असें कीं,

शिक्षणाची खरी कसोटी म्हटली म्हणजे त्याचा प्रत्यक्ष व्यवहारांत किती उपयोग केला जातो ह्यावर आहे असें माझें मत आहे. सबब त्यासंबंधीं दृश्य गोष्टी माझ्या हातून घडल्याखेरीज बरें वाईट कांहींच म्हणतां यावयाचें नाहीं. तसेंच देणग्यांसंबंधीं जो उल्लेख केला आहे त्याविषयीं माझे मतानें मीं कांहीं विशेष केलें आहे असें बिलकुल नाहीं. प्रजेचा पैसा प्रजेच्या कल्याणाप्रीत्यर्थ खर्च झालाच पाहिजे असें मला वाटतें. लोकोपयोगी कृत्यें करण्यास अनुकूल परिस्थिति लागते हें लोकांच्या ध्यानांत असेलच. माझी खरोखर अशी इच्छा आहे कीं, वडिलांस पुष्कळ आयुष्य मिळून मजला जास्त जास्त काम करण्याची संधि मिळावी. तथापि आपल्या मनःपूर्वक स्वागतामुळें मला उत्साह प्राप्त झालेला आहे.

आतां आपण थोडें इतर गोष्टींकडे वळूं. माझी सुधागड पाहण्याची पुष्कळ दिवसांची फार इच्छा होती. त्याचीं कारणें बरींच आहेत. त्यांतलें मुख्य कारण म्हणजे संस्थानांतील सर्व तालुक्यांत हा तालुका शिक्षणांत व इतर सुधारणांत पुढें गेलेला आहे हें होय. प्रो. हरिभाऊ लिमये व त्यांचे बंधु हे ह्याच तालुक्यांतले आहेत, ही एकच गोष्ट केवळ याच तालुक्याला भूषण नसून सर्व भोर संस्थानला मोठी भूषणावह व अभिमानास्पद आहे, हें आपणांस सांगावयास मला फार आनंद वाटत आहे. रा. रा. हरिभाऊ हे मुंबई इलाख्यांतील अतिशय प्रसिद्ध अशा फर्ग्युसन कॉलेजांत अध्यापकाचें काम करीत असून युनिव्हर्सिटींत, पुणें येथील म्युनिसिपॅलिटींत, त्याचप्रमाणें प्रॉव्हिन्शिअल कॉंग्रेस कमिटींत व इतर नानाप्रकारच्या लोकोपयोगी संस्थांत मोठ्या महत्त्वाचीं व जोखमीचीं कामें करीत आहेत. तेव्हां अशा प्रकारच्या थोर व लोककल्याणाचें ध्येय पुढें ठेवणाऱ्या गृहस्थाचा येथें त्यांच्याच मातृभूमींत जाहीर रीतीनें प्रशंसापर व अभिमानास्पद उल्लेख करण्याची अनायासें संधि मिळाली याबद्दल मला फार आनंद वाटत आहे. त्याचप्रमाणें त्यांचे वडील बंधूहि सांगली संस्थानांत मोठ्या हुद्दयाचे जागेवर आहेत. या सर्व गोष्टींबद्दल लिमये बंधुद्वयाचें व इतर येथील लोक—ज्यांनीं ज्यांनीं म्हणून संस्थानांत अगर संस्थानाबाहेर कोणत्याहि शाखेंत नांवलौकिक मिळविला असेल त्यांचें मी मोठ्या आनंदानें व अभिमानानें अभिनंदन करतों.

दुसरें इकडे येण्याचें कारण हें कीं, आपल्या संस्थानांतील प्रदेश पाहावा व आपल्या रयतेची शक्य तेवढी प्रत्यक्ष माहिती करून घ्यावी. इकडे येण्याचें तिसरें एक कारण असें आहे कीं, हा तालुका ऐतिहासिक दृष्टीनें फार प्रसिद्ध आहे. सुधागडची माहिती इतिहासांत अंधुक कां होईना, पण सहाव्या शतकापासून उपलब्ध आहे. इकडील नागोठणें, नाडसूर, नेणवली वगैरे गांवांतील व सरसगड किल्लयांतील कोरीव लेणीं, गुहा, लेख वगैरे अजून आपल्या प्राचीनत्वाची साक्ष देत आहेत. श्रीशिवछत्रपतींच्या वेळीं हा किल्ला व येथील लोक मराठी राज्यस्थापनेला व संरक्षणाला अतिशय उपयोगी पडून इतिहासांत फार प्रसिद्ध होऊन राहिले आहेत. नागोठणें बंदर सन १८३० पर्यंत या संस्थानांत मोडत होतें. तरी ह्या तालुक्यांतील लोकांनीं जें पूर्वीं नांव मिळविलें आहे तें आतांहि बदललेल्या परिस्थितींतहि ते कायम ठेवतील व संस्थानाचा एकंदरीनें सर्वांगसुंदर असा उत्कर्ष करण्याकरितां अहोरात्र झटतील अशी मला पूर्ण आशा आहे.

तेव्हां अशा प्रकारचा तालुका पाहण्याची माझी फार दिवसांची उत्कट इच्छा तृप्त करून घेण्याची संधि मला आमचे वडील श्री. सरकार यांनीं दिली याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें.

आतां अशा आनंददायक प्रसंगीं आपणांस एक अत्यंत आनंददायक, महत्त्वाची कामगिरी केली पाहिजे, व ती कोणती म्हणाल तर आपल्या सार्वभौम इंग्रज सरकारास व त्यांचे दोस्तांस महायुद्धांत फार मोठा चिरस्मरणीय व लौकिकास्पद जय मिळून लढाई बंद झाली ह्याबद्दल ईश्वराची मनोभावानें प्रार्थना करून आपल्या सार्वभौम सरकारांचें अभिनंदन करणें ही होय. ही लढाई जशी फार भयंकर व सर्वव्यापी होती तसे तिचे परिणामहि फार महत्त्वाचे व अत्यंत घडामोडीचे होणारे आहेत. ही लढाई बंद झाल्यानें व तींत आपल्या सार्वभौम सरकारास जय मिळाल्यानें लढाई चालू असतांना महागाई वगैरे जे लढाईचे दुष्परिणाम हे तर बंद होतीलच; परंतु ज्या हिंदुस्थानच्या राज्य-कारभारांतल्या सुधारणा लढाईंतल्या जयावर अवलंबून होत्या त्याहि आतां होण्यास वेळ लागणार नाहीं. ही लढाई चालू असतांना हिंदुस्थानच्या भावी राज्य-पद्धतीची रूपरेषा आपले स्टेट सेक्रेटरी मॉंटेग्यूसाहेबांनीं २० ऑगस्ट १९१७ च्या

आपल्या भाषणांत अधिकारयुक्त अशा वाणीनें आंखून ठेविली आहे. नंतर लगेच स्वतः हिंदुस्थानांत येऊन सर्व प्रकारें साधक बाधक रीतीनें त्या प्रश्नाचा खल करून ताबडतोब रिफॉर्म स्कीम तयार केली व लवकरच ती कायद्याचे स्वरूपांत येऊन हिंदुस्थानांत नवीन जबाबदार राज्यपद्धती सुरू होणार आहे. आतां हिंदुस्थानांत सुधारणा सुरू झाल्या म्हणजे संस्थानांची प्रगति झाल्याखेरीज राहणार नाहीं. कारण कीं, संस्थानिकांनीं व संस्थानच्या लोकांनीं ब्रिटिश हिंदुस्थानच्या लोकांपासून अलग राहणें शक्य नाहीं व इष्टहि पण नाहीं.

जेव्हां इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानांत राज्य संपादन केलें—आणि कोणतीहि गोष्ट परमेश्वरी सत्तेवांचून व इच्छेवांचून होत नसते व जें ईश्वर घडवून आणतो तें सर्वांच्या कल्याणाकरितांच असतें—तेव्हां जीं अवशिष्ट संस्थानें राहिलीं होतीं त्यांच्याशीं इंग्रजांनीं करारमदार केले आहेत. ते करार प्रत्येक संस्थानाशीं निरनिराळे असले तरी त्यांचें एकच सार थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, संस्थानांवर बाहेरचें परचक्र आलें तर तें दूर करण्याची जबाबदारी ब्रिटिश सरकारनें आपणावर घेतली आहे. तसेंच विशेष गैरव्यवस्था झाल्याशिवाय तेथें हात घालावयाचा नाहीं अशी हमी दिली आहे. खेरीज संस्थानांनीं इंग्रज सरकारास वरिष्ठ सरकार समजलें पाहिजे व हिंदुस्थानावर परकीयांनीं स्वारी केल्यास त्यांस संस्थानांनीं मदत केली पाहिजे.

इंग्रजी राष्ट्र हें कलाकौशल्यामध्यें व इतर गुणांमध्यें फारच पुढें गेलेलें असल्यामुळें त्यांना हिंदुस्थानांत स्वसामर्थ्यानें लवकरच शांतता प्रस्थापित करतां आली. त्यामुळें ज्ञानवृद्धि पुष्कळ झाली. आपल्या उणीवा लोकांस समजून आल्या व प्रजेचे व राजाचे हक्क काय असतात हेंहि सर्वांस समजून आलें. आगगाड्या, तारायंत्रें यांनीं दळणवळणाचीं साधनें सुलभ झालीं व एकराष्ट्रीयत्वाची भावना विशेष दृढ झाली. याशिवाय इंग्रजी राज्यापासून प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष असे फायदेहि संस्थानांस पुष्कळ झाले आहेत. आपण त्यांची न्याय-पद्धति स्वीकारली आहे व तसेंच जरूर वाटेल तेव्हां त्यांचीं माहितगार माणसेंहि संस्थानें सुधारण्याकरितां घेतलीं आहेत. त्यांच्या विश्वविद्यालयांचा आपण उपयोग करून घेत असतोंच व त्यांच्याच धर्तीवर आपण इतरहि पुष्कळ संस्था

निर्माण केल्या आहेत. आपल्या भोर संस्थानांतहि बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत. त्यांचें श्रेय आमचे परमपूज्य वडील हि. हा. श्रीमंत पंतसाहेब सचिव यांचेकडे असलें तरी त्या इंग्रज राज्यकर्त्यांच्या अनुकरणानें व प्रोत्साहनानें झाल्या आहेत व त्याबद्दल त्यांसहि बरेंच श्रेय दिलें पाहिजे.

परंतु कालाच्या ओघाप्रमाणें व ब्रिटिश राष्ट्राच्या जनतेचें उदाहरण पाहून व विशेषत: युद्धामध्यें उत्पन्न झालेल्या विशिष्ट परिस्थितीनें संस्थानच्या कार-भारांत लोकांचा हात असावा असें संस्थानांतील प्रजेस वाटूं लागलें आहे व ही त्यांची आकांक्षा योग्यहि आहे. आतां हिंदुस्थानमध्यें नेक नामदार लॉर्ड चेम्सफर्ड व मि. मॉंटेग्यू हे ज्या सुधारणा घडवून आणणार आहेत त्यांचाहि सुपरिणाम संस्थानच्या प्रजेवर व संस्थानिकांवर झाल्यावांचून राहणार नाहीं असें ध्यानांत घेऊनच संस्थानिकांसंबंधानें सुधारणा घडवून आणण्याची योजना त्यांनीं केली आहे. कारण हिंदुस्थानची खरी सुधारणा होण्यास ज्या एकंदर संस्थानांनीं हिंदुस्थानचा $\frac{1}{3}$ प्रदेश व्यापला आहे व ज्यांमध्यें $\frac{1}{5}$ लोकसंख्या वसत आहे त्यांची सुधारणा झाल्याशिवाय हिंदुस्थानची खरी उन्नति झाली असें म्हणतां यावयाचें नाहीं, हें तत्त्व त्यांनीं या योजनेंत मान्य केलें आहे. पण त्याबरोबरच वर सांगितल्याप्रमाणें संस्थानच्या अंतस्थ कारभारांत तेथें अतिशय अंदाधुंदी झाल्याशिवाय ढवळाढवळ करावयाची नाहीं हें पूर्वी तहनाम्यानें मान्य केलेलें तत्त्व पुढें तसेंच पाळलें जाणार आहे, व असें करणें अगदीं योग्य आहे; हें कोणीहि कबूल करील. ह्या तत्त्वाच्या अनुरोधानें संस्था-निकांची सभा Princes Conference निर्माण केलेली आहे. अशा सभे-पासून किती फायदे होणारे आहेत ते मला स्वत:ला गुदस्त सालीं आमच्या वडिलांबरोबर दिल्ली व मुंबई येथें सुधारणांच्या योजनेसंबंधीं वाटाघाट करणाऱ्या संस्थानिकांच्या परिषदेस हजर राहण्याचा सुयोग प्राप्त झाला तेव्हां समजून आलें. तेथील कांहीं संस्थानिकांचीं भाषणें ऐकिलीं तर आपण जणूं काय राष्ट्रीय सभेंतील प्रसिद्ध वक्त्यांचीं आवेशयुक्त भाषणेंच ऐकत आहोंत असा भास होतो. त्यांची प्रजेसंबंधीं कळकळ व विद्वत्ता पाहून मन थक्क होऊन जातें. तर मग ज्या तत्त्वांकरितां ते इंग्रज सरकारशीं वादविवाद करतात तीं तत्त्वें आपल्या संस्थानांत अंमलांत आणावींशीं साहजिकच वाटणारीं आहेत.

चित्रांक ६०



वेरूळच्या लेणीमधील कैलास गुहेंतील रंगमहालाची उजवी बाजू. [सं. पा. २६६

व तसेंच जे संस्थानिक कमी सुशिक्षित आहेत व प्रजेला हक्क न देण्याकडे ज्यांची प्रवृत्ति आहे त्यांसहि ह्या पुढें गेलेल्या संस्थानिकांचें साहजिकच अनुकरण करावेंसें वाटणार आहे. म्हणून ह्याही गोष्टीचा संस्थानांतील लोकांवर अप्रत्यक्ष परिणाम झाल्यावांचून राहणार नाहीं. त्याबद्दल निराशा वाटण्याचें कारण नाहीं. सावकाश झालेले फायदे निरंतरचे व टिकाऊ असतात. घाईनें केलेल्या कोणत्याहि गोष्टीचा परिणाम चांगला होत नसतो, हें रशियांत चाललेल्या आजच्या अंदाधुंदीवरून ध्यानांत येणार आहे. ह्या सर्व फायद्यांचें श्रेय इंग्रज राज्यकर्त्यांसच दिलें पाहिजे. म्हणून त्यांच्या सुखदुःखाच्या वेळीं आपण भागीदार होणें अगदीं इष्ट आहे. म्हणून आजचा त्यांना वाटणारा आनंदाचा प्रसंग आपणांसहि आनंददायक वाटला पाहिजे. व तसा तो प्राप्त झाला याबद्दल ईश्वराचे आपण ऋणी असलें पाहिजे.

आतां येथें कांहीं लोकांस अशी शंका येईल कीं, हिंदुस्थानांत ह्या सुधारणा झाल्यापासून संस्थानांतील लोकांस काय फायदे आहेत? तरी ह्या-संबंधानें जरा विचार केल्यास पुष्कळ फायदे घडून येणार आहेत असें कळून येईल. इंग्रज सरकारास ह्या सुधारणा प्रत्यक्ष संस्थानांत सुरू करतां यावयाच्या नाहींत. कारण संस्थानच्या राज्यकारभारांत ढवळाढवळ करावयाची नाहीं असे त्यांचे व संस्थानिकांचे तहनामे झाले आहेत, व हें त्यांचें ढवळाढवळ न करण्याचें तत्त्व योग्यहि आहे. तथापि आपण जसे आजपर्यंत इंग्रज सरकारचे कायदेकानू घेतलेले आहेत व जशा शिक्षणसंस्थाहि घेतलेल्या असून राज्यकार-भारपद्धतीमध्यें अनुकरण करीत आहोंत तसेंच याही सुधारणांचें अनुकरण करणें आपणांस इष्ट व अगत्याचें वाटणार आहे. अशा सुधारणा केव्हांहि झाल्या तरी सावकाशीनेंच व्हावयाच्या असतात. त्याबद्दल निराश होण्याचें कारण नाहीं. याबद्दल लोकांनीं कांहीं प्रयत्न करूं नये असें नाहीं. कारण कीं, इंग्रजीमध्यें अशी म्हण आहे कीं, "God helps those who help themselves." परंतु फार घाईनें सुधारणा झाल्यापासून काय परिणाम होतात हें रशियाचे राज्यक्रांतीकडे पाहिलें असतां समजून येणार आहे. आतां ह्या सुधारणांमध्यें आपल्याला विशेष अनुकूल अशी आणखी एक योजना करण्याचें ठरलें आहे. ती ही कीं, संस्थानिकांची सभा ( Chamber of Princes अथवा नरेंद्र-

मंडळ ) निर्माण करणें ही होय. ह्यामुळें संस्थानिकांचा दर्जा वाढला इतकेंच नव्हे तर त्यांचें स्वातंत्र्यहि जास्त सिद्ध झालें आहे. ह्या सभेपासून संस्थानांतील प्रजेचें कल्याण होण्यासारखें उघड दिसत नसलें तरी ज्या संस्थानिकांचे विचार प्रगल्भ झाले आहेत व ज्या संस्थानिकांनीं, उदाहरणार्थ, म्हैसूर, बडोदें, बिकानेर ह्यांनीं आपल्या राज्यकारभारांत प्रजेस हक्क दिले आहेत त्या संस्थानिकांचें अनुकरण मागसलेल्या संस्थानिकांस ह्या सभेंत वरचेवर गांठी पडल्यानें साहजिकच करावेंसें वाटणार आहे. तसेंच ह्या सुधारणेमुळें संस्थानिकांस कांहीं बाबतींत ब्रिटिश कारभारांत मत देण्याचा अधिकार प्राप्त झालेला आहे. त्यामुळें ब्रिटिश हद्दींतील लोकांचेंहि संस्थानांकडे लक्ष जास्त लागणार आहे. ह्या एकंदर गोष्टींपासून ब्रिटिश इंडिया व संस्थानें यांचे संबंध जास्त निगडित होणार आहेत. यामुळें जसजशा सुधारणा ब्रिटिश इंडियामध्यें होतील तसतशा संस्थानांतहि होतील व जीं संस्थानें प्रगमनशील आहेत त्यांत तर ब्रिटिश इंडियापेक्षांहि लौकर होतील.

म्हणून ह्या सर्व गोष्टींवरून आपल्या प्रजेच्या दृष्टीनेंहि लढाईंत जय मिळाला हें तुम्हांस फायदेशीर आहे. म्हणूनसुद्धां आपण ह्या लढाईच्या जयाबद्दल ईश्वराचे ऋणी असलें पाहिजे व आपल्या इंग्रज सरकारास जय आल्याबद्दल त्यांचें अभिनंदनहि केलें पाहिजे.

येथें दुष्काळाचें उग्र स्वरूप दिवसेंदिवस जास्त भासूं लागलें आहे. त्यामुळें गरीब रयतेच्या स्थितीविषयीं अतिशय दुःख वाटत आहे. त्यांतले त्यांत समाधानाची गोष्ट ही कीं, परमपूज्य व प्रजेच्या कल्याणासंबंधीं अतिशय काळजी वाहणारे आमचे वडील हिज हायनेस श्रीमंत सरकारांना दुष्काळामुळें फार वाईट वाटत असून तत्संबंधीं रयतेचीं दुःखें शक्य तितकीं कमी करण्याचा प्रयत्न करीत आहेत; व त्यांनीं तुम्हांस कळविण्यास मला सांगितलें आहे कीं, पिकांचे मानानें सूट देण्याचा विचार चालू आहे व दुष्काळाप्रीत्यर्थ इतर जे उपाय ब्रिटिश हद्दींत योजतात ते शक्य तितके योजण्यांत येतील. ह्या सर्व गोष्टी बहुतेक घडून येतील अशी माझी खात्री आहे व त्याबद्दल आपण सर्वांनीं आमचे वडिलांचे मनःपूर्वक आभार मानून अत्यंत ऋणी असलें पाहिजे.

पुन्हां मानपत्र अर्पण केल्याबद्दल आपले आभार मानल्यावांचून राहवत नाहीं. आजचा समारंभ माझ्या स्मरणांतून कधींहि जावयाचा नाहीं. माझा प्रवास लोकांच्या अंतःकरणपूर्वक स्वागतानें व तसेंच ह्या तालुक्यांतील मामलेदार, फौजदार, वगैरे अम्मलदारांच्या दक्षतेनें सुखावह झाला याजबद्दल मी येथें आपला संतोष व्यक्त करून आपली रजा घेतों.

## परिशिष्ट झ

'श्रीरामक्रीडाभुवन' ( Tennis Court ) उद्घाटनसमारंभाच्या वेळचें श्रीमंतांचें भाषण

ता. ८-११-१९१५

श्रीमंत बाळासाहेब गांडेकर, रा. रा. नानासाहेब धायगुडे व इतर सभ्य गृहस्थहो,

मला तुम्हीं आजच्या समारंभाला बोलाविलें व प्रेसिडेंट नेमून माझे हस्तें अधिवेशनसमारंभ साजरा करण्याचा जो बहुमान दिला त्याबद्दल तुम्हां सर्वांचा मी आभारी आहें. वास्तविक पाहतां आजचा समारंभ माझे हस्तें न होतां माझे परमपूज्य वडील श्रीमंत सरकार यांचे हस्तें व्हावयास पाहिजे होता. परंतु मीं हा समारंभ साजरा करावा असा त्यांचा मनोदय मला रा. रा. नानासाहेब धायगुडे यांनीं कळविल्यामुळें वडिलांची आज्ञा पाळणें व सर्व जनतेच्या योग्य विनंतीस मान देणें हा माझा धर्म आहे असें समजून मी हा समारंभ साजरा करीत आहें. आतां समारंभ म्हणजे कोणतेहि असले तरी ते चांगलेच असतात व ते होत असतांना करणाऱ्याच्या मनास आनंद, समाधान होत असतेंच; परंतु आज माझ्या मनास विशेष आनंद होत आहे. त्याचें मुख्य कारण म्हणजे ज्या संस्थेसंबंधीं हा समारंभ होत आहे ती संस्था लोकोपयोगी असून ती लोकांनीं तयार केली असून लोकाश्रयाचे जोरावर लोकांकडून चालावयाची आहे. कारण कोणतीहि संस्था, ती लहान अथवा मोठी असो, सामाजिक असो अथवा राजकीय असो, धार्मिक असो अथवा औद्योगिक असो, ती जितक्या प्रमाणावर लोकांकडून चालेल तितक्या प्रमाणावर ती खरी यशस्वी, टिकाऊ व सर्वांगसुंदर बनते असा सर्वत्र अनुभव आहे; व हाच अनुभव याच कोर्टाच्या

इतिहासावरून सर्वांच्या निदर्शनास आला आहे व येईल. शिवाय हा खेळ पाश्चिमात्य आहे. तो ज्याअर्थी आपण उचलला आहे त्याअर्थी त्या लोकांच्या सर्व यशाची व अभ्युदयाची जी गुरुकिल्ली तीहि शक्य तितकी मिळावी ह्याचा हलके हलके प्रयत्न केला पाहिजे. ती गुरुकिल्ली म्हणजे स्वावलंबन. कोणत्याहि मोठ्या कार्यास आरंभीं संस्थानाकडून उपक्रम होणें व साहाय्य होणें हें आवश्यक आहे. परंतु हें साहाय्य म्हणजे लहान मुलास ज्याप्रमाणें चालण्याकरितां कांहीं दिवस पांगुळगाड्याचा आश्रय करावा लागतो त्याप्रमाणें असलें पाहिजे.

आतां प्रस्तुत विषयाकडे वळूं. टेनिस हा खेळ पाश्चिमात्य आहे हें वर मीं सांगितलेंच आहे.

खर्चाच्या दृष्टीनें हा खेळ बराच महागाईचा आहे. तेव्हां कांहीं लोक असें म्हणतील कीं, आपल्याकडे थोड्या किंमतींत नाना प्रकारचे खेळ होण्यासारखे आहेत, तर हा एवढा महागाईचा खेळ येथें सुरू कां केला ? तर या खेळापासून आपल्या खेळांत होणारे व्यायामादि फायदे होऊन शिवाय दुसरेहि बहुमोल फायदे होत असतात व त्या फायद्यांची आपणास सध्यां व पुढेंहि फार जरुरी आहे.

१. या खेळामध्यें एक प्रकारची शिस्त आहे. तेव्हां शिस्तीनें व पद्धतपूर्वक एखादें काम कसें करावें ही गोष्ट आपणांस या खेळापासून शिकतां येते.

२. दुसरा फायदा, एखादें काम एकमेकांचे विचारानें व परस्पर मदतीनें कसें करावें हें ह्या खेळापासून चांगलें शिकतां येतें.

३. तिसरा फायदा, दुसऱ्याकरितां आपणांला कांहीं तरी आर्थिक, शारीरिक व मानसिक झीज सोसली पाहिजे ही जाणीव उत्पन्न होते. म्हणजे साम्राज्याकरितां आपण स्वार्थत्याग करण्यास शिकतों.

४. चवथा फायदा, बहुमतापुढें आपलें मत एका बाजूस ठेवून समाजाचें कल्याण करण्याकरितां झटणें.

हे चार फायदे माझ्या मतें ठळक व आपणां सर्वांस नेहमीं लागणारे असल्यामुळें ते ह्यापासून शिकतां येण्यासारखे आहेत. तरी ही संस्था स्थापन करण्याचा मुख्य हेतु जरी रोज ज्यांना जशी व जेव्हां सवड सांपडेल तेव्हां

येथें येऊन व्यायाम घ्यावा हा आहे तरी पण विशेष हेतु म्हणजे वरील गुण आपल्या अंगांत आणण्याचा प्रत्येकानें प्रयत्न करणें हा होय. तसेंच नेहमीं सर्वांनीं एकत्र जमून एकमेकांच्या नानाप्रकारचे विषयांवरील आपल्या विचारांचा फायदा देण्यास संधि व स्थळ मिळावें हाहि आहे. तरी हे वरील सर्व हेतु सिद्ध झाले म्हणजे ही संस्था स्थापन केल्याचें खरें चीज झालें असें मी समजेन.

या संस्थेतर्फे मी कायमचा अध्यक्ष व्हावें म्हणून मला आग्रहाची विनंति करण्यांत आली आहे. याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. परंतु माझी अशी उलट इच्छा आहे कीं, अशा संस्था माझा प्रत्यक्ष संबंध असल्यावांचून चालाव्यात. म्हणून एक वर्षपर्यंतच आज मी अध्यक्ष होण्याचें कबूल करितों.

आतां शेवटीं ज्या ज्या लोकांनीं आपल्या शक्तीप्रमाणें द्रव्यद्वारां म्हणा अगर इतर गोष्टीनें म्हणा साहाय्य केलें आहे त्यांचे मी आपल्या स्वतःतर्फे आभार मानतों.

शेवटीं मला एक गोष्ट सांगितल्यावांचून राहवत नाहीं. ती ही कीं, या संस्थेच्या कामांत नानाप्रकारच्या अडचणी आल्या असतां त्या न जुमानतां संस्थेस हें स्वरूप आणण्याचें मुख्य श्रेय रा. रा. भाऊसाहेब मुनसब, रा. रा. दिवाण डॉक्टर व रा. रा. जोशी हेडमास्तर, रा. रा. नरहर गोपाळ आंबेकर व रा. रा. श्रीपाद केशव भिडे यांस आहे व त्यांना असेंच वरचेवर लोकोपयोगी काम करण्यास उत्तेजन यावें व लोकांनींहि असेंच आपल्या पायांवर उभें राहण्यास शिकावें म्हणून पूर्वीं मीं कबूल केलेली रक्कम रुपये १०० देऊनहि आणखी दोनशें रुपयांची रक्कम या संस्थेस देण्यास मला संतोष वाटतो. एवढें सांगून मला येथें बोलावून माझा गौरव केल्याबद्दल मी या संस्थेचे व सर्वांचे आभार मानतों व खेळण्यास कोर्ट खुलें केलें आहे म्हणून जाहीर करतों.

## परिशिष्ट अ

श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालयाचा उद्घाटनसमारंभ ता. ९ जून सन १९१८ इसवी रोजीं श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें झाला, त्या वेळीं त्यांनीं केलेलें भाषण:—

आपण सर्वांनीं मिळून हें वाचनालय अनावृत्त करण्याची स्फूर्तिदायक कामगिरी मजकडे सोंपवून माझा जो गौरव केला त्याबद्दल मी आपणां सर्वांचा फार आभारी आहें. पहिल्या प्रथम हिज हायनेस श्रीमंत सरकार आमचे परम-पूज्य वडील यांचे या कार्यास अनुकूलता असल्याबद्दल आपण सर्वांनीं आभार मानणें अगत्याचें आहे. तसेंच मि. वेस्ट्रॉपसाहेब, आपले कर्तव्यदक्ष हल्लींचे पो. ए., यांचेहि आपण ऋणी असलें पाहिजे. कारण त्यांनीं गेल्या जानेवारी महिन्यांत वाचनाल्यासंबंधीं जें स्फूर्तिदायक भाषण केलें तें केलें नसतें तर आजचा सुयोग आला नसता. मी जी कांहीं वर्गणी व पुस्तकें दिलीं त्याबद्दल श्रीरामक्रीडाभुवनाचे लोकांनीं जे एवढे प्रशंसापर उद्गार काढले ते सर्वस्वीं योग्य आहेत असें मला वाटत नाहीं. कारण आमच्या सारख्यांनीं अशा गोष्टी करणें म्हणजे कांहीं विशेष केलें असें होत नाहीं. कारण धार्मिक दृष्टया पाहतां अध्ययन आणि अध्यापन हीं ब्राह्मणांचीं आद्य कर्तव्यें आहेत. तेव्हां वाचनालयद्वारां विद्या देणें हें माझें आद्य कर्तव्य आहे. दुसरें, आर्थिक दृष्टया विचार करतां विद्याधन हें दुसऱ्यास दिलें असतां त्यांत माझा फायदा आहे. कारण विद्याधन हें ' व्यये कृते वर्धत एव नित्यम् ' असें आहे. तिसरें, नैतिक दृष्टया पाहतां प्रजेकडून आलेल्या पैशांतील बराचसा पैसा प्रजेच्याच कल्याणा-करितां खर्च झाला पाहिजे, व तसें तें न करणें म्हणजेच कृतघ्नपणा आहे असें मला वाटतें. आणि प्रजेला शिक्षण देणें हें तिचें सर्वोत्कृष्ट कल्याण करणें होय. तेव्हां कोणत्याहि बाजूनें विचार केला तरी मी कर्तव्यापेक्षां जास्त केलें असें होत नाहीं. खरें म्हटलें म्हणजे माझ्या हातून लोकांकरितां पुष्कळ गोष्टी व्हावयास पाहिजेत व व्हाव्यात अशी मला फार इच्छा आहे. परंतु त्या गोष्टी सफल होण्यास पुष्कळशा इतर गोष्टी अनुकूल लागतात, ही गोष्ट आपण विसरतां कामा नये. आतां ज्या लोकांची आर्थिक दृष्टया फार निकृष्ट स्थिति

असूनहि त्यांनीं केवळ लोकोपयोगी व शिक्षणविषयक संस्था याच गोष्टी मनांत घेऊन आपल्या ऐपतीपेक्षांहि जास्त मदत केली आहे त्यांचे सकौतुक आभार मानणें या प्रसंगीं योग्य आहे असें मला वाटतें. त्याचप्रमाणें ज्या लोकांनीं अद्यापपर्यंत मदत केली नाहीं ते आतां मदत करतील अशी मला पूर्ण आशा आहे.

दुसऱ्या एका गोष्टीबद्दल श्रीरामक्रीडाभुवन मंडळींच्या अंत:स्फूर्तीचें कौतुक करून त्यांचे आभार मानणें जरूरीचें आहे. ती गोष्ट सदरहू वाचनालयास आमच्या प्रथम कुटुंबाचें नांव देणें ही होय. या संस्थेस नांव देऊन आमच्या कुटुंबाचें नांव चिरस्मरणीय करण्याकरितां सर्व लोकांचें व माझें त्यांच्यावर प्रेम कशा प्रकारचें होतें हें मंडळींनीं व्यक्त केल्याबद्दल मला फार आनंद होत आहे. सांसारिक दृष्टीनें सुखाची परमावधि म्हणजे आपणांस कुटुंब अनुरूप मिळणें ही होय; व तसें तें होतेंहि. आपणां सर्वांस माहित असल्यामुळें व आपल्या समाजाच्या चालीरीतींस अनुसरून त्यांच्या गुणांचें विशेष पाल्हाळिक वर्णन न करतां आमचे परस्परांचे संबंध कशा प्रकारचे होते व त्यांचे निधनानंतर मला किती दु:ख झालें हें मी आपल्या भाषेंत न सांगतां कविकुलगुरु कालिदास व श्रीभवभूति यांचे शब्दांत सांगतों.

गृहिणी सचिव: सखी मिथ: प्रियशिष्या ललिते कलाविधौ ।
करुणा विमुखेन मृत्युना हरता त्वां वद किं न मे हृतम् ।
दु:खसंवेदनायैव रामे चैतन्यमर्पितम् ।
मर्मोपघातिभि: प्राणैर्वज्रकीलायितं हृदि ।

तेव्हां अशा आमच्या प्रिय पत्नीचें योग्य स्मारक आपल्या राजधानींत तुमचेकडून होत आहे हें पाहून मला किती आनंद होत आहे हें शब्दांनीं सांगणें अशक्य आहे; व त्याबद्दल तुमचे कशा प्रकारें आभार मानावेत हें मला समजत नाहीं.

आतां आपण प्रस्तुत विषय जो वाचनालय त्याचा सांगोपांग रीतीनें विचार करूं. तो करण्याचा मुख्य हेतु हा कीं, येथील कांहीं लोकांस वाचनालयाची उणीव अद्यापहि भासत नाहीं ती त्यांना भासवूं लावणें हा होय. वैद्याचें काम रोग बरा करणें हें असूनहि रोग्यास रुग्णावस्था पटविणें हें आहे.

कारण कित्येक रोग फारच अल्प प्रमाणांत जडत असल्यामुळें दीर्घकाल संवयी-मुळें रोग्यास कळून येत नाहींत. तेव्हां असे रोग वैद्यानें रोग्याचे हिता-करितांच त्यांचे नजरेस आणावे लागतात. कारण रोग लक्षांत आल्याखेरीज तो नाहींसा करण्याचा प्रयत्न रोगी करणार नाहीं. अशांतलीच सांप्रतच्या कांहीं लोकांची स्थिति आहे. सबब त्यांचेकरितां मी वाचनालयासंबंधानें थोडक्यांत दोन शब्द सांगण्याची परवानगी घेतों. मनुष्यामध्यें व इतर प्राण्यां-मध्यें जो मुख्य भेद आहे तो हा कीं, मनुष्यामध्यें ज्ञानार्जनशक्ति आहे व ती इतरांमध्यें नाहीं. मनुष्यप्राणी जर ईश्वरानें उत्पन्न केला नसता किंवा त्याला ज्ञान प्राप्त करून घेण्याची बुद्धि दिली नसती तर जगांत जे आज फेरफार दिसत आहेत ते झाले नसते. मनुष्याच्या ज्ञानानें त्यास आज पंचमहाभूतांवरहि बऱ्याच अंशानें ताबा चालवितां आला म्हणून Knowledge is power अशी म्हण प्रचारांत आली. ह्या शक्तीची परमावधि ईश्वरामध्यें होते, म्हणूनच मनुष्या-खेरीज इतर प्राण्यांस ईश्वरत्व प्राप्त करून घेतां येत नाहीं. अतएव मनुष्यास Man is the Image of God असें म्हणतात. आणि ईश्वर कसा आहे, तर "ज्ञानमयोऽसि विज्ञानमयोऽसि" असें उपनिषदांत म्हटलें आहे. ह्यावरून मनुष्य, ज्ञान आणि ईश्वर यांचे कसे संबंध व ऐक्य आहे हें लक्षांत येईल. अशा प्रकारचें ज्ञान फार अगाध आहे. तें एका मनुष्यास एका पिढीस किंवा एका राष्ट्रास मिळविणें अशक्य आहे. तें अनेक राष्ट्रांचे अनेकजन्मसंसिद्धीं-पैकीं एक आहे. तेव्हां तें प्रत्येकानें मिळविलें पाहिजे; तें ग्रंथरूपांत सांठवून ठेविलें पाहिजे व त्याचा दुसऱ्यांनीं उपयोग करून घेऊन पुन्हा त्यामध्यें भर घातली पाहिजे. खरोखरीच ज्ञानाचा महिमा फार अगाध आहे. त्याचें वर्णन मीं करण्यापेक्षां संस्कृत कवींनींच केलेलें आपणांस वाचून दाखविल्यास पटेल.

मातेव रक्षति पितेव हिते नियुंक्ते ।
कान्तेव चापि रमयत्यपनीय खेदं ।
लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिं ।
किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ।।

म्हणून आपणां सर्वांस फार मोठें होणें शक्य नसलें तरी आपणास जर ज्ञान असलें तर ज्ञान नसल्यापेक्षां आपणांस आपलें नेहमींचें काम जास्त

चित्रांक



वेरुळच्या लेणींतील इंद्राची मूर्ति

चांगल्या तऱ्हेनें करतां येईल; व आपली जगाच्या नियमाकडे लक्ष देऊन जास्त समाधानवृत्ति राहील.

अशा रीतीनें आजपर्यंत हजारों वर्षे अनेक राष्ट्रें खटपट करून जें ज्ञान संपादन करून आपणांकरितां व पुढील पिढीकरितां ग्रन्थरूपानें सांठवीत आलीं आहेत त्या ग्रंथांचा व वाचनालयांचा महिमा जितका वर्णन करावा तितका थोडाच आहे. आतां कोणी म्हणेल कीं ज्ञान पुस्तक-वाचनानें होतें तर तें आम्ही व्यक्तिशः पुस्तकें विकत घेऊन घरोघरीं वाचूं व मिळवूं. त्यास वाचनालया-सारखी एवढी संस्था कशास पाहिजे? परंतु त्यांनीं जर खालील गोष्टींकडे लक्ष दिलें तर त्यांना सुद्धां वाचनालयापासून जास्त फायदे होतात हें त्यांचे लक्षांत येईल. थोड्या खर्चांत फारच मौल्यवान् असंख्य ग्रंथ एखाद्या निष्कृष्ट स्थितींतील मनुष्यास सुद्धां वाचावयास मिळतात; व तेणेंकरून त्याला आपली ज्ञानलालसा तृप्त करून घेतां येते. शिवाय एके ठिकाणीं अनेक विद्वान् मंडळींच्या गांठी पडून एकमेकांच्या ज्ञानाचा एकमेकांस अल्पायासानें थोड्या वेळांत फायदा करून घेतां येतो. एखाद्या विषयावर उत्तम ग्रंथ कोणते व किती आहेत, तें एखाद्या विषयाचा नूतन अभ्यास करणाऱ्या इसमास सहज कळून येतें व त्याचा उपयोग त्यांना अल्प खर्चानें करतां येतो.

अशा ठिकाणीं गेल्यानें कोणी पुस्तकें वाचीत आहेत, कोणी वर्तमानपत्रें वाचीत आहेत, चोहोंकडे पुस्तकें, वर्तमानपत्रें, नकाशे वगैरे ज्ञानार्जनाचीं साधनें ठेविलेलीं आहेत तीं पाहून आपणांसहि ज्ञान प्राप्त करून घेण्याची लालसा उत्पन्न होते व ती तृप्त करून घेण्याच्या उद्योगास आपण लागतों. शिवाय 'काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्' या श्लोकाप्रमाणें आपला कंटाळवाणा व फुरसतीचा वेळ उत्तम रीतीनें अशा ठिकाणीं जातो.

प्रत्येक सुधारलेल्या देशांत वाचनालयें ठिकठिकाणीं स्थापन करणें हें अत्यावश्यक गणलें जातें. कारण सर्व प्रकारच्या सुधारणांचा शिक्षण हा एक पाया आहे असें सर्व विद्वानांचें मत आहे; व अशा प्रकारची संस्था ही शिक्षण देण्याचें उत्तम साधन आहे. जरी आजमितीस येथील वाचनालय मोठ्या प्रमाणावर नसलें तरी घरीं पुस्तकें वाचण्यापेक्षां वाचनालयापासून जास्त फायदा

होणार आहे. आतां वाचनालयांत गेल्यानंतर काय वाचावें याबद्दल माझें काय मत आहे तें सांगतों.

वाचनालयांत मुख्यत्वेंकरून दोन प्रकारची वाचनसामग्री असते, पुस्तकें, वर्तमानपत्रें व मासिकें. पुस्तकांमध्यें दोन प्रकार आहेत, एक ( Higher literature ) उच्च दर्जाचें वाङ्मय, व दुसरें ( Light literature ) कनिष्ठ दर्जाचें वाङ्मय. ज्या व्यक्तीस एखाद्या विषयाची पूर्ण माहिती करून ध्यावयाची आहे त्याला उच्च दर्जाच्या वाङ्मयाचा जास्त उपयोग होतो; व त्यांतले त्यांत त्या विषयासबंधीं ज्या ग्रंथांची विशेष प्रशंसा झाली असेल तेच वाचले म्हणजे विनाकारण वेळ व श्रम व्यर्थ न जातां त्या मनुष्यास त्या विषयांत प्रावीण्य मिळवितां येतें.

कनिष्ठ दर्जाचे वाङ्मयांत वर्तमानपत्रें, कादंबऱ्या व मासिकें वगैरेंचा समावेश होतो. ह्या वर्गांतील पुस्तकांत कांहीं पुस्तकें केवळ करमणुकीचीं असतात व कांहीं विशिष्ट ज्ञानपर करमणुकीचीं असतात. दुसऱ्या वर्गांत ऐतिहासिक, सामाजिक कादंबऱ्या वगैरेंचा समावेश होतो. त्यांच्या वाचनानें करमणूक होऊन विशिष्ट स्थल व कालाचा इतिहास व सामाजिक माहितीचें ज्ञान होतें. ह्या वर्गांत Scott's novels व आपलेकडील हरि नारायण आपटे यांच्या उष:काल, मधली स्थिति, चंद्रगुप्त वगैरे कादंबऱ्यांचा समावेश होतो. अशा प्रकारच्या वाङ्मयाचा विशेषेंकरून ज्या लोकांस मानसिक श्रम जास्त होत असल्यानें उच्च दर्जाच्या वाङ्मयानें प्रकृतीस अपाय होतो अशांना उपयोग होतो. त्याचप्रमाणें रोज थोडेंसें वर्तमानपत्रांचें वाचनहि फार फायदेशीर होतें. कारण आजमितीस जगांत काय काय घडामोडी होत आहेत हें कळणें अत्यावश्यक आहे. कारण तें कळलें असतां आपली व आपल्या देशाची काय स्थिति आहे याचा तुलनात्मक दृष्टीनें विचार करतां येतो; व असें करण्यांत आपल्या उणीवा, दोष, गुण कळून येऊन सुधारण्यास काय काय उपाय योजले पाहिजेत हें कळतें. त्याचप्रमाणें आजच्या स्थितीची परंपरा प्राचीन काळापर्यंत भिडवून त्यापासून ऐतिहासिक सत्यें काढतां येतात व त्याप्रमाणें वागून आपला फायदा करून घेतां येतो. कारण नेहमीं इतिहासाची पुनरावृत्तीच होत असते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. परंतु पुष्कळच वेळपर्यंत वर्तमानपत्रें व मासिकें वाचणें म्हणजे

कालाचा अपव्यय करणें होय. कारण जशीं इंग्लंड, अमेरिका वगैरे सुधारलेल्या राष्ट्रांत एकेका विषयासंबंधानेंच वर्तमानपत्रें व मासिकें निघतात तशीं इकडे फारच क्वचित् निघतात. या वाचनालयासंबंधानें काय अंतिम हेतु ठेवावयाचा याविषयीं दोन शब्द सांगून मी आपलें भाषण संपवितों.

या वाचनालयांत एक मोठी उणीव माझ्या दृष्टीनें राहिली आहे व ती परिस्थित्यनुरूप शक्य तितकी लवकर दूर होईल अशी मी आशा करितों. ती उणीव दूर करण्याकरितां श्रीरामक्रीडाभुवनाच्या सभासदांचा मला पाठिंबा आहे, याबद्दल मला फार संतोष वाटतो. ती उणीव ही कीं, ज्याअर्थी या वाचनालयास स्त्रीचें नांव देण्यांत आलें आहे त्याअर्थी साहजिकपणें स्त्रियांचा ह्या संस्थेवर जास्त हक्क आहे व तो असणें स्वाभाविक आहे. पुरुषांप्रमाणें स्त्रियाहि सुशिक्षित होणें किती आवश्यक आहे हें आतां मीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. कारण लहानपणीं जे मुलांच्या मनावर संस्कार होतात तेच टिकाऊ असतात व त्यांवरच त्यांचे भावी आयुष्यक्रम अवलंबून असतात. तेव्हां मुलांच्या मनावर बरे वाईट संस्कार होणें हें त्यांच्या आयांवर अवलंबून आहे, व म्हणूनच आया सुशिक्षित असणें महत्त्वाचें आहे. त्यांना शिक्षण देणें फार जरुरीचें आहे. आयांना शिक्षण चांगलें मिळालें म्हणजे त्यांचीं मुलें पुढें कशीं मोठ्या पदास चढतात हें शिवाजीमहाराज व नेपोलिअन बोनापार्ट यांचे चरित्रांवरून स्पष्ट होत आहे. वरील थोर विभूतींनीं आपण होऊन स्पष्ट म्हटलें आहे कीं, आमच्या मोठेपणाचें कारण आमच्या मातोश्रींनीं आम्हांस दिलेलें शिक्षण हें होय. देश चांगल्या, उच्च स्थितीस येण्यास आपल्या पुढील पिढ्या चांगल्या निपजल्या पाहिजेत, व तसें होण्यास स्त्रीवर्ग उत्तम सुशिक्षित झाला पाहिजे. म्हणून त्या वर्गास या संस्थेचा फायदा करून देण्यास सांपडलें पाहिजे. म्हणून जे लोक वाचनालयाचे सभासद आहेत, त्यांच्या स्त्रियांस या संस्थेचा फायदा घेण्यास परवानगी दिली म्हणजे लोकांवर जास्त खर्चाचा बोजा न पडतां इष्ट हेतु साध्य होईल. परंतु हा इष्ट हेतु सिद्धीस जाण्यास खर्चापेक्षांहि आपली सांप्रतची समाजबंधनाची विशेष अडचण आहे. तेव्हां ती अडचण हलके हलके परिस्थितीनुसार थोडें धैर्य धरून आपणच दूर केली

पाहिजे. ती तशी दूर झाली म्हणजे आपल्या स्त्री-समाजास अशा संस्थेचा पूर्ण फायदा करून घेतां येईल.

दुसरी एक सूचना सभासदांस करावयाची ती ही कीं, ज्या गृहस्थांनीं जीं पुस्तकें वाचलीं असतील त्यांचें त्यांनीं मार्मिक दृष्टीनें विवेचन करून लोकांस सांगण्याचा परिपाठ ठेवावा. म्हणजे पुष्कळ ग्रंथांची थोड्या वेळांत पुष्कळ लोकांस माहिती होऊन वाचणारांना सुद्धां पुस्तकवाचनाचें व्यवस्थित वळण लागेल.

माझी तिसरी सूचना अशी आहे कीं, ह्या वाचनालयांत दुसरे नैतिक दृष्ट्या बाध न येणारे असे करमणुकीचे प्रकार हलके हलके सुरू करावेत. म्हणजे आपल्या ह्या एकंदर संस्थेस Recreation Club चें स्वरूप प्राप्त होऊन ती पूर्णपणें मोहक बनेल, व असें झालें म्हणजे संध्याकाळ केव्हां होते व आपण या संस्थेंत जातों केव्हां असें रोज प्रत्येकास वाटूं लागेल.

ह्या माझ्या वैयक्तिक सूचना आहेत. त्यांचा लोकांनीं नीट विचार करावा. त्या पसंत होऊन लोकांनीं मनांत आणल्यास त्या अंमलांत आणण्यास सांप्रतची परिस्थितीहि बऱ्याच अंशीं अनुकूल आहे. मनुष्यापुढें नेहमीं उच्च ध्येय पाहिजे. अल्पसंतोषीपणा ज्ञानाचे कामांत केव्हांहि चांगला नाहीं. इंग्रजींत अशी म्हण आहे कीं, 'Low aim is but a crime,' हीन ध्येय हा एक गुन्हा आहे. तेव्हां आपल्या संस्थेसंबंधीं आपलें ध्येय सर्वोत्कृष्ट व सर्वांगसुंदर असणें जरूर आहे. योग्य परिस्थिति येतांच वाचनालयाच्या शाखा सर्व संस्थानांत स्थापन होऊन त्या सर्व मोफत होऊन बडोदें संस्थानांत जशी Circulating Library ची स्थापना झाली आहे तशी येथेंहि स्थापन होण्याची व्यवस्था ईशकृपेनें लवकर होवो अशी श्रीजगन्नियंत्या परमेश्वराची प्रार्थना करून हें वाचनालय खुलें झालें आहे असें आम्ही जाहीर करतों.

# परिशिष्ट ट

भारत इतिहास संशोधक मंडळाच्या इमारतीचें पश्चिम दालन उघडण्याचा समारंभ ता. २० मे १९१९ इ. रोजीं श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव, संस्थान भोर, यांचे हस्तें झाला. त्या वेळीं त्यांनीं केलेलें भाषण:---

रावबहादुर वैद्य व इतर सभ्य गृहस्थहो,

आज रोजीं आपण येथें कां जमलों आहों याचें कारण रावबहादुर वैद्यांनीं आपणांस निवेदन केलेंच आहे. आजच्या शुभ प्रसंगीं भारत इतिहास संशोधक मंडळानें बांधलेल्या इमारतीचा प्रवेशसमारंभ करण्यासंबंधानें मजला केलेल्या आज्ञेस अनुसरून मी आज येथें हजर राहिलों आहें.

आजपर्यंत इतिहाससंशोधनाच्या कामीं ज्यांनीं अव्याहत परिश्रम केले आहेत असे अधिकारी पुरुष आजच्या महत्त्वाच्या कामगिरीस सर्वपरीनें लायक असतां ती कामगिरी मजकडे कां सोंपविण्यांत आली तें मजला समजत नाहीं.

ज्या अधिकारी पुरुषांचा मीं उल्लेख केला ते विद्वत्तेमध्यें व इतिहासाच्या ज्ञानामध्यें मजपेक्षां कितीतरी पटींनीं श्रेष्ठ आहेत. शिवाय त्यांनीं द्रव्यरूपानें व पुस्तकरूपानें संस्थेस वेळोवेळीं जी मदत केली आहे तशा प्रकारची मदत मजकडून झाली नाहीं. याप्रमाणें सर्व बाजूंनीं मजमध्यें वैगुण्य असतां आजच्या महत्त्वाच्या कामीं माझी योजना झाली याबद्दल मीं मंडळाचे आभार मानावेत तितके थोडेच होणार आहेत. माझ्या समजुतीनें माझ्यावर ही कामगिरी सोंपविण्याचा मंडळाचा हेतु इतकाच असावा कीं, आजपर्यंत मीं इतिहासामध्यें विशेष लक्ष घातलें नव्हतें व तें मला घालण्यास भाग पाडावें, एवढ्याच हेतुस्तव आजच्या कामीं माझी योजना झाली आहे; व येवढाच हेतु असेल तर आपल्या सामर्थ्याप्रमाणें द्रव्यद्वारा व शरीरद्वारा इतिहासदेवीचें अर्चन करण्याचें मी अभिवचन देतों. देशहिताच्या प्रगतीचें कोणतेंहि कार्य कोणत्याहि व्यक्तीवर पडलें तर त्या व्यक्तीनें तें करण्याचें टाळूं नये, व आपल्या सामर्थ्याप्रमाणें तें पार पाडावें हें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे. त्यास अनुसरून मीं हें काम करण्याचें कबूल केलें आहे. तरी मंडळी मजकडून हें काम करवून घेतील अशी मला आशा आहे.

आजचा प्रवेशसमारंभ करण्यापूर्वीं इतिहासाचें महत्त्व काय आहे व या संस्थेनें कोणती कामगिरी केली, यासंबंधानें माझे वेडेवाकडे विचार मी आपल्यापुढें मांडणार आहें. वरील विषयासंबंधानें मजपेक्षां आपणांपैकीं बऱ्याच जणांस पुष्कळ माहिती असेल; तथापि आजचे प्रसंगास अनुसरून मीं आपली माहिती आपल्यापुढें सादर केल्यास तें करणें अप्रस्तुत न होतां माझ्या कर्तव्या-पैकीं एक भाग आहे असें माझ्याप्रमाणें आपणहि मानाल अशी मला पूर्ण उमेद आहे. माझें भाषण वक्तृत्वपूर्ण, विद्वत्ताप्रचुर होणार नाहीं हें मी जाणून आहें. तथापि आपण तें प्रेमानें गोड करून घ्यावें अशी आपणांस पुन्हां एकवार विनंति करून मी आजच्या विषयाकडे वळतों.

## इतिहास म्हणजे काय ?

इतिहास हा शब्द इति-ह-आस या संस्कृत शब्दांचा संधि होऊन झालेला आहे, व याचा अर्थ, असें असें होतें व होऊन गेलें, असा आहे. परंतु या अर्थावरूनच विषयाचा पूर्ण बोध होत नाहीं. संस्कृत भाषेंत इतिहास या शब्दाची व्याख्या दिली आहे ती अशी:—

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितम् ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्ष्यते ।।

या व्याख्येप्रमाणें इतिहास म्हणजे पूर्वकालीं घडलेल्या गोष्टींचें सांगोपांग वर्णन असून चतुर्विध पुरुषार्थ साधण्यासाठीं उपदेशपर असा रचिलेला प्रबंध. यावरूनच इतिहासास धार्मिक स्वरूप प्राप्त होऊन त्याचेसंबंधानें पावित्र्याची भावना आर्यांत होती. परंतु प्रस्तुत कालीं इतिहास याचा अर्थ धार्मिक स्वरूपाचा प्रबंध असा करण्यांत येत नाहीं. पाश्चात्यांच्या देशांत इतिहासास History असें म्हणतात. History हा शब्द ग्रीक भाषेंतील धातूपासून झाला असून त्या धातूचा अर्थ 'शोध करून मिळविलेली माहिती' असा आहे. प्राचीन ग्रीस, इटली आणि अलीकडे प्रसिद्धीस आलेलीं पाश्चात्य राष्ट्रें यांत वरील अर्थास अनुसरून इतिहासाची रचना झाली आहे. प्रथम History शब्दाचा अर्थ गतकालीं घडलेल्या गोष्टींचें वर्णनपर लेखी टिपण असाच होता. परंतु कालांतरानें इतिहास या शब्दाच्या अर्थाची कल्पना व्यापक होत गेली.

प्रचलित कालीं ती व्यापक कल्पना काय स्वरूपाची आहे हें पुढें दिलेल्या व्याख्येवरून समजून येणार आहे.

"History (of which biography is a part) covers all that man has thought and felt and said and planned and achieved. It is the best mirror of human nature; it describes human nature not as we fancy it but as it is. It reveals to us not only what has been, but how that, which is, has come to be, what it is. It helps to explain to us, our generation as well as those that have gone before." —James Bryce.

ही व्याख्या यथार्थ असली तरी तीमुळें इतिहास या शब्दांत किती अर्थ भरला आहे याचा सहज बोध होत नाहीं. यापेक्षां इतिहासाची खुलासेवार व्याख्या कोलब्रुक यांनीं दिलेली आहे.

"In speaking of history, I do not refer merely to the succession of political struggles, national conflicts and warlike achievements, but rather to less conspicuous yet more important occurrences, which directly concern the structure of society; the civil institutions of nations; their internal, more than their external, relations; and the yet less prominent but more momentous events, which affect society universally and advance it in the scales of civilized life. It is the history of the human mind, which is most diligently to be investigated; the discoveries of the wise, the inventions of the ingenious and the contrivances of the skilful."

अर्थपूर्ण व विनोदपर इतिहासाची व्याख्या करूं म्हटलें तर इतिहास म्हणजे गतकालीन समाजाचा सिनेमांतील चित्रपट होय.

" केवळ राजकीय उलाढालींच्या वर्णनानें इतिहास परिपूर्ण होत नाहीं. राज्यव्यवस्था, धर्म, समाजभाषा, ग्रंथसंग्रह, व्यापार, इत्यादि अनेक विषयांचा विचार इतिहासांत आला पाहिजे. "—सरदेसाई—'मराठी रियासत'

## इतिहासाचा उपयोग

येथपर्यंत इतिहास म्हणजे काय व त्यांत कोणत्या विषयांचा अंतर्भाव होतो याचें विवेचन झालें. आतां इतिहासाचा उपयोग काय तें आपण पाहूं.

इतिहासाचा पहिला उपयोग भूतकाळीं या भूगोलावर घडलेल्या सर्व गोष्टींचें ज्ञान करून देणें हा होय. जर पूर्वीचा इतिहास अस्तित्वांत नसेल तर आपल्या देशासंबंधानें आपणांस कांहींच माहिती मिळणें शक्य होणार नाहीं. आपण कोण, पूर्वी कोठें होतों, आपली राज्यव्यवस्था व समाजव्यवस्था कशा प्रकारची होती, आपली उन्नति कीं अवनति होत आहे या गोष्टी इतिहासावांचून समजणार नाहींत. तसेंच जगांतील इतर देशांची दृश्यमान स्थिति साहजिक आहे अगर कांहीं विशिष्ट घडामोडींमुळें ती त्यास प्राप्त झाली आहे या प्रश्नाचेंहि समाधानकारक उत्तर इतिहासच देऊं शकेल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे इतिहास हा व्यक्तीस व राष्ट्रासहि पूर्वपरंपरा दाखवितो व पूर्वपरंपरेचें ज्ञान सर्वांस आवश्यक असून त्याच्या अभावीं कोणाहि व्यक्तीस, समाजास किंवा राष्ट्रास आपली उन्नति करून घेण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न होणार नाहीं. ज्याला महत्त्वाकांक्षा नाहीं म्हणजे जो प्राप्त होईल त्या त्या स्थितींत पूर्ण समाधानानें राहत असेल ती व्यक्ती, समाज किंवा तें राष्ट्र प्राप्त वैभवाला आंचवेल इतकेंच नव्हे तर तें अधोगतीस जातां जातां अखेर नामशेषहि होऊन जाईल.

इतिहासाचा दुसरा उपयोग मानसिक उन्नति होणें हा होय. गत-कालीन थोर पुरुषांचीं चरित्रें अवलोकन केल्यानें त्यांच्या अंगचे कोणते विशिष्ट गुण होते व त्या योगानें त्यांनीं स्वतःची व ज्या राष्ट्रांत ते जन्मले त्या राष्ट्राची उन्नति कोणत्या मार्गानें केली, त्यांनीं आपलें ध्येय कसें हस्तगत केलें, या सर्व गोष्टी इतिहासानेंच कळतात. वारंवार थोर पुरुषांचीं चरित्रें वाचल्यानें मन जोरदार होऊन आत्मप्रत्यय वाढतो, थोर पुरुषांचें अनुकरण करण्याची बुद्धि उत्पन्न होते, महत्त्वाकांक्षा वाढते व मनुष्य उद्यमशील बनतो. या संबंधानें जूलियस सीझर, नेपोलियन, शिवाजी या त्रिवर्गांचीं चरित्रें लक्षांत घेतलीं म्हणजे वरील विवेचनाची सत्यता मनास सहज पटेल.

इतिहासाचा तिसरा उपयोग म्हणजे गतकालीन अनुभवानें पारखून निघालेलें व्यवहारज्ञान समवायानें मिळणें हा होय. पूर्वींच्या चालीरीति, समाज-व्यवस्था, राजकारण, कायदे वगैरे बाबतींत इतिहासांत सांठवून ठेवलेल्या अनुभवाचा फायदा घेतां येतो व अमुक परिस्थितींत राजानें प्रजेशीं कसें

वागावें, समाजव्यवस्था कशी असावी, व्यापार-धंदे उदीमास कसे आणावे वगैरे सर्व प्रकारच्या व्यावहारिक, सामाजिक व राजकीय बाबतींत इतिहास हा योग्य मार्गदर्शक आहे.

इतिहासाचा चवथा उपयोग मनोरंजन होय. मनुष्यानें आपल्या कल्पनेच्या कितीहि भराऱ्या मारल्या व काल्पनिक गोष्टी कितीहि रचिल्या तरी त्यामध्यें इतिहासाप्रमाणें साहजिक वैचित्र्य नसतें. कादंबऱ्या कांहीं काळपर्यंत मन रंजवितात, परंतु पुढें कंटाळवाण्या वाटतात, तसें इतिहासाचें नाहीं. त्यांतल्या त्यांत ऐतिहासिक कादंबरीइतकें कोणतेंच मनोरंजनाचें साधन नाहीं. आंग्ल ग्रंथकार सर वॉल्टर स्कॉट व फ्रेंच ग्रंथकार अलेक्झांडर ड्यूमा यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या प्रसिद्धच आहेत. त्याचप्रमाणें कै. हरिभाऊ आपटे यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या सरस वठल्या आहेत, व तितकीच सरस रा. ब. वैद्य यांची पानपतच्या युद्धासंबंधींची ऐतिहासिक कादंबरी ' दुर्दैवी रंगू ' वठलेली आहे. ऐतिहासिक कादंबरीनें मनोरंजन किती होतें तो अनुभव स्वसंवेद्य असल्यामुळें त्याबद्दल विशेष सांगण्याचें प्रयोजन नाहीं. याशिवाय इतिहासापासून होणारे अनेक फायदे आहेत. परंतु कालसंकोचास्तव त्याचा ऊहापोह येथें न करतां पुढील विषयाकडे वळतों. परंतु इतिहासाचे इतके फायदे असून व गतकालीं आर्यांची संस्कृति उच्च दर्जाची असूनसुद्धां या बाबतींत प्रयत्न झाल्याचें निदर्शनास येत नाहीं. वर निर्दिष्ट केलेल्या व्याख्ये-प्रमाणें अद्याप हिंदुस्थानचा किंवा त्यांतील कोणत्याहि विशिष्ट भागाचा इतिहास उपलब्ध नाहीं. निरनिराळ्या काळीं हिंदुस्थानांत परदेशीय प्रवासी आले व त्यांनीं हिंदुस्थानासंबंधीं माहिती लिहिलेली आहे, परंतु ती त्रोटक आहे. प्रचलित राजकारण व एतद्देशीय राजे, संस्थानिक वगैरे बरोबर झालेल्या लढायां-संबंधानें मि. ऑर्म (Orme) यांनीं इ. स. १७८२ सालीं इतिहास लिहिला व त्याच सुमारास पेशवाईच्या उत्तर कालांतील प्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणवीस यांनींहि मराठ्यांच्या काळचा इतिहास किंवा साद्यंत बखर लिहिण्याचा प्रयत्न केला होता, अशी माहिती मिळते. पेशवाईची अखेर झाली त्या सुमारास ग्रँट डफ् यानें मराठ्यांचा इतिहास लिहिला आहे. हाच महाराष्ट्रासंबंधानें संकलित इतिहास लिहिलेला पहिला इतिहास आहे. तसेंच ग्रँट डफचे पूर्वी

व नंतरहि युरोपियन लोकांनीं हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांसंबंधीं बरेच इतिहास लिहिले आहेत, परंतु ते इतिहासाच्या लक्षणांप्रमाणें लिहिले आहेत किंवा नाहींत याचें परीक्षण केल्यामुळें त्यांतील बरेच दोष दिसून आले व त्या कारणानें इतिहाससंशोधनाची जरूरी उत्पन्न झाली.

## इतिहाससंशोधनाची आवश्यकता

वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें महाराष्ट्राचा इतिहास बहुतेक युरोपियन लोकांनीं लिहिला आहे. तो ज्या परिस्थितींत व ज्या भावनेनें लिहिला गेला ती परिस्थिति महाराष्ट्रास सर्वथैव प्रतिकूल असल्यामुळें त्या काळाचें यथार्थ वर्णन त्या इतिहासकारांनीं केलेलें नाहीं. शिवाय ते इतिहासकार परकीय असल्यामुळें इकडे घडलेल्या सर्व गोष्टींचें अंतर्बाह्य यथार्थ स्वरूप व कार्यकारण-संबंध त्यांस कळणें शक्य नव्हतें. शिवाय चालीरीति व भाषा भिन्न असल्या-कारणानें त्यांना झालेल्या गोष्टींचें मर्म नीटसें समजलें नाहीं. ते इतिहास किती दोषपूर्ण आहेत हें अलीकडे उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक साधनांवरून समजून येत चाललें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्यास ते इतिहासकार अधिकारी नव्हते. शिवाय त्यांची माहिती एकांगी असून ब्रिटिश साम्राज्याचा विस्तार कसा झाला एवढ्याच गोष्टीचें त्यांत प्रामुख्यानें कथन केलें आहे. महाराष्ट्रियांची संस्कृति, राज्यव्यवस्था, समाज-व्यवस्था, धार्मिक कल्पना, व्यापार वगैरे आवश्यक प्रतिपाद्य विषय त्यांनीं चर्चेस घेतले नाहींत, त्यामुळें १७ व्या व १८ व्या शतकांत हिंदुस्थानांत झालेल्या युद्धांपैकीं दुसरी कोणतीहि माहिती त्या इतिहासावरून मिळत नाहीं. राष्ट्राची उन्नति होण्यास राष्ट्राची यथार्थ पूर्वपरंपरा दर्शविणारा सांगोपांग इतिहास असणें अत्यंत जरूरीचें आहे. आपल्या राष्ट्राचा पूर्वेतिहास झाला तसा लिहिला गेला नाहीं, हें कळल्यानंतर ती उणीव भरून काढण्यास उपलब्ध इतिहासाचें चिकित्सक दृष्टीनें संशोधन करण्याची आवश्यकता उत्पन्न होते. येथें असेंहि सांगणें जरूर आहे कीं, युरोपियनांचे सर्वच इतिहास त्याज्य आहेत असें म्हणण्याचा हेतु नाहीं. कारण मालकम, मेडोज टेलर वगैरे इतिहासकार वरील सर्वसाधारण नियमास अपवाद आहेत. यापुढील विवेचन इतिहास-संशोधनाचे प्रयत्न आजपर्यंत कसकसे झाले, त्यासंबंधानें आहे.

जरी या संस्थेचें नांव भारत इतिहास-संशोधक मंडळ असें व्यापक आहे तरी महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याची सामग्री जास्त मिळत आहे, व महाराष्ट्राचीच मिळविणें जास्त सुलभ असल्यामुळें या मंडळाचा ती मिळविण्याकडे जास्त ओढा आहे. तेवढीच जरी माहिती मिळविली तरी हिंदुस्थानच्या इतिहासास त्यानें मदत होणार असल्यामुळें माझें विवेचन विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासाबद्दलच आहे. ग्रँट डफनंतर युनिव्हर्सिटीची स्थापना होईपर्यंत दरम्यानचे काळांत युरोपियन लोकांनीं मराठ्यांचे इतिहास लिहिले आहेत. इ. स. १८६४ नंतर महाराष्ट्रांतील लोकांनीं इतिहासासंबंधानें पुस्तकें लिहिण्यास सुरुवात केली. रा. ब. निलकंठ जनार्दन कीर्तने यांनीं ग्रँट डफचे इतिहासावर टीकात्मक ग्रंथ लिहून सदर इतिहासांतील दोषांचें आविष्करण केलें. याच सुमारास विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं निबंधमालेंत इतिहास या विषयावर निबंध लिहून इतिहासापासून काय फायदे आहेत व इतिहासाचें महत्त्व किती आहे तें निदर्शनास आणलें. यानंतर कै. जनार्दन बाळाजी मोडक व रा. ब. साने यांनीं काव्येतिहास-संग्रह या नांवाचें मासिक सुरू करून त्यांत बखरी व पूर्वीचे कागदपत्र प्रसिद्ध करण्याचें काम सुरू केलें. पुढें ग्रंथमाला, ऐतिहासिक लेखसंग्रह वगैरे मासिकें सुरू झालीं तेव्हांपासून इतिहासासंबंधीं लोकांत जागृति झाली. इ. स. १८९५ मध्यें पेशव्यांचे दप्तरांतील निवडक कागदपत्र प्रसिद्ध करण्यास सरकारनें परवानगी दिली; व त्याप्रमाणें रा. ब. वाड यांनीं एक ग्रंथ प्रसिद्धहि केला. ना. जस्टिस रानडे यांचीं *Rise of the Maratha Power* हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

रा. राजवाडे व खरेशास्त्री यांनीं जुनीं दप्तरें चाळून मिळतील ते कागदपत्र प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. रा. राजवाडे यांचे पानिपतच्या लढाईसंबंधाचे कागदपत्र व पटवर्धन संस्थानिकांचे खरेशास्त्री यांनीं प्रसिद्ध केलेले पत्रव्यवहार इतके महत्त्वाचे आहेत कीं त्यांचा उल्लेख जरूर केला पाहिजे. पानिपतच्या लढाईसंबंधाच्या ग्रंथांत रा. राजवाडे यांची प्रस्तावना एक वेळ तरी ज्यांनीं वाचली नसेल त्यांनीं अगत्य वाचावी, अशी माझी शिफारस आहे. तसेंच पेशव्यांच्या कर्नाटकांतील हैदर व टिपू यांजवरील स्वाऱ्यांसंबंधाचे पत्रव्यवहार ज्या ग्रंथांत प्रसिद्ध केले आहेत त्या ग्रंथांत ठिकठिकाणीं खरेशास्त्री

यांनीं ग्रँट डफच्या चुका दाखवून पत्रव्यवहाराचा सारांश दिला आहे; व तो इतका मार्मिक रीतीनें लिहिला आहे कीं, मुंबई युनिव्हार्सिटीनें एम्. ए. च्या परीक्षेस सदर ग्रंथ नेमला असून सदरहू सारांशहि विद्यार्थ्यांनीं लक्षपूर्वक तयार केला पाहिजे अशी सूचना दिली आहे व या गोष्टीचा मी आनंदपूर्वक उल्लेख करतों.

मराठ्यांच्या इतिहाससंबंधानें ज्यांनीं आस्थापूर्वक परिश्रम केले आहेत त्यांत मुंबई येथील राजश्री पुरुषोत्तम मावजी शेट, माझे परम स्नेही ठाण्याचे रा. भावे, धुळें येथील रा. देव, व साताराचे आमचे मित्र रा. ब. पारसनिस यांचा उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. रा. किर्तने यांचेपासून रा. ब. पारसनिसां-पर्यंत निर्दिष्ट केलेल्या सद्गृहस्थांनीं जे प्रयत्न केले व जी झीज सोसली त्यांचा मोबदला देणें अशक्य आहे. तथापि महाराष्ट्रावर त्यांचे अगणित उपकार आहेत, व त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

हे इतिहाससंशोधनाचे झालेले प्रयत्न कमीजास्त प्रमाणांत वैयक्तिक झाले. परंतु जसजसें कार्यक्षेत्र व प्रयत्न करणारांची संख्या वाढूं लागली तसतसें इतिहासांत जिज्ञासेचे विषय वाढले; व त्याबरोबर महाराष्ट्राच्या इतिहासाकडे पाहण्याची दृष्टि व्यापक झाली, व अभ्यासाची पद्धति नवीन तयार होऊं लागली. आणि

जो दुसऱ्यावरी विश्वासला ।
त्याचा कार्यभाग बुडाला ।

या समर्थांच्या उक्तीची पूर्ण प्रचीति येऊन इतर लोकांनीं लिहिलेल्या इतिहासापेक्षां आपला इतिहास संशोधन करून आपण लिहिला पाहिजे तरच तो आपल्या उपयोगी पडेल अशी भावना दृढ झाली. हें काम वैयक्तिक होणें शक्य नसल्यामुळें त्यास संघटित स्वरूप देणें ओघानेंच प्राप्त झालें व या विषयाचा व्यासंग करणाऱ्या गृहस्थांनीं—विशेषतः श्रीमंत तात्यासाहेब मेहेंदळे व रा. राजवाडे यांनीं—भारत इतिहाससंशोधक मंडळ स्थापन केलें; व तेथें केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे तर सर्व भारतवर्षाच्या इतिहासाचीं साधनें तयार करण्यास सुरुवात केली. या प्रयत्नांचीं फळें सदर मंडळानें प्रसिद्ध केलेले २० ग्रंथ होत. सदर ग्रंथांत विविध प्रकारचे ऐतिहासिक माहितीचे विषय असून शिवाय मनोरंजक विषयहि आहेत.

व्याकरण, काव्य, शब्दाची उत्पत्ति, पाणिनी-कालनिर्णय, शिलालेख, मंत्रतंत्र, औषधी बाडें, कूटप्रश्न, धनगरी ओव्या, आरत्या, अभंग वगैरे विविध विषय आले आहेत. सदर संस्थेंत इतिहासाचें साधन या दृष्टीनें भारतवर्षांतील कोणत्याहि देशासंबंधानें जातिभेदाचें खूळ मनांत न आणतां शक्य ती संशोधनेश्वराची सेवा होत आहे, हें अवश्य ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. कलाकुसरीचीं कामें, ताम्रपट, रंगीत चित्रें, जुनीं नाणीं वगैरे वस्तूंचाहि संग्रह करण्याची खटपट चालू आहे. तरी अशा रीतीनें इतिहाससंशोधनाची कामगिरी संस्थेनें अंगावर घेतली आहे. व त्या कामीं निर्जीव वस्तूंकडून गतकालाचा इतिहास वदविण्याची अद्भुत कामगिरी सदर संस्था करीत आहे. निर्जीव वस्तूंच्या ठिकाणीं जो स्वाभिमान दिसून येतो त्यावरून इतिहाससंशोधनाच्या कामीं आपला देह खर्चीं पडावा या उद्देशानेंच कीं काय त्या वस्तू शेंकडोंशें वर्षें तपश्चर्या करीत असाव्यात, असा भास होतो. श्री. छत्रपतींनीं सुरू केलेला सोन्याचा होन इ. स. १६७४ पासून शिवछत्रपतींच्या नामचिन्हानें अंकित होऊन आजपर्यंत स्वाभिमानपूर्वक आपलें वैभव राखून त्या राजर्षींची महती गाण्यास पुढें सरसावला आहे, व हीच स्थिति सर्व साधनांची आहे. निर्जीव वस्तूंचा स्वाभिमान व राजनिष्ठा पाहून आपणांस खरोखरच मान खालीं घातली पाहिजे. कारण ज्या राजर्षींनीं आपल्या पूर्वजांचे पराक्रम व स्वामिनिष्ठा पाहून संस्थानें, जहागिरी, सरंजाम, इनामें वगैरे दिलीं व ज्यांचा उपभोग आपणांस सुखानें घेतां येत आहे व जीं परंपरेनें सहजीं प्राप्त झालीं आहेत, त्या राजर्षींच्या व आपल्या पूर्वजांच्या तत्कालीन घडामोडींचें यथार्थ स्वरूप इतिहासद्वारा प्रसिद्ध करणें आपलें आद्य कर्तव्य आहे. जरी आपल्या पूर्वजांचा नांवलौकिक वाढविण्यास हल्लींच्या परिस्थितींत अवसर नसला तरी त्यांनीं राष्ट्रोन्नतीकरितां काय प्रयत्न केले, राष्ट्राचा दर्जा कसा वाढविला, व त्या योगानें त्यांनीं जो नांवलौकिक व कीर्ति संपादन केली त्या कीर्तीचें रक्षण करणें आपल्या हातचें आहे व तें नांवलौकिक वाढविण्यापेक्षां फार सोपें आहे. परंतु ह्या सोप्या गोष्टींस लोकांकडून जितकी मदत व्हावयास पाहिजे तितकीसुद्धां होत नाहीं हें दुर्दैवानें म्हणणें भाग पडतें. संस्थानिकांपासून तों पाटीलकुळकर्ण्यांपर्यंत सर्वांनीं जर आपलीं जुनीं दप्तरें चाळून पूर्वकालीन सनदा, पत्रव्यवहार, महजर,

निवाडापत्रें, वगैरे उपयोगी कागद संस्थेच्या स्वाधीन केले, निदान नक्कल दिली तरी संस्थेच्या कार्याची प्रगति होऊन आपण अंशतः तरी पितृऋणांतून मुक्त होण्याची खटपट केल्यासारखें होईल.

ही संस्थेनें हातीं घेतलेली कामगिरी फारच बिकट आहे. कारण त्यांत प्रत्यक्ष काळाशींच दोन हात करून

सा रम्या नगरी महान्स नृपतिः सामंतचक्रं च तत् ।
पार्श्वे तस्य च साऽपि राजपरिषद् ताश्चन्द्रबिम्बाननाः ।
उद्रिक्तः स च राजपुत्रनिवहः ते बंदिनस्ताः कथाः ।
सर्वं यस्य वशादगात्स्मृतिपथं कालाय तस्मै नमः ॥

इत्यादि त्यानें गिळलेलीं रत्नें त्याजपासून निर्जीव वस्तूंच्या साहाय्यानें परत मिळविण्याची खटपट मंडळ करीत आहे. जुने कागदपत्र मंडळास दिल्यानें अगर दाखविल्यानें कोणाच्याहि इनाम-जहागिरीस धोका येणार नाहीं, व या बाबतींत गैरसमज करून घेऊं नये, अशी माझी विनंति आहे. प्रो. जदुनाथ सरकार यांनीं नुकताच पर्शियन कागदपत्रांच्या आधारानें औरंगजेब बादशहाचा इतिहास लिहिला आहे. तो लिहीत असतांना त्यांना जो विलक्षण अनुभव आला तो नमूद करण्यासारखा आहे. एकदां एका व्यापाऱ्याजवळ कांहीं जुने कागदपत्र होते ते त्यांनीं पाहावयास मागितले. परंतु केवळ भ्रांतिकारक समजुतीमुळें त्यानें देण्याचें नाकारलें. पुढें एका साहेबाचा वशिला लावल्यावर त्यानें ते कागदपत्र दाखवून आपल्या खर्चानें त्याच्या नकला छापवून दिल्या. अशा प्रकारची खेदकारक गोष्ट इकडे होणार नाहीं अशी मी आशा करितों.

आतां आजपर्यंत ही संस्था कोठें वाढत होती व हल्लीं संस्थेच्या मालकीची इमारत स्वतंत्र कां झाली, या दोन गोष्टींबद्दल आपणांस हकीगत कळविली म्हणजे फक्त अखेरचीच कामगिरी शिल्लक राहील. सदर संस्थेची स्थापना शके १८३२ सालीं झाली. तेथपासून आजपर्यंत तिच्या बालपणची जोपासना सरदार अप्पा बळवंत यांचे वंशज सरदार तात्यासाहेब मेहेंदळे यांनीं ९ वर्षे आपल्या वाड्यांत पितृवात्सल्यानें केली आहे. संस्थेचें वयमान जसजसें वाढूं लागलें त्याप्रमाणें तिचें कार्यक्षेत्रहि वाढूं लागलें व सरदार तात्यासाहेब

यांचा वाडा तिच्या लीलेस पुरेसा होईना. सबब मंडळानें संस्थेकरितां व तिच्या क्रीडासाहित्याकरितां स्वतंत्र गृह बांधण्याचें ठरविलें, व यापैकीं एका भागाचा आज प्रवेशसमारंभ आहे. येथें हेंहि जाहीर करण्यास मला आनंद वाटतो कीं, सरदार तात्यासाहेब यांनीं सदर संस्थेस आपल्या अपूर्व ग्रंथसंग्रहालयाची देणगीहि दिली आहे.

सभ्य गृहस्थहो, माझे वेडेवांकडे चार शब्द आपण शांतपणें ऐकून घेतले याबद्दल मी आपला फार आभारी आहें. तसेंच संस्थेसंबंधीं सर्व प्रकारची माहिती मजला सरदार मुजुमदार व रा. पांडुरंग नरसिंह पटवर्धन यांनीं फार प्रेमानें व काळजीपूर्वक दिली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. आपली रजा घेण्यापूर्वीं एका गोष्टीचा म्हणजे संशोधनाची कामगिरी ज्या ज्या सद्गृहस्थांनीं केली असेल त्यांच्या कामगिरीचा उल्लेख झाला नसल्यास तो केवळ माझ्या अज्ञानाचा दोष आहे, असें समजून उदार अंतःकरणानें त्यांनीं मला क्षमा करावी अशी त्यांस विनंति आहे. सरते शेवटीं जगन्नियंत्यानें संस्थेस दीर्घायुष्य द्यावें व उत्तरोत्तर संस्थेची प्रगति व्हावी असें ईश्वरापाशीं मागणें मागून हें दालन खुलें झालें आहे असें जाहीर करून मी आपली रजा घेतों.

---

## परिशिष्ट ठ

Speech made by Shrimant Babasaheb, at the time of Unveiling Ceremony of the Bust of Sir R. G. Bhandarkar on 6th July 1919 in the Oriental Research Institute Buildings.

Ladies and Gentlemen, and Members of this Institute,

Words indeed fail to adequately express my thanks to the members of this institution for kindly inviting me and making me President of to-day's function. I really do not understand what they have seen in me to make me occupy the chair. I wished some better selection could have given more grace and charm to the occasion like the present one. I was from the very beginning rather unwilling to say " yes " to the secretaries who came to invite me, only because a sense

of responsibility heavily weighed upon my mind. For it is the literary society of the highest importance and I am neither a scholar nor a literary prodigy to discharge the onerous duty thrown upon my shoulders. The second reason is weightier still. It is that this seat was occupied on the last two occasions by the ablest possible persons. So naturally I feel diffident as to how I shall be able to carry out the function as successfully as it had been done on the past occasions by the capable men like H. E. Lord Willingdon who inaugurated this Institute on the 6th July 1917, and my friend Shrimant Balasaheb Pant Pratinidhi who opened the J. N. Tata Research Hall on 6th July 1918. But now as it has fallen on me I must undertake it as one of my duties as a citizen and try to make it successful according to the best of my abilities.

In the beginning I must tell you, gentlemen, that the subject on which I am called to make some remarks is quite new to me, especially its working is so at least. So my remarks are naturally bound to be rather inadequate and possibly incorrect also. I, therefore, request you all, gentlemen, to look more to the spirit, enthusiasm and liking which gave them utterance rather than to the actual meaning and sense of the words I express.

At the outset I must say a few words regarding the pleasant work I had to perform to-day. It is the unveiling of the bust of the great person, great in age, experience and knowledge, Sir Ramkrishnapant Bhandarkar whose name is familiar wherever Sanskrit literature is read with taste. I am sorry I had not the good fortune to be his student in the Deccan College since he had left it before I was enrolled there as a student. You all will admit that we very rarely find such a sage-like man who has devoted all his life and energies in the pursuit of knowledge for the sake of knowledge itself. It will not be an exaggeration to say that he thinks in knowledge, speaks in knowledge and lives in knowledge. In short knowledge is co-existent with him and he is co-existent with

knowledge. I am, therefore, happy to see that not only did the Government and European scholars appreciate his worth, abilities and literary activity but the sons of his mother-land also, in appreciation of his above mentioned qualities, have made his name perpetual in the history of oriental scholarship in India by giving his name to this literary institution to which he has kindly given his valuable collection of books and magazines which are very important in the work of research.

Thus offering my reverential and respectful bow in the form of real and unostentatious praise to the grand old preceptor, gentlemen, I now turn to the subject of today.

It will not be out of place, gentlemen, if a history of this institution, as to its inception, development, establishment and progress be given in a few words.

The Poona Deccan College had in its building a valuable large collection of Sanskrit manuscripts. Owing to want of room, the authorities of the College were insisting upon the Government for the removal of that collection to some other place. But owing to the financial difficulty the matter was not seriously considered for a long time. Afterwards a young band of enthusiastic workers coming from the western world, completing their educational course took up the idea of establishing an institute like this and to work there on the western lines. Accordingly they approached Dr. Bhandarkar with this idea and received his promise of giving his valuable library and magazines in case the institute is started. Then with the help of Dr. Bhandarkar these young workers approached the Government who was kind enough to hand over the whole manuscript stock from the Deccan College to them and also the series of the printed books of Sanskrit and Prakrit literature and promised an annual grant of Rs. 15,000 for publishing the manuscripts and for the up-keep of the manuscript library. When the idea of the institute was thus supported and developed the young enthusiasts seriously began to work and practically settled to start the institute. But institutes like the present one require large

amount of money and that difficulty was felt in the present case also. But it was soon partially removed by the generous donations of the Tata Bros , the name of whose father the central hall bears. In this way when this institute was helped with the necessary requisites such as library, manuscripts, magazines etc. the originators sought the sympathy of H. E. Lord Willingdon whose benign Government was ever ready to promote the cause of education. His Excellency did what he could do to establish the institution on a sound footing and showd his active sympathy and great liking by opening the institute on the 6th of July 1917.

You will be glad to know, gentlemen, the peculiar nature and character of this institute. It is not of one individual or of one caste or creed or religion. In short it is of a Cosmopolitan character. It is helped by the Hindus, by the Parsees, as well as by the Jains; and it also expects help and sympathy from other communities which have not yet joined it. Again this institute hopes to become an all-India institution inasmuch as it has had its members all over India.

There was a long-felt want of an institute like the present one in India and now-a-days it was especially felt in this part of the country which is the centre of all kinds of activities on this side. Individual and united efforts have been made in this direction, say at Calcutta, Bangalore, Bombay etc., but no fruitful result is yet seen forthcoming and nothing is heard of them. In every civilised country you will find this sort of institution conducted by Government and by private societies.

In order to make all-sided progress of a country complete, you will see that such an institute is quite necessary. Otherwise there will be no research, no discoveries in the field of old literature and thus there will be no correct ideas of the real state of things of the people of the past ages and no addition to the old stock of learning.

Again the establishment of the Chemical Research Institute, Economical Research Institute, Bharat Itihas Samshodhak Mandal and the like go to confirm the necessity of the institute in this branch also.

In the Western countries like England and especially Germany research work in all branches of science and literature is taken up by the universities themselves and it is not left necessarily upon private individuals. There the universities are not simply examining bodies like those in India. They also do the business of teaching bodies. The professors have to work only 5 or 6 hours during a week in colleges. The remaining time they are to devote at home to make research work and write out new and original books on different subjects. They allot some portion of their time to discuss with students, to examine their written work, to correct and explain their try, to imbibe in the minds of the students the critical spirit which is so very necessary to make researches and new discoveries. In Germany there are 21 universities. The number of professors and students in all of them is 3679 and 58844 respectively. So for 16 students there is one professor on an average. And as a professor has a very small number of students to teach, he can very easily come in closer touch with everyone of them and thus finds an opportunity to mould and frame the whole character of a student according to the needs of their country. The professors there get very high salaries and very high respect and so his profession is considered there very honourable. In 1913 the famous professor of the German language Mr. Irish Shmit died all of a sudden. His funeral ceremony was attended by the high officials and the German Emperor. This very fact goes to prove how much honourable and respectable the professorship in Germany is.

The practical use of research in the oriental languages and antiquities is to understand and learn the real history of the past. The research in these branches will give us the

real picture of the social, political, economical, industrial and religious condition of our ancestors.

The research work can be made from the following materials :—

(1) Manuscripts, (2) Printed books, (3) Oriental journals, (4) Inscriptions on monuments, (5) Monuments, caves, temples, pillars, (6) Coins and medals, (7) Old paintings, and (8) Old buildings.

These are the materials for research and fortunately India is rich in all of them. But we do not know where they can be found and how to make use of them. It is to be learnt from the Western world. Our enlightened rulers taught us the value of these materials and directed their efforts towards the preservation and excavation of these materials. Their Excellencies Governor-General first Lord Minto, Lord Hastings and first Lord Hardinge were the first pioneers in this work. But the continuity of the work was not maintained at all. Again the work was taken up by Lord Canning in the right direction and made the Archæological Survey of India and thence the Archæological publications are being issued periodically. But Archæological work began in right earnest since the Viceroyalty of Lord Elgin. But it must be frankly admitted that none of these viceroys took as deep an interest and worked as satisfactorily as was done by Lord Curzon in this field. He gave great motion to the tardy wheel of this department and tried to remove the mistaken notions of the Government officers about this branch of knowledge or, I may say the department. He says :—

"If there be anyone who says to me there is no duty devolving upon a Christian Government to preserve the monuments of a pagan art, or the sanctuaries of an alien faith, I cannot pause to argue with such a man. Art and beauty, and the reverence that is owing to all that has evoked human genius or has inspired human faith, are independent of creeds, and, in so far as they touch the sphere of religion, are embraced by the common religion of

all mankind. Viewed from this standpoint the rock temple of Brahmins stands on precisely the same footing as the Buddhist Vihar, and Mahomedan masjid as the Christian Cathedral."

In my short compass of travel I saw the Taj, Itmat-dhuala, Chinaka-Roza, Sikandra, Fatepur-Sikri, Annasagar lake at Ajmere, Jain temples on Mt. Abu, Sidhi Sayad mosque at Ahmedabad, Elora Caves etc. and in all these historical places the hand of Lord Curzon was clearly discernable. People of all those places are very much thankful to Lord Curzon for his care about these ancient historical buildings and they give him for this high compliment. He ordered the removal of Government offices from several of these ancient buildings. Again he spent many thousands of rupees in restoring these buildings to the original conditions and in repairing them in many places. So also he passed the Ancient Monument Act and sanctioned a permanent large sum towards the expenditure in this department. So also he advised the rulers of the Native States to make an archæological survey and establish such departments in their States. I am glad to note here that I was much impressed by the good work done by the Archæological department in Muttra and Saranath in excavations.

It was in the year 1911 that a great impetus was given to this department. In that year Sir Harcourt Butler, the Member of the Viceregal Council for Education, called a conference of Orientalists at Simla to discuss on subjects of oriental studies. They discussed chiefly on the following five heads viz. :—

(1) The general encouragement to the oriental studies.
(2) The proposal for a central research institute.
(3) Examination.
(4) Museum.
(5) Archæology.

So far we have seen what the Government have done up till now in this subject and we have no serious ground to com-

plain against it. But at the same time we are sorry to say that Indian universities have not achieved much in this branch of science.

We know, gentlemen, that we had a glorious past and when we actually see that attempts are being made, though slowly and gradually, all over India in every branch of learning to make the future of our country glorious, we cannot but hope to see our country once more occupying the same rank and position which she had once attained.

Last Sunday I came to see this institution and minutely saw all that is being done here by the able workers like Prof. Gune, Dr. Belvalkar, Mr. Utgikar, and many others. From my actually seeing on that day and hearing all today from the report of the institution read by Prof. Rajwade I am glad to say that this institution has within the course of two years made much progress and has taken up work in many branches. The institution has secured 168 members which is not a small number. The board of the institution held 14 meetings during the year under report and decided several important matters among which are the following :—

(1) To hold an Oriental Conference, (2) To undertake the printing work of a critical edition of the Mahabharata, and (3) To issue a journal.

Really these are by no means small and easy undertakings. Similarly the Publication Department also played its part equally well by publishing 16 works, and the Library Department did not lag behind in its activity since it secured a great many books from the Government of Bombay, Mysore, Travancore and also from the Royal Asiatic Society, London, etc. The Information Bureau made its existence felt by receiving and replying 4 letters of historical and literary nature. The Research Department showed its activities by calling papers from scholars for being read at this institution and also decided to open German and French classes. Indeed these are not the small achievements of the institute which is only of two years' growth and which is still ill-fed and ill-clad in

all its requisites, and therefore the workers in several departments of the institute are much more worthy of praise and active and solid sympathy of all the lovers of knowledge. The institute did not undertake all the promised objects yet simply because it is short of funds and active workers. Persons like Shrimant Balasaheb Pant Pratinidhi, Messrs. Tata Bros., the Jain Community and many others who have substantially helped the institute deserve public eulogy and the institute will ever remain grateful to them. People of these types must come forward to help the institute either with money or with books or with manuscripts, or with old papers and antiquities. Any kind of help will be welcomed here. Those who are intellectually fitted to work in the institute should at once join it to give the benefit of their divine gift to the country where they are born. Without whole-hearted support of the Government and the people at large the institute will not be in a position to undertake all the activities which it aims at. Like the Mahabharata it must print all the great epics, also the Rigveda, the Upanishads and the Bhagwatgita. It must not confine its activity to the Sanskrit literature alone. But as it is oriental, it must extend its activity to the research of all the languages in the east, such as Persian, Arabic, Baluchi, Tibetian, Chinese, etc. For this purpose it must have in it the scholars of all these languages or it must co-operate with them by constant communication or by holding occasional meetings and conferences. To achieve this object the conference of the orientalists which the institute is going to hold in the month of October next is very useful. To achieve complete success in all its activity it will have to co-operate not only with the similar institutes all over the world but it will have to do so with all the kindred institutes and departments such as Zoological section, Geological section, Industrial section, Art section, Ethnological section and Archæological section.

For the research work there are many requisites without which the work cannot be done easily, smoothly and successfully. The research institute must have (1) A grand and

complete library of printed books; (2) It must have a fully equipped museum consisting of all sections of kindred sciences; (3) It must have all kinds of maps giving both old and modern names of countries, rivers, mountains etc. and showing also the ancient and modern divisions of a country; (4) Government must furnish such institutions with all the necessary information from the various departments; (5) All the magazines pertaining to this and other kindred subjects must be at its command; (6) Government must supply such institutes with old manuscripts, coins, medals, inscriptions, and all kinds of antiquities.

Now we come to the method of the work. The story of scientific investigation in India is like in other nations the story of growth and developement in critical inquiry, sceptical attitude and rationalism. Dr. Caldwell rightly observes that the historical spirit, the antiquarian spirit and to a degree even the critical spirit are the development of modern times. We, therefore, must necessarily follow the footsteps of modern scholars of leading European nations who have been for a long time engaged in making researches into our literature and ancient history. They have got their own critical methods which are so very important in the work of research. Regarding the method of work, therefore, following points may be noted with advantage : (1) The attitude of the mind of the worker must be like a clean glass ; it must not be a coloured one ; otherwise it will distort the image it will receive. (2) The worker must guard himself against, if I may be permitted to use the Baconian phraseology, the three kinds of fallacies :— (*a*) Fallacies to which human mind, generally, is from its constitution, liable, (*b*) fallacies to which individuals are liable owing to their peculiar mental habits and training, (*c*) fallacies which spring from misunderstanding of the nature of language. Because these three things often arrest the real progress of science. (3) Again he must be careful against hasty generalisation. (4) He must verify his conclusion. Lastly, Bacon's advice to all the seekers of knowledge is worth remembering :

"Knowledge is attainable only by those who will take the trouble to observe accurately and reason correctly." Thus if we are particularly careful in our method, success is sure. For "well begun is half done", says aphorism.

I am glad now to say, gentlemen, that the originators of this institute are very happy and fortunate in selecting the site for its building. For in the first place it is located in the historical city which is the centre of all kinds of activities. Secondly it is surrounded on all sides by other institutions viz. Ranade Economic Institute, Servants of India Society, Deccan Education Society. Not very far from these there are the Agricultural College, Science College, Bharata Itihasa Samshodhak Mandal etc. So from all these I am naturally led to express my sanguine hope about the institute in the words of His Excellency Lord Willingdon whom I quote below :—

"I look forward to the future when this institute is a part of a Poona University, which, I feel sure, will, through the activity of the numerous lovers of education in this historic city, soon become, not as now, a pious aspiration but an accomplished fact."

Now praying to God for long life and health to Sir Bhandarkar whose bust I have just unveiled and wishing all success and prosperity to the institute and thanking you all again for your patient hearing and thanking also the members of the institute for giving me an opportunity to learn and express something about this branch of learning, I, with your kind permission, resume my seat.

---

## परिशिष्ट ड

## सत्कारसमारंभ

## १९१३

मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड वुइलिंग्डन यांनीं जून महिन्यांत पुणें येथें भरविलेल्या लेव्ही व रिसेप्शनला श्रीमंत बाबासाहेब हजर राहिले होते, व त्याच महिन्यांत बादशहांच्या जन्मदिवसानिमित्त दक्षिणेंतील सरदारांच्या तर्फे एजंट यांनीं भरविलेल्या दरबारासहि ते हजर होते.

ता. २० जून रोजीं हिंदुस्थानचे माजी गव्हर्नर लॉर्ड हार्डिज यांचेवर दिल्ली येथें बॉंब टाकून जो नीचपणाचा अत्याचार केला गेला त्यांतून ईश्वरी कृपेनें ते बचावले, म्हणून त्यांचे जन्मदिनानिमित्त ता. २० जून रोजीं श्रीमंत बाबासाहेबांचे हस्तें शिरवळ येथील अँग्लो-व्हर्नाक्युलर शाळेंतील मुलांना मिठाई वाटण्यांत आली.

ता. १० ऑक्टोबर रोजीं शिरवळ येथें मि. एल्. जे. माउंटफोर्ड, पो. ए., यांनीं भेट दिली.

ता. १५ ऑक्टोबर रोजीं पोलिटिकल सेक्रेटरी मि. सी. सी. वॉटसन् व मध्यप्रांत कमिशनर ऑनरेबल एस. आर. आर्थर हे उभयतां पुण्याहून महाबळेश्वरास जात असतां वाटेंत शिरवळ येथें श्रीमंत बाबासाहेबांनीं त्यांचा यथोचित सत्कार केला.

## १९१४

ता. २० मार्च रोजीं मुंबई येथें लॉर्ड व लेडी वुइलिंग्डन यांनीं लॉर्ड व लेडी हार्डिज यांना गव्हर्मेन्ट हाउसमध्यें दिलेल्या आफ्टरनून पार्टीस श्रीमंत बाबासाहेब हजर होते. त्या वेळीं त्यांची लॉर्ड व लेडी हार्डिंज यांचेबरोबर लॉर्ड वुइलिंग्डन यांनीं ओळख करून दिली.

ता. २ जून रोजीं ऑनरेबल मि. जी. एस्. कर्टिस यांना शिरवळ येथें चहापार्टी देण्यांत आली.

ता. ९ जून रोजीं प्रो. ओ. व्ही. मूल्लर यांनीं शिरवळास भेट दिली.

## १९१५

ता. २५ जून १९१५ रोजीं मि. व मिसेस जी. डब्ल्यू. हॅच् यांनीं शिरवळास भेट दिली.

ता. ४ नोव्हेंबर १९१५ रोजीं राजापुरकर नाटक मंडळीनें संत तुकाराम नाटकाचा प्रयोग करून त्याचें उत्पन्न कँप एज्युकेशन सोसायटीस दिलें. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें. त्या वेळीं कंपनीचे मॅनेजर मि. राणे व प्रसिद्ध नट मि. शुक्ल यांना मेडल्स दिलीं, व कँप एज्युकेशन सोसायटीस रु. ५० दिले.

चित्रांक ६२



श्रीमीनाक्षीचें देवालय. मदुरा.

[ सं. पा. ३१५

ता. ४ डिसेंबर १९१५ रोजीं मिस्टर व मिसेस जी. डब्ल्यू. हॅच यांनीं शिरवळास भेट दिली, त्या वेळीं त्यांना चहा व पानसुपारी देण्यांत आली.

## १९१६

ता. २४ मे १९१६ रोजीं महाबळेश्वर हिंदु जिमखान्यातर्फे लॉर्ड व लेडी विलिंग्डन यांना ' ॲट होम ' दिली. श्रीमंत बाबासाहेब जिमखान्याचे सभासद असल्यामुळें त्यांनीं या ' ॲट होम ' करितां रु. ४० वर्गणी दिली.

ता. १ ऑगस्ट १९१६. तळेगांव येथील कांच-कारखाना पाहण्याचें श्री. बाबासाहेबांच्या मनांत बरेच दिवस होतें, म्हणून वरील तारखेस ते मुद्दाम तळेगांवास गेले व त्यांनीं कारखाना पाहिला. कारखान्यांत कांचेला कोणतीं द्रव्यें लागतात, तीं कोठून आणण्यांत येतात, वगैरे माहिती विचारून कांच कशी तयार करितात तें प्रत्यक्ष पाहिलें; व 'आपल्या देशांत असे धंदे निघाले पाहिजेत, त्याशिवाय देशाची औद्योगिक प्रगति होणार नाहीं ' असें आपलें मत प्रदर्शित करून त्यांनीं संस्थेच्या चालकांच्या साहसाच्या व चिकाटीच्या प्रयत्नांचें कौतुक करून कारखान्याची उत्तरोत्तर भरभराट व्हावी अशी इच्छा प्रकट केली.

ता. ५ सप्टेंबर १९१६ रोजीं शिरवळ येथें रामदासभजनसमाजाची वार्षिक सभा झाली. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारलें.

ता. ३ नोव्हेंबर रोजीं ते मुंबई-परळ येथील (Bacteriological Laboratory) बॅक्टेरिऑलॉजिकल लॅबोरेटरी पाहण्यास गेले होते. त्या प्रयोगशाळेची त्यांनीं संपूर्ण माहिती करून घेतली.

ता. ९ डिसेंबर १९१६ रोजीं वेंकटेश्वर प्रेसचे शेट खेमराज यांनीं श्रीमंत बाबासाहेब यांना विचित्रगड तालुक्याचे अधिकार मिळाल्याबद्दल मानपत्र दिलें. ( हें मानपत्र परिशिष्ट ' द ' मध्यें दिलें आहे. )

## १९१७

ता. ६ जानेवारी १९१७ रोजीं पाटणकर सिनेमा स्टार्स कंपनीच्या 'गर्व-परिहार' नाटकाचें उद्घाटन श्रीमंत बाबासाहेब यांचे अध्यक्षतेखालीं झालें.

ता. १० मार्च १९१७ रोजीं पुणें डेक्कन जिमखान्याचे खेळांचे सामने झाले, त्या वेळीं बक्षिससमारंभ श्रीमंत बाबासाहेब यांच्या हस्तें झाला.

ता. २९ जून १९१७ रोजीं गव्हर्मेन्ट हाउसवर लॉर्ड व लेडी विलिंग्डन यांचे रिसेप्शनचे वेळीं श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

ता. २५ जुलै १९१७ रोजीं गव्हर्मेन्ट हाउसवर लॉर्ड व लेडी विलिंग्डन यांनीं दक्षिणेंतील सरदारांना दिलेल्या गार्डन पार्टीस श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

ता. २९ सप्टेंबर १९१७ रोजीं भोर येथील श्रीराम-क्रीडाभुवनाचे सभासदांना ईव्हिनिंग पार्टी दिली.

ता. २८ ऑक्टोबर १९१७ रोजीं श्रीमंत बाबासाहेब मि. व मिसेस् पर्सिव्हल यांचेकडे चहास गेले होते.

ता. ५ नोव्हेंबर १९१७ रोजीं लॉर्ड व लेडी चेम्सफर्ड यांनीं रूलिंग प्रिन्सेस आणि चीफ्स् यांना दिल्लीस पार्टी दिली. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हे श्रीमंत रावसाहेब यांचेबरोबर हजर होते. त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब यांची लॉर्ड व लेडी चेम्सफर्ड यांचेबरोबर ओळख करून देण्यांत आली.

ता. २६ नोव्हेंबर रोजीं Our Day च्या मदतीकरितां Food Industrial Product चें प्रदर्शन भरलें, त्यास श्रीमंत बाबासाहेब हजर राहिले होते.

ता. ४ डिसेंबर सन १९१७ रोजीं गव्हर्मेन्ट हाउसवर झालेल्या पार्टीस श्रीमंत बाबासाहेब हजर राहिले होते.

ता. ८ डिसेंबर सन १९१७ रोजीं लॉर्ड विलिंग्डन यांचे हस्तें 'विलिंग्डन स्पोर्टस् क्लब बॉम्बे' चा उद्घाटनसमारंभ झाला. त्यास श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

## १९१८

ता. १३ जुलै सन १९१८ रोजीं लॉर्ड व लेडी विलिंग्डन यांनीं गव्हर्मेंट हाउसवर पार्टी दिली, त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

ता. ५ नोव्हेंबर सन १९१८ रोजीं विलिंग्डन स्पोर्टस् क्लबतर्फे लॉर्ड व लेडी विलिंग्डन हे विलायतेस जाणार म्हणून पार्टी दिली, त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हे क्लबचे मेंबर या नात्यानें उपस्थित होते.

ता. ११ डिसेंबर सन १९१८ रोजीं मुंबई इलाख्यांतील रूलिंग प्रिन्सेस आणि चीफ्स् यांनीं लॉर्ड विलिंग्डन यांना फेअरवेल बँक्वेट दिली, त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

## १९१९

ता. १७ मे १९१९ रोजीं महाबळेश्वर येथें लॉर्ड व लेडी लॉइड यांनीं गार्डन पार्टी दिली, त्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब पार्टीस गेले होते.

ता. ९ मार्च सन १९१९ रोजीं पुणें येथील डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपॉल एफ्. डब्ल्यू. बेन, एम्. ए., सी. आय्. ई., हे रिटायर झाले. त्या वेळीं त्यांना फेअरवेल ॲड्रेस देण्यांत आला. श्रीमंत बाबासाहेब हे कॉलेजचे विद्यार्थी असल्यानें या समारंभास हजर राहिले होते.

ता. २४ जून सन १९१९ रोजीं लॉर्ड लॉइड यांनीं दिलेल्या लेव्हीच्या वेळीं श्रीमंत बाबासाहेब हजर होते.

ता. १२ नोव्हेंबर सन १९१९ रोजीं दक्षिणेंतील सरदारांनीं गव्हर्नर-साहेबांना ॲटहोम दिली. त्या ॲटहोमला श्रीमंत बाबासाहेब गेले होते.

## परिशिष्ट ढ

श्रीमंत बाबासाहेब यांनीं रामेश्वरच्या प्रवासाची हकीकत भोर येथें ता. २१ मार्च सन १९२० इ. रोजीं व्याख्यानरूपानें सांगितली ती येणेंप्रमाणें :—

ता. ७ मार्च सन १९२० रोजीं मी मंडळींस येथें भेटावयास आलों असतां मंडळींनीं उत्सुकपणानें मला मीं नुकत्याच केलेल्या प्रवासाची हकीकत विचारली, त्यावरून त्या प्रवासाची हकीकत सांगितली असतां मंडळींस करमणूक होईल, व कांहीं थोडीशी नवीन माहिती मिळेल ह्या उद्देशानें मी ती सांगत आहें. मी परवां येथें आलों तेव्हां मंडळी फार थोडकी होती व तेव्हां प्रवासासंबंधीं जसजसे प्रश्न विचारण्यांत आले तसतशी व तेवढीच हकीकत सांगण्यांत आली; संपूर्ण सांगण्यांत आली नाहीं. ती संगतवार रीतीनें पुष्कळ मंडळींस कळावी या उद्देशानें आज मीं ती सांगण्याचें योजिलें आहे.

पहिल्या प्रथम मला हें सांगितलें पाहिजे कीं, आमचे परमपूज्य वडील श्रीमंत सरकार यांनीं जर प्रवासखर्चाकरितां वेगळी रक्कम दिली नसती तर माझा प्रवास झाला नसता व मला व माझ्या कुटुंबास जें दुःख झालें त्याचा कांहीं अंशीं विसर पडण्यासहि मार्ग झाला नसता. ह्या त्यांच्या कृतीबद्दल मी श्रीमंत सरकारांचा फार आभारी आहें. तसेंच आमचे मामा श्रीमंत बाळासाहेब

विंचुरकर यांनीं मला सौ. मामीसाहेब यांची प्रकृति अस्वस्थ असतांनासुद्धां आपल्या नेहमींच्या दिलदार स्वभावास अनुसरून माझ्या प्रवासासंबंधानें जी मदत केली तीबद्दल त्यांचे आभार मानणें अगत्याचें आहे.

माझी प्रवासास निघतेवेळीं मन:स्थिति चांगली नसल्यामुळें व माझी शरीरप्रकृतीहि साधारणपणें अशक्त असल्यामुळें प्रवासामध्यें ठिकठिकाणची जितकी माहिती मिळविणें अवश्य होतें तितकी घेतां आली नाहीं. त्यामुळें ती अगदीं यथातथ्य बरोबर असेल असें सांगतां येणार नाहीं. पुस्तकें वाचून व प्रत्यक्ष पाहून व तिकडील मंडळींस भेटून जी माहिती मिळाली ती सारांशरूपानें मी सांगणार आहें.

कोणतींहि ठिकाणें पाहावयाचीं असल्यास तीं भूगोलदृष्ट्या कोठें आहेत, तेथील हवापाणी कशा प्रकारचें आहे, तेथील नैसर्गिक सृष्टिरचना कशी आहे, तसेंच तीं स्थळें कोणकोणत्या राजांच्या अंमलाखालून गेलीं, त्या त्या वेळीं जे राज्यकर्ते होऊन गेले त्यांचा धर्म, आचार, चालरीति व त्यांच्या राज्यपद्धति कशा होत्या हें समजल्याशिवाय त्या ठिकाणची शिल्पकला व एकंदर कलाकुसरीचीं कामें ह्यांचें महत्त्व ध्यानीं येणार नाहीं. सर्व देशांमध्यें व विशेषत: हिंदुस्थानामध्यें धार्मिक समजुतीच्या पायावरच पुष्कळ इमारती उभारलेल्या आहेत. म्हणून त्या समजुती काय होत्या याची माहिती अवश्य पाहिजे. मुख्यत्वेंकरून राज्यकर्ते कोणत्या जातीचे व कोणत्या धर्माचे होते हें समजलें म्हणजे वर सांगितलेल्या गोष्टी चांगल्या रीतीनें समजून येणार आहेत.

मीं जो प्रवास केला त्याचे साधारणपणें तीन भाग पडतील: १ पुण्यापासून रामेश्वरपर्यंत; २ म्हैसूर संस्थानांतील ठिकाणें; ३ हुबळीपासून पुण्यापर्यंत. माझा आगगाडीनें प्रवास सुमारें ३००० मैल झाला. शिवाय कांहीं स्थळें पाहावयास पायवाटेनें जावें लागलें हें निराळेंच. मीं एकंदर १६ गांवें पाहिलीं. प्रत्येक गांवीं माझा मुक्काम सरासरीनें चार दिवस पडला. उत्तर हिंदुस्थान आणि दक्षिण हिंदुस्थान यांमध्यें साधारणपणें बहुतेक बाबतींत मोठा भेद आहे. यांतील मुख्य भेद असा कीं, मुसलमानांचा अंमल अगदीं भरभराटींत असतांनासुद्धां दक्षिण हिंदुस्थानपर्यंत पोहोंचला नव्हता. त्यामुळें त्यांचीं कबरस्थानें व मशिदी दक्षिणेंत क्वचितच आढळतात. अर्थात् त्यांची शिल्पकला,

चालीरीति, व हिंदी किंवा उर्दू भाषा दक्षिणेंत अगदीं क्वचित् दृष्टीस पडते. दक्षिणेंत हिंदूंचींच मोठमोठीं राज्यें होऊन गेलीं; त्यामुळें मोठमोठीं व उत्कृष्ट देवालयें तेथें बांधलीं गेलीं व याच कारणामुळें दक्षिण हिंदुस्थानांत धर्मासंबंधीं श्रद्धा जास्त प्रमाणांत दिसून येते व ह्या कारणानेंच तिकडील देवांस उत्पन्नेंहि फारच मोठीं आहेत.

दक्षिण हिंदुस्थानांत पाहण्यालायक मुख्य स्थळें म्हटलीं म्हणजे देवालयें होत. त्यांसंबंधीं सर्वांस साधारणपणें लागू पडणारें जें वर्णन असेल तें अगोदर सांगितलें म्हणजे पुन्हां पुन्हां तीच ती हकीकत सांगावी लागणार नाहीं. फर्ग्यूसन नांवाचा एक युरोपियन प्रवासी होऊन गेला त्यानें हिंदुस्थानांत सर्वत्र हिंडून बहुतेक इमारतींचे गुणदोष व त्यांची शिल्पकला यांबद्दल लिहून ठेविलें आहे. त्याच्या मताप्रमाणें दक्षिणेंत जीं देवालयें आहेत तीं ब्राह्मणी द्राविड शिल्पकलेच्या पद्धतीवर बांधलीं आहेत, व तीं हिंदु राजांनीं बांधलीं असल्यामुळें साहजिकच त्यांच्यावरील खोदकामांत रामायण-महाभारतांतील कथा चित्ररूपानें कोरलेल्या आहेत. विजयानगर येथें तर खुद्द तेथील राजांच्या चालीरीति, पेहराव व दरबारी समारंभ देवळांवर व इतर इमारतींवर चित्रित केले आहेत. ब्राह्मण द्राविड शिल्पकलेमध्यें मुख्यत्वेंकरून चिदंबर, तंजावर, मदुरा, श्रीरंग, रामेश्वर व विजयानगर येथील देवळें प्रमुखत्वानें येतात ; व फर्ग्यूसनच्या मताप्रमाणें ह्या देवळांचा भव्यपणा व सौंदर्य युरोपमधील कोणत्याहि देवळांपेक्षां सरस ठरणारें आहे. यांतील कांहीं देवळें अकराव्या शतकांत बांधलेलीं आहेत. देवळांसंबंधीं साधारण पाहिलें तर असें आढळून येतें कीं, प्रत्येक देवळांत शिवाचें लिंग अगर विष्णूची मूर्ति असावयाची. शिवलिंग असेल तर त्याच देवळांत त्याच्या बायकामुलांच्या व गणांच्या मूर्ती असावयाच्या व त्यांचीं निरनिराळीं वाहनें सोन्याचांदीच्या पत्र्यांनीं मढविलेलीं असावयाचीं. प्रत्येक देवळांत एक मोठें बांधीव तळें असावयाचें. विष्णूची मूर्ति असेल तेथेंहि वरीलप्रमाणेंच त्याच्या परिवाराच्या सर्व मूर्ती वगैरे सर्व व्यवस्था असावयाची. ही विष्णूची मूर्ती शेषशाईची असावयाची. चिदंबर, तंजावर, मदुरा रामेश्वर व हंपी विरूपाक्ष अथवा विजयानगर येथील मुख्य देवालयांत शिवलिंगें प्रमुख आहेत. तसेंच बहुतेक देवळांमध्यें जवळजवळ एक हजार खांब असलेला

सभामंडप असावयाचा व त्या मंडपांत देवाचे निरनिराळे सोहळ्याचे समारंभ व्हावयाचे. तसेंच यात्रेकरूंस राहण्यास ओवऱ्या असावयाच्या व विशेषेंकरून देवालयाच्या सभोवतीं एक, दोन अगर तीन तट असावयाचे; व त्या प्रत्येक तटाच्या चारी भिंतींवर मध्यभागीं महाद्वार ठेवून त्यावर चार मोठमोठीं उंच गोपुरें असावयाचीं. या गोपुरांचें काम फार नक्षीदार व प्रेक्षणीय असावयाचें. खुद्द देवळांचीं शिखरें इतकीं उंच नसतात. गोपुरांत वर जाण्यास मार्ग असावयाचा. उदा० South Indian Railway च्या सचित्र गाइडमधील नं. ८, २२ व २३ या पानांत असलेलीं चित्रें पहा. शिल्पकलेच्या दृष्टीनें मदुरा, तंजावर व विजयानगर येथील राजवाड्यांचीं कामें थोडींशीं मुसलमानी धाटणीचीं आहेत.

उत्तर व दक्षिण हिंदुस्थान यांतील दुसरा मोठा फरक म्हणजे दक्षिण हिंदुस्थान भूमध्यरेषेनजीक असल्यामुळें तिकडे उत्तर हिंदुस्थानापेक्षां उन्हाळा अधिक आहे व त्यामुळें तेथील लोक जास्त काळे आहेत. तिकडे हिंवाळा नाहीं. ह्या उष्णतेमुळें तिकडील लोकांस अधिक कपड्यांची जरूरी वाटत नाहीं. पुरुषवर्गहि नेहमीं उघडाबोडकाच असतो. स्त्रियाहि बेताचींच वस्त्रें वापरतात. अंगांत साधी चोळी घालून लहंग्याप्रमाणें कमरेभोंवतीं चून घालून मोठ्या कांठाचें व भडक रंगाचें वस्त्र नेसतात. ह्या कपडे कमी वापरण्याच्या पद्धतीचा परिणाम तिकडे इतका शिष्टसंमत व सर्वमान्य झाला आहे कीं, पुरुषांच्या अंगाभोंवतीं वस्त्र नसणें हेंच दुसऱ्यास मान देण्याचें लक्षण होऊन बसलें आहे. देवळामध्यें गेलें असतां आपणांप्रमाणें धोतर, उपरणें असें उत्तरीय वस्त्र अंगावर घेऊन न जातां तें हरदासाप्रमाणें कमरेस गुंडाळतात. म्हैसूर संस्थानांतहि, तें इतकें सुधारलेलें आहे तरी, तेथील मानकऱ्यांव्यतिरिक्त इतर नोकर लोकांनीं तें कमरेस गुंडाळून राजवाडयांत व सरकारी कामकाजप्रसंगीं असलें पाहिजे असा नियम आहे. उत्तर हिंदुस्थानपेक्षां तिकडील एकंदर राहणी फार घामट आहे. चांगल्या चांगल्या गांवींहि तिकडे गटारांची व शौचकूपांची व्यवस्था बिलकुल चांगली नाहीं. तिकडे तामील व तेलगू या भाषा चालतात. तथापि सामान्य दर्जाच्या लोकांस इंग्रजी भाषा थोडीशी येत असते. याचें कारण तिकडे इंग्रजी राज्यस्थापनेस लवकर सुरुवात झाली हेंच असावेंसें वाटतें. तिकडे नद्यांस पुष्कळ कालवे काढलेले आहेत, व तलावहि पुष्कळ

बांधलेले आहेत. त्यामुळें शेतकी ही पावसावरच सर्वस्वी अवलंबून नाहीं, असें दिसतें. त्यामुळें आम्हीं डिसेंबरांत गेलों होतों तेव्हां सर्वत्र धान्याचीं हिरवींगार शेतें दिसत होतीं, व तंजावरास तर 'दक्षिणेंतील उपवन' असें जें म्हणतात तें नांव आम्हांस सार्थ वाटलें.

ब्रिटिश राज्यव्यवस्था मुंबई इलाख्यासारखीच आहे. फरक इतकाच कीं, मुख्य गव्हर्मेन्ट, गव्हर्नर-इन्-कौन्सिल व कलेक्टर यांच्या दरम्यान कमिशनर्स नाहींत. यामुळें तिकडे कलेक्टरला काम जास्त पडतें व गव्हर्नर-इन्-कौन्सिल-लाहि काम जास्त पडतें. मी जेव्हां लॉर्ड विलिंग्डन यांस भेटावयास गेलों तेव्हां त्यांच्या बोलण्यांतहि त्यांना इकडीलपेक्षां काम जास्त पडतें असें आलें. मद्रासकडे व्यापार व उद्योगधंदा मुंबई इलाख्यापेक्षां कमी प्रमाणावर आहे, त्यामुळें मुंबईपेक्षां मद्रास इलाखा साधारणपणें गरीब आहे.

ज्या ज्या ठिकाणीं मी गेलों होतों त्या त्या ठिकाणीं मला जें कौतुकास्पद वाटलें त्यासंबंधींच सांगण्याचा मी प्रयत्न करणार आहें, म्हणजे हें भाषण फार लांबणार नाहीं. दक्षिणेंत जातांना पहिला मुक्काम मीं रायचुरला केला. रायचुर निजामच्या हद्दींत आहे. तेथून आम्ही मद्रासेस गेलों. मद्रासेस मी आर. व्यंकटराव, सर टी. माधवराव यांचे नातू, यांच्या घरीं उतरलों होतों. मद्रास शहर मुंबईपेक्षां प्रत्येक बाबतींत कमी प्रतीचें वाटलें. तेथील विशेष पाहण्या-सारखें म्हणजे पदार्थसंग्रहालय आहे. तें मात्र मुंबईच्या आल्बर्ट म्यूझियमपेक्षां पुष्कळच श्रेष्ठ प्रतीचें आहे. मीं त्या संग्रहालयांत दोन दिवस तीन तीन तास घालविले तरी मला तें चांगल्या प्रकारें पाहतां आलें नाहीं. तेथील दुसरी सांगण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे Acquarium ऊर्फ जलचर प्राण्यांचा संग्रह हें ठिकाण होय. अशा प्रकारचा संग्रह हिंदुस्थानांत दुसरीकडे कोठेंहि नाहीं. त्या प्राण्यांचे निरनिराळे रंग व आकार पाहून आश्चर्य वाटतें. कांहीं प्राणी अशा प्रकारचे आहेत कीं, त्यांना हात लावला असतां विजेच्या बॅटरीप्रमाणें धक्का बसतो. इंग्रजी राज्यस्थापनेपासून फोर्ट सेन्ट जॉर्ज म्हणून मद्रास येथें एक प्रसिद्ध ठिकाण आहे. फोर्ट सेन्ट जॉर्ज हा एक भुइकोट किल्ला असून तो समुद्राच्या बाजूनें अर्धचंद्राकृति आहे व जमिनीच्या बाजूनें त्यास खंदक आहे. तेथें मुख्य सरकारी इमारती आहेत व मुंबईस ज्याप्रमाणें सरकारी कागदोपत्रीं

'बॉम्बे कॅसल' ह्या नांवानें मुंबईचा उल्लेख करण्यांत येतो, त्याप्रमाणें मद्रासला ह्या फोर्ट सेन्ट जॉर्ज ह्या स्थळाचा उल्लेख करण्यांत येतो. पण मुंबईस कॅसल अथवा फोर्टच्या अवशेषाचा कांहींच मागमूस आज दिसत नाहीं. परंतु फोर्ट सेन्ट जॉर्ज हें स्थल तसें नसून तो एक खराखुरा किल्ला आहे. मद्रास येथील हायकोर्टाची इमारत फारच शोभायमान व भव्य अशी असून हिंदुस्थानांतील सर्व हायकोर्टांच्या इमारतींत तिचा पहिला नंबर लागण्यासारखा आहे, व तेथें फक्त वरिष्ठ अदालतीचें अथवा हायकोर्टाचेंच तेवढें काम चालत नसून मद्रास शहरापुरतें सर्वच न्यायमनसुब्याचें काम चालतें. मद्रासची हॉर्टि-कल्चरल गार्डन हीहि फारच प्रेक्षणीय आहे. तेथें मला एक प्रकारचें झाड दाखविण्यांत आलें, व तें किडे खाणारें आहे असें समजल्यावर मला फार आश्चर्य वाटलें. मला सांगण्यास फार आनंद वाटतो कीं, इकडून नुकतेच गेलेले गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन हे तिकडे फार लोकप्रिय झाले आहेत. मुंबईस अद्याप प्रमुखपणानें न दिसणारी तिकडील संस्था म्हटली म्हणजे बॉयस्काउट्स् ही होय. लॉर्ड विलिंग्डन यांचे अध्यक्षतेखालीं या संस्थेच्या एका समारंभास मला हजर राहण्याचा प्रसंग आला होता. त्या वेळीं मीं जी हकीगत ऐकली तीवरून चांगले लोकोपयोगी नागरिक निपजण्यास तिचा फार उपयोग होण्यासारखा आहे असें मला वाटतें.

माझा तिसरा मुक्काम चिदंबर येथें पडला. चिदंबरास जें शिवाचें मुख्य देवालय आहे तें दक्षिण हिंदुस्थानांत फार पुरातन आहे, व त्यांतील कांहीं भाग शिल्पकलेच्या दृष्टीनें अतिशय उत्कृष्ट आहे. देवळाभोंवतीं दोन मोठाले तट असून त्यांच्या आंत सुमारें ३२ एकर चौरसचौरस आवार आहे. आम्हीं तेथें उपाध्याकडून तेथील भोगमूर्तीची पूजा करविली. ही पूजेची मणिमूर्ति तांबड्या पारदर्शक दगडाची असून पाहण्यासारखी आहे.

चिदंबराहून आम्ही तंजावरास आलों. तेथें शहाजीचे पुत्र व्यंकोजीराजे यांचे वंशज हल्लींचे शिवाजी राजेसाहेब, ज्यांना 'सीनियर प्रिन्स' म्हणतात त्यांचे वाड्यांत त्यांचे आग्रहावरून उतरलों होतों. यांनीं आपले मेहुणे स्टेशनवर सामोरे पाठविले होते. ह्यांचा राजवाडा फार मोठा आहे. तो इ. स. १५५० मध्यें बांधिलेला आहे. या वाड्यांत हे शिवाजीराजे व त्यांचे कुटुंबांतील

मंडळी राहून ज्यूनियर प्रिन्सहि राहतात, व त्यांची दुसरी नातेवाईक मंडळी राहतात. या वाडयांत ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या बऱ्याच कचेऱ्या, शाळा वगैरे सार्वजनिक संस्था आहेत. या वाडयांत पाहण्यासारखा दरबारचा दिवाणखाना असून त्यामध्यें हल्लींच्या राजांच्या पूर्वजांच्या रंगीत तसबिरा आहेत. दुसरें प्रेक्षणीय स्थळ म्हणजे याच वाड्यांत असलेला फार प्राचीन असा संस्कृत-ग्रंथसंग्रह व अर्वाचीन लायब्ररी व वाचनालयहि असून तेथें सुमारें एक लाख ग्रंथसंग्रह आहे. त्यांत ताडपत्रावर लिहिलेले आठ हजार ग्रंथ आहेत. तंजावरचें दुसरें प्रेक्षणीय स्थळ म्हणजे तेथील शंकराचें देऊळ होय. देवळांत मुख्य आपलें लक्ष तेथील शिवलिंगाकडे व तेथील नंदीकडे अगोदर जातें. कारण तीं दोन्ही एकाच काळ्या जातीच्या दगडाचीं असून दोन्हींची उंची तेरा फूट आहे. शिवलिंगाची पूजा शिडी लावून करावी लागते. तेथील रथ फार भव्य आहे. या देवालयाचें जें सर्वांत उंच गोपूर आहे तें दोनशें फूट उंचीचें आहे. त्याची उंची कुतुबमिनारपेक्षां ३८ फुटांनीं व राजाबाई टॉवरपेक्षां साठ फुटांनीं कमी आहे. तंजावरास जरतारी गालिचे, जडजवाहिर वगैरे कलाकौशल्याचीं कामें होत असून तांब्यापितळेचीं नक्षीदार भांडीं, त्यांवर चांदी वगैरे भिन्न धातूंचा उपयोग करून मूर्ति वगैरेंचें केलेलें नक्षीकाम हीं फार उत्तम होतात. त्याचप्रमाणें भेंडाचीं व दुसऱ्याहि लांकडांचीं नमुनेदार देवळांचीं चित्रें फार उत्तम प्रकारचीं तयार होतात. आम्हीं तंजावर शहर सोडावयाचे अगोदर तेथील सीनियर प्रिन्स यांनीं आम्हांस पोषाख नजर करून आम्हांस स्टेशनवर निरोप देण्यास आले व सर्व प्रकारें फार अगत्य दाखविलें. त्यांना कोणत्याहि प्रकारचा अधिकार नाहीं. हे चांगले शिक्षणसंपन्न मराठी राजे असून त्यांची सनातन धर्मावर फार श्रद्धा आहे. ते स्वभावानें फार दिलदार आहेत.

तंजावराहून आम्ही मदुरेस आलों. वाटेनें त्रिचनापल्ली लागली होती, पण तेथें न थांबतां येतांना त्रिचनापल्लीस उतरलों. पण प्रवासमार्गसूत्र कायम ठेवण्याकरितां त्रिचनापल्लीचें वर्णन अगोदर देणें योग्य आहे. म्हणून तें प्रथम देत आहें. त्रिचनापल्ली व श्रीरंग हीं शहरें शेजारींच आहेत. ह्या दोहोंमधून कावेरी नदी वाहते. श्रीरंगच्या दोहों बाजूंनीं दोन फाट्यांचा वळसा घालून कावेरी नदी वाहत गेल्यामुळें तें एक बेट झालें आहे. आम्ही श्रीरंग येथें ना. व्ही. के. रंगस्वामी

आयंगार, व्हाइसरॉयच्या कौन्सिलचे एक मेंबर, यांचे घरीं उतरलों होतों. तेथें मुख्य पाहण्यासारखें म्हटलें म्हणजे श्रीरंगाचें देऊळ हें होय. मुख्य देऊळ २४७५ फूट रुंद व २८८० फूट लांब आहे. त्याच्या सभोंवार एकाभोंवतीं एकानंतर एक असे दोन मोठे तट आहेत. या तटांचे आंत बरीच मोठी वस्ती आहे, व जाण्या-येण्याच्या सोयीकरितां मोठाल्या सडका वगैरे आहेत. या देवालयाइतकें मोठें देऊळ हिंदुस्थानांत नाहीं. या देवळांत शेषशाईची मूर्ति आहे. येथील मूर्तीस अंत्यरंग म्हणतात व अशाच प्रकारच्या मूर्ती श्रीरंगपट्टण व शिवसमुद्र येथें आहेत. त्यांस आदिरंग व मध्यरंग असें म्हणतात. हीं तीनहि ठिकाणें कावेरीचे दोन फाटे दोहों बाजूंनीं मिळते गेल्यामुळें बेटांप्रमाणेंच झालीं आहेत. श्रीरंगचे देवळांत गरुडाची मूर्ति फार मोठी आहे. दुसरें पाहण्यासारखें ठिकाण त्रिचनापल्लीचा किल्ला हें होय. तेथें मुख्य देव शंकर हा आहे. श्रीरंग येथील दुसरें देऊळ म्हणजे जंबुकेश्वराचें होय. तें लहान आहे, तथापि त्याचें बांधकाम श्रीरंगच्या देवळापेक्षां सरस आहे.

मदुरेस आमची सर्व प्रकारें व्यवस्था एस. पूर्णैया, एस. आय. आर.चे एक ॲसिस्टंट ट्रॅफिक सुपरिन्टेन्डन्ट, यांनीं ठेविली होती. तेथें शिवाचें देवालय तिरुमल्ल नाईक म्हणून जो एक राज्यकर्ता सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत होऊन गेला त्याच्या कारकीर्दींत बांधलें आहे. या देवळाच्या खांबांवर नक्षीचीं कोरीव चित्रें फार अप्रतीम काढलेलीं आहेत, व भिंतींवर रामायण-महाभारतांतील कथाभागाचीं चित्रें रंगांमध्यें काढलेलीं आहेत. हें देऊळ रात्रीच्या विद्युद्दिपांच्या प्रकाशांत विशेष शोभायमान दिसतें. या देवळासभोंवतीं नऊ मोठमोठीं गोपुरें आहेत. मीनाक्षी ऊर्फ पार्वतीचें देऊळ लहान आहे, तथापि फारच सुंदर आहे. दुसरी प्रेक्षणीय गोष्ट म्हणजे तिरुमल्ल नायकाचा वाडा ही होय. हा वाडा भव्य असून त्याचें बांधकाम प्रमाणबद्ध असें आहे. येथें सायंकाळीं हवा खाण्याचें ठिकाण म्हणजे टेपाकुलम हें होय. टेपाकुलम म्हणजे मध्यभागीं देवालय असून सभोंवतीं चांगल्या तऱ्हेनें बांधलेलें तळें असावयाचें. दक्षिण हिंदुस्थानांत अशा प्रकारचीं तळीं बरेच ठिकाणीं आढळतात.

मदुरेहून आम्ही रामेश्वरास गेलों. पूर्वीं जेव्हां आम्ही आमचे वडिलां-बरोबर रामेश्वरास इ. स. १८८९ त गेलों होतों तेव्हां आम्ही मदुरेपासून

बैलगाडीनें प्रवास करून पांचसहा दिवसांनीं रामेश्वरास पोहोंचलों. त्या वेळीं हल्लीं जीं ठिकाणें पाहिल्याचें मीं वर सांगितलें तीं सर्व पाहिलीं होतीं; व त्यांशिवाय विजापूरहि पाहिलें होतें. पण त्या वेळीं मी लहान असल्यामुळें त्या प्रवासासंबंधीं माझी आठवण अगदीं अंधुक आहे. रामेश्वर हें एक लहानसें बेट आहे. तेथपर्यंत आतां रेल्वेनें जातां येतें. पण हा लोहमार्ग चमत्कारिक यांत्रिक पुलावरून गेला आहे. हा यांत्रिक पूल ज्या विवक्षित ठिकाणीं बांधला आहे त्याच्या खालून जेव्हां बोटी जावयाच्या तेव्हां तो पूल दोहों बाजूंच्या दोन मनोऱ्यांत ( टॉवरांत ) असलेल्या यांत्रिक साधनांनीं वर उचलला जातो. बोट इकडून तिकडे गेल्यावर तो खालीं करण्यांत येतो. ज्यानें लंडन येथील टेम्स नदीवरील टॉवर ब्रिजचें चित्र पाहिलें आहे, त्याला ह्या पुलाची थोडीशी बरोबर कल्पना येईल. हल्लीं रेल्वे रामेश्वर गांवापर्यंत गेली नसून पुढें अकरा मैलांवर धनुष्यकोटीच्या बंदरापर्यंत नेली आहे. त्या ठिकाणीं सामुद्रधुनी आहे. उत्तरे-कडून बंगालचा उपसागर व दक्षिणेकडून हिंदी महासागर येऊन भिडतात. त्यांस रत्नाकर व महोदधी असें म्हणतात. धनुष्यकोटीपासून सिलोनला जावयाचें असल्यास बोटींत दोन तास बसावें लागतें. श्रीरामचंद्रांनीं लंकेस जातांना शिवलिंगाची स्थापना करून त्यास रामेश्वर असें नांव दिलें, असें रामायणांत वर्णन आहे. तेव्हांपासून हें ठिकाण फार पवित्र मानलें असून अष्टधामें व बारा ज्योतिर्लिंगें यांत त्याची प्रमुखत्वानें गणना आहे. रामेश्वर येथील देवस्थानची धनदौलत फार मोठी आहे. त्यास जवळ जवळ पाऊण लाख रुपयांचें सालिना उत्पन्न आहे. रामनदच्या राजांनींच त्यास पुष्कळ देणग्या व उत्पन्न दिलें आहे. रामनदच्या राजांनीं देवस्थानच्या बंगल्यामध्यें आमची उतरण्याची व्यवस्था केली होती. त्यांची माझी एकदां भेटहि झाली होती. ते हल्लीं मद्रास कौन्सिलचे मेम्बर आहेत. रामेश्वरचें देऊळ फार मोठें व नक्षीदार तर आहेच, तथापि त्या देवळा-भोंवतीं ज्या तीन प्रदक्षिणेच्या एकाभोंवतीं एक ओवऱ्या (Corridors) आहेत त्या फारच अप्रतिम आहेत. त्या तीनहि प्रदक्षिणेच्या ओवऱ्या आच्छादित असून त्यांत उजेड विपुल आहे; व दोहों बाजूंच्या खांबांवरचें व वरील तक्त-पोशीचें काम फार मनोहर आहे. सर्वांत बाहेरच्या प्रदक्षिणेची लांबी १००० व रुंदी ६०० फूट आहे. येथें देवाचा छबिना दररोज रात्रीं बहुतेक निघत

असतो. तोही पाहण्यासारखा असतो. येथें शेंकडों यात्रेकरू दररोज येत जात असतात. येथें पुढें दिलेल्या पद्धतीप्रमाणें अनुक्रमें विधि करावयाचा असतो.

काशीयात्रा करून प्रयागाहून गंगा आणल्यावर प्रथम दिवशीं रामेश्वरांत लक्ष्मणकुंडावर तीर्थविधि करावयाचा. दुसरे दिवशीं प्रयागाहून आणलेल्या गंगेचें पूजन, श्राद्धविधि व सुवासिनी-ब्राह्मणभोजन घालावयाचें. तिसरे दिवशीं धनुष्य-कोटीला जावयाचें. तेथें सामुद्रधुनी अथवा खाडी आहे हें वर सांगितलें आहेच. तेथें प्रथम महोदधीमध्यें व नंतर रत्नाकरामध्यें स्नान करावयाचें व तें झाल्यावर सेतूची (समुद्राच्या वाळूची) पूजा करावयाची व मग ब्राह्मण त्या वाळूच्या ओंजळी आपल्या पदरांत टाकतात. त्या घेऊन रामेश्वरीं परत यावयाचें. रामेश्वराच्या देवळामधील सेतुमाधवाच्या मंदिरांत त्या सेतूचे तीन ढीग करून पूजा करतात; व त्यांतील एक ढीग समुद्रांत टाकतात; दुसरा ब्राह्मणांस देतात, तिसरा नार-ळांत भरून प्रयागास घेऊन जाऊन त्रिवेणींत टाकतात. ह्याप्रमाणें केल्यावर यात्रा परिपूर्ण होते.

माझ्या मनांत रामेश्वराहून सीलोनला जावयाचें होतें. पण तेथें त्या वेळीं पाऊस पडत असल्यामुळें व गारठा फार असल्यामुळें माझी प्रकृति थोडीशी बिघडली. म्हणून पुढें जाण्याचा बेत मला रहित करावा लागला. रामेश्वराहून मी त्रिचनापल्लीस आलों. तेथील वर्णन वर दिलें आहेच.

त्रिचनापल्लीहून आम्ही म्हैसूरला गेलों. परंतु म्हैसूरची हकीकत देण्याचे अगोदर जो मीं प्रवासाचा तिसरा भाग म्हणून वर सांगितला आहे त्याची हकीगत ऐतिहासिक दृष्ट्या अगोदर सांगणें जास्त सोयिस्कर व जरूर असल्या-मुळें ती अगोदर सांगत आहें.

प्रवासाचा तिसरा भाग हुबळीपासून पुण्यापर्यंतचा हा होय. ह्या भागा-मध्यें हुबळी, विजयानगर किंवा हंपी-विरूपाक्ष, गदग आणि विजापूर हीं स्थळें मीं पाहिलीं. येथील राज्यव्यवस्था हंपीविरूपाक्ष शिवायकरून मुंबई सरकारच्या ताब्यांत आहे. ती आपणांस परिचित असल्यामुळें त्यासंबंधीं विशेष सांगण्याचें कारण नाहीं. या ठिकाणीं मुख्य भाषा कानडी चालते. तथापि मराठीहि पुष्कळांना समजते. चालीरीति, हवापाणी मुंबई इलाख्यांतील सिंधशिवाय-करून इतर भागांप्रमाणेंच आहे.

माझा पहिला मुक्काम हुबळीस पडला. तेथें रा. रा. सुब्राव बेहट्टी ह्या एका नामांकित वकिलानें माझी तेथील व्यवस्था ठेविली होती. तेथें विशेष पाहण्यासारखें कांहीं नाहीं. विजयानगर पाहण्यास जाण्यास हॉस्पेट स्टेशन सोयिस्कर आहे. हें हॉस्पेट स्टेशन हुबळी आणि गुंटक या दोन जंक्शन स्टेशनमध्यें जो रेल्वेचा फाटा पूर्व-पश्चिम जातो त्याच्या मध्यावर आहे. हॉस्पेट स्टेशनवरून कमलपूर डाकबंगला ७ मैलांवर आहे. तेथें आम्ही झटक्यांत बसून गेलों. तेथील प्रदेश फार प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. सुग्रीवाची व वालीची किष्किंधा नगरी म्हणून जी रामायणांत म्हटली आहे, तसेंच मातंग पर्वत व पंपा सरोवर यांविषयीं त्यांत वर्णन आहे, तें येथीलच आहे, असें इतिहासज्ञांचें मत आहे.

जरी मुसलमानांचें या प्रदेशावर राज्य झालें नाहीं असें मागें म्हटलें आहे, तथापि मुसलमानांच्या ताब्यांत हा प्रदेश केव्हांहि गेलाच नव्हता किंवा या प्रदेशावर मुसलमानांच्या स्वाऱ्या बिलकूल झाल्या नव्हत्या अशांतला प्रकार नाहीं. अलीकडे म्हणजे तेराव्या शतकामध्यें मुसलमानांच्या वरचेवर स्वाऱ्या होऊन येथील लोक फार त्रस्त झाले व तसे त्रस्त झाल्यानंतरच राज्याच्या उलाढाली होत असतात. त्याप्रमाणें हक्क आणि बुक्क या दोन बंधुद्वयांनीं येथें ज्या स्थलीं पडक्या इमारती व देवळें दिसतात त्या ठिकाणीं एक नगर स्थापन केलें व त्यांच्या राज्याचा विस्तार जेव्हां वाढला व वैभव वाढलें त्या वेळेस विजयानगर असें नांव या शहरास देण्यांत आलें. व त्यांच्या राज्यासहि विजयानगरचें साम्राज्य असें म्हणूं लागले. हें राज्य इ. स. १३३६ पासून १५६५ पर्यंत सुमारें सव्वा दोनशें वर्षें होतें. या राज्याची खरी भरभराट दुसरा कृष्णदेवराय यांच्या कारकीर्दीमध्यें अगदीं शिखरास पोहोंचली. त्या वेळेस या शहराचा विस्तार जवळजवळ चोवीस पंचवीस मैल होता. याची कारकीर्द इ. स. १५०९ पासून १५३० पर्यंत होती. हें हिंदूंचें वैभव सहन न होऊन जें मुसलमानांचें ब्राह्मणी राज्य म्हणून इ. स.१३४७ मध्यें स्थापन झालें त्या राज्यांतील गोवळकोंडें, विजापूर व अहमदनगर येथील बादशहा एकत्र होऊन त्यांनीं शेवटच्या रामराजाचा पराभव तालिकोट येथें करून त्याचा शिरच्छेद केला. त्याचा शिरच्छेद झाला हें पाहून त्याचें सैन्य शत्रूस तोंड न देतां पळूं

लागलें, व मुसलमानांनीं त्यांचा पाठलाग करून पुष्कळांना ठार मारलें; व शहराची राखरांगोळी करून ते अगणित बायका व संपत्ति घेऊन गेले व देवळांतील मूर्तीहि घेऊन गेले. तेव्हांपासून जो एकदां त्या शहराचा नाश झाला तो पुन्हां त्यांत कधींहि वस्ती झाली नाहीं. आज तेथें पाहावयाचें म्हणजे जुन्या व पडक्या इमारती व जीं कांहीं देवळें राहिलेलीं आहेत त्यांतील नक्षी-काम वगैरे हीं होत. पाहण्याचा मुख्य उद्देश मनांत धरून जे लोक पाहावयास जातात ते पूर्वीचें वैभव कसें होतें तसेंच पूर्वीच्या लोकांच्या चालीरीति कशा प्रकारच्या होत्या, हें समजून घेण्याकरितां जातात. आपल्याकडे मुसलमानां-प्रमाणें व इतर राष्ट्रांप्रमाणें इतिहास लिहून ठेवण्याची चाल नसल्यामुळें त्या वेळेस जे प्रवासी इकडे आले होते त्यांनीं लिहून ठेविलेल्या वर्णनांवरून व हल्लीं येथें जीं चित्रें कोरलेलीं आहेत त्यांवरून आपणांस त्या वेळच्या चालीरीति समजून घेणें भाग आहे. येथील राजांचें वैभव समजून घेण्याच्या दृष्टीनें Sewell's *Forgotten Empire* व कै. रा. रा. हरि नारायण आपटे यांचें 'वज्राघात' हीं पुस्तकें फार उपयुक्त आहेत. त्या वेळचे लोक बायकांप्रमाणें लांब केस ठेवून वेण्या घालीत होते, सती जाण्याची वहिवाट पुष्कळ होती, राजाचे पुढें दसऱ्याचे वेळेस निरनिराळ्या प्रकारचे समारंभ होत होते, हल्लींप्रमाणेंच शिमग्याचा सण साजरा करण्याची व बायकांनीं नाचण्याची चाल होती. तसेंच भाले, तिरकमठे घेऊन लढाई करण्याची व शिकार करण्याची चाल होती. ह्या सर्व गोष्टी हल्लींच्या इमारतींवरील कोरीव कामांवरून समजून येण्यासारख्या आहेत. विजया-नगर शहर तुंगभद्रा नदीच्या कांठीं आहे. तुंगभद्रा नदीमध्यें पुष्कळच मोठमोठे म्हणजे आपल्या इकडील मोठमोठ्या घरांएवढाले धोंडे असल्यामुळें दगडांचीं देवळें व इमारती व तसेंच मोठमोठ्या मूर्ती करणें तिकडे सुलभ गेलें. ज्या कांहीं प्रेक्षणीय गोष्टी मीं तेथें पाहिल्या त्यांपैकीं मी कांहीं खालीं सांगत आहें.

(१) पाण्याचा दगडी पाट—त्यांतून शहरांत तुंगभद्रेचें पाणी आणलें होतें. (२) ४२ फूट लांब, ३ फूट रुंद व २ फूट खोल दगडी कुंडी—गरीब लोकांस दूध मोफत वांटण्यास ठेवण्याचा तो एक मोठा हौदच आहे. (३) सिंहासनाचा दगडी चबुतरा—त्याच्या बाजूला दसऱ्याच्या समारंभाचीं चित्रें कोरलेलीं आहेत. (४) हजारराम टेम्पल—त्यांत रामायणांतील रामचरित्रविषयक हजारों प्रसंगांचीं

चित्रें फारच हुबेहूब काढलेलीं आहेत. हें टेम्पल फारच प्रेक्षणीय आहे. (५) लोटस महाल, (६) हत्तीखाना, वगैरे गोष्टी पाहण्यासारख्या आहेत. येथील नारसिंहाची व गणपतीची मूर्ति फार मोठी आहे. हें पाहून आम्ही अनागोंदी म्हणून तुंगभद्रेच्या पलीकडच्या बाजूस एक ठिकाण आहे तेथें हरगोलमध्यें बसून तुंगभद्रा ओलांडून पलीकडे गेलों. हरगोल म्हणजे बुरडी बांबूची विणलेली व बाहेरून कमावलेल्या कातडयानें मढविलेली टोपल्याच्या आकाराची नाव होय. अशा प्रकारच्या नावा तैग्रीस व युफ्रेटीस नद्यांमध्यें २५०० वर्षांपासून चालतात. अनागोंदीमध्यें विजयानगरच्या राजांचे वंशज हल्लीं आहेत. त्यांस तीस हजारांचें हल्लीं उत्पन्न आहे. येथें खरोखर ऐन भरभराटीच्या वेळेस लाखों रुपयांच्या देणग्या दसऱ्याच्या समारंभसमयीं देण्यांत येत होत्या. त्याची नक्कल मात्र आपण आज येथें करीत असतों. यावरूनच त्या जमाखर्चास आपण 'अनागोंदी जमाखर्च' असें म्हणतों. ही नदी ओलांडून पुन्हां आम्ही अलीकडे आलों व हंपी विरूपाक्षाच्या देवाचें दर्शन घेतलें. विरूपाक्ष हें विजयानगरच्या राजाचें कुलदैवत होतें. विजयानगरचा नाश झाल्यानंतर त्या देवळाजवळच हंपी व ज्यास इंग्रजींत हॉस्पेट म्हणतात तें गांव वसलें गेलें, म्हणून या ठिकाणास हंपी-विरूपाक्ष असें म्हणतात.

येथून मी गदग जंक्शनवरून विजापुरास गेलों. गदग येथें पाहण्यासारखें विशेष कांहीं नाहीं. विजापुरास स्टेशनवर रा. ब. आर. एच. पागे, District Supdt. of Police, सामोरे आले होते व तेथील आमची व्यवस्था त्यांनींच उत्तम ठेविली.

आपण येथील इतिहासाकडे नजर दिली तर आपणांस असें समजून येईल कीं, बहामनी राज्य इ. स. १३४७ मध्यें स्थापन झालें हें जें मीं वर सांगितलें आहे, तें अल्लाउद्दिन हासन कांगो ब्राम्हणी यानें स्थापन केलें. पुढें महंमदशहानें आपल्या राज्यकारभाराच्या सोयीकरितां राज्याचे अहमदनगर, विजापूर, गोवळकोन्डा, बेदर व वऱ्हाड असे पांच भाग इ. स. १४४८ मध्यें केले व त्यांच्यावर पांच सुभेदार नेमले; व विजापुरावर युसफखान म्हणून एक तुर्की सुभेदार नेमला. हे सुभेदार महंमदशहाचे पश्चात् स्वतंत्र झाले; व त्यांनीं स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं. याप्रमाणें युसफखान यानें इ. स. १४८९ मध्यें विजापुरास

आदिलशाही म्हणून राज्य स्थापन केलें. बाकीच्या राज्यांपेक्षां विजापूरचें राज्य सर्वांत भरभराटीस आलें, व त्याची भरभराट विजयानगरच्या राजाचा तालिकोट येथें पराभव झाल्यानंतर विशेष झाली.

विजापूर येथें आम्ही डिस्ट्रिक्ट इन्स्पेक्टरच्या बंगल्यांत राहिलों. या बंगल्यास फॉरेस्ट बंगलो असेंहि म्हणतात. सायंकाळीं जोडगुमज नांवाची कबर पाहिली. या कबरीस एकाच आकाराचे दोन घुमट असल्यामुळें युरोपिअन लोक तिला Two Sisters असें म्हणतात. नंतर इब्राहिम रोझा पाहिला. यांत असलेल्या थडग्यांच्या दगडांवर अरेबिक वाक्यें कोरलेलीं आहेत व त्यांच्या प्रत्येक अक्षरांत प्रकाश दिसेल अशी अत्यंत आश्चर्यकारक योजना करण्यांत आली आहे. अशी चांगली योजना हिंदुस्थानांत दुसरीकडे कोठेंहि आढळत नाहीं. या इमारतीचें छप्पर फार विस्तीर्ण असून तें कशाच्या आधारावर उभारलें आहे हें एक गौप्य आहे. पुढें बुर्जे-इ-शेराझा ( सिंह बुरुज ) व त्यावर असलेली मलिक-इ-मैदान नांवाची अगडबंब तोफ पाहिली. येथील गोल-घुमट पाहण्यास गेलों त्या वेळीं तेथें बँड व हार्मोनियम वादनाची आगाऊ तजवीज करण्यांत आली असल्यामुळें प्रत्येक आवाजाचा प्रतिध्वनि किती वेळ होतो हें समजण्याची चांगली सोय झाली. अनेक वेळ प्रतिध्वनि उठणें हें या इमारतीचें वैशिष्ट्य आहे. एका कोपऱ्यांतील बुरुजावरून आम्ही वर चढून गेलों. तेथील घुमटा-सभोंवतालची गॅलरी ( सज्जा ) इतकी रुंद आहे कीं एकादी रुंद गाडी तींतून सहज जाऊं शकेल. या गॅलरीच्या एका कोपऱ्यांत केलेला हलका आवाज गॅलरीच्या दुसऱ्या बाजूच्या कोपऱ्यांत स्पष्ट ऐकूं येतो. एक पाऊल टाकण्यानें होणारा आवाज एखाद्या पलटणीचे चालण्याइतका मोठा ध्वनि उमटविण्यास पुरेसा होतो. इमारतीचा घुमट जगांतील सर्व घुमटांपेक्षां मोठा आहे. घुमटाच्या आंतील बाजूस कमानी असून त्यांचा गॅलरीस आधार आहे. गोल-घुमट आसपासच्या २० मैल अंतरावरून दिसतो. नंतर आम्हीं नगारखाना पाहिला. या ठिकाणीं राजघराण्यांतील जुने अवशेष हल्लीं ठेवण्यांत आलेले आहेत. आसफ महाल अथवा असारह-इ-शरीफ यामधील एका सुंदर खोलींतील रंगकाम, त्यांतील दगडाचे तुकडे वगैरे अवशेष निरनिराळ्या रंगांचे असून फार सुबक आहेत. एका साधूच्या दाढीचे केस फार जुनाट असा अवशेष म्हणून तेथें ठेविलेले आहेत.

मेहतान महालाच्या पुढील भागाचा अवशेष पाहण्यांत आला, त्याचें बांधकाम हिंदु व मुसलमान बांधकाम-पद्धतींचें मिश्रण आहे.

विजापूर येथील इमारतींच्या बांधकामांत त्यांना घुमट असणें हे वैशिष्ट्य आहे. तसेंच त्यांना असलेले मनोरे हे त्या इमारती सुशोभित दिसाव्या अशा उद्देशानें बांधलेले आहेत. उत्तर हिंदुस्थानांतील इमारतींच्या मनोऱ्यांप्रमाणें त्यांचा दुसरा कांहीं उपयोग व्हावा असा येथें उद्देश नाहीं. येथील सर्व इमारतींना घुमट बांधण्यांत बांधणाराचा हेतू आपल्या वैभवाची साक्ष चिरकाल व पूर्णत्वानें राहावी हा असावा व तो हेतू इमारतरचनाकल्पकतेंत पूर्णपणें व अतिशय सुंदरपणें साधला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

येथील 'तासबावडी' अथवा Crown Well, बारा कमानी नांवाची इमारत (या इमारतीस आधारभूत अशा बारा कमानी आहेत), जेल, उपळी बुरूज, त्यावर असलेल्या तोफा, व अफझुलखानाच्या त्रेसष्ट स्त्रियांच्या कबरी आम्हीं पाहिल्या. अफझुलखानानें लढाईवर जाण्यापूर्वीं लढाईंत आपण मरण पावल्यास आपल्या मागें आपल्या स्त्रिया भ्रष्ट केल्या जाऊं नयेत या हेतूनें स्त्रियांचा वध केला अशी आख्यायिका आहे.

यानंतर येथील ( १ ) ' सातमजली ' नांवाची इमारत; ( २ ) मक्का मशीद; ( ३ ) अल्लिअदिलशहाचें अर्धवट बांधलेलें थडगें—याचें बांधकाम पूर्ण झालें असतें तर तें तेथील सर्व इमारतींत उत्कृष्ट ठरलें असतें असें म्हणतात? ( ४ ) अंडू मशीद—हिचें बांधकाम उच्च दर्जाचें आहे; ( ५ ) अलिकडील पद्धतीचें बांधकाम असलेलें चर्च; (६) पूर्वीं ज्या ठिकाणीं राजस्त्रिया राहत असत तो आनंद महाल—हा हल्लीं युरोपियन क्लबसाठीं उपयोगांत आणला आहे; (७) गुन्हेगार वसाहत—गुन्हेगारांना पुन्हां गुन्हा करणार नाहीं अशी खात्री पटवीपर्यंत या ठिकाणीं राहावें लागतें. या वसाहतींत गुन्हेगारांना, उद्योगधंद्यासाठीं प्राथमिक भांडवल सरकार पुरवतें, त्यांना शिक्षण देण्यांत येतें, त्यांना राहण्यासाठीं फुकट जागा देण्यांत येते. अशा गुन्हेगारांची संख्या या वेळीं मुंबई इलाख्यांत सुमारें १४००० असून विजापूर येथें त्यांपैकीं १४०० गुन्हेगार होते,—इत्यादि स्थळें आम्हीं पाहिलीं. तसेंच अर्किला किल्ल्यानजीकच्या श्रीनरसिंहाचें दर्शन घेतलें.

रा. ब. पागे येथील सुपरिन्टेन्डेन्ट ऑफ पोलीस असल्यानें त्यांनीं येथील पोलीसची फिजिकल ड्रिल आम्हांस करून दाखविली. ता. १० रोजीं विजापुरहून निघून हुडगी सोलापूर वरून ता. ११ रोजीं पुण्यास येऊन पोहोंचलों. स्टेशनवर आमचे मामा सरदार बाळासाहेब विंचुरकर आले होते.

याप्रमाणें एकंदर आमच्या प्रवासाचें वृत्त मीं आपणांस सांगितलें तें आपण शांतपणानें ऐकून घेतलें याबद्दल मी आपणां सर्वांचा फार आभारी आहें.

## परिशिष्ट ण

श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव, युवराज, भोर, यांनीं ता. २८ मार्च १९२० इ. रोजीं भोर मुक्कामीं म्हैसूर संस्थानची हकीकत येथील लोकांस समजावी म्हणून केलेलें भाषण.

कोणतेंहि ठिकाण पाहावयाचें म्हणजे तेथील चालीरीति, हवापाणी, पूर्वेतिहास यांची माहिती असल्याशिवाय तेथील ठिकाणचें महत्त्व समजत नाहीं. म्हणून मी पहिल्या प्रथम या गोष्टी सांगून नंतर मीं जीं ठिकाणें पाहिलीं आहेत त्यांबद्दल सांगणार आहें; व सरते शेवटीं म्हैसूर संस्थानच्या राज्यव्यवस्थेसंबंधानें दोन शब्द सांगून ही हकीकत संपविणार आहें.

म्हैसूर हें संस्थान मद्रास इलाखा व मुंबई इलाखा यांच्या जवळ दक्षिण व पश्चिम सरहद्दीवरच असल्यामुळें तेथील हवापाणी कांहीं अंशीं मुंबई इलाख्याप्रमाणें व कांहीं अंशीं मद्रास इलाख्याप्रमाणें आहे. म्हैसूर संस्थानांत दोन्ही इलाख्यांच्या सर्व मुख्य मुख्य गोष्टींचें संमिश्रण झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुंबई इलाख्याच्या दक्षिणप्रांतीं कानडी भाषा चालते. म्हैसूर संस्थानमध्येंहि मुख्यत्वेंकरून कानडी भाषाच बोलतात. तथापि सुशिक्षित लोकांत इंग्रजी भाषेचा प्रसार अधिक असल्यामुळें ती भाषा तिकडे राजमान्य व सर्वमान्य झाली आहे. कोणत्याहि मोठमोठ्या प्रसंगीं व्हावयाचीं भाषणें वगैरे इंग्रजींतच होतात. एवढेंच नव्हे, तर खाजगी संभाषणेंहि इंग्रजींतच चालतात.

म्हैसूर संस्थान हें कसें अस्तित्वांत आलें याविषयीं इतिहासाच्या फार खोल पाण्यांत न शिरतां हल्लीं जें वाडियार राजघराणें म्हैसुरास राज्य

करीत आहे त्याचाच आपण थोडक्यांत विचार करूं. मीं आपल्या मागील व्याख्यानांत सांगितलें आहेच कीं, विजापूरच्या साम्राज्याची तालिकोटच्या क्रांतिकारक लढाईनंतर धूळधाण होऊन विजापूरच्या बादशाहीची भरभराट झाली तेव्हां विजयानगर व विजापूर यांचा तालिकोटच्या रणांगणावर संग्राम होऊन त्यांचा शत्रुत्वाचा संबंध घडून आला. म्हैसूर व विजयानगर यांचा तसा शत्रुत्वाचा संबंध नाहीं. म्हैसूर व विजयानगर यांचा संबंध मांडलिकपणाचा होता. मुख्य सत्ता कमकुवत अथवा नामशेष झाल्यावर तिचे मांडलिक हे प्रबळ होऊन मुख्य सत्तेस खाऊन टाकतात, स्वतंत्र होतात अथवा अनेक राजकीय उलाढाली करून आपलें मुख्य सत्तेशीं असलेलें मांडलिकत्वाचें नातें तोडून टाकितात. निदान आमच्या हिंदुस्थानच्या इतिहासांत तरी असल्या उलथापालथीस कमतरता नाहीं, ही गोष्ट इतिहासज्ञांस सर्वविश्रुत आहेच. त्याच न्यायानें हें म्हैसूरचें वाडियार घराणें विजयानगरची सत्ता संपुष्टांत आल्यावर हलके हलके स्वतंत्र झालें. प्रथम म्हैसूरचा भोला चामराज वाडियार यानें विजयानगरच्या राज्याचा दुर्बलपणा नजरेस आल्यावर त्यास वार्षिक खंडणी देण्याचें नाकारलें व विजयानगराविरुद्ध इ. स. १५७१ मध्यें स्वातंत्र्याचें निशाण फडकविलें. त्याच्या मागून राजवाडियार इ. स. १६१० त म्हैसूरच्या गादीवर आल्यावर त्यानें विजयानगरच्या ताब्यांतील श्रीरंगपट्टणचा सुभा व दुसरीं कित्येक ठिकाणें जिंकून घेतलीं. याप्रमाणें म्हैसूरच्या राज्याचा हलके हलके पुष्कळ विस्तार व उत्कर्ष होत गेला. या वाडियार कुलांत पुढें चिकदेवराज म्हणून एक प्रख्यात पुरुष होऊन गेला. त्याच्या कारकीर्दींत म्हैसूरच्या राज्याची भरभराट अगदीं कळसास जाऊन भिडली. त्यानें शेंकडों लढायांत विजय संपादन केले. त्याच्या पदरीं त्याचा कीर्तिदुंदुभी वाजविण्यास शेंकडों चारगण होते. त्याच्याच कारकीर्दींत म्हैसूरचें डळमळीत सिंहासन भक्कम पायावर मांडलें गेलें. त्यानें मराठे लोकांपासून बंगलोर शहर विकत घेतलें व राज्यांत अठरा कारखान्यांची ऊर्फ खात्यांची स्थापना करून राज्यव्यवस्थेस उत्तम शिस्त लाविली. शेती सुधारण्याकरितां अनेक मोठमोठे तलाव व कालवे बांधिले. त्यानें औरंगजेब बादशहाशीं स्नेह संपादन करून त्याची वाहवा मिळविली. औरंगजेबानें त्यास 'जगदेवराव' या

बहुमानाच्या पदवीनें विभूषित केलें. इतिहासभक्तांस त्याची कारकीर्द म्हणजे एक मोठाच ठेवा सांपडल्याप्रमाणें वाटणार आहे. चिकदेवराजानंतर म्हैसूरच्या गादीवर दोनतीन दुबळे पुरुष आले. हैदरअलीचा उत्कर्ष होण्यास म्हैसूरच्या राजांची हीच दुर्बळता कारण होय. म्हैसूरच्या लष्करांत हैदर हा एक शिलेदार होता. तो आपल्या कावेबाजपणानें व पराक्रमानें या राज्यांतील बखेड्याचा फायदा घेऊन कसा उदयास आला व त्यानें म्हैसूरच्या नामधारी राजास बगलेंत मारून आपणच म्हैसूरचा नबाब कसा बनला, हें सर्वविश्रुत आहेच. म्हैसूरचें राजघराणें हैदर व टिपू यांच्या अमदानींत इ. स. १७९९ पर्यंत नजरकैदेंतच होतें. इ. स. १७८२त हैदर मरण पावल्यावर त्याचा पुत्र टिपू सुलतान हा बापसे बेटा सवाई निघून त्यानें दक्षिणेंत कहर मांडिला. तुम्हांस कोणत्याहि प्रकारें त्रास देणार नाहीं, असा इंग्रजांशीं तह करून इंग्रजांचा दोस्त जो त्रावणकोरचा राजा त्याच्यावर स्वारी केली. हा अपमान सहन न होऊन इंग्रजांनीं मराठे व निजाम यांस आपल्या पक्षास अनुकूल करून घेऊन श्रीरंगपट्टणवर पहिली स्वारी केली व त्यास जेरीस आणून त्याच्याकडून तहाच्या अटी मान्य करून घेतल्या. पण इंग्रजांपुढें आपल्यास मान वांकवावी लागली ही गोष्ट टिपू सुलतानास सहन न होऊन त्यानें इंग्रजांचा चांगला समाचार घेण्याकरितां आपल्या सैन्याची जय्यत तयारी केली. श्रीरंगपट्टण शहरास दुहेरी तटबंदी करून कडेकोट बंदोबस्त केला, व त्या वेळच्या राज्यक्रांतीनें उदयास आलेला फ्रान्सचा बादशहा नेपोलियन बोनापार्ट याच्याशीं संधान बांधून त्याची कुमक मागितली. नेपोलियनसारख्या कट्टया दुष्मानाची मदत टिपूस मिळत आहे ही गोष्ट समजल्यावर इंग्रज अतिशय चिडून जाऊन त्यांनीं आपले दोस्त मराठे व निजाम यांच्या साहाय्यानें श्रीरंगपट्टणास वेढा दिला, व इ. स. १७९९त घनघोर लढाई चालू झाली. तींत टिपू मारला गेला. याप्रमाणें श्रीरंगपट्टण पडल्यावर मराठे व निजाम यांच्या अनुमतीनें इंग्रजांनीं म्हैसूरच्या मूळच्या राजघराण्यांतील त्या वेळच्या कृष्णराज या नांवाच्या तीन वर्षांच्या बालकास गादीवर बसवून श्रीरंगपट्टणास गेलेलें म्हैसूरचें सिंहासन पुन्हां म्हैसुरास स्थापन केलें, व तेथें पूर्णय्या नामक विख्यात पुरुषास तेथील दिवाण व राजाचा पालक नेमिलें. येथपासून नव्या युगास प्रारंभ झाला. दिवाण पूर्णय्या यांनीं इंग्रज सरकारचे व

कर्नल वेलस्ली ऊर्फ ड्यूक ऑफ वेलिंग्टन यांचे धन्योद्गार मिळविले होते. म्हैसूर संस्थानांत त्यांनीं शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करण्यांत यश संपादन केलें. परंतु अल्लड व अप्रबुद्ध महाराज कृष्णराज यांचे आज्ञेवरून त्यांना इ. स. १८१० सालीं राज्यकारभाराचीं सूत्रें खालीं ठेवावीं लागलीं. त्यामुळें कृष्ण-राजांच्या कारकीर्दींत त्यांचें व संस्थानचें दुर्दैव ओढवलें. "महाराजांच्या अव्यवस्थित कारभारामुळें संस्थानांत असंतोष व अंदाधुंदी माजून संस्थानच्या खजिन्यास ओहोटी लागली." असा इंग्रज सरकारचा पक्का ग्रह होऊन व त्यांत नागरच्या दंगलीची भर पडून महाराजांस इ. स. १८३० सालीं गादीला मुकावें लागलें. गादीवरून निघाल्यानंतर त्यांची वृत्ति निवळली व त्यांनी गादी मिळविण्याकरितां भगीरथ प्रयत्न केले. ते जरी साध्य झाले नाहींत तरी त्यांना दत्तक घेण्याची परवानगी मिळाली.

कृष्णराज महाराजांस दत्तकाची परवानगी मिळून ते इ. स. १८८१ मध्यें सिंहासनारूढ होईपर्यंत मध्यंतरीं जो ५० वर्षांचा काल लोटला, त्यांत सर्व संस्थानचीं सूत्रें इंग्रज अधिकाऱ्यांच्या हातीं होतीं. या इंग्रजी कारभाराबरोबर जरी तदनुषंगिक कांहीं दोष राज्यकारभारांत आले असले व तो राज्यकारभार दिवाण रंगा चार्लू यांच्या मताप्रमाणें विशेष खर्चाचा झाला असला तथापि या कारभारांत संस्थानची अंतर्बाह्य पुनर्घटना होऊन म्हैसूरच्या रयतेच्या मनो-भूमिकेमध्यें खऱ्या लोकसत्तेच्या कल्पनेचें बीज चांगलें रुजून केवळ संस्थानि-काच्या अथवा त्याच्या राजघराण्याच्या लहरीप्रमाणें संस्थानचा कारभार हांकावयाचा नसून तो रयतेच्या हितानुरोधानें हांकला पाहिजे, ही गोष्ट सर्वांस चांगली पटूं लागली. याप्रमाणें स्वराज्यास ऊर्फ लोकशाहीस म्हैसूरच्या प्रजेची मनोभूमिका तयार झाल्यावर दत्तकपुत्र श्रीचामराजेन्द्र वाडियार इ. स. १८८१ च्या ता. २५ मार्च रोजीं मसनदीवर विराजमान झाले. या शिक्षण-संपन्न, थोर व प्रजावत्सल महाराजांनीं सर शेषाद्री ऐयर या हुशार दिवाणाच्या साहाय्यानें संस्थानामध्यें झपाट्यानें प्रगति केली. यांच्या कारकीर्दीमध्यें प्रगति कशी झाली याबद्दलची हकीकत इ. स. १८९५ च्या म्हैसूरच्या प्रतिनिधि सभेपुढें दिवाण सर शेषाद्री ऐयर यांनीं निवेदन केली ती वाचली असतां समजणार आहे. श्रीचामराजेन्द्र महाराज इ. स. १८९४ त ता. २८ डिसेंबर

रोजीं अकालीं मृत्युमुखीं पडले. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनीं म्हटल्याप्रमाणें त्यांच्या निधनानें अखिल हिंदुस्थान शोकाकुल झालें. त्यांच्या निधनानंतर म्हैसूरची राजसत्ता महाराणींच्या दिमतीस एक सल्लागार मंडळ देऊन त्यांच्या हातीं देण्यांत आली. महाराणींच्या कारकीर्दींत त्यांच्या उदार पतींनीं वाढीस लावलेला सुधारणावृक्ष अधिक फोंफावत गेला. हल्लींचे महाराज श्रीकृष्णराजेन्द्र वाडियार इ. स. १९०२ मध्यें गादीवर आल्यानंतर पंचम जॉर्ज इ. स. १९०६ मध्यें म्हैसुरास भेट देण्यास गेले. त्या समयीं त्यांनीं उद्गार काढल्याप्रमाणें सर्वत्र संतोष व उत्कर्षाचीं गोड फळें या वृक्षास आलेलीं आपणांस दिसत आहेत. सर्व हिंदी संस्थानांत म्हैसूरचे बरेच दिवाण आपल्या कर्तबगारीनें विशेष पुढें आले आहेत, व त्यांनीं संस्थानच्या लौकिकांत भर घातली आहे. दिवाण पूर्णय्या इ. स. १७९९ ते १८१२, दिवाण रंगा चार्लू व सर शेषाद्री ऐयर इ. स. १८८३ ते १९०१, सर कृष्णमूर्ती, दिवाणबहादुर व्ही. पी. माधवराव, सर विश्वेश्वर एय्या १९१२ ते १९१९ असे दैदीप्यमान दिवाण म्हैसूर संस्थानास एकामागून एक लाभले व म्हैसूरच्या आजच्या भौतिक उत्कर्षाचें व सुधारणेचें पुष्कळसें श्रेय तेथील या नामांकित दिवाणांकडे जरी असलें तथापि, त्याहूनहि अधिक श्रेय तेथील गादीवर येणाऱ्या उदारधी महाराजांच्या सदिच्छेकडे आहे असें मी तरी समजतों. कारण खरें प्रजावात्सल्य जर महाराजांच्या मनांत वसत नसतें, त्यांनीं जर एकतंत्री व अनियंत्रित सत्ताच गाजविण्याचा निश्चय केला असता तर महाराजांच्या हातांत कळसूत्री बाहुल्याप्रमाणें खेळणारे शेंकडों दिवाण मिळण्यास वाण पडली नसती.

म्हैसूर संस्थानांत मीं मुख्यत: पांच ठिकाणें पाहिलीं—म्हैसूर, श्रीरंगपट्टण, बंगलोर, बोरिंगपेठ येथील सोन्याच्या खाणी आणि गिरसप्पाचा धबधबा. मी पहिल्याप्रथम त्रिचनापल्लीहून म्हैसुरास गेलों. वाटेनें एरोड, जालारपेठ व बंगलोर अशा तीन ठिकाणीं गाडी बदलावी लागते. आम्हीं रात्रीच्या वेळीं बंगलोर येथें आलों. बंगलोरास येतांनाच आपणांस अशी कल्पना होते कीं, आपण भरभराटींत असलेल्या शहरांत येत आहोंत. कारण सर्व शहर विद्युत्प्रकाशानें प्रकाशित असें दृष्टीस पडलें व बंगलोर स्टेशन भव्य असून विजेच्या दिव्यांनीं प्रकाशित होतें. चोहोंकडे आगगाडीचे फाटे व डबेहि दृष्टीस पडतात.

तेथून आम्ही मुक्काम न करतां रात्रीं निघून सकाळीं म्हैसुरास आलों. म्हैसूरची लोकसंख्या सुमारें ६८ हजार आहे. स्टेशनवर महाराजांचे तर्फे म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष व खाजगीकडील मुख्य कामगार आम्हांस सामोरे आले होते. आम्ही संस्थानच्या एका खास बंगल्यांत उतरलों. तेथें आमची सर्व व्यवस्था महाराजांकडूनच करण्यांत आली होती. मोटार वगैरे वाहनांची उत्तम सोय असल्यामुळें व जावयाच्या ठिकाणीं अगाऊ वर्दी असल्यामुळें आम्हांस सर्व ठिकाणें व्यवस्थेनें पाहावयास सांपडलीं. सहज पाहणाऱ्याचा सुद्धां म्हैसूरसंबंधीं उत्तम प्रकारचा ग्रह होतो. शहरांत रस्ते रुंद असून दुतर्फा इमारतीहि मोठ्या व सुशोभित आहेत, व ठिकठिकाणीं कचेऱ्या, दवाखाने, शाळा, कॉलेजें हीं दृष्टीस पडतात. तसेंच शहरांत मधून मधून बागा असल्यामुळें हवाहि उत्तम प्रकारची खेळते. शहरांत Hardinge Circle हें एक विशेष मनोवेधक ठिकाण आहे. हें जें मीं वर शहराचें वर्णन केलें आहे हें म्हैसूरच्या नवीन वस्तीसंबंधानें आहे व हल्लींहि म्हैसूर झपाट्यानें वाढत आहे. मूळचें म्हैसूर शहर जरी सुधारत आहे तरी तेथें यापेक्षां वस्ती दाट असून घरेंहि लहान आहेत. एकंदरींत चोहोंकडे शहराच्या आरोग्याकडे विशेष लक्ष पुरविलें जातें असें सहज आढळून येतें. शहराच्या नवीन वस्तीच्या मध्यभागीं जगन्मोहन नांवाचा महाराजांचा भव्य वाडा आहे. तो चोहोंकडूनहि दृष्टीस पडतो. यामुळेंहि शहरास एक प्रकारची शोभा आलेली आहे. तो वाडा आपल्या जुन्या पद्धतीनें बांधला असून चंदनी, हस्तिदंती व सोन्याचें अशीं नक्षीचीं कामें करून, तसेंच राजा रविवर्म्यांच्या मोठमोठ्या रंगीत तसबिरा लावून सुशोभित केला आहे. हा वाडा विद्युत्प्रकाशानें तर फारच मनोहर दिसतो.

येथें हल्लींच्या राजघराण्यासंबंधानें दोन शब्द सांगणें जरूर आहे. हल्लींच्या महाराजांच्या मातोश्री ऊर्फ महाराणीसाहेब हयात आहेत व बायकांकडील भेटी वगैरे घेणें त्यांच्याकडेच असतें. महाराजांस कुटुंब असून अद्याप संतति झालेली नाहीं. महाराजांना एक बंधु आहेत. त्यांना हिज हायनेस युवराज असें म्हणतात. शिवाय महाराजांना तीन बहिणी असून त्या तेथीलच सरदारांना दिलेल्या आहेत. त्यांपैकीं त्यांच्या एका बहिणीच्या नवऱ्यास दिवाणपद दिलेलें आहे. महाराजांना संतति नाहीं, तथापि युवराजांस नुकतेंच पुत्ररत्न

झाल्यामुळें तेथील प्रजेस आनंद झालेला दिसला. हल्लीं युवराजांकडे एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या विशिष्ट सभासदाचें काम दिलें असून मिलिटरी खातेंहि त्यांच्याकडेच आहे. महाराज व युवराज दोघेहि चांगल्या स्वभावाचे आहेत, तथापि त्यांच्या स्वभावांमध्यें मोठेंच अंतर आहे. महाराज जुन्याचे अभिमानी आहेत, तर युवराज नव्याचे अभिमानी आहेत. महाराज शांत स्वभावाचे, तर युवराज तापट आहेत. महाराजांची व माझी दोन वेळ भेट झाली. तसेंच आमच्या कुटुंबांच्या व हल्लींच्या राणी, राजमाता व युवराज्ञी यांच्या भेटी झाल्या.

या शहरीं Zoological Gardens प्राणिसंग्रह मोठा असून फारच पाहण्यासारखा आहे. इतका मोठा विविध प्राणिसंग्रह मला कलकत्त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि ठिकाणीं आढळला नाहीं. दुसऱ्या ठिकाणीं न पाहिलेला असा प्राणी जिराफ मीं येथें पाहिला. तो मोठ्या हत्तीइतका उंच असून त्याची मान वर तितकीच उंच होती. तसेंच तेथें मी एक चमत्कारिक मेंढा पाहिला. त्याला पुढच्या बाजूस दोन पाय असून मागील बाजूस चार पाय व स्त्रीचें व पुरुषाचें अशीं दोन जननेन्द्रियें आहेत. तेथील दुसऱ्या पाहण्यालायक गोष्टी म्हणजे अश्वशाला, गोशाला, रथशाला, या होत. तेथील टापटीप व व्यवस्था पाहून मनास संतोष वाटतो. तेथील चंदनी तेलाचा कारखाना हें एक प्रेक्षणीय ठिकाण आहे. म्हैसूर संस्थानांत चंदनाचीं झाडें उत्तम प्रकारचीं व विपुल आहेत. तीं सरकारी परवानगीशिवाय विकावयाचीं नसल्यामुळें सरकारच तीं घेऊन विकीत असे. पण तसें करण्यापेक्षां त्यांचें तेल काढल्यानें जास्त फायदेशीर होईल व लोकांनाहि कारखान्यांत काम मिळेल असें समजून त्याचें आतां तेल काढूं लागले आहेत. त्यापासून संस्थानास पांचसहा लक्षांचा फायदा होऊं लागला आहे. म्हैसुरास इतर ठिकाणें पाहिलीं त्यांमध्यें चामुंडा टेकडी हीहि पाहिली. पुण्याला जशी पर्वती तशी म्हैसूरला चामुंडी ही आहे. चामुंडी ही राजघराण्याचें कुलदैवत आहे. ती टेकडी पर्वतीपेक्षां बरीच उंच आहे. वरपर्यंत मोटार जाण्यासारखी सडकहि केली आहे.

म्हैसूरपासून चौदा मैलांवर कृष्णराजसागर अगर कदंबाळी धरण कावेरी नदीला केलें आहे. हें धरण संस्थानांत सर्वांत मोठें आहे, व त्याची उंची १०७ फूट आहे. तेथें मीं गेलों होतों. ज्याप्रमाणें ईजिप्त देशांतून नाइल नदी

वाहत जाऊन तिच्या पाण्यानें ईजिप्तचा प्रदेश सुपीक झाला आहे, त्याप्रमाणें म्हैसूर संस्थानांतून कावेरी नदी वाहत जाऊन तिनें आपल्या दोन्ही कांठचा प्रदेश भिजवून काढून सुपीक केला आहे. कावेरी नदी बारा ठिकाणीं अडवून तिला मोठमोठीं धरणें प्राचीन राजांनींच बांधून व त्यांतून मोठमोठे कालवे काढून सर्व प्रदेशांतून पाणी खेळविलें आहे. त्यामुळें म्हैसूर संस्थानचा फार मोठा प्रदेश हिरवागार व सुपीक दिसतो. कदंबाळी येथें कावेरीला तेरावे स्थळीं अडविलें आहे; व त्या धरणाचें काम अद्यापपर्यंत चालू आहे; या धरणाकडे आजपर्यंत १५५ लाख रुपये खर्च झाले. हें धरण भाटघरच्या धरणाप्रमाणेंच आहे.

म्हैसुरास कृष्णराजेन्द्र हॉस्पिटल व चामराजेन्द्र टेक्निकल इन्स्टिटयूट (औद्योगिक शाळा) आहेत, त्याहि मीं पाहिल्या. म्हैसुराहून आम्ही शिवसमुद्र या ठिकाणीं मोटारींत बसून गेलों. शिवसमुद्र हा तलाव कावेरी नदी अडवून तयार केला आहे. तो म्हैसूरपासून ७२ मैल लांब आहे. तेथें खोपोलीप्रमाणें उंचावरून नळानें पाणी सोडून विद्युत्शक्ति उत्पन्न केली आहे. या विजेच्या कारखान्यास कावेरी पॉवर वर्क्स असें म्हणतात. तेथेंच हिंदुस्थानांत पाण्याच्या जोरावर विद्युत्शक्ति पहिल्या प्रथम उत्पन्न करण्यांत आली. तें ठिकाण पाहावयास आम्ही गेलों होतों. शिवसमुद्रापासून Hydro-Electric Power House पर्यंत जाण्यास ट्रॉलीमधून उतरत जावें लागतें. उतरत जातांना डोळे फिरतात, याची कल्पना Reversing Station पासून खोपोलीपर्यंत जर सरळ लोहमार्ग केला व त्यावरून ट्रॉलींत बसून गेलों असें मनांत आणलें तर येणार आहे. तेथील Power House खोपोलीप्रमाणेंच आहे. या ठिकाणीं विद्युत्शक्ति सव्वा कोटि युनिट्सची तयार होते, व ती म्हैसूर, बंगलोर सिटी, सिव्हिल व मिलटरी स्टेशन व बोरिंगपेठ इकडे पाठविली आहे. तिच्या योगानें दिवे, सोन्याच्या खाणींतील कामें व इतर कारखाने चालतात. ही विद्युत्शक्ति येथें उत्पन्न करण्याची कल्पना सर शेषाद्री ऐयर यांनीं पुष्कळ वर्षांपूर्वी काढली व ती अंमलांत आणिली. त्यामुळें म्हैसूर संस्थानांत पुष्कळ उद्योगधंदे व कारखाने निघून ते भरभराटीस आले. या विजेच्या कारखान्यापासून दरसाल ११ लक्ष रुपये उत्पन्न येतें. म्हैसूर संस्थानांत हल्लीं Power Installations आणि Lighting Installations अनुक्रमें १५३ आणि ४००५ आहेत.

शिवसमुद्राहून आम्ही श्रीरंगपट्टण हें इतिहासप्रसिद्ध शहर पाहण्यास गेलों. येथें पूर्वीं म्हैसूरची राजधानी होती. श्रीरंगपट्टण हें कावेरीचे दोन फाटे दोहों बाजूंनीं मिळते गेल्यामुळें बेट झालेलें आहे. त्यामुळें व टिपूनें मजबुतीकरितां दोन तट बांधिले असल्यामुळें पूर्वींच्या काळीं हा एक अभेद्य किल्ला होऊन बसला होता. त्यामुळें हैदर व टिपू यांना शत्रूंस बरेच दिवस टक्कर देतां आली.

येथें दर्यादौलत बाग अथवा टिपूचा हवा खाण्याचा महाल हा पाहण्यासारखा अप्रतिम राजवाडा आहे. तेथें भिंतीवर व छतावर सोनेरी रंगीत नकसकाम फारच अप्रतिम केलें आहे.[1] तें अद्यापपर्यंत नव्यासारखें दिसतें. हैदरअल्लीनें कर्नल बेलीवर जो विजय मिळविला तो भिंतीवर चित्ररूपानें फारच हुबेहूब दाखविला आहे. त्यावरून त्या वेळचे कपडे व लढाई करण्याचीं हत्यारें यांची माहिती उत्तम प्रकारें होते. तेथें दुसरें पाहण्यासारखें ठिकाण म्हणजे हैदरअल्ली व टिपू सुलतान यांचें कबरस्थान होय. तेथील सर्वांत आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे हावेलीनची कमान ( Havelin's Arch ) ही होय. ती चुनेगच्चीची बांधलेली आहे. तीवर उभें राहून नाचलें असतां ती हालते, हा तिच्यांत विशेष गुण आहे. तेथें श्रीरंगाचें एक देऊळ आहे, हें मागील व्याख्यानांत सांगितलें आहेच. तेथील आणखी पाहण्यासारखें म्हटलें म्हणजे कावेरी नदीवरील दोन दगडी पूल हे होत. ते पूल दगडाच्या कमानींवर न उभारतां दगडी ठोकळ्यांवर बसवून तयार केले आहेत. ते बांधून सुमारें ५०० वर्षें झालीं तरी ते अद्याप अभंग आहेत. अशाच प्रकारचे दोन पूल शिवसमुद्रं येथें आहेत. श्रीरंगपट्टण येथें टिपू कोठें जखमी झालेला सांपडला, कोठें मेलेला सांपडला, इंग्रजांना कोणत्या भुयारांत कोंडून ठेविलें होतें व पुढें त्यांनीं कोठें हल्ला करून श्रीरंगपट्टण कसें कसें घेतलें वगैरे ठिकाणें दाखवितात.

श्रीरंगपट्टणाहून आम्ही बंगलोरास आलों. बंगलोर हें तीन शहरें मिळून झालें आहे, बंगलोर सिटी, बंगलोर सिव्हिल व मिलिटरी स्टेशन. बंगलोर सिव्हिल व मिलिटरी स्टेशन यांनीं साडे तेरा औरसचौरस मैल क्षेत्र व्यापिलें आहे. ज्या वेळीं इंग्रज सरकारांनीं म्हैसूरच्या पूर्वींच्या राजघराण्यांतील वंशजास १७९९मध्यें गादीवर बसविलें त्या वेळीं तें आपल्याकडे राखून ठेविलें आहे. या राखून ठेविलेल्या

चित्रांक ६६



टिपूच्या दर्यादौलत राजवाड्याच्या आंतील भागाचें दृश्य, श्रीरंगपट्टण.

[सं. पा. ३३६

भागाची लोकसंख्या सुमारें एक लक्ष आहे. या तिन्हींमध्यें म्हैसूर सरकारच्या ताब्यामधील जो भाग आहे तो विशेष पाहण्यासारखा आहे, व त्याचाच हल्लीं विस्तार होत आहे. शोभेपेक्षां विस्ताराच्या मानानें बंगलोर हें म्हैसूरपेक्षां सरस आहे. शहरची लोकसंख्या ७० हजार आहे. म्हैसूर हें संस्थानच्या राजधानीचें शहर आहे. तथापि त्या संस्थानचा सर्व राज्यकारभार बंगलोर येथें चालतो. तेथें दिवाण व सर्व खात्यांचे मुख्य अधिकारी, सेक्रेटरी, कौन्सिलर्स राहत असून त्यांच्या सर्व कचेऱ्या व बंगले तेथेंच बांधलेले आहेत. म्हणून बंगलोर पाहिल्याशिवाय नुसतें म्हैसूर पाहून तेथील सर्व कारभार कसा प्रागतिक तत्त्वावर चालत आहे हें ध्यानांत येणार नाहीं. म्हैसुरास फक्त महाराजांच्या सहीकरितां कागद पाठविण्यांत येतात.

बंगलोर स्टेशनवर मि. एस. कदंबी, चीफ एंजिनियर, हे सामोरे आले होते. ते आम्हांस दिवाणांच्या बंगल्यावर राहण्यास घेऊन गेले. हल्लीं दिवाण सरदार एम्. कांतराज, बी.ए., सी.एस.आय., हे आहेत. ते महाराजांचे मेहुणे आहेत. त्यांची व माझी दोनदां भेट झाली होती. ते स्वभावानें शांत आहेत, व बोलण्याचालण्यावरून ते फार हुषार दिसतात.

तेथें मला आर. रंगराव, सहकारी पेढ्यांचे रजिस्ट्रार, यांनीं कांहीं निरनिराळ्या धंद्यांतील म्हणजे घरें बांधणें, धान्य वगैरे संग्रह, बींबियाणें, खतें, खरेदी-विक्री, विणकर, वगैरे पतपेढ्या दाखविल्या व तशाच कांहीं बँकाहि दाखविल्या. बंगलोरास पाहण्यासारखें मुख्य ठिकाण म्हटलें म्हणजे टाटा रिसर्च इन्स्टिटयूट. ही पोस्ट-ग्रॅज्युएट तयार करणारी व औद्योगिक संशोधन करणारी सर्व हिंदुस्थानांत मोठी संस्था आहे. या संस्थेचा म्हैसूर संस्थानास औद्योगिक संशोधनाचे कामीं फार उपयोग होत आहे. म्हैसूर संस्थानच्या जंगलांत निरनिराळ्या प्रकारचीं लांकडें व तेथील जमिनींत जीं कच्चीं खनिज द्रव्यें सांपडतात त्यांचें शास्त्रीय रीतीनें पृथक्करण करून त्या लांकडांचा व द्रव्यांचा योग्य उपयोग कसा करतां येईल, हें ठरविण्यास ही संस्था फार उपयोगी आहे.

बंगलोरास मी हिसरघट्टा टँक म्हणून ठिकाण आहे तें पाहावयास गेलों होतों. तेथून बंगलोर सिटी व कॅटोन्मेन्टमध्यें पाणी आणलें आहे. तेथें Central Jail हा पाहण्यासारखा आहे. यामध्यें विशेष गोष्ट ही आहे कीं,

बाकीचें धंदेशिक्षण देऊन कैद्यास धार्मिक शिक्षणहि देण्यांत येतें. त्या तुरुंगामध्यें व बाकीच्या तुरुंगांमध्यें मोठा फरक म्हटला म्हणजे म्हैसूर संस्थानांतील ज्या कैद्यांस जन्मठेपेची, काळ्या पाण्याची शिक्षा झालेली आहे त्यांस अंदमान येथें न पाठवितां याच तुरुंगांत ठेवण्यास परवानगी आहे.

बंगलोरहून आम्ही बोरिंगपेठ येथें सोन्याच्या खाणी पाहावयास गेलों. तेथें हल्लीं सोन्याच्या खाणींकरितां मोठें गांवच वसलें आहे असें दिसतें. गांवाची वस्ती साधारणपणें ७५ हजार आहे, व खुद्द मजुरांची संख्या तीस हजारपर्यंत आहे. तेथें चोहोंकडे यंत्रें व चिमण्या हीं दृष्टीस पडतात. तेथें हल्लीं सोनें काढणाऱ्या पांच कंपन्या असून त्या प्रत्येक कंपनीची एक एक खाण आहे. त्यांपैकीं आम्हीं Champion Reef Gold Mine ही खाण पाहिली. प्रथम जेथून सोन्याचे दगड वर काढतात तें ठिकाण पाहण्यास गेलों. तें ठिकाण जमिनीच्या पोटामध्यें चार ते सहा हजार फुटांवर आहे. आम्ही विजेच्या शक्तीनें चालणाऱ्या लिफ्टमध्यें म्हणजे पाळण्यांत बसून जमिनीच्या पोटांत ४००० फुटांवर गेलों. जातांना अंधारांतून जावें लागतें व श्वास कोंडतो. खालीं गेल्यानंतर पुष्कळ मैल दूरपर्यंत आगगाडीचे रूळ पसरले आहेत, व विजेच्या प्रकाशांत शेंकडों लोक दगड उकरून काढण्याचें काम करतात, हें पाहून आश्चर्य वाटतें. तेथील दगड निरनिराळ्या लिफ्टमधूनच वर आणतात, व उंचीवरून यंत्रांत सोडून त्याचें पीठ करितात. नंतर त्यांत कांहीं रासायनिक द्रव्यें मिसळून त्याचा रस करितात व तो रस उतरत्या पत्र्यावरून सोडून पाणी जाऊं देतात व घट्ट राहील तें सोनें तयार होतें. सोनें तयार करण्याची शास्त्रीय पद्धतीची माहिती पाहिजे असल्यास त्यांनीं टाइम्स ऑफ इंडियाचा ता. १२-३-१९२० चा अंक वाचावा अशी माझी त्यांस शिफारस आहे. १९१८-१९ सालीं या पांच कंपन्यांनीं सुमारें पांच लक्ष औंस म्हणजे २५ कोट रुपयांचें सोनें काढून साडे चौदा लक्ष रुपये म्हैसूर संस्थानास रॉयल्टी म्हणजे मालकी हक्काबद्दल रक्कम दिली. यावरून सोनें केवढ्या मोठ्या प्रमाणावर निघतें हें ध्यानीं येणार आहे.

बोरिंगपेठहून आम्ही परत बंगलोरास आलों. तेथून शिमोग्यास गेलों. वाटेनें बिरूर जंक्शन लागतें. तेथून शिमोग्यापर्यंत गिरसप्पा धबधबा पाहण्याच्या सोयी-

करितां निराळा रेल्वेचा फाटा केला आहे. शिमोग्यास आमची व्यवस्था ठेवण्याकरितां तेथील डेप्युटी कमिशनर आले होते. शिमोग्याहून गिरसप्पाचा धबधबा ६५ मैल लांब आहे. शिमोग्याहून मोटारींत बसून गिरसप्पाचा धबधबा पाहण्यास गेलों. आम्हीं म्हैसूर व बंगलोर शहरें पाहिलीं, त्यावरून सुधारणा अशी म्हैसूर संस्थानांत झालेली आहे ती मुख्य शहरापुरतीच असावी अशी आमची कल्पना झाली. परंतु गिरसप्पास जातांना जें काय आम्हीं पाहिलें त्यावरून आमची कल्पना चुकीची आहे असें आम्हांस वाटलें. कारण तेथील रस्ता अगदीं निबिड अरण्यांतून गेला असून देखील जीं गांवें मधून मधून लागलीं त्या गांवांत प्राथमिक शिक्षणाच्या व औद्योगिक शाळा, दवाखाने, पोष्ट व तार ऑफिस, रहदारी बंगले व किरकोळ कारखाने, को-ऑपरेटिव्ह सोसायट्या, हीं दृष्टीस पडलीं. त्यावरून सुधारणा मोठमोठ्या शहरांपुरती नसून खेडेगांवांपर्यंत देखील पोंचली आहे, असें दिसलें. अरण्य किती दाट लागलें याची थोडीशी कल्पना ज्यांनीं महाबळेश्वर पाहिलें असेल त्यांस येणारी आहे. ह्या जंगलांतील विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, या जंगलांतून लांकूड व इतर जंगली माल नेण्यासाठीं सर्वत्र आगगाडी खेळविली आहे. अशी माल नेण्याची सोय झाल्यामुळें जंगलखात्याचें उत्पन्न वाढून लोकांचीहि सोय झाली आहे. गिरसप्पाचा ऊर्फ 'जोक फॉल' धबधबा पाहण्याचे अगोदर दोन मैलांवर शरावती नदी लागते, व त्या शरावती नदींतून नावेवर मोटार घालून ती धक्क्यावर नेतात व तीच मोटार धक्क्यावरून पुढें चालू होते. म्हणजे आपणांस मोटारींतून खालीं उतरावें लागत नाहीं. म्हैसूर सरकारचा डाक बंगला गिरसप्पा धबधब्याचे अगदीं समोरचे बाजूला आहे, तेथें आम्ही उतरण्यास गेलों. जी शरावती नदी ओलांडावी लागते म्हणून वर सांगितलें आहे तीच वळण घेऊन म्हैसूरकरांचे बंगल्यासमोर ९०० फुटांवरून चार लोंढ्यांनीं खालीं पडते. त्या लोंढ्यांस राजा, रोअरर, राकेट आणि डेन ब्लेंची असें म्हणतात. बंगला धबधब्याचे अगदीं समोरील बाजूला व त्याच सपाटीवर असल्यामुळें तेथून धबधब्याचा देखावा कांहीं श्रम न पडतां फार अप्रतिम दिसतो. विशेषतः दोनप्रहरीं सूर्याचे किरण पाण्यावर पडले असतां पाण्यामध्यें निरनिराळ्या तऱ्हेचे रंग दृष्टीस पडतात; व पाणी फारच उंचावरून पडत असल्यामुळें तळाशीं जें पाणी

पडतें तें पाणी असें न दिसतां बाष्परूपानें दिसतें. चांदण्याच्या प्रकाशांतहि या धबधब्याचा निराळाच देखावा दृष्टीस पडतो; व काळोख्या रात्रीं जरी धबधब्याचा देखावा दृष्टीस पडत नाहीं, तथापि आवाज फार मोठा होत असल्या-मुळें तेथील भीषणप्रद जंगलांत अधिक भय उत्पन्न करण्यास कारण होतें. अशा प्रकारचा उंच धबधबा जगांत हा पहिलाच आहे असें म्हणतात. धबधबा पाहून आम्ही परत शिमोग्यास आलों, व शिमोग्याहून बिरूरास येऊन त्या स्टेशनवरून हुबळीकडे गेलों. यापुढील प्रवासाची व पाहिलेल्या स्थळांची हकीकत मागील व्याख्यानांत सांगितली आहेच.

## परिशिष्ट त

ता. २८ मार्च सन १९२० इ. नंतर कांहीं दिवसांनीं श्रीमंत बाबासाहेब यांनीं भोर येथें म्हैसूर संस्थानची सांगितलेली हकिकत:—

आज म्हैसूर संस्थानासंबंधीं थोडीशी भूगोलविषयक माहिती देऊन म्हैसूरच्या राज्यकारभारांत मला ज्या विशेष गोष्टी दिसून आल्या त्या सांगण्याचा प्रयत्न करतों.

म्हैसूर संस्थानचें क्षेत्रफळ सुमारें २९ हजार चौरस मैल असून तें स्कॉटलंडच्या क्षेत्रफळाइतकें व बेल्जमच्या दुप्पट आहे. राज्यकारभाराच्या सोयी-करितां त्याचे आठ जिल्हे पाडले आहेत. एकंदर लोकसंख्या ५८ लक्ष ७ हजार आहे. समग्र संस्थानचे डोंगरी घाटमाथा व सपाटीचा प्रदेश असे नैसर्गिक दोन भाग पडतात. त्यांतून सुमारें बारातेरा नद्या वाहत असून कावेरी व तुंगभद्रा या मोठ्या नद्या संस्थानांतून वाहत जाऊन अनुक्रमें बंगालचा उपसागर व कृष्णा यांस मिळतात. कावेरीला दक्षिणगंगा असेंहि म्हणतात. तिला सुमारें बारातेरा कालवे काढून म्हैसूरचा बराच प्रदेश सुपीक केला आहे. संस्थानची एकंदर हवा समशीतोष्ण असून बंगलोरसारख्या घांट-माथ्याच्या प्रदेशाची हवा पुणें-सातार्‍यासारखी आहे. म्हैसुरास सरासरी २५ व बंगलोरास ३० इंच पाऊस पडतो. वातावरणांतील नैसर्गिक फेरबदल नमूद

करण्याकरितां Meteorological Dept. नें सालिना १२००० रुपये खर्च करून चार वेधशाळा ठेविल्या आहेत. त्यांत बंगलोरची वेधशाळा पहिल्या प्रतीची असून त्यांनीं घेतलेले वेध व नैसर्गिक फेरबदल सिमला, मुंबई व मद्रास येथें कळविण्यांत येतात.

आतां आपण म्हैसूरच्या राज्यपद्धतीकडे वळूं. प्रथम मला हें सांगितलें पाहिजे कीं, म्हैसूरची राज्यपद्धति लोकछंदानुवर्ति आहे. कोणत्याहि देशाची सर्व बाजूंनीं भौतिक सुधारणा करण्यास अर्थशास्त्राच्या भाषेंत सांगावयाचें तर जमीन, श्रम व भांडवल ही धनोत्पादनाच्या साधनांची त्रयी आपल्या मुठींत आणावयास त्याची शासनपद्धतिहि कालानुरूप पाहिजे हें सांगावयास नकोच. तशी म्हैसूरची राज्यपद्धति सनदशीर आहे. म्हणजे महाराज हे संस्थानचे मुख्याधिपति आहेत, तथापि त्यांच्या हुकमतीखालीं कायदे करण्यास व राज्यकारभार करण्यास स्वतंत्र अधिकार असलेल्या संस्था आहेत. तेथील दिवाण हे अम्मलबजावणीखात्याचे मुख्याधिकारी असून त्यांच्या मदतीला दोन कार्यकारी सभासद व एक विशिष्ट सभासद—या जागीं हल्लीं युवराज आहेत—असतो. हे चार सभासद मिळून महाराजांचें कार्यकारी मंडळ बनलें आहे. निरनिराळ्या खात्यांतील सर्व खातीं दिवाण व हे सभासद यांच्यामध्यें वांटून देण्यांत आलीं असून तेच संस्थानिकाकरितां निकाली हुकूम देतात. अधिक महत्त्वाचीं कामें महाराजांकडे विचाराकरितां जातात. प्रत्येक खात्याचा एक एक मुख्याधिकारी असतो. जिल्हानिहाय कारभार पाहण्यास अधिकारी असतात. येथें न्याय व अम्मलबजावणीखातीं हींहि सन १९१९ सालापासून पृथक् पृथक् करण्यांत येऊन तूर्त बंगलोर व शिमोगा या जिल्ह्यांत त्यांचा प्रयोग करून पाहण्यांत येत आहे. तसेंच म्हैसूर व बंगलोर जिल्ह्यांत जूरीपद्धति गेल्या सालापासून चालवून पाहण्यांत येत आहे.

म्हैसूरची राज्यव्यवस्था स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर रचलेली आहे. या स्वराज्याची मुहूर्तमेढ, म्हैसूरची लोकसभा ऊर्फ प्रतिनिधीसभा सन १८८१मध्यें प्रसिद्ध दिवाण रंगा चार्लु यांनीं महाराजांचे अनुमतीनें स्थापन करून रोविली. याच्यापूर्वी जो पन्नास वर्षें राज्यकारभार राजा व प्रजा यांची ताटातूट करून हांकला जात होता, त्यांतील पुष्कळ दोष उघडकीस आले. या सभेनें म्हैसूरच्या

लोकांचे हक्क व स्वातंत्र्य मान्य करून त्यांच्यांत राजकीय आकांक्षांना आशेचा अंकुर उत्पन्न केला. ही सभा स्थापन करतांना महाराजांनीं जो जाहीरनामा काढला त्यांतील पुढील भाग मननीय आहे. त्यांत महाराज म्हणतात, " ज्या हेतूनें राज्यकारभार चालतो ते हेतू ज्यांच्या कल्याणाकरितां राज्य हांकावयाचें त्यांना नीट समजावेत अशी माझी इच्छा आहे. हा हेतु तडीस नेण्यास सर्व वर्गांच्या प्रतिनिधींची सभा स्थापून हा उपक्रम करावा व तीपुढें दिवाणानें राज्यकारभाराचा हिशेब द्यावा व पुढील सालचा कार्यक्रम ठरवावा, असें माझें मत आहे. या व्यवस्थेनें लोक व सरकार यांचा निकट संबंध येऊन सरकारच्या कारभारासंबंधीं लोकांचे असलेले गैरसमज दूर होतील, व सरकार व रयत यांचा हितविरोध नसून रयतेचें कल्याण तेंच राजाचें कल्याण अशी भावना दृढ होईल." या लोकसभेच्या घटनेंत निवडणुकीचें तत्त्व स. १८९१ सालापासून घालण्यांत आलें. या लोकसभेसंबंधीं नियम वगैरे करण्यांत आले आहेत, ते येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. या सभेपुढें चर्चेकरितां सुमारें ८००-८५० विषय येत असत. परंतु ही संख्या मर्यादित करून बंगलोर व म्हैसूर या जिल्ह्यांनीं फक्त ७५ विषयांसंबंधीं व इतर जिल्ह्यांनीं ५० विषयांवर प्रश्न विचारावेत असा नियम केला. या लोकसभेंत सुमारें तीनशें लोकप्रतिनिधी असतात.

या लोकसभेंतून पुढें लवकरच म्हैसूरचें कायदे कौन्सिल सन १९०८ सालीं जन्मास आलें. तोंपर्यंत महाराजांच्या कार्यकारी ऊर्फ पूर्ण सत्ताधारी मंत्र्यांच्या हातांतच कायदे करण्याची सर्व सत्ता होती. पहिल्या कायदे कौन्सिलांत दिवाण, व दुसरे दोन अम्मलदार Ex-Officio म्हणून आलेले सभासद असत, व १० पासून २५ पर्यंत सर्व सरकारनियुक्त सभासद असत. त्यांत दोन-पंचमांश म्हणजे ४ अथवा ६ बिनसरकारी सभासद असत. आतां वरील दोन कौन्सिलरच्या जागा प्रतिनिधिसभेनें निवडून दिलेल्या दोन सभासदांस खुल्या ठेविल्या आहेत, व सभासदांची संख्या १५ ची २१ वर आणली आहे. त्यांपैकीं आठ जागा लोकनियुक्त सभासदांस व १४ प्रातिनिधिक सभेस खुल्या ठेविल्या असून दुसऱ्या चार जागा जिल्ह्यांच्या चार गटांस ठेविल्या आहेत. शिवाय या कौन्सिलला वार्षिक बजेटावर चर्चा करण्याचा व प्रश्न विचारण्याचा अधिकार

विशिष्ट नियमानुसार देण्यांत आला असून सार्वजनिक हितसंबंधीं ठराव आणण्याचाहि हक्क दिला आहे. या कौन्सिलांस महाराजांच्या व ब्रिटिश सरकारच्या कारभारांत तोंड घालण्याची सक्त मनाई आहे. कौन्सिलची सुधारणा ही सर विश्वेश्वर ऐयर यांची सर्वश्रेष्ठ व संस्मरणीय कामगिरी आहे. त्या योगानें म्हैसूरच्या इतिहासांत नव्या युगास आरंभ झाला आहे. राज्यकारभारावर लोकनियुक्त सभासदांनीं टीका केली असतां सरकारचें लक्ष होत असलेल्या अन्यायाकडे तेव्हांच लागतें व राज्यकारभाराच्या तत्त्वाच्या पद्धतीवर प्रकाश पडतो.

सुधारलेल्या कौन्सिलच्या पाठोपाठ आर्थिक परिषद् सन १९११ मध्यें प्रथम स्थापन झाली. तिला आतां चिरस्थाई स्वरूप प्राप्त झालें असून तिच्या घटनेंत दूरदर्शीपणानें चांगल्या सुधारणा करण्यांत आल्या आहेत. तिची बैठक दरसाल महाराजांचे वाढदिवसाचे दिवशीं होत असते. या परिषदेचे चार उद्दिष्ट हेतू आहेत. ते येणेंप्रमाणें :

१. म्हैसूरच्या आर्थिक प्रगतीचा विचार करण्याकरितां सुशिक्षित, सार्वजनिक कामांत लक्ष घालणारे, मोठमोठे जमीनदार, व्यापारी, यांचा सरकारी अधिकाऱ्यांशीं संबंध घडवून आणणें.

२. ज्या लोकांस या विषयाचा विचार करण्याची पात्रता असेल त्यांच्याशीं नित्य विचारविनिमय करून लोकांमध्यें निरनिराळ्या प्रश्नांसंबंधीं जागृति कायम ठेवणें.

३. लोकांची स्वतः प्रयत्न करण्याची पात्रता उद्दीपित करून जेथें सरकारनें मदत करण्यासारखी असेल तेथें ती कशा प्रकारें करावी हें सुचविणें.

४. अखिल संस्थानच्या उत्कर्षासंबंधीं महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार करण्याकरितां वार्षिक परिषद् भरविणें. या परिषदेचे अध्यक्ष दिवाण असतात, व दोन कार्यकारी सभासद उपाध्यक्ष असतात. तसेंच खात्यांचे १२ अधिकारी, ८ डेप्युटि कमिशनर, ८ लोकसभेचे प्रतिनिधी, ८ जिल्हानिहाय अनधिकारी लोकनियुक्त प्रतिनिधी, १२ सरकारनियुक्त सभासद, येणेंप्रमाणें ४८ सभासद व ३ अध्यक्ष-उपाध्यक्ष अशी मिळून ही सभा बनलेली आहे. सरकारी नोकरांस या परिषदेचे प्रतिनिधी म्हणून उभें राहतां येत नाहीं. हल्लीं या

सभेचा खर्च २ लक्ष २५ हजार रु. येतो. अंदाजपत्रकांत नमूद केलेल्या रकमेपेक्षां अधिक रक्कम खर्च करण्यास अथवा १०० रुपयांच्यावर नोकर नेमण्यास अगाऊ मंजुरी घ्यावी लागते. या परिषदेची घटना अतःपर याप्रमाणें करण्यांत आली आहे:

१. आर्थिक प्रगति करणारें मध्यवर्ती मंडळ;

२. शिक्षण, कृषि-उद्यम व औद्योगिक अशा तीन कमिट्या;

३. शास्त्रीय संशोधन व सल्लागार मंडळ, या परिषदेच्या तीन कमिट्या केल्या आहेत. वरील कमिट्यांचें काम करण्यास आणखी पोट-कमिट्या नेमल्या आहेत.

म्हैसूरची लोकसभा, कायदेमंडळ व आर्थिक परिषद् या स्वयंनिर्णयपोषक मुख्यांगांचा विचार येथवर केल्यानंतर राज्यकारभाराच्या बाकीच्या उपांगांचा म्हणजे राज्ययंत्रांतील निरनिराळ्या खात्यांचा सारांशरूपानें विचार करणें क्रमप्राप्तच होतें. म्हैसूरच्या राज्यघटनेसंबंधीं सांगतांना अम्मलबजावणीसंबंधीं दोन शब्द सांगितले. त्यापुढील महत्त्वाचें म्हणजे न्यायखातें होय. म्हैसूरचें वरिष्ठ कोर्ट म्हणजे न्यायखात्याचें आद्यपीठ होय. त्यांत तीन अथवा जरूरीप्रमाणें अधिक न्यायाधीश असून संस्थानांतील न्यायमनसुब्यांच्या कारभारावर त्याची देखरेख व हुकमत आहे. न्यायखात्यांतील बढत्या वगैरे तेंच करतें. वरिष्ठ कोर्टाखालीं जिल्हा व तालुका कोर्टें आहेत.

ब्रिटिश हद्दींतल्याप्रमाणेंच न्याय व अम्मलबजावणीखात्यांत सिव्हिलियनांची ऊर्फ सनदी नोकरांची लायकीची परीक्षा विलायतेंत उत्तीर्ण झाल्यावर त्यांची नेमणूक करतात. याप्रमाणें म्हैसूर संस्थानानें वरील वरिष्ठ प्रतीच्या नोकरींत लायक व हुषार इसमांची भरती करण्याकरितां Mysore Civil Service म्हणून परीक्षा ठेविली असून ती पास होणारांचाच या वरिष्ठ नोकरींत प्रवेश होतो. या परिषदेचे विशिष्ट नियम व अभ्यासक्रम संस्थाननें मुकर्रर केला आहे. ही परीक्षा फक्त संस्थानच्या कायम रहिवाश्यांनाच देतां येते.

१९ सालाबद्दल मिळणारी रक्कम व खर्च देऊन पुढील कांहीं कालाकडे वळतों.

| बाब | जमा | बाब | खर्च |
|---|---|---|---|
| जमीन बाब | १०९७५७९१ | खंडणी | ३५००००० |
| खाणी | १४४६२७४ | वसुली खर्च | ३९५९६६० |
| जंगल | ४६०२१४२ | राज्यकारभार | ८२५८९८१ |
| अबकारी | ६६८७९४८ | शिक्षण | ३६१४००१ |
| स्टांप | १२७१६६६ | वैद्यक | ७९६५०७ |
| न्यायखातें | ४३०७४ | देवस्थान धर्मादाय | ३६५६०२ |
| किरकोळ रजिस्ट्रेशन | ८९७११५ | रेल्वे, कालवे, खाणी | ४१७३८३१ |
| शेतकी, व्यापार, उद्योगधंदे, व्याज | १९४८३२८ | पब्लिक वर्क्स | ४२६०३८० |
| रेल्वे, कालवे, चंदनी तेल कारखाना इ. | ३७९५९१८ | पेन्शन | १२३०८३० |
| कर्जाऊ रकमा | ८९९०६९८ | किरकोळ, आरोग्य, आर्थिक परिषद्, शेती, दुष्काळ, रेल्वे-खातें, व्यापार, उद्योग, पतपेढ्या | ४४७४३५४ |
| | | दिलेलें कर्ज | ४४०५५३८ |
| एकूण | ४०६५८९५४ | एकूण | ३९०३९६८४ |

शिक्षण घेण्यास योग्य अशा मुलांची संख्या शिक्षण घेत असलेल्यांशीं पाहतां शेंकडा ६२ पडते व मुलींची संख्या पाहतां शेंकडा ३८ पडते. या शाळा ९ हजार आहेत. त्यांत ७९२ मुसलमानी व ६०२ पंचामा जातीच्या आहेत.

संस्थानांत शेंकडा ६ लोकांना लिहितां वाचतां येतें. पुरुषांमध्यें शेंकडा १० व स्त्रियांमध्यें शेंकडा २ याप्रमाणें १९१३ सालीं शिक्षण-प्रसार होता. त्यापेक्षां आज कितीतरी पट तो अधिक झाला आहे. एकंदर ११५३० शिक्षण-संस्था असून त्यांत मुलें व मुली मिळून ३ लक्ष ३६ हजार संख्या आहे. संस्थानांत

पुरुषांकरितां ५ व स्त्रियांकरितां २ कॉलेजें आहेत. स्त्रीशिक्षकांकरितां एक उद्योगशाळाहि काढण्यांत आली आहे. मुसलमान शिक्षक व शिक्षकिणी तयार करण्याची नवीन व्यवस्था करण्यांत आली आहे. मुलांकरितां १४ व मुलींकरितां २ हायस्कूल्स आहेत. त्याचप्रमाणें पंचामा या अस्पृश्य जातीच्या शिक्षणाची विशेष दक्षता घेतली जाते. त्यांच्याकरितां म्हैसूरला वसतिगृहासह हायस्कूल व औद्योगिक वर्ग काढले आहेत. त्यांच्याकरितां अनेक सवलती दिलेल्या आहेत. त्याचप्रमाणें उद्यम शिकणाऱ्या ४, औद्योगिक २२, एंजिनियरिंग २, शेतकी २, संस्कृत ५७ शाळा आहेत. त्यांत मुख्य शिक्षणावर सालिना एकंदर खर्च ३६ लक्षांवर होत असतो. संस्थानांत सन १९१४ पासून प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करण्यांत येऊन ७ ते ११ वर्षांच्या मुलांस तें मिळालेंच पाहिजे, अशी तजवीज केली आहे. अस्पृश्यवर्गाकरितां सुमारें २०० शाळा असून त्यांत पांच हजारांवर मुलामुलींची संख्या आहे. सन १९१६ च्या वर्षारंभापासून म्हैसूरला युनिव्हर्सिटी स्थापण्यांत येऊन ती शिक्षण देणारी व परीक्षा घेणारी अशीं दोन्ही कामें करिते. या विद्यापीठाचा विशेष हा आहे कीं, येथील आर्ट्स् कॉलेजचा शिक्षणक्रम तीन वर्षांचा असून आपल्या इकडील कॉलेजचा पहिल्या वर्षाचा अभ्यासक्रम तिकडे हायस्कूलच्या अभ्यासांत ओढला आहे. शिक्षक तयार करणारें कॉलेजहि या युनिव्हर्सिटीस जोडलें आहे. शिवाय मेकॅनिकल व सिव्हिल एंजिनियरिंग शिकविणारीं कॉलेजेंहि जोडण्यांत आलीं आहेत. बॉयस्काउटच्या चळवळीचीहि येथें चांगली प्रगति आहे. गुदस्त सालीं महाराजांच्या वाढदिवशीं या स्काउटचें संमेलन भरविण्यांत आलें होतें.

एकंदर संस्थानच्या लोकसंख्येपैकीं शेंकडा ७३ शेतीवर निर्वाह करणारे आहेत, शेंकडा साडेसात उद्योगधंद्यांत, चार व्यापारांत, साडेतीन नोकरींत व दीड शिक्षणसंपन्न धंद्यांत व बाकीचे निरुद्योगी आहेत. येथें सरकार व कुळें यांच्यांतील संबंध आपल्या मध्यभागच्या पद्धतीप्रमाणें आहे. म्हणजे इकडे रयतवारी पद्धतिच चालू आहे. खोती, मालगुजारी, जमीनदारी पद्धति चालू नाहींत. वसुलाची पद्धति आपल्या पद्धतीप्रमाणेंच आहे. सर्व्हेसेटलमेन्ट आपल्या इकडील पद्धतीप्रमाणेंच असून इनामगांवची सर्व्हे करणें इनामदाराच्या मर्जीवर सोंपविलें आहे. शेती सुधारणेकरितां येथें लहानमोठे हजारों तलाव व कालवे

बांधले आहेत. संस्थानांत सुमारें २९ हजार लहानमोठीं तळीं आहेत. त्यांत २५०० मोठे तलाव असून यांचेंच उत्पन्न सुमारें ७ लक्ष ७५ हजार आहे. संस्थानांत तळ्यांची इतकी समृद्धि आहे कीं, कोलारसारख्या जिल्ह्यांत आतां तळीं बांधण्यास मुळींच वाव राहिला नाहीं. इतका लहान विपुल तळीं असलेला प्रदेश हिंदुस्थानांत तर काय पण जगांतहि सांपडणें विरळा.

या तलाव-कालव्यांनीं सुमारें ९० लक्ष ६३ हजार एकर जमीन भिजते. शेती सुधारणेकरितां शेतकीखातें निर्माण केलें असून त्या खात्याकडे ६ लक्ष ५० हजार रु. खर्च होतो. या खात्याचा मुख्य एक डायरेक्टर असून त्याच्या हाताखालीं रसायनशास्त्रज्ञ, भूस्तरशास्त्रज्ञ व इन्स्पेक्टर नेमले आहेत. या खात्याच्या कामाचे संशोधन, प्रयोग व शिक्षण असे तीन भाग केले आहेत. या उपशाखांच्या विद्यमानें तेथील शेती शास्त्रीय पद्धतीवर आणून ती उपयुक्त, लोकप्रिय व किफायतशीर करण्याकडे जास्त लक्ष पुरविलें जातें. शेतकऱ्यांस तगाईरूपानें मदत करण्यांत येऊन लहान धरणें व तळीं यांची दुरुस्ती, लोकांशीं सहकारिता करून करण्याचा सरकारनें उपक्रम केला आहे.

संस्थानांत एकंदर १ कोटि ३९ लक्ष रुपये किंमतीचे यांत्रिक कारखाने ७५ असून त्यांत ६ हजारांवर मजूर काम करतात, व दरसाल १ कोटि ५९ लक्ष रुपये किंमतीचा माल काढतात. वरील यांत्रिक कारखान्यांत कापूस, रेशीम, लोखंड, तेल, लांकूड, पायमोजे, दारू, यांचे कारखाने आहेत. शिवाय चंदन, हस्तिदंत, जडजवाहीर, तांबें, पितळ, वगैरे धातूंवर व लांकडावर घरगुती कलाकौशल्याचीं कामें फार अप्रतिम होतात. आणखी गालिचे, तंतुवाद्यांच्या तारा, कुंभारकाम, कातडीं कमाविणें, साखर, बांगड्या ह्याहि इकडे उत्तम प्रकारच्या तयार होतात. रासायनिक उद्योगधंद्याच्या वाढीकडे लक्ष पुरविण्या-करितां येथें दोन वर्षांपूर्वी शास्त्रीय संशोधन व सल्लागार मंडळ स्थापण्यांत आलें आहे. याप्रमाणें संस्थानांतील सर्व व्यापार व उद्योगधंद्याच्या सांप्रतच्या स्थितीची माहिती मिळविण्याकरितां जे कोणी कारखाने वगैरे काढतील त्यांस सल्लामसलत वगैरे देण्याकरितां येथें व्यापार व उद्योगधंद्याचें खातें काढलें आहे. त्याचा खर्च ११ लक्ष रुपये आहे. सरकारनें स्वतः ३७ हजार रुपये खर्च करून ऊंस गाळण्याचे कारखाने काढले आहेत. तसेंच ९० हजार रुपये भांडवलाचा

साबणाचा कारखाना व ३७ हजार रुपये भांडवलानें धातूचा कारखाना व विणकर कामाचा कारखाना असे कारखाने काढले आहेत. येथील रेशमाचा कारखाना चांगला भरभराटींत आहे.

संस्थानचा आयातीपेक्षां निर्गत व्यापार अधिक आहे. व्यापाराच्या उत्तेजनार्थ १ कोटि २ लक्ष भांडवलाच्या जॉइंट स्टॉक कंपन्या ९३ असून त्यांनीं व्यापारी पेढ्या, विमा, रेल्वे व ट्रॅमवे अशा कारखान्यांस भांडवल पुरविण्याचें पत्करलें आहे. सहकारी पतपेढ्यांची चळवळ येथें १४ वर्षांपूर्वींच सुरू झाली असून ती आतां फार लोकप्रिय झाली आहे. एकंदर सहकारी पतपेढ्या १२३३ वर निरनिराळ्या धंद्यांतील लोकांच्या आहेत. त्यांच्या सभासदांची संख्या ९० हजार असून भांडवल ७५ लक्ष आहे. सन १९१२ मध्यें संस्थाननें स्वतःची म्हैसूर बँक लि. नांवाची बँक काढली आहे. एकंदर संस्थानच्या बँकांत १ कोटीवर ठेवी आहेत.

या संस्थानांत सोन्याच्या खाणी तर आहेतच. त्यांतून सोन्याबरोबर दुसरींहि खनिज द्रव्यें निघतात. तथापि त्यांखेरीज लोखंड, मँगॅनीझ इत्यादिक ३१ खाणी सांपडल्या आहेत. भूगर्भशास्त्रदृष्टीनें त्यांची पाहणी करणारें येथें स्वतंत्र खातें आहे. रूसो-जपानच्या युद्धसमयीं हिंदी मँगॅनीझला युरोपच्या बाजारांत फार किंमत येत होती. म्हैसूर संस्थानच्या जमिनीच्या उदरांत असलेल्या सर्व द्रव्यांचा उपयोग करून घेण्याकरितां म्हैसूर दरबार पराकाष्ठा करीत आहे. हें खातें नुसता खर्च खात पडलें नसून त्या खात्याचें आज सालिना रु. १४ लक्ष ५० हजार उत्पन्न असून खर्च १ लक्ष ८२ हजार आहे. सन १८८२ मध्यें सोन्याची प्रथम खाण सांपडली. तेव्हांपासून आज-पर्यंत सुमारें ७५ कोटींचें सोनें खाणींतून पैदास होऊन संस्थानास मालकी हक्काबद्दल ५ कोट रुपये मिळाले.

संस्थानांत रेल्वे सुमारें ५४१ मैल लांबीची गेली असून तिच्या एकंदर भांडवलावर शेंकडा ५।।। टक्के व्याज पडतें. एकंदर नफा १५ लक्ष रुपये मिळतो. कांहीं रेल्वे खास संस्थाननें चालविल्या आहेत, व रेल्वे कंपन्यांच्या ताब्यांतील रेल्वे लवकरच संस्थानच्या ताब्यांत येणार आहेत. आणखी रेल्वे वाढविण्याचा विचार चालू आहे.

म्हैसूर संस्थानांत एकंदर जमीन सुमारें १ कोटि ९० लक्ष एकर असून सुमारें साडेबावीस लक्ष फॉरेस्टखालीं, साडेऐशीं लक्ष लागवडीखालीं, सदुसष्ट लक्ष लागवड करण्यासारखी व तेरा लक्ष पडतर आहे. जमीन कांहीं मऊ असून कोठें कोठें वालुकामिश्रित आहे. तेथील जंगलचें क्षेत्रफळ ३२३५ चौरस मैल आहे. जंगलांत पुष्कळ प्रकारचीं झाडें आहेत. त्यांत चंदन व सागवान यांची विपुल समृद्धी असून या दोहोंचें ऐन उत्पन्न २५ लक्ष रुपयांचें आहे. चंदन हा तेथील निर्गत व्यापाराचा मुख्य जिन्नस असून त्यास दर टनीं १ हजार रुपये किंमत येते. त्या झाडांवर संस्थानचा मालकी हक्क प्रस्थापित करण्यांत आला आहे. जंगलखात्याचें ४६ लक्ष २ हजार रुपये उत्पन्न येतें. त्यांत ११ लक्ष ८० हजार खर्च वजा जातां ३४ लक्ष २२ हजार निव्वळ नफा राहतो. या खात्याचा कारभार ब्रिटिश फॉरेस्ट खात्याप्रमाणेंच चालला आहे. संस्थानास जंगलापासून कसा फायदा होणार ही गोष्ट प्रथम दिवाण रंगा चार्लू यांनीं संस्थानच्या निदर्शनास आणली. तेव्हांपासून या खात्याची उत्तरोत्तर प्रगति होत जाऊन १९१३ मध्यें सर विश्वेश्वर ऐया यांनीं जंगलाची शास्त्रीय पद्धतीनें पाहणी करण्याची आवश्यकता दर्शविली व तत्काल आगपेट्या, पेन्सिली, कागद, सूत, कातडीं रंगविणें, रंग, लाख, डिंक, औषधी रसायनें, तेलें, चरबी, वेत, पिपें इत्यादि धंद्यांच्या वाढीस त्यांचा कसा उपयोग करतां येईल हें पाहण्यास दोन अम्मलदार नेमले, व त्याच्या संशोधनाकरितां प्रयोगशाळा, ग्रन्थसंग्रहालय स्थापन करून फॉरेस्टविषयक माहिती देणारी शाळाहि स्थापन केली. औषधी रसायनें व तेलें काढणाऱ्या नुकत्याच एकदोन कंपन्या निघाल्या आहेत. संस्थाननें २५ हजार रुपये भांडवलावर लांकडें कापण्याची एक गिरणी कुमसी येथें उघडली आहे.

संस्थानांत दुभत्या व शेतीच्या उपयोगी जनावरांची विपुलता आहे : गाईम्हशी २१ लक्ष, बैल-रेडे १७ लक्ष, शेळ्या-मेंढ्या ५६ लक्ष, घोडे २१ हजार. यांच्या उत्तम पैदाशीकरितां सरकारी तबेले व गोठे ठेविले आहेत. त्यांत ८३५० जनावरें आहेत. त्यांकरितां अमृतमहाल ऊर्फ थट्टीखातें या संस्थानांत ऐतिहासिक कालापासून अस्तित्वांत आहे. या थट्टीच्या जोरावर हैदर व टिपू यांस दररोज ५०।५०, ६०।६० कोसांच्या मजला मारतां येत.

या खात्यानें हैद्राबाद संस्थानास व मुंबई इलाख्याच्या शेतकी खात्यास उत्तम अवलादीचीं जनावरें पुरविलीं आहेत. हेंहि खातें नुसतें खर्चाचेंच खातें नाहीं. खर्च वजा जातां या थट्टीपासून १० हजार रुपये उत्पन्न येतें. संस्थानी जंगलांत शिकार पुष्कळ सांपडते. म्हैसूर संस्थानची हत्ती पकडण्याच्या बाबतींत पहिल्यापासून मोठी ख्याति आहे. बडया दरबारी पाहुण्यांच्या भेटीसमयीं बडोद्यास हत्तीची साठमारी करितात त्याप्रमाणें अशा प्रसंगीं अथवा शेतीस उपद्रव होऊं लागला म्हणजे हे हत्ती पकडण्याचे प्रयोग चालू होतात. तेव्हां पुष्कळ हत्ती सांपडतात. त्यांपैकीं हजारों रुपयांस बरेच विकून टाकतात. हें हत्ती पकडण्याचें काम बऱ्याच खर्चाचें आहे.

या संस्थानांत मुख्य मुख्य धर्म प्रचलित असून त्यांचे अनुयायी एकमेकांशीं गुण्यागोविंदानें नांदत आहेत. सर्व धार्मिक संस्थांची व देवस्थानची व्यवस्था ठेवण्याकरितां येथें वेगळें खातें असून संस्थानाकडून त्या धार्मिक संस्थांस ३ लक्ष ६५ हजार रुपये नेमणूक आहे. शिवाय इनामें, देणग्या वेगळ्याच आहेत. म्हैसूर ही हिंदुस्थानांतील पुण्यभूमि आहे. शंकराचार्यांचा श्रृंगेरीमठ, विशिष्टाद्वैती रामानुजम्, द्वैतवादी वैष्णवस्वामी मध्वाचार्य यांनीं याच भूमीवरून आपल्या मतांचा प्रसार केला. लिंगायत, जैन व इस्लाम यांचींहि पवित्र स्थानें येथें आहेत. ख्रिस्तीधर्मप्रसार इकडे थोडाबहुत दृष्टीस पडतो.

लोकांच्या आरोग्याकडे लक्ष पुरविण्यास येथें वैद्यक व आरोग्य अशीं पृथक् खातीं आहेत. त्यांवर अनुक्रमें ७ लक्ष ९६ हजार व १ लक्ष ५२ हजार रुपये खर्च होतो. संस्थानांत एकंदर १७९ दवाखाने आहेत. लवकरच आणखी ११० दवाखाने काढून येथें मेडिकल कॉलेज काढण्यासंबंधीं विचार होणार आहे. म्हणजे या खात्याकडे दरसाल १० लक्ष रुपयांची अधिक वाढ होणार आहे. देशी दवाखाने काढण्यास लोकांची विशेष अनुकूलता दिसून येते. पण आयुर्वेदिक कॉलेजची पुनर्घटना करून त्यांतच वैद्यक शिक्षणाची सोय करून हा प्रश्न लवकरच सोडविला जाणार आहे. खेड्याचें आरोग्य सुधारण्याकरितां कायदा करण्यांत येऊन त्या अन्वयें ८९५ आरोग्य कमिट्या नेमण्यांत येऊन १२ हजार खेडीं अथवा ४८ लक्ष लोकसंख्या त्यांच्या देखरेखीखालीं देण्यांत आली व त्यांच्या खर्चास संस्थानकडून साठ हजार रुपये मंजर करण्यांत आले.

संस्थानमध्यें एकंदर १०२ म्युनिसिपालिट्या आहेत. त्यांचे तीन वर्ग आहेत. सिटी म्युनिसिपालिट्या २, टाउन २९ व मायनर ७१ आहेत. सिटी व टाउन म्यु.पालिटीस स्वतःचा अध्यक्ष निवडण्याचा अधिकार आहे. संस्थानांतील गांवांस स्थानिक स्वराज्याचे अधिकार दिल्यामुळें आतां खेड्याच्या म्यु. फारशा शिल्लक राहिल्या नाहींत. वरील म्यु.पालिटींत १३१६ मेम्बर असून त्यांत ४९३ निवडून आलेले व ४९५ सरकारनें नेमलेले आहेत. पैकीं ३३३ सरकारी अम्मलदार आहेत. म्यु.पालिट्यांचें वार्षिक उत्पन्न २१ लक्ष २५ हजार आहे. त्यांत सरकारी देणगी रूपानें १ लक्ष २ हजार रक्कम मिळते. व कर्जाऊ रक्कम ५ लक्ष ४० हजार आहे. खर्च २० लक्ष ५२ हजार आहे.

संस्थानांत जिल्हा लोकलबोर्डें ८ व तालुका लोकलबोर्डें ७७ होतीं. स्थानिक स्वराज्याचा अधिकारप्रसार झाल्यामुळें ह्या बोर्डांच्या कारभारांत पुष्कळ फेरफार झाला आहे. खेडोखेडीं ग्रामपंचायती चालू करण्यांत आल्या असून हल्लीं ८५८ पंचायत-कमिट्या स्थानिक कारभार करीत आहेत. जिल्हाबोर्डांचें उत्पन्न १८ लक्ष ९५ हजार व खर्च ११ लक्ष ४३ हजार आहे. सरते शेवटीं लष्करखातें. याच्यामध्यें रिसाला १४९८, पायदळ १५४७, नेआण करणारे ८५०, एकूण ३८९५. या खात्याकडे १८०६५५१ खर्च गेले सालीं झाला.

संस्थानच्या राज्यकारभाराचें स्वरूप वर वर अवलोकन करणारास हेंच दिसून येईल कीं, त्या राज्यकारभाराचें मुख्य ध्येय संस्थानची व रयतेची सांपत्तिक स्थिति सुधारणें हें होय; व त्याच दिशेनें कसकसे प्रयत्न चालले आहेत याचें साररूपानें येथवर विवेचन करण्यांत आलें. तेथील राज्यकारभार कोणत्या धोरणावर चालला आहे, हें माझ्या शब्दांत सांगण्यापेक्षां माजी सुप्रसिद्ध दिवाण सर विश्वेश्वर ऐया यांनीं सन १९१७ मध्यें म्हैसूरच्या लोकसभेंत केलेल्या भाषणांतील कांहीं भाग येथें उद्धृत करून हें भाषण पुरें करतों. दिवाण सर विश्वेश्वर ऐया म्हणतात—

"गेलीं थोडीं वर्षे आपल्या मर्यादित क्षेत्रांत निरनिराळ्या सुधारणा व प्रगति करण्याचा आमचा नम्र प्रयत्न आहे. या सुधारणांच्या योजना तुटक तुटक दिसत असल्या तरी प्रगतीच्या दृष्टीनें त्या सर्व एकजीव झालेल्या आहेत. सर्व योजनांचें पर्यवसान पुढें दिलेल्या तीन मुख्य वर्गांपैकीं

कोणत्या तरी एका वर्गांत होतें. ते वर्ग असे: राज्यकारभार, आर्थिक प्रगति, नागरिक व सामाजिक प्रगति.

ज्या गोष्टी राज्यकारभाराच्या सदराखालीं येतात त्या लोकप्रतिनिधींच्या मदतीनें व लोकसभेची व इतर सार्वजनिक संस्थांची सल्ला घेऊन होतात.

आर्थिक चळवळीचें नियंत्रण लोकप्रतिनिधी व सरकार या दोघांच्या मिश्र व्यवस्थेनें होतें व ही योजना अधिकाधिक परिणामकारक अशी होत आहे.

नागरिकविषयक व सामाजिक चळवळींना नुकताच हात घातला आहे. पण लोकांच्या नजरेंत भरेल असें त्यांना महत्त्व येण्यापूर्वी अगोदर पद्धतशीर कामाची दिशा आंखावयास पाहिजे. बाहेर जी विचारक्रांति झालेली दिसून येत आहे तीवरून आम्ही योग्य मार्गानेंच जात आहोंत असें ठरतें. आमची पुढील प्रगति लोकांची तत्परता, धाडस व ग्राहकशक्ती यांवर अवलंबून आहे हें सांगावयास नकोच.

रेल्वे, कालवे, विजेचे कारखाने, जंगलें, खाणी व इतर उद्योगधंद्यांची वाढ यांनीं निसर्गसिद्ध साधनांची वाढ परिस्थितीनुरूप सावधपणानें परंतु शक्य तेवढी झपाट्यानें होत आहे. ज्या उत्पन्नाच्या वसुलाचा बोजा रयतेवर पडणार नाहीं असे नवीन उद्योग आम्ही काढणार आहोंत, व त्याच उद्देशानें आम्हीं उत्पन्न वाढवून आर्थिक प्रगति करणारीं खातीं निर्माण करून त्यांवर बरीच मोठी खर्चाची रक्कम मंजूर करण्यांत येत आहे.

मागसलेले व अस्पृश्य अशा सर्व लोकांची शैक्षणिक पात्रता व कार्य-क्षमता वाढविण्याकरितां नेटाचा प्रयत्न सुरू होणें जरूर आहे. आम्हीं हातीं घेतलेल्या योजना यशस्वी झाल्या म्हणजे आजच्यापेक्षां चौपट मुलें मुली शाळेंत जाऊं लागतील. या योजनेनें खेड्याच्या वस्तीचा व मागसलेल्या वर्गाचाच फायदा होणार आहे. एका बाजूस प्राथमिक शिक्षणाची झपाट्यानें वाढ व दुसऱ्या बाजूस अर्वाचीन पद्धतीच्या विश्वविद्यालयीन शिक्षणाची प्रगति होत गेल्यावर शिक्षणाच्या बाबतींत आमचें पाऊल पुढें आहे असें मानण्यास हरकत नाहीं. आमची शिक्षणविषयक योजना महाराजांच्या सर्व प्रजाजनांना कल्याणप्रदच होईल व आम्हांस अशी उमेद आहे कीं, त्या योगानें सर्व प्रजेमध्यें सलोखा व एकोपा नांदूं लागेल.

चित्रांक ६७



पॉपलर ॲव्हिन्यू, श्रीनगर, काश्मीर.

[ सं. पा. ३६०

संस्थानच्या नोकरीस लायक माणसें मिळून त्यांना योग्य बढती मिळण्यासंबंधींची योजनाहि सुधारून कायम करण्यांत येत आहे. एकंदर खात्यांची बारीक चौकशी होत आहे. प्रत्येक खात्यास पद्धतशीर व शुद्ध वळण लागण्याकरितां कायदे, वटहुकूम व तत्संबंधीं माहितीचीं पुस्तकें तयार होत आहेत. स्थानिक स्वराज्याच्या हक्कांची जी वाढ करण्यांत आली आहे तिच्या योगानें लोकांत सहकारी तत्त्वावर काम करण्याची पुष्कळ संधी मिळून तिचा ते योग्य फायदा घेतील असें वाटतें.

सरकारी मदत न घेतां भौतिक शास्त्रें, कला, वाङ्मय, धर्म व नीति यांची अभिवृद्धि करण्याकरितां पद्धतशीर प्रयत्न अद्याप व्हावयाचा आहे.

सारांश, मालांची पैदास वाढवून लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारणें, त्यांना प्रसंशनीय गोष्टींचें वळण लावणें, त्यांच्या भलभलत्या समजुती दूर करून त्यांच्यापुढें पुढारलेल्या राष्ट्रांच्या अनुभवानें पारखून निघालेलें जोमदार ध्येय ठेवणें म्हणजे सामर्थ्यवान्, बुद्धिवान्, कर्तबगार व धाडसी लोक तयार करणें हा आमच्या सर्व उलाढालींचा हेतु आहे.''

## परिशिष्ट थ

## काश्मीर-प्रवास

श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव यांनीं केलेल्या काश्मीरच्या प्रवासाची हकीकत भोर येथें ता. १८ नोव्हेंबर सन १९२० रोजीं व्याख्यान रूपानें सांगितली ती :—

सभ्य गृहस्थहो, मी नुकताच काश्मीरचा प्रवास करून आलों हें आपणांस माहीत आहेच. काश्मीर देश अपूर्व सृष्टिसौंदर्याबद्दल फार प्रसिद्ध आहे. अशा प्रदेशाची आपणांस कांहीं माहिती कळावी अशी इच्छा असणें स्वाभाविक आहे. ती अंशतः पूर्ण करण्याकरितां व ज्या कोणास तें पाहणें शक्य असेल त्यास प्रोत्साहन मिळावें या उद्देशानें मी आज त्याबद्दल थोडीशी माहिती सांगण्याचा विचार केला आहे. पहिल्यानें मीं कोणकोणतीं ठिकाणें पाहिलीं तें सांगण्याचे अगोदर काश्मीरसंबंधानें सामान्य माहिती सांगतों.

काश्मीर संस्थानचा मुलूख ३२°-१७′ ते ३८°-५८′ अक्षांश व ७३°-२६′ ते ८०°-३०′ रेखांशांवर आहे. त्याचें क्षेत्रफळ ८०९०० चौरस मैल आहे. सन १८९१ च्या खानेसुमारीप्रमाणें एकंदर संस्थानची लोकसंख्या सुमारें साडे-पंचवीस लक्ष आहे. त्याच्या उत्तरेस कांहीं अर्धवट स्वतंत्र अशीं लहान लहान डोंगरी संस्थानें आहेत. तीं काश्मीरचीं मांडलिक आहेत. ह्यांखेरीज उत्तरेस काराकोरम पर्वत व हिंदुस्थानांतून तुर्कस्थानांत जाण्याकरितां असलेला काराकोरम घांट आहे. पूर्वेस चिनी तिबेट, दक्षिणेस पंजाब इलाखा. काश्मीरमध्यें निर-निराळ्या जाती, भाषा, धर्म, पंथ व चालीरीती प्रचलित आहेत. संस्थानचा आकार साधारण चौकोनी असून राज्यकारभाराचे सोयीकरितां त्याचे जम्मू, काश्मीर, लहान तिबेट व गिलजित असे चार प्रांत केले आहेत. ह्या काश्मीर प्रांताभोंवतीं अथवा मुख्य दरीभोंवतीं सर्वत्र हिमालय पर्वताचें वेष्टण असून त्याची लांबी ८४ व रुंदी २५ मैल आहे. हा सखल प्रदेश काश्मीर संस्थानच्या मध्यभागीं असून सर्वांत सृष्टिसौंदर्यामध्यें अप्रतिम आहे. हा प्रदेश समुद्रसपाटीपासून ५३०० फूट उंच आहे. काश्मीरच्या ह्याच प्रदेशांतून झेलम ऊर्फ वेदकालीन वितस्ता किंवा ग्रीक लोकांनीं संबोधिलेली हिडसपिस ही मुख्य नदी वाहते. ह्या नदींत इस्लामाबाद-पासून बारामुल्लापर्यंत नावा चालतात. ह्याच काश्मीर प्रदेशांतील कांहीं ठिकाणें मीं पाहिलीं; व त्यांबद्दल आज मी सांगणार आहें. काश्मीरसंबंधानें अति प्राचीन माहिती कल्हण पंडितानें इ. स. ११४८ मध्यें रचलेल्या ‘राजतरंगिणी’ ग्रंथांत विस्तृतपणें सांपडते. त्यांतील पहिल्या सर्गांतील कांहीं श्लोक मी येथें देत आहें. त्याचा उद्देश हा कीं, जरी ते पौराणिक पद्धतीनेंच लिहिले आहेत तरी ते काश्मीरची उत्पत्ति कशी झाली याबद्दल, तें सत्यास धरून आहे अशाबद्दल, अन्य पुराव्यावरून तज्ज्ञांनीं सिद्ध केलें आहे; व शिवाय काश्मीरास इतकें सृष्टिसौंदर्य कसें लाभलें हें त्याच्या उत्पत्तीवरच अवलंबून आहे.

पुरा सती सरः कल्पारंभात्प्रभृतिभूरभूत् ।
कुक्षौ हिमाद्रेरर्णोभिः पूर्णा मन्वंतराणि षट् ॥
अथ वैवस्वतीयेऽस्मिन् प्राप्ते मन्वंतरे सुरान् ।
द्रुहिणोपेन्द्ररुद्रादीनवतार्य प्रजासृजा ॥
कश्यपेन तदन्तःस्थं घातयित्वा जलोद्भवम् ।
निर्ममे तत्सरो भूमौ कश्मीरमितिमंडलम् ॥

कल्पारंभापासून सहा मन्वंतरांच्या कालांत हिमालयाच्या पोटांतील भूमि पाण्यानें तुडुंब भरलेली असल्यामुळें तिला सतीचें सरोवर म्हणत. पुढें हल्लीं चालू असलेला वैवस्वत मनू सुरू झाल्यावर प्रजापती कश्यपानें द्रुहिण, उपेन्द्र, रुद्र इत्यादि देवांना खालीं आणून त्यांचे हस्तें त्या सरोवरांत राहणाऱ्या जलोद्भव राक्षसाला मारविलें व त्या भूमीवर कश्मीर नांवाचा देश निर्माण केला, व हल्लींच्या शोधावरून हेंच सिद्ध झालें आहे कीं, पूर्वीं तेथें म्हणजे काश्मीर प्रांतांत व दरींत सर्वत्र पाण्याचें अति विस्तृत सरोवर होतें व पुढें बारामुल्ला येथें दगड फोडून अगर धरणीकंपानें पाण्यास वाट मिळाल्यावर तें झेलम नदीच्या द्वारें बाहेर पडलें. अति प्राचीन कालीं या प्रांताची राज्यव्यवस्था त्या त्या गांवापुरतीच होती. म्हणजे प्रत्येक गांवचा मुख्याधिकारी हाच तेथील सत्ताधिकारी मानण्यांत येई. पण ग्रामाधिकारी आपआपसांत भांडूं लागले, तेथें सर्व बंडाळी उत्पन्न झाली, त्यामुळें लोकांस पीडा होऊन त्यांनीं जम्मू प्रांतांतून दयाकरण नांवाच्या क्षत्रिय राजास आपल्यावर राज्य करावयास बोलाविलें. या कुलांतील शेवटचा राजा सोमदत्त कौरवपांडवांच्या भारतीय युद्धांत मारला गेला. त्यानंतर ख्रिस्तशकपूर्वीं २४४८ मध्यें गोणंद नांवाचा राजा गादीवर आला. त्यानंतर मध्यंतरीं पुष्कळ क्षत्रिय राजे होऊन गेले. पुढें अशोकानें ख्रिस्तशकपूर्व १३९४ मध्यें हा काश्मीर प्रांत जिंकून तेथें बौद्ध धर्माचा प्रसार केला. पण अशोकाचा मुलगा जलोक यानें बौद्ध धर्माचा विध्वंस करून पुन्हां आर्यधर्माची तेथें प्राणप्रतिष्ठा केली. अभिमन्यु नांवाच्या राजानें त्या प्रांतांतून बौद्ध धर्म समूळ उपटून काढला. गोपादित्य नांवाच्या राजानें हल्लींच्या तख्त-इ-सुलेमान टेकडीवरील अथवा शंकर पर्वतावरील प्रसिद्ध शंकराचें देवालय बांधलें. राजा प्रवरसेनानें श्रीनगर शहर वसविलें. ललितादित्य नांवाचा एक राजा फार सुसंस्कृत व न्यायी होऊन गेला. त्याच्या कारकीर्दींत त्या प्रांताची फार भरभराट झाली. इ. सनाच्या चवदाव्या शतकारंभीं काश्मीरांतील हिंदु राजघराणें नष्टप्राय झालें. पूर्वींच्या हिंदु राजासंबंधीं जी काय साधार माहिती सांपडते तीवरून ते राजे फार न्यायी व दयावंत होते व त्यांच्या राज्यांत प्रजा फार सुखी होती असें दिसतें. या प्रदेशांतील प्राचीन मोठमोठे कालवे, मोठमोठ्या इमारती, पुष्करणी अशीं जीं लोकोपयोगी कामें आज अस्तित्वांत आहेत तीं त्या कालाच्या संपन्नतेची पूर्ण साक्ष देत आहेत.

इ. सनाच्या चवदाव्या शतकापासून मुसलमानी अमदानीस सुरुवात झाली. या तुर्की सुलतानांपैकीं शिकंदर ऊर्फ भुत-शिकान यानें धर्मवेडाच्या भरांत मार्तंड, अवंतीपूर व पंद्रितन येथील प्रसिद्ध देवळांचा व दुसऱ्याहि पुष्कळ हिंदु देवळांचा विध्वंस केला. गणेशबळ येथील गणेशाची मूर्ति फोडतांना त्यानें एवढी अमानुष कत्तल केली कीं, लिडारच्या दरींतून रक्ताचा पूर वाहिला. बिजविहार अथवा विजयेश्वरी देवीचें देवालय जमीनदोस्त करून त्या ठिकाणीं भिस्मिल्ला या एका एकशब्दी मंत्रानें विजयेश्वरी देवळाची राखरांगोळी झाली अशीं अक्षरें लिहिलेला एक दगड त्यानें रोविला. शिकंदरानें काश्मीर प्रांतांतील हातीं लागतील त्या लाखों संस्कृत ग्रंथांचा नाश करून हजारों ब्राह्मण बाटविले. पुढें झेनुल्ला बुद्दिनाच्या कारकीर्दींत काश्मीरनें बरे दिवस पाहिले. त्यानें ५२ वर्षें राज्य केलें. हा फार थोर, धर्मसहिष्णु, सदाचार-संपन्न असा बादशहा होऊन गेला. त्यानेंच काश्मीरांत तिबेट प्रांतांतून उत्तम लोकर व कारागीर आणवून शालींच्या कारखान्यांचा उपक्रम केला. तेव्हांपासून काश्मिरी शालींची प्रसिद्धि आहे. कागद करण्याची व कागदाच्या लगद्याचे निरनिराळे उपयुक्त चित्रविचित्र पदार्थ करण्याची कला त्यानेंच तत्प्रांतीय लोकांना शिकविण्याची व्यवस्था केली. त्यानें जीं लोकोपयोगी कामें केलीं त्यांतच दाल सरोवर व श्रीनगरचें शहर ह्यांच्यामधील नालामारचा कालवा बांधला. तो वाङ्मय व काव्य यांचा मोठा भोक्ता होता. पुढें चक नांवाचे लोक प्रबल होऊन त्यांनीं काश्मीरच्या आबादानीचा नाश केला. युसफखानाच्या कारकीर्दींत अकबरानें काश्मीर जिंकण्याकरितां मोठें सैन्य पाठविलें व लवकरच सन १५८७ मध्यें तेथें अकबर बादशहाचा अंमल बसला. अकबराच्या कारकीर्दींत काश्मीरला बरेंच सुख लागलें. अकबराचा दिवाण राजा तोडरमल्ल यानें काश्मीर प्रांताची जमाबंदी ठरवून दिली. हरि पर्वतावरील किल्ला त्यानेंच बांधिला. पुढें जहांगिर बादशहानें आपल्या कारकीर्दींत लावण्यलतिका नूरजहान महाराणीबरोबर सुखविलास भोगण्याकरितां अनेक ठिकाणीं अनेक उपभोग्य व रमणीय उद्यानें बांधविलीं. औरंगजेबाच्या प्रखर जुलमी राज्यपद्धतीचा जबर चटकाहि या थंड प्रदेशास बसला आहे. औरंगजेबाच्या पश्चात् दिल्लीहून जे सुभेदार या प्रांतावर नेमले गेले ते स्वतंत्र होऊन काश्मीर प्रांतांत

चित्रांक ६८



श्रीनगरजवळील डाल सरोवर, काश्मीर

सं. ३६२

बेबंदशाही चालू झाली. ही संधि साधून अहंमदशहा अबदाली वगैरे अफगाणच्या प्रबल दुराणी ऊर्फ पठाण लोकांनीं या प्रांतावर सन १७५२ मध्यें हल्ला केला. पण काश्मीरच्या सुदैवानें हा दुराणी अम्मल सांठ-पासष्ट वर्षांपेक्षां अधिक टिकला नाहीं. पण या दुराणी लोकांनीं हिंदूंचा इतका छळ केला कीं, त्याला जगाच्या इतिहासांत दुसरी तोड सांपडणार नाहीं. जाबरखान नांवाच्या दुराणी सुभेदाराच्या अमदानींत पंजाबचा सिंह रणजितसिंग उदयास आला होता. फत्तेखान बरकझी नांवाच्या सरदारानें काश्मीर लुटण्यास रणजितसिंगास प्रोत्साहन दिलें. परंतु लाहोरास पळून आलेला काश्मीरी पंडित बिरबल दाल याची सल्लाच हा काश्मीर प्रांत हाताखालीं घालण्यास रणजितसिंगाला उपयोगी पडली. हा पंडित त्यास मिळाल्यामुळें काश्मीरांत पठाणांनीं त्याचे बायकामुलांस मुसलमान केलें. पठाणांचा रणजितसिंगाचे लोकांनीं पूर्ण पाडाव केला. त्या वेळीं रणजितसिंगाचा एक सेनानी मिसर दिवाणचंद ह्यानें शीखांचें निशाण हरि पर्वतावर कायमचें रोविलें. पुढें रणजितसिंगाचा एक डोग्रा रजपूत जातीचा सरदार गुलाबसिंग म्हणून होता. जम्मू हें त्या गुलाबसिंगाचेंच लहान संस्थान अगोदर होतें. गुलाबसिंगानें आपल्या शौर्यानें आसपासचीं लहान संस्थानें पादाक्रांत केलीं. सन १८२० सालीं त्यास रणजितसिंगानें 'जम्मूचा राजा' असा किताब दिला. किस्तावर व लडाक हे मोठमोठे प्रांत गुलाबसिंगानें जिंकले. सन १८४० सालीं लडाकनजीकचा बाल्टिस्थान हा प्रांतहि त्यानें काबीज केला. या वेळीं काश्मीर-भोंवतीं गुलाबसिंगानें जिंकलेल्या प्रांतांचाच वेढा पडला होता. सन १८४५ त शीख व इंग्रज यांचें युद्ध जुंपलें. त्यांत गुलाबसिंग रणजितसिंगास सामील झाला नाहीं. या अप्रत्यक्ष मदतीबद्दल शीखांची सत्ता नष्ट झाल्यावर गुलाबसिंगास शीखांच्या ताब्यांतील काश्मीर प्रांत स्वतंत्रपणें तोडून देण्यांत आला. सन १८५२ सालीं इंग्रज सरकारनें त्यास महाराजा असा किताब दिला. तेव्हांपासून या संस्थानच्या अधिपतीस जम्मू व काश्मीरचे महाराज अशी संज्ञा प्राप्त झाली. पुढें अफगाणच्या युद्धांत गुलाबसिंगाचा पुत्र रणवीरसिंग यानें चांगली मदत केल्यामुळें दत्तकाची सनद त्यास देण्यांत आली. हल्लींचे हिज हायनेस जनरल सर प्रतापसिंग, जी. सी. आय. ई., हे रणवीरसिंगाचे पुत्र सन १८८५ मध्यें गादीवर आले. त्यांचें वय हल्लीं सुमारें ७०-७२ वर्षांचें आहे. काश्मीरच्या अपूर्व

सौंदर्यावरून त्याची ख्याति फार प्राचीन आहे. राजतरंगिणी ग्रंथांत पहिल्याच सर्गांत काश्मीरच्या सृष्टिसौंदर्याचें बहारीचें वर्णन आहे तें असें:—

चक्रभृद्विजयेशादि केशवेशानभूषिते
तिलांशोपि न यत्रास्ति पृथ्व्यास्तीर्थैर्बहिष्कृतः ॥ १ ॥
विजीयते पुण्यबलैर्बलैर्यस्तु न शस्त्रिणाम्
परलोकात्ततो भीतिर्यस्मिन्निवसतां परम् ॥ २ ॥
सोष्मस्नानगृहाःशीते स्वस्थतीरास्पदास्थे
यादो विरहिता यत्र निम्नगा निरुपद्रवाः ॥ ३ ॥
असन्तापार्हता जानन्यत्र पित्रा विनिर्मिते
गौरवादिव तिग्मांशुर्धत्ते ग्रीष्मेऽप्यतीव्रताम् ॥ ४ ॥
विद्या वेश्मानि तुङ्गानि कुंकुमं सहिमं पयः
द्राक्षेति यत्र सामान्यमस्ति त्रिदिवदुर्लभम् ॥ ५ ॥
त्रिलोक्यां रत्नसूः श्लाघ्या तस्यां धनपतेर्हरित्
तत्र गौरी गुरुः शैलः यत्तस्मिन्नपि मण्डलम् ॥ ६ ॥

चक्रभृत् व विजयेश या रूपांनीं विष्णु व शंकर या देवांनीं विभूषित अशा त्या देशांत तीर्थ नाहीं अशी तिळभर सुद्धां जमीन नाहीं. तो देश पुण्याच्या सामर्थ्यानें जिंकला जाईल, पण सैन्याच्या सामर्थ्यानें जिंकला जाणार नाहीं. म्हणून त्या देशांतले लोक फक्त परलोकला भितात. त्या देशांतील नद्यांमध्यें हिंवाळ्याकरितां उष्ण स्नानगृहांची सोय आहे व त्या देशांतील नद्यांस पाण्यापर्यंत जाण्यास सुलभ घाट आहेत. त्या देशांतिल नद्यांपासून धोका नाहीं. त्या देशांतील नद्यांमध्यें हिंस्र जनावरें नाहींत. आपल्या बापानें निर्माण केल्यामुळें त्रास देण्यास योग्य नाहीं असें जाणून त्या देशाला आदरानें उन्हाळयांत सुद्धां सूर्य प्रखरता भासवीत नाहीं. स्वर्गांतसुद्धां दुर्मिळ अशा वस्तु म्हणजे विद्या, उंच घरें, केशर, बर्फमय पाणी व द्राक्षें, त्या वस्तु या देशांत अगदीं सुलभ व विपुल आहेत. त्रैलोक्यामध्यें बहुरत्ना वसुंधरा ही प्रशंसनीय आहे. त्या पृथ्वीवर कुबेराची उत्तर दिशा अधिक प्रशंसनीय आहे. त्या उत्तर दिशेकडील पार्वतीचा बाप हिमालय हा विशेषच प्रशंसनीय आहे व त्या हिमालयांतील काश्मीर तर सर्वांत प्रशंसनीय आहे.

हे श्लोक येथें उदधृत करण्याचा उद्देश असा कीं, काश्मीरचें वर्णन जें त्यांत केलें आहे तें पौराणिक कालीं लिहिलें गेलें म्हणून अतिशयोक्तीचें वाटण्याचा संभव आहे. तथापि त्यांत त्याचें अस्तित्व व सौंदर्य वर्णिलें आहे ती अतिशयोक्ति नसून सत्यास धरून आहे.

श्लोकांतील वर्णनापेक्षां काश्मीरचें सृष्टिसौंदर्याचें वर्णन अधिक देण्याचें कारण नाहीं. अतिप्राचीन कालापासून मनोहर सृष्टिसौंदर्य, उत्कृष्ट हवापाणी, फलपुष्पांची समृद्धि याविषयींच या प्रदेशाची ख्याती आहे. तथापि निरनिराळ्या ऋतूंत येथील सृष्टिशोभा निरनिराळ्या तऱ्हेची असते. वसंतकालीं फुलांचा बहर, शरद् ऋतूंत फळांचें वैपुल्य व हीमऋतूंत स्फटिकतुल्य बर्फाच्छादित नगांचें व नगभूमीचें दर्शन.

असा हा निसर्गदेवतेचा वरदहस्त असलेला प्रदेश पाहण्याकरितां मी मुंबईहून कुलाबा स्टेशनवरून पेशावर मेलनें ता. २० ऑगस्ट १९२० रोजीं दोनप्रहरीं अडीच वाजतां निघालों, तो रावळपिंडीस ता. २२ रोजीं सायंकाळीं पांच वाजतां रेल्वेनें एकठोक ५० तासांत १४५० मैल प्रवास करून पोहोंचलों. तेथें काश्मीर दरबारचे व पुंच संस्थानचे वकील आम्हांस सामोरे आले होते. पुंच हें काश्मीर संस्थानचें मांडलिक आहे. आम्ही त्या संस्थानच्या मालकीच्या बंगल्यांत उतरलों होतों. रावळपिंडीसंबंधीं हकीकत मागाहून सांगण्यांत येईल. तूर्त काश्मीरचें प्रवासवृत्त मीं आज सांगण्याचें ठरविलें आहे.

श्रीनगरास जाण्यास निरनिराळे पुष्कळ मार्ग आहेत. त्यांत रावळपिंडीहून जाणारा मार्ग सुलभ असून ह्या रस्त्यानें वाहनांची चांगली सोय आहे. याच मार्गानें आम्ही गेलों. ता. २४ ऑगस्ट रोजीं सकाळीं ११ वाजतां आम्ही रावळपिंडीहून गढीला सायंकाळीं ५ तासांत पोहोंचलों. हें गांव रावळपिंडी व श्रीनगर यांच्या मध्यावर आहे, म्हणजे रावळपिंडीपासून १०० मैलांवर आहे. रावळपिंडीपासून सुमारें ३८ मैल गेल्यावर मरी हें प्रसिद्ध ठिकाण लागतें. मरी समुद्रसपाटीपासून ७ हजार फूट उंच आहे. हें पंजाब सरकारचें उन्हाळ्यांतील शीतळ वसतिस्थान आहे. हा मरी डोंगराचा चढाव जसजसा चढत जावा तसतशी हवा थंड लागत जाते, व झाडें उंच व निरनिराळ्या प्रकारचीं दिसूं लागतात. या पहाडाचा एकंदर देखावा नयनमनोहर दिसतो. मरीपर्यंत

३८ मैल चढाव चढून आपणांस वर जावें लागतें. येथून पुढें उतार लागतो. पुढें कोहाला गांवीं झेलमचा पूल ५० मैलांवर ओलांडून जावें लागतें. काश्मीरच्या वाटेवर येथें प्रथम झेलमचें दर्शन होतें. येथपासून श्रीनगरपर्यंत नदी अगदीं एकसारखी रस्त्याच्या बाजूनें आलेली आपणांस दिसते. येथून काश्मीर संस्थान सुरू होतें. गढीहून आम्ही पुन्हां ता. २५ रोजीं आपल्या मोटारच्या प्रवासास सकाळीं साडेअकरा वाजतां आरंभ केला. तेथून श्रीनगरास जातांना वाटेनें डुमेलपर्यंत एक निरनिराळ्या प्रकारच्या वनस्पतींचा देखावा दृष्टीस पडतो. येथें रान फार दाट असून सभोंवतालचे पहाड फार प्रचंड आहेत. येथून हिमाच्छादित शिखरें दूर दूर उंच गेलेलीं दृष्टीस पडतात. तीं पाहून खालीं नजर पोहोंचत नाहीं इतक्या दूरपर्यंत अनेक रंगमिश्रित लतावृक्षांनीं मढवून काढलेल्या सृष्टीचा देखावा पाहून फार कौतुक वाटतें. डुमेल येथेंच संस्थानांतील आयात निर्गत मालावर जकात घेण्यांत येते. गढीपासून सुमारें साठ मैलांवर बारामुल्ला हें एक शहर लागतें. तेथपासून निसर्गदेवतेचें रूप पालटत जातें. जसजसें आपण श्रीनगरचा रस्ता आक्रमण करीत जातों, तसतसें तें अधिक मनोहर दिसत जातें. त्यांतच पॉपलर अथवा सफेद्याच्या गगनचुंबीत वृक्षांच्या शोभेनें भर घातल्यामुळें त्या द्विगुणित सौंदर्यावरून दृष्टि हलत नाहीं. हीं पॉपलर झाडें आपल्याकडील सुरूच्या झाडांप्रमाणें आडव्यातिडव्या फांद्यांचा विस्तार न होतां सरळ दोनदोनशें फूट उंच वाढत असतात. हिमालयांतील अरण्यांचा व हिमशिखरांचा असा विशेष आहे कीं, हिमशिखरें समुद्रसपाटीपासून अत्यंत उंच असल्यामुळें पाणी व बर्फ यांनीं ओथंबलेले ढग त्यांच्याकडे वर्षानुवर्ष आपोआप खेचले जातात व त्यामुळें त्या प्रदेशावर बारा मास पाऊस पडत राहतो. म्हणून ज्या वेळीं इकडे आपण उन्हानें तळमळत असतों व घामाघुम होतों त्या वेळीं सुद्धां हीं शिखरें व त्यांखालील प्रदेश सदोदित हिरव्यागार लतावृक्षांनीं सुशोभित दिसतो व तेथें नित्य फलपुष्पांची समृद्धि असते. तिकडे या अरण्यामध्यें ठिकठिकाणीं लहान लहान खेडीं वसलीं असून त्यांत गरीब शेतकरी लोक लहान लहान छपरांत राहतात. त्यामुळें तिकडील अरण्यें सह्याद्रींतील जंगलांप्रमाणें ओसाड व भयप्रद वाटत नाहींत. हिवाळ्याखेरीज बाकीच्या दिवसांत येथें तांदूळ, मका

वगैरे धान्यें लोक पिकवीत असलेले पाहण्यांत येतात. हिवाळा मात्र फारच कडक असून बाधण्यासारखा असतो.

गढीहून श्रीनगरास आम्ही ता. २५ ऑगस्ट रोजीं सायंकाळीं ५ वाजतां आलों, व मुनशी बाग नांवाच्या महाराजांच्या बंगल्यांत आम्हीं मुक्काम ठेविला. काश्मीरच्या महाराजांनीं आमची या बंगल्यांत राहण्याची वगैरे उत्तम व्यवस्था करून आमच्या तैनातीस मोटारी, घोड्यांच्या गाड्या, शिकारा व डुंगा ठेविल्या होत्या. या शिकारा व डुंगासंबंधीं अगोदर माहिती सांगणें भाग आहे. शिकारा म्हणजे दोनचार माणसें बसण्यासारखी चपट्या बुडाची अगदीं हलकी अशी होडी होय. डुंगा ही मोठी नाव असून तींत राहण्या-जेवणाची व स्वयंपाक-पाण्याची देखील व्यवस्था असते. श्रीनगर शहराची जी आश्चर्यकारक गोष्ट प्रथम आम्हांस दिसली ती अशी कीं, हें शहर म्हणजे एक द्वीपसमूहच होय. म्हणजे या शहराच्या मध्यभागांतून झेलम ही महानदी दोन मैलांपर्यंत गेली असून तिच्या रुंद पात्राच्या दोहों बाजूंच्या किनाऱ्यावर सर्व शहर बसलें असून दोहों बाजूंस दोन सरोवरें 'डाल' व 'अंचर' अशीं आहेत. झेलमनें व या सरोवरांनीं या शहराचे निसर्गतःच बेटवजा दोन भाग झाले आहेत. या नदीवरून जाण्यायेण्यास सात लांकडी तरते पूल आहेत. प्रत्यक्ष शहरांतून रहदारीच्या सोयीकरितां मधून मधून कालवे काढून देऊन वरील सरोवरांस भिडविले आहेत. एकंदरींत हें शहर म्हणजे पाण्यावर वसलेलें तरतें शहरच आहे असें वाटतें. किंबहुना हिंदुस्थानांतील हें व्हेनिस शहरच होय असें मानण्यास हरकत नाहीं. अर्थात् या शहराच्या निरनिराळ्या भागांत जाण्या-येण्याकरितां वरील शिकारा व डुंगा यांची सोय केली आहे, व या नौकानयनाच्या धंद्यावर हजारों कोळी लोकांचा चरितार्थ चालतो. श्रीनगरास आम्हीं सूर्यास्त झाल्याबरोबर या पर्वतवलयांकित प्रदेशाच्या राजधानींत,—जिला अद्याप भौतिक सुधारणांचा विटाळ विशेषसा झाला नाहीं तेथें—एकदम आश्चर्यानें व प्रकाशानें दिपवून टाकणारी दुसरी अजब गोष्ट पाहिली, ती म्हणजे तेथील विजेच्या दिव्यांची रोषणाई होय. हें गिरिकंदरांतील शहर असंख्य विद्युद्दीपांनीं प्रकाशित झालेलें व त्याचें प्रकाशयुक्त प्रतिबिंब समीपच्या अफाट जलसंचयामध्यें पडलेलें पाहून फारच बहारीची मौज वाटते. रावळपिंडीहून श्रीनगरास येतांना

बारामुल्ला हा मोठा गांव श्रीनगरापासून ३५ मैलांवर लागतो. त्याच्या नजीक झेलमच्या अफाट जलप्रवाहाच्या शक्तीच्या साहाय्यानें वीज उत्पन्न करून ती श्रीनगरास आणिली आहे, म्हणून तेथें दिवे व पंखे इत्यादींची सोय झाली आहे. श्रीनगरच्या एका बाजूस अनुपमेय सृष्टिसौंदर्य, यांत्रिक दीपशोभा व तेथील सुदृढ व निकोप प्रकृतीचे अतिशय सुंदर स्त्री-पुरुष यांकडे पाहिलें व दुसरीकडे त्या शहराचा गलिच्छपणा पाहिला म्हणजे या दोहोंमधील विषमतेचें सखेदाश्चर्य वाटतें. पण श्रीनगरचा गलिच्छपणा हा तेथील अज्ञानाचा व दारिद्र्याचा परिणाम आहे, हें पाहिलें म्हणजे लोकांसंबंधानें कींव उत्पन्न होते. श्रीनगरची उंची समुद्रसपाटीपासून ५०५० फूट आहे.

श्रीनगरास गेल्यावर आम्हीं दुसऱ्या दिवशीं तेथील जुम्मा मशीद पाहिली. ती झेलमच्या डाव्या तीराला श्रीनगरच्या पुराणा वस्तीच्या मध्यभागीं आहे. मशिदीस जाण्याचा रस्ता फार अरुंद, बोळकंडीवजा व घाणेरडा आहे. ही मशीद फार मोठी व प्रेक्षणीय आहे. ती सर्व हिमालयांतील अरण्यांत विपुल उत्पन्न होणाऱ्या मजबूत देवदार लांकडाची बांधलेली आहे. तिचे भव्य लांकडी खांब सुमारें ५० फूट उंच असून तेहि देवदारांचेच आहेत, व त्यांवर काश्मीरी नक्षीकाम फारच अप्रतिम केलें आहे. त्यांची तेथें रांगच रांग दृष्टीस पडते, व या खांबांची ही उंची पाहून मनुष्य आश्चर्यानें थक्क होतो. हे उंच खांब एकाच झाडाच्या खोडाचे आहेत. त्यावरून हिमालयांतील वृक्षांच्या प्रचंडपणाची व उंचीची कल्पना येते. ही इमारत फार मोठी आहे, तथापि नयनमनोहर नाहीं. शिकंदर लोदीनें सन १४०४ मध्यें एका हिंदु देवळाचें सामानसुमान घेऊन ही इमारत प्रथम बांधिली. पुढील दोनतीनशें वर्षांत तिला दोनतीन वेळां आग लागून ती भस्मसात् झाली. पुढें औरंगजेबाच्या कारकीर्दींत सन १६७४ मध्यें हल्लींची इमारत बांधण्यांत आली. मशिदीचें मधील अंगण २५४×२४४ फूट आहे. त्यावरून तिच्या विस्तृतपणाची कल्पना येईल.

येथील पदार्थसंग्रहालय पाहण्यासारखें आहे. तें लालमंडी नांवाच्या महाराजांच्या एका अतिथिगृहांत आहे. त्या संग्रहालयास हल्लींच्या महाराजांचें नांवच दिलें आहे. ह्या संग्रहालयांत काश्मीरी कलाकौशल्याचे संग्राह्य व प्रेक्षणीय जिन्नस असून काश्मीरी चमत्कारिक मृत पशुपक्षी ह्यांचा चांगला संग्रह आहे. याच्या भोंवतीं उत्तम बाग आहे.

श्रीनगरास असतांना आम्हीं जीं प्रेक्षणीय स्थळें पाहिलीं त्यांतील शालिमार बाग, निशद बाग व निसिम बाग या प्रमुख होत. शालिमार बाग जहांगिर बादशहानें सन १६१० मध्यें बांधिली. या ठिकाणीं तो उन्हाळ्यांत महाराणी नूरजहान हिजबरोबर राहत असे. या बागेची लांबी ५९० फूट व रुंदी २६० फूट आहे. या बागेंत चिनार नांवाच्या फार मोठया वृक्षांची सुंदर राई आहे. मोंगल बादशहांनींच हीं झाडें परशियांतून आणिलीं असें म्हणतात. या झाडांचीं पानें इतकीं मऊ व सुकुमार असतात कीं, फारशी भाषेंत नाजुक रूपवती स्त्रियांच्या हाताला या वृक्षांच्या पल्लवांची उपमा देतात. या बागेचे जिन्याच्या पायऱ्यांप्रमाणें अथवा डोंगरांतील भातखाचरांच्या एकीवर एक असलेल्या तालींप्रमाणें चार टप्पे आहेत. एक एक टप्पा अथवा मजगी जसजसा वर चढून जावें तसतसा बागेचा विस्तृतपणा, तींतील सुखसोयी, तिची रचना व सौंदर्य यांची बरोबर कल्पना येते. प्रत्येक टप्प्याच्या मधोमध एक एक तलाव असून सर्व तलाव पाटानें जोडले आहेत. या पाण्याचे एकांतून दुसऱ्या तलावांत पडणारे लहान लहान संगमरवरी दगडाचे धबधबे बांधले असून शेवटीं सर्व पाणी दाल तलावांत सोडून दिलें आहे. चौथ्या म्हणजे वरच्या टप्प्यावर ६५ फूट लांबीचा रुंद चबुतरा असून त्यावर दगडी मंडप उभारलेला आहे. त्याचे खांब काळ्या संगमरवरी दगडाचे असून त्यांवर सुबक नक्षीकाम केलेलें आहे. या मंडपाच्या सभोंवार पुष्करिणी असून तींत १४० कारंजीं आहेत. श्रीनगर शहर अशा तऱ्हेच्या कित्येक बागांनीं अलंकृत झाल्यामुळें, शिवाय फलपुष्पांच्या भारांनीं वांकलेले लतावृक्ष तेथें सर्वत्र आपोआप आल्यामुळें त्या टापूस सृष्टिसौंदर्याचें आगर असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं.

ही बाग पाहून आम्ही श्रीनगरपासून ११ मैलांवर असलेल्या हारवान या ठिकाणीं गेलों. श्रीनगरास येथूनच पिण्याचें पाणी नळानें बांधून नेलें आहे. हारवान हा एक तिही बाजूंनीं उंच डोंगर असलेला स्वाभाविक तलाव आहे. तलावाच्या दक्षिण भागीं वनच आहे. यांत गुलाबाचीं फुलें बचकेएवढाळीं असतात. काश्मीर प्रांतांत फुलझाडें विपुल आहेत. त्यांत गुलाब तर मनस्वी आहेत. त्यावरून त्या प्रांतास गुलाबाची भूमि असेंहि म्हणण्याचा प्रघात आहे.

तेथून परत येतांना आम्हीं महाराजांचा ट्राउट माशांची निपज ज्या ठिकाणीं करतात तो तलाव पाहिला. ट्राउट मासा अत्यंत स्वादिष्ट व दुर्मिळ असल्यामुळें महाराजांनीं स्वत:करितां व खाशांकरितां या माशांच्या उपजे-करितां स्वतंत्र व्यवस्था केली आहे. एका लहानशा तलावांत दोन फूट रुंदीचे लांबच लांब बांधीव पाट काढून त्यांत पाणी खेळविलें आहे. त्या पाटांत हे मासे इतस्तत: फिरतांना दिसतात. हे मासे फार महाग म्हणजे सहा रुपयांस अर्धा शेरप्रमाणें विकत मिळतात. काश्मीरी ब्राह्मण मत्स्याहारी व मांसाहारी आहेत, त्यामुळें हे मासे पाहिल्यावर त्यांच्या तोंडास पाणी सुटतें यांत आश्चर्य नाहीं. हा मच्छी तलाव पाहून आम्ही निशद बाग पाहावयास गेलों. हा बाग नूरजहानचा भाऊ आसफशाह यानें सन १६३३ मध्यें बांधिला. या बागेची बांधणी शालिमार बागेप्रमाणेंच मोगली थाटाची आहे; पण शालिमारपेक्षां ही बाग जास्त शोभायमान आहे. या बागेच्या तिन्ही बाजूंस गगनचुंबित हिरवेगार डोंगर व बागेच्या तळयाच्या टप्याखालीं अफाट दाल सरोवर आहे. असा हा एकावर एक बगीच्यांचे मजले असलेला देखावा, दाल सरोवरांतून शिकारामध्यें बसून फारफार बहारीचा दिसतो. शहाजहान बादशहानें या बागेचें सौंदर्य पाहिल्यावर ही बाग फारच आल्हादकारक आहे असें बादशहा तीनदां उद्गारला. त्यांत बादशहाचा आशय असा होता कीं, आसफशहानें ती बाग आपणास अर्पण करावी. आसफशहानें बादशहाच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. त्यावरून बादशहानें रागावून जाऊन ज्या जलसंचयानें त्या बागेस अनुपमेय शोभा आली आहे तें पाणीच या बागेला येण्याचें बंद करून टाकलें. पाणी बंद झाल्यावर आसफशहाची आवडती बाग रूक्ष होऊन भयाण दिसूं लागली. ती बागेची हीनावस्था पाहून तो हिरमुष्टी होऊन बसला. त्याच्या नोकरानें धन्याची ही करुणास्पद अवस्था पाहून त्याच्या दु:खाचें कारण जाणलें, व जेथून बागेस पाणी येत होतें तो दट्टया फोडण्याचें धाडस करून बाग पुन्हां जलमय करून सोडली. लवकरच ही बातमी बाद-शहाचे कानांवर गेल्याचें समजल्यावर त्या नोकराचीं शंभर वर्षें भरलीं असें सर्वांस वाटलें. पण बादशहानें त्या चाकराची स्वामिभक्ति पाहून त्यास वरील गुन्हा माफ केला, व बागेस कायमचें मुबलक पाणी देण्याची आसफशहास सनद करून दिली.

ही बाग पाहून झाल्यावर आम्ही दाल तलावामधून शिकारांत बसून चांदण्या रात्रीची वनश्रीची शोभा पाहत नालामार कालव्यांतून दाल दरवाज्यानें झेलम नदींतून परत आलों. झेलमच्या पुराचें पाणी या सरोवरांत जाऊं नये म्हणून हा दरवाजा केला आहे. नदीस पूर आला म्हणजे तो आपोआप बंद होतो. ही व्यवस्था मोगल बादशहापासूनची आहे. वरील बागा पाहावयास जातांना आम्हांला वाटेनें आलू बुखार, पीअर, अक्रोड, द्राक्षें, सफरचंद, सेब, गोषा, मळगुम ( पेरूप्रमाणें एक गोड फळ ), सर्द ( खजुराप्रमाणें फळ ) ह्यांचीं झाडें व वेली दिसल्या. ह्यांपैकीं आलू बुखार व द्राक्षें निरनिराळ्या रंगांचीं व विविध रुचींचीं असतात व हीं नानाविध रंगांचीं फळें तबकांत अथवा चांगल्याशा करंडींत एकत्र लाविलीं असतां मोठी मौज दिसते.

ता. ३० ऑगस्ट रोजीं आम्ही शिकारांत बसून दाल सरोवर पाहण्यास गेलों. दाल सरोवराची लांबी ५ मैल, रुंदी २½ मैल व खोली सुमारें १० फूट आहे. तें शहराच्या अगदीं नजीक आहे, व त्याच्याच कांठाला वरील सर्व प्रेक्षणीय बागा आहेत. ह्या तलावांत लव्हाळ्याचीं बेटेंचीं बेटें वाढलीं असून पाण्याच्या कडेला होणाऱ्या पाणवेली वगैरे पुष्कळ आहेत. ह्या लव्हाळ्यांचा चटया करण्याकडे, व घरें शाकारण्याकडे उपयोग करतात, इतकीं तीं उंच वाढतात. ह्या सरोवराचा एकंदर देखावा नयनाला फारच आल्हाद देणारा आहे. सभोंवतीं दूरवर पसरलेलीं हिमाच्छादित पर्वतशृंगें, तो सभोंवारचा उंच वृक्षांनीं भरलेला हिरवागार प्रदेश, तलावाच्या कांठाला व मधून मधून माजलेलीं दर्भाचीं व लव्हाळ्याचीं बेटें असा हा रमणीय देखावा पाहून सर्व जगांत दाल सरोवरासारखें निसर्गसौन्दर्याचें प्रेक्षणीय स्थान नाहीं, असे उद्‌गार लॉरेन्स ह्या लेखकानें काढले आहेत. सूर्यास्ताच्या सुमारास ह्या सरोवराचें जें लावण्य आमच्या दृष्टीस पडलें तें मी आपल्या शब्दांत सांगण्यापेक्षां प्रसिद्ध आंग्ल कवि मूर याच्याच शब्दांत सांगतों :

" Oh ! to see it at sunset when warm over the Lake
Its splendour at parting a summer eve throws
Like a bride full of blushes when lingering to take
A last look at her mirror at night ere she goes ! "

या तलावांत दुसरी पाहण्यासारखी मौज आहे ती त्या तलावांतील तरत्या बागा होत. पाण्याच्या पृष्ठभागावर ल्व्हाळीं व पाणवेली दाट अंथरून त्यांवर पुन्हां पुष्कळ गवत पसरतात व त्याच्यावर मातीचा बराच जाड थर पसरून त्यांत काकड्या, कलिंगडें, खरबुजें, भाजीपाला, फुलें वगैरे लावतात. या तरत्या बागा म्हणजे श्रीनगरच्या गरीब लोकांची एक उत्पन्नाची बाब आहे. या सरोवराचें पाणी नेहमीं अगदीं संथ असल्यामुळें अशा बागा करणें फार सुलभ जातें.

श्रीनगरच्या आसपास कोट-किल्ले फारसे नाहींत; व आहेत तेहि पाहण्यालायक नाहींत. दाल सरोवराच्या दोन बाजूंस दोन जयविजयांप्रमाणें उभे असलेले हरि पर्वत व शंकर पर्वत असे पर्वताचे दोन उंच सुळके आहेत. त्यांपैकीं आम्हीं हरि पर्वत पाहिला. ह्या टेकडीची उंची दाल सरोवरापासून सुमारें चारपांचशें फूट आहे. तो श्रीनगरच्या उत्तरेस आहे. हा किल्ला अकबर बादशहानें सन १५८० मध्यें १ कोट रुपये खर्चून बांधला, असा तेथें किल्ल्यावर शिलालेख आहे. ह्या किल्ल्याच्या भिंतीचा घेर तीन मैल असून उंची २८ फूट आहे, व रुंदी १३ फूट आहे. किल्ल्यांत सारिका देवीचें देऊळ आहे. ह्या किल्ल्यावरून दाल सरोवर, त्याच्या कांठावरील बागा व त्यांच्या मागें दूरवर उंच उंच उभे असलेले बर्फाच्छादित पर्वत यांचा देखावा क्षणभर थक्क करून सोडण्यासारखाच दिसतो. किल्ल्यांत हल्लीं कांहीं जुन्या फुटक्या तोफा मात्र दिसतात, व श्रीनगराप्रमाणें या किल्ल्याची नीटशी व्यवस्था नाहीं.

श्रीनगराच्या आसमंतभागीं निशद, शालिमार, निसिम व चष्मशाई या बागा विशेष प्रसिद्ध व पाहण्यासारख्या आहेत. त्यांत निशद व शालिमार बाग पाहिल्याचें मागें सांगितलेंच आहे.

ता. ६ सप्टेंबर रोजीं आम्ही चष्मशाई बाग व तेथील गोड, स्वच्छ व थंडगार पाण्याचा झरा पाहण्यास गेलों. ही बाग शालिमार किंवा निशद-प्रमाणें मोठी सुंदरहि नाहीं. बागेच्या बांधणीची तऱ्हा मोगली थाटाचीच असून तीस ते मजले, धबधबे, कारंजीं हीं सर्व भूषणें आहेत. ही बाग विशेषेंकरून बाग म्हणून इतकी प्रसिद्ध नसून तेथील थंड पाण्याच्या झऱ्यावरून तिची प्रसिद्धि आहे. चष्मशाई या फारसी शब्दाचा अर्थच बादशाही झरा असा आहे. या

झऱ्याच्या तीनहि बाजूंस लांकडी इमारत असून खालच्या मजल्यांत तीन बाजूंना बसण्यास ओटे केले आहेत. या झऱ्यांतून सुमारें दोन अडीच फूट उंच जोरानें पाणी उडत असतें. सरासरी चार इंच अथवा तळहाताच्या रुंदीइतक्या व्यासाच्या तोटींतून जोरानें जितकें पाणी येईल तितकें त्या झऱ्यांतून उडत होतें. झऱ्यास दगडी कुंड बांधलें असून त्याच्या तोंडावर वरील व्यासाचें जस्ती नळकांडें बसविलें आहे. त्यांतून कुंडांत वर्तुलाकार पाणी पडतें. तें पाणी इतकें स्वच्छ आहे कीं, तें उडत असतांना अगदीं पांढरी स्वच्छ कांचेची हंडी उपडी ठेविल्याप्रमाणें हुबेहुब दिसतें. तें बर्फाप्रमाणें शुभ्र, गार व निर्मळ पाणी पाहून आम्हांस फार आनंद झाला. या पाण्याच्या बाह्य मोहकतेप्रमाणें तें अंतर्गुणांतहि म्हणजे पचनशक्ति वाढविण्यांतहि सरस आहे. सर्व जगांत यासारखें पाचक पाणी नाहीं, असें एक अमेरिकन प्रवासी म्हणतो. पुष्कळ अपचनाचे रोगी या पाण्यास दुवा देऊन जातात असें म्हणतात. या चष्मशाई झऱ्यास जातांना वाटेनें आम्हांस बदामाचीं मोठमोठीं झाडें बदामांनीं लगडलेलीं दृष्टीस पडलीं.

दुसऱ्या दिवशीं शिकारांत बसून झेलम नदींतून फिरावयास जाऊन तिच्या दोहों कांठांवर वसलेलें श्रीनगर शहर आम्हीं पाहून घेतलें. आम्ही शिकाऱ्यांत बसून नदींतून चाललों असतां नदीवर बांधलेले सात लकडीपूल आम्हांस लागले. त्या पुलांखालूनच आमचा शिकारा आला. शिकाऱ्यांत बसून हें शहर पाहण्याची मोठी मौज आहे. काशीस होडींत बसून ज्याप्रमाणें गंगेच्या विस्तीर्ण घाटांची, त्यांवरील हजारों देवळांची व त्यांवरील शहराची मजा दिसते त्याप्रमाणें येथें झेलमच्या दोन्ही किनाऱ्यांवर दिसते. मात्र काशीप्रमाणें घाट व देवळें यांच्या शोभेची त्यांत इतकी भर नाहीं.

ता. ८ सप्टेंबरला आम्ही रेशमाचा कारखाना पाहावयास गेलों. पण या कारखान्याचें वर्णन देण्यापूर्वीं येथें रेशमाची कशी अफाट प्रमाणावर निपज होते हें अगोदर सांगितलें पाहिजे. येथील रेशमाचा धंदा सरकार-मालकीचा आहे. रेशमाच्या किड्यांचीं अंडीं सरकार इटली व फ्रान्समधून आणतें. तीं खेडोंखेडीं शेतकऱ्यांस फुकट वाटलीं जातात. या अंड्यांतून किड्यांची उत्पत्ति व वाढ कशी होते, किड्यांनीं रेशमाचे कोषे घालीतोंपर्यंत त्यांची शुश्रूषा कशी करावयाची, त्या किड्यांस खावयास काय घालावयाचें, त्यांस पाळण्याची

व्यवस्था व जपणूक कशी करावयाची ही सर्व माहिती या धंद्यांतील तज्ज्ञ सरकारी अम्मलदार शेतकऱ्यांस देतात. या शेतकऱ्यांपासून सरकार ठरीव भावानें कच्च्या रेशमाचे कोषे विकत घेतें. ते दुसऱ्या कोणांस विकण्यास सक्त मनाई आहे. शेतकरी लोक घरांतील थंड जागेंत फळीवर अथवा कापडांच्या दुकानांतील कापड ठेवण्याच्या शिडीवजा खुल्या कपाटांत हे किडे ठेवतात. त्यांना तुतीचीं पानें खाऊं घालतात. इकडे तुतीचीं झाडें पुष्कळ आहेत. त्यामुळें किड्यांना खावयास घालण्याची अडचण पडत नाहीं. या किड्यांना जास्त थंडी व जास्त उन्हाळा सोसत नाहीं. उष्णतामान किती ठेवावयाचें हें समजण्याकरितां किंवा तें तसें राखण्याकरितां इकडे सरकारनें प्रत्येक शेतकऱ्यास उष्णतामापक नलिका-यंत्र दिलेलें असतें. कच्चें रेशीम तयार करणाऱ्या लोकांचीं झोपडीवजा घरें असतात. तथापि त्यांस कांचेचीं तावदानें ठिकठिकाणीं असतात. त्यांचा उपयोग त्या खोलींतील हवामान सारख्या प्रमाणांत ठेवण्यास होतो. कदाचित् उष्णता अधिक वाढल्यास त्या खोलींत सर्वत्र पाणी शिंपडून त्यानें नैसर्गिकपणें बाष्पीभवन घडवून आणून ती कमी करण्यांत येते. या किड्यांच्या निपजेवर देखरेख करण्याकरितां व त्यांना होणाऱ्या रोगांचा प्रतिकार करण्याकरितां संस्थानानें वाकबगार इन्स्पेक्टर नेमले आहेत. याप्रमाणें खेड्यापाड्यांत हे किडे घरोघर हौसेनें पाळण्यात येतात. हीं अंडीं चारपांच दिवस उबविलीं गेलीं म्हणजे त्यांतून सुरवंटाप्रमाणें एक किडा बाहेर पडतो. तो तुतीच्या पानांवर आपली उपजीविका करतो. या सुरवंटाच्या अवस्थेंत तो सुमारें एक महिना राहून त्या अवधींत तो भिरकुंडाप्रमाणें रेशमाचा कोष तयार करतो, व त्यांतच तो आपणांस कोंडून घेतो. हा कोष तयार झाल्यावर लागलीच दहाबारा दिवसांनीं तो किडा बाहेर पडून त्याचें फुलपांखरूं बनून उडून जातें. पण फुलपांखरूं होऊन किड्यानें कोष फोडला असतां त्या कोषाच्या रेशमाचा लांब धागा चांगला निघत नाहीं. सर्व तंतू तुटले जाऊन त्याची गुंतागुंत होऊन पुंजके बनतात, व त्या रेशमास चांगली किंमत येत नाहीं. उत्तम रेशीम मिळविण्यास हे सुरवंटवजा किडे कोषांत असतांनाच ते कोषे घ्यावे लागतात. या किड्यांसह कोषांचा दोन प्रकारांनीं उपयोग करतात. एक, अंडीं उत्पन्न करण्याकरितां व दुसरा, रेशीम काढण्याकरितां. कोषांपासून

रेशीम काढावयाचें असल्यास हे कोष गरम पाण्यांत टाकून त्यांतील किडे आंतल्या आंत मारून टाकावे लागतात. वरील रेशमाचे तंतू यांत्रिक रहाटांवर भरतात. हे रेशमाचे कोष गरम पाण्यांत टाकून त्यांचे तंतू भरण्यापासूनची व पुढील सर्व क्रिया प्रत्यक्ष कारखान्यांत करतात. पण अंडीं उत्पन्न करावयाचीं असल्यास तो कोष तसाच राहूं देतात. मग आंतील किडा तो फोडून फुल-पांखराच्या रूपानें बाहेर येतो व अंडीं घालूं लागतो. वरील पद्धतीनें बनलेले कच्च्या रेशमाचे हजारों कोष कारखान्यांत आणतात, व त्यांच्यावर कारखान्यांतील वर सांगितलेली कृति घडवून व ते रंगवून पक्कें रेशीम तयार करतात. हा कारखाना बराच मोठा आहे. त्यांत हल्लीं वळीव रेशमी सूत मुख्यत्वेंकरून तयार होतें, व हल्लीं कापडहि थोडेंबहुत तेथेंच मागावर तयार होतें. तेथें तयार झालेलें बरेंच रेशीम इंग्लंड, फ्रान्स, सयाम वगैरे ठिकाणीं निर्गत होतें, व पुष्कळसें हिंदुस्थानांत बनारस, अमृतसर, कलकत्ता, मुंबई येथें खपतें. पण बहुतेक टाकाऊ रेशीम सर्व युरोपांत रवाना होतें. त्याचें उत्तम सूत बनविण्यास लागणारी अतिशय गुंता-गुंतीची यंत्रसामग्री आपल्या देशांत अद्याप उपलब्ध नाहीं. या कारखान्याचें संस्थानास सालिना १०--१२ लक्षांचें उत्पन्न होतें. रेशीम करण्याचा मोठा धंदा हिंदुस्थानांत काश्मीरखेरीज दुसरीकडे नाहीं. म्हैसूरचा याच्या खालोखाल आहे.

सप्टेंबरच्या १० तारखेस आम्ही श्रीनगराहून १४ मैल असलेल्या अंचर सरोवराच्या रस्त्यानें गंधरबळ पाहण्यास गेलों. तेथें मोठमोठ्या वृक्षांची गर्द झाडी आहे, व तीच पाहण्यासारखी आहे. तेथून पुढें उत्तरेस सहा मैलांवर खिर भवानी म्हणून एक बेट असून त्यांत देवीचें देवालय आहे, तें आम्हीं पाहिलें. तेथून परत येतांना आम्हीं निसिम बाग पाहून घेतली. ही बाग एका लहानशा बेटावर पुष्कळ शोभिवंत चिनार झाडांच्या सुंदर रांगा बनवून तयार केली आहे. ही बाग अकबर बादशहानें बांधली. एकंदरींत काश्मीर व त्याच्या आसमंतभागाचा प्रदेश शेंकडों झऱ्यांनीं व कालव्यांनीं व्यापलेला पाहून व त्या पाण्यावर विपुल भाजीपाला, फळफळावळ व फुलझाडें होत असलेलीं पाहून व शिकारा व डुंगामधून वाटेल तेव्हां फिरण्याची सोय असलेली पाहून आम्हांस फार मौज वाटली.

ता. ११ सप्टेंबरला आम्हीं श्रीनगरापासून बरीच लांबपर्यंत प्रेक्षणीय

स्थळें पाहण्याकरितां दौड काढली. प्रथम पांपूर अथवा पद्मपूर या गांवीं गेलों. या गांवच्या आसपास केशराच्या पुष्कळ बागा आहेत. परंतु केशर अगोदरच काढून नेल्यामुळें आम्हांस तें दृष्टीस पडलें नाहीं. तेथून वीस मैलांवर आम्हीं अवंतीपूर गांवीं गेलों. अवंतीपुरास पुराण वस्तुसंशोधनखात्यानें नुकत्याच शोधून काढलेल्या दोन देवळांखेरीज दुसरें पाहण्यालायक कांहीं नाहीं. हें अवंतीपूर गांव झेलमच्या उजव्या तीरावर श्रीनगरापासून १८ मैलांवर वसलेलें एक खेडें आहे. पण पूर्वकालीं तें राजधानीचें एक शहर होतें. अवंतीवर्मा नांवाच्या काश्मीरच्या राजानें ८५५ ते ८८३ पर्यंत आपल्या कारकीर्दींत हें शहर वसविलें. एक देऊळ दुसऱ्यापेक्षां फार मोठें आहे. या मोठ्या देवळाच्या म्हणजे अवंतीस्वामीच्या देवळाचा गाभारा मधोमध असून त्यासभोंवतीं २०० फूट लांब व १७० फूट रुंद चौकोनी इमारत आहे. हीं दोन्ही देवळें मोठालीं असून फार प्रेक्षणीय आहेत, व तीं एकाच राजानें म्हणजे अवंतीवर्म्यानेंच एक विष्णूचें व एक शिवाचें अशीं बांधिलीं आहेत. कल्हण पंडिताच्या राजतरंगिणी ग्रंथांत यासंबंधीं पुस्तक ५ श्लोक ४५ मध्यें जो उतारा आहे तो येणेंप्रमाणें:—

"सिंहासनावर बसण्यापूर्वीं अवंतीवर्म्यानें विष्णूचें म्हणजे अवंतीस्वामीचें देऊळ बांधल्यावर पुढें कांहीं दिवसांनीं राज्याधिकार प्राप्त झाल्यावर अवंतीश्वराचें देऊळ बांधिलें."

स्थानिक दंतकथेच्या आधारावर ज. कनिंगहॅमनें अवंतीपूर येथील वरील दोन देवळांचें वर्णन या श्लोकांतील वर्णनाशीं ताडून पाहिलें. या देवळांच्या बांधकामाचा दगड काळसर हिरव्या रंगाचा आहे. मुख्य दरवाज्यावरील व ओवऱ्यांवरील नक्षीकाम फार सुबक आहे. हीं देवळें आज अगदीं पडीक स्थितींत दिसतात, पण तीं मूळ शाबूद असतांना फारच सुबक असलीं पाहिजेत. अवंतीश्वराचें देऊळ लहान आहे, पण बांधणी एकसारखीच आहे. त्यांतल्या त्यांत अवंतीस्वामीच्या देवळाचे खांब फारच सुंदर आहेत. त्या खांबांवर जें नक्षीकाम आहे त्याचें व ग्रीक खोदकामाचें फारच साम्य आहे, असें म्हणतात. त्या देवळावरील दरवाज्याचें नक्षीकाम फारच प्रेक्षणीय आहे. हीं देवळें उकरून काढतांना सुमारें १२१ जुनीं नाणीं व भांडीं वगैरे इतर

ज्या वस्तू त्या ठिकाणीं सांपडल्या, त्या नीट जतन करून येथेंच एका खोलींत पाहण्याकरितां ठेविल्या आहेत, आणि त्या पाहण्यासारख्या आहेत.

येथून पुढें दहा मैलांवर बिजबिहारला (विद्याविहारला) जाऊन आम्ही गॅरालिंगी (अकरालिंगी शिवलिंग) नांवाच्या शंकराचें दर्शन घेतलें, व येथून सहा मैल दूर असलेल्या इस्लामाबाद ऊर्फ अनंतनाग शहरीं आलों. अनंतनाग म्हणजे पुष्कळशा पाण्याच्या झऱ्यांचा एकत्र समूह. काश्मीरकडे पाण्याच्या झऱ्याला व सर्पालाहि नाग म्हणतात. हें शहर श्रीनगरच्या खालोखाल आहे. येथें वीस हजारांची वस्ती आहे. ती बहुतेक मुसलमानांची आहे. येथून पुढें व्हर्नागचा सुप्रसिद्ध झरा अथवा झेलमचा उगम पाहावयास गेलों. श्रीनगरापासून व्हर्नाग गांव ७० मैलांवर आहे. हें ठिकाण हिमाच्छादित पर्वताच्या चिमट्यांत बनिहल घाटाच्या पायथ्याशीं आहे. येथें सर्वत्र हिरवीगार झाडी आहे. डोंगरांतून झरा धो धो करीत वाहत आहे. या सुंदर ठिकाणीं जहांगीर बादशहानें सन १६१२ मध्यें एक अष्टकोनी तलाव बांधिला व त्यांत हा झरा सोडला. त्यानेंच सन १६१९ मध्यें हें पाणी कृत्रिम धबधब्यांत सोडून व त्या पाण्याचीं कारंजीं बांधून एक सुंदर बाग तयार केली. ही बाग इतर बागांप्रमाणें फार मोठी नाहीं. पण येथील त्या झऱ्याची शोभा व एकंदर सृष्टिसौंदर्य फारच अप्रतिम आहे. पुष्करणीभोंवतीं अष्टकोनाकृति एक कमानदार ओवरी आहे व त्या इमारतीच्या भिंतीवर परशियन भाषेंत शिलालेख आहे. ते मोगल बादशहा किती आढ्यतापूर्वक लेख लिहीत होते तें त्यावरून समजून येतें. त्याचें भाषांतर पुढीलप्रमाणें : "धर्मयोद्धा महाराज अकबर याचा पुत्र, सप्तद्वीपाधिपति, न्यायप्रसारक, राजाधिराज, वीरपिता, धर्मप्रकाश महाराज जहांगीर यांनीं (आपल्या) राज्यारोहणाच्या १५ व्या वर्षी या विपुलतायुक्त झऱ्यावर उतरून त्याला मान दिला. हजरतांच्या हुकुमानें या मंदिरास पूर्ण स्वरूप आलें. अकबरशहाच्या जहांगिरशहामुळें या मंदिराचें शीर (शिखर) गगन (भेदून) वर चढलें. विवेक शिल्पकालास याचा काल (पुढील शब्दांत) मिळाला. व्हर्नागच्या काल्व्यावरील राजमहालाची समृद्धि असो (सन १६१९)." या शीतल स्थलीं नूरजहान नित्य आराम घेण्यास येत असे. सृष्टिसौंदर्याचें हें शीतल आरामस्थान जहांगिराला इतकें आवडलें

ं कीं, त्याचा अंतकाल समीप आला असतां आपणांस तेथें घेऊन जाण्या-बद्दल त्यानें आज्ञा केली. त्याप्रमाणें तो या स्थलाकडे जात असतां वाटेंत पीरपंजाल रस्त्यावर बरमगूल येथें हल्लींच्या काश्मीर संस्थानांत मरण पावला.

व्हर्नागहून परत येत असतांना वाटेंत आछाबल येथें आम्ही उतरलों. व्हर्नागहून आछाबल १२ मैल आहे. या ठिकाणचा पाण्याचा झरा, नव्हे येथून उगम पावणारा एका माणसाच्या रुंदीचा मोठा जोरदार पाण्याचा ओढा व तेथील कारंजीं असलेली पुष्करणी व बाग पाहण्यासारखी आहे. आम्ही तेथें गेलों तेव्हां हीं सर्व कारंजीं उडत होतीं. येथील रानांत देवदाराचे वृक्ष फारच प्रचंड आहेत. त्यामुळें इकडील अरण्याची शोभा वेगळीच दिसते. या ठिकाणींहि ट्राउट माशांच्या निपजेकरितां मच्छी तलाव आहे. जहांगिराची कन्या जहानआरा बेगम इनें हा बाग बांधला म्हणून त्यास बेगमबाग म्हणतात. हा बाग ४६७ फूट लांब व ४६ फूट रुंद आहे. सभोंवार मोठी भिंत असून हिचे दोन टप्पे आहेत. या ठिकाणचे चिनारवृक्षहि फार प्रचंड आहेत. येथें पुष्कळ फळझाडें आहेत. वरील प्रचंड झऱ्याचेंच पाणी सर्व बागेंतून खेळविलें आहे. त्याचे तीन पाट काढले असून मधला पाट तर १६ फूट रुंदीचा आहे. या पाटांतून पायवाटा ठेविल्या आहेत. हे पाट त्रिधारी आहेत. मधल्या पाटाच्या दरम्यान दोन पुष्करणी बांधलेल्या आहेत. त्यांतील एका मोठ्या पुष्करणीमध्यें चौरंगवजा दगडी कामावर लांकडी मंडप बांधला आहे. पाटाच्या स्फटिकतुल्य पाण्याचे तीन धबधबे १२ फूट उंचीवरून धो धो पडतांना मोठी मौज दिसते. ही बागेची मजा पाहत असतांना तेथेंच अस्तमान झाला. सबब आछाबल गांवींच आम्हीं मुक्काम केला.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे ता. १२ सप्टेंबर रोजीं सकाळीं भोजन आटोपून महाराजांचे गुरु संत देवजी यांच्या दर्शनास आम्ही गेलों. गुरु संतदेवजी यांची कांति गौर व तेजःपुंज आहे. त्यांना पाहतांक्षणींच त्यांची पाहणारावर तात्काल छाप पडण्यासारखी आहे. त्यांस हिंदी भाषा चांगली येत असून ते चांगले धोरणी, बहुश्रुत व व्यवहारदक्ष आहेत. त्यांची संभाषणशैली गोड व सरस आहे. ते पूर्वकालीन यतीप्रमाणें अरण्यवास पत्करून तपोनिष्ठाप्रमाणें सदाचरणानें राहतात. त्यांच्या आश्रमांत मी भेटावयास गेलों होतों. त्यांचा आश्रम शांत सृष्टिसौन्दर्यानें परिप्लुत आहे.

गुरुमहाराजांचा निरोप घेऊन आम्ही परत इस्लामाबादवरून लिडार खोऱ्यानें अमरनाथाच्या वाटेनें बरेच दूरवर जाऊन मार्तंडाचें ऊर्फ सूर्याचें देवालय पाहिलें. या देवळास जातांना आम्हांस भवन गांवापासून दोन मैल घोड्यावर प्रवास करावा लागला. हें देवालय बरेंच मोठें आहे, तथापि अवंतीपूरच्या अवंती-स्वामीच्या देवळाखालोखाल आहे. तथापि काश्मीरी शिल्पशास्त्र एक हजार वर्षांपूर्वी किती उच्च दर्जास पोंचलें होतें, एवढें दाखविण्यास तें पुरें आहे. राजतरंगिणी ग्रंथाप्रमाणें रामादित्य नांवाचा राजा सन ५७८—५९४ पर्यंत होऊन गेला. त्यानें हें देवालय बांधलें आहे. मार्तंडाच्या मुख्य देवळाभोंवतीं खुला चौक असून त्याच्या चारी बाजूंस कमानदार बांधकामाच्या ओवऱ्या काढल्या आहेत. अवंतीपूरची व येथील देवळांची धाटणी एकच दिसली. मोठमोठ्या शिल्पशास्त्रज्ञांनीं व जुन्या शास्त्रीय संशोधकांनीं याच्या वास्तुकलेची वाहवाच केली आहे. व्हिन्सेन्ट स्मिथ, फर्ग्युसन, बर्डवुड या पुराणवस्तुसंशोधकांनीं या देवळाच्या कारागिरीची फार प्रशंसा केली आहे. देवालय अगदीं मोडकळीस आलें आहे. त्याच्या कोठें नुसत्या भिंतीच उभ्या आहेत तर कोठें नुसते खांबच उभे आहेत. चौकाच्या मध्यभागीं असलेलें देऊळ फार मोठें नाहीं. चौकाभोंवतालच्या ओवऱ्यांना खांब व कमानी यांची रांगच रांग असलेली दिसते. चौक चौरसचौरस दोनशें फूट आहे. त्यांतून पूर्वी पाणी खेळविलें होतें असें सांगतात. देवळांत सूर्याची मूर्ति आहे. हिंदु लोक जरी सूर्योपासक आहेत तरी सूर्याची मूर्ति असलेलें देवालय क्वचितच सांपडतें. भवन गांवाजवळ आम्हीं एका गुहेंतील देवालय ( कार्ल्याच्या लेण्यांप्रमाणें पण लेणीं नसलेलें ) पाहिलें. तशा देवळास तिकडे भुंजू म्हणतात. तेथून वीस मैलांवर आम्ही आश्रीकाम या ठिकाणीं गेलों. तेथें एक उंच टेकडी चढून झिआरत म्हणजे कबरस्थान आम्हीं पाहिलें. या कबरस्थानाच्या टेकडीवरून लिडार नदी व तिचें खोरें यांचा देखावा फार भव्य दिसतो. येथून पुन्हां इस्लामाबाद रस्त्यानें परत श्रीनगरला आम्ही आलों.

काश्मीरांतील सृष्टिसौन्दर्यनिरीक्षणाचा तिसरा दौरा ता. १३ सप्टेंबर रोजीं आम्ही गुलमर्गकडे काढला. श्रीनगरपासून २५ मैल हनमर्गपर्यंत आम्ही मोटारनें जाऊन तेथून पुढें पांच मैल दंडींत बसून वर चढलों. ही दंडी चार माणसें वाहून नेतात. तिचा आकार मोटार सायकलच्या साइडकारप्रमाणें साधारण

असतो. तिला खालीं मेण्याप्रमाणें तोल साधण्याकरितां मधोमध दांडी असून त्या दांडीस मागें व पुढें उचलण्याकरितां बैलगाडीच्या जोखडाप्रमाणें दोन आडव्या दांड्या असतात. काश्मीर प्रांतांत उन्हाळा फार भासूं लागला म्हणजे लोक गुलमर्गला गिर्यारोहण करतात. मर्ग या शब्दाचा अर्थ पठार असा आहे. गुलमर्ग याचा अर्थ पुष्पवाटिका आणि खरोखरच तें स्थान अनंत पुष्पांनीं इतकें नटलेलें असल्यामुळें त्यास तें नांव सार्थ आहे. काश्मीर प्रांतांत अत्यंत रमणीय पण सुगम असें जें गिरिशिखर तें हेंच होय. या ठिकाणीं पोलो वगैरे खेळण्याच्या करमणुकीच्या सर्व सोयी आहेत. याची उंची समुद्रसपाटीपासून ८५०० फूट आहे.

श्रीनगराहून उत्तरेस सोळा मैलांवर मानसबळ सरोवर आहे. तें पाहण्यास आम्ही ता. १४ सप्टेंबर रोजीं गेलों. संबळपर्यंत आम्ही मोटारींतून जाऊन पुढें शिकारांत बसलों. तेथें वेळेवर पोंचावें म्हणून अगाऊ शिकारा पाठविण्याची व्यवस्था केली होती. झेलमपासून बांधलेल्या कालव्यांमधून आम्हीं या सरोवरांत प्रवेश केला. या सरोवरांत शिरतांना आपणांस एका उंच दगडी पुलाखालून अथवा प्रवेशद्वारांतून जावें लागतें. हा पूल पूर्वींच्या बादशहांनींच बांधिलेला आहे. हें सरोवर म्हणजे काश्मीर प्रांताचा अलंकार आहे. याची लांबी तीन मैल व रुंदी एक मैल आहे. या सरोवरांत विविध रंगांचीं हजारों-नव्हे लाखों कमळें आपल्या एकदम दृष्टीस पडतात. अनंत सुंदर कमलांनीं समृद्ध असें हेंच सरोवर आमच्या पाहण्यांत आलें. किंबहुना असंख्य कमलदर्शन हाच तेथील पाहण्याचा विषय आहे. या सरोवराजवळच्या बादशाही बागेंतून आम्हीं उत्तम उत्तम पीच फळें घेतलीं. ही बाग आतां मोडकळीस आली आहे. ती जहांगिरानेंच तयार केली आहे. येथून पुन्हां शिकारांत बसून आम्ही सरोवरांत सहल करून आलों, व कांहीं कमलें बरोबर आणिलीं.

श्रीनगरास असतांना श्रीमंत सरकारचे ( आमचे वडिलांचे ) भेटीस काश्मीरचे महाराज आले होते, त्या प्रसंगीं मी हजर होतों. त्यांचें आम्हीं यथोचित स्वागत केलें. महाराजांस औरस पुत्रसंतति नाहीं. त्यांनीं जगदेवसिंग नांवाचा एक सतरा वर्षांचा मुलगा दत्तक घेतला आहे. तोहि

श्रीमंत सरकारच्या व आमच्या भेटीस आला होता. महाराजांचे पुतणे जनरल सर राजा हरिसिंग म्हणून आहेत. ते संस्थानचे मुख्य सेनाध्यक्ष आहेत. महाराजांचे पश्चात् त्यांनाच काश्मीरची गादी मिळणार असें ठरलें आहे. आम्हीहि एक दिवस महाराजांचे भेटीस गेलों होतों. ही आमची भेट राजवाड्याच्या गोटामधील एका भव्य दिवाणखान्यांत झाली. तेथील राजवाडा भुईकोट किल्लेवजा आहे. त्यास तीन बाजूंनीं १०० फूट उंचीचा दुहेरी तट असून पुढील भागाचें तोंड नदीकडे आहे. आंत मोठें थोरलें पटांगण असून त्यांत बाजार, सरकारी ऑफिसें, खजिना, मुख्य राजवाडा व कुलस्वामीचें देवालय आहे. नवीन धर्तीचा राजवाडाहि या गोटाच्या आंत जवळच बांधला आहे. नदीकडील मुख्य दरवाजांतून आंत गेल्यावर एक नवीन धर्तीचा गोलधर म्हणून स्वतंत्र दिवाणखाना आहे. त्याच्या भिंतींवर व छतावर विविध रंगांचें नक्षीकाम व कलमदानी काम केलें आहे. याच ठिकाणीं महाराजांची व आमची भेट झाली. एकदां आमचें कुटुंबहि महाराणींच्या भेटीस गेलें होतें. त्या वेळीं त्यांस त्यांनीं चांदीचा चहाचा संच नजर केला. सर हरिसिंगांच्या निमंत्रणावरून त्यांच्याकडे चहा घेण्याकरितां मी गेलों होतों. आमचें सुमारें एक तासभर निरनिराळ्या विषयांवर संभाषण झालें. सर हरिसिंग हे चांगले हुषार व सुशिक्षित गृहस्थ आहेत. त्यांचें स्वतःचें खाजगी उत्पन्न १५ लक्षांवर आहे.

ता. १६ सप्टेंबर—आम्हीं श्रीनगरचें शेवटचें दर्शन घेऊन परत वाटेनें येतांना हिंदुस्थानांत सर्वांत मोठें जें वुलर सरोवर तें पाहण्यास निघालों. हा वुलर सरोवराचा रस्ता सोपूर गांवीं मुख्य रस्त्यापासून फुटतो. तेथून सरोवर १४ मैल आहे. याची लांबी १५ मैल, रुंदी ५ मैल व घेर ३० मैल आहे. या सरोवरानजीक आम्हांस नारू कालवाहि दिसला. हा कालवा बरेच मैल लांबीचा आहे. तो, झेलम नदी वुलर सरोवरांत शिरण्यापूर्वींच एका ठिकाणापासून तों त्या सरोवरांतून झेलम नदी बाहेर पडल्या ठिकाणच्या पुढील एका ठिकाणापर्यंत गेला आहे. तो होड्या जाण्याच्या सोयीचा केला असून मोगल बादशहांनीं जीं अचाट लोकोपयोगी कामें केलीं त्यांपैकीं हा कालवा एक प्रमुख आहे. वुलर सरोवरांत नेहमीं तुफान वारा चालतो, म्हणून या सरोवरांतून ती नदी चपट्या बुडाच्या होडयांनीं पार उतरून जाणें फार धोक्याचें

आहे. म्हणून बोटींच्या सुरक्षित रहदारीकरितां हा कालवा मुद्दाम बाजूनें काढून दिला आहे. काश्मीर प्रांतांतील जीं जीं ठिकाणें आम्हीं पाहिलीं त्यांतील गुलमर्गखेरीज बाकी सर्व नावेंत बसून पाहतां येण्यासारखीं आहेत व त्यास खर्चहि कमी येतो. परंतु वेळ फार लागतो म्हणून आम्हीं तीं सर्व स्थळें मोटारनें व गाडीनें पाहिलीं.

वुलर सरोवरापासून आम्ही एकदम गढीस आलों व दुसरे दिवशीं म्हणजे ता. १७ रोजीं आम्ही गढीहून निघालों. तेथून वाटेनें येतां येतां सहज पाणचक्की दिसली. ती पाहण्याकरितां मुद्दाम खालीं उतरलों, तों आसपास प्रत्येक झोपडीनजीक अशा कित्येक चक्क्या आहेत म्हणून समजलें. काश्मीर प्रांतांतून जागजागीं निसर्गसिद्ध धबधब्यांची व विपुल जलप्रवाहांची मनस्वी कृपा असल्यामुळें अशा हजारों चक्क्या जलशक्तीवर सहज चालवितां येतात व धान्य दळण्याकडे, कांडण्याकडे वगैरे त्यांचा फार उपयोग होतो. येतांना झेलमच्या खोऱ्यांतील अफाट सृष्टिसौंदर्याचें नेत्रसुख आम्हीं अनुभविलें. या दरींतून हिंवाळ्याच्या ऋतूशिवाय एरवीं जातां येतां उन्हाळा फार भासतो. त्याप्रमाणें आम्हांस तो प्रथम भासला. पण आम्ही येत असतांना कांहीं वेळानें जोराचा पाऊस पडला व तो संपल्यावर मरी डोंगरावर गारठाहि विशेषच जाणवला. म्हणजे हिमालयांत तीन्ही काल कसे प्रखरपणें भासतात याचा थोडासा अनुभव आम्हांस एकाच दिवशीं आला व पावसामुळें नद्या, नाले व ओढे जोरानें वाहूं लागल्यामुळें तोहि मनोहर देखावा पाहावयास सांपडला. आम्ही रात्रीं आठ वाजतां रावळपिंडीस पोहोंचलों.

हल्लींच्या काश्मीरच्या महाराजांचें वय ७२ वर्षांवर असल्यामुळें त्यांचे विचार जुन्या तऱ्हेचे आहेत. तथापि त्यांचा स्वभाव खर्चिक असल्यामुळें बागा व इतर ठिकाणें साधारण पूर्ववत् स्थितींत बरीं राहिलीं आहेत. महाराजांच्या जुन्या विचारांप्रमाणें त्याच धर्तीवर राज्यकारभारहि चालला आहे, म्हणून राज्य-कारभारासंबंधीं कांहीं न सांगतां काश्मीरसंबंधीं विशिष्ट माहिती सांगून भाषण आटोपतें घेणार आहें.

काश्मीरचे मुख्य चार प्रांत आहेत हें पहिल्या प्रथम सांगितलें आहे. जम्मू प्रांत पंजाबच्या नजीक असल्यामुळें तो त्याच सपाटीवर आहे व त्याचें

हवापाणी पंजाबच्या उत्तर जिल्ह्यांप्रमाणें आहे. पीर-पंजाल नांवाची टेकडी ओलांडली म्हणजे काश्मीर प्रांताची हद्द म्हणजे काश्मीरची सुंदर दरी लागते. हिची उंची सर्वसाधारणपणें सात आठ हजार फूट आहे, व येथील ठिकाणचें आतांपर्यंत वर्णन दिलेलें आहे. काश्मीरच्या उत्तरेस अठरा ते पंचवीस हजार फूट उंच असलेली हिमालयाची रांग लागते. त्याच्या पुढें गिलजित प्रांत लागतो. त्यानंतर २८ हजार फूट उंचीचे काराकोरम पर्वत लागतात. याप्रमाणें संस्थानचे भाग म्हणजे एकावर एक असलेल्या प्रचंड पायऱ्याच होत. या संस्थानांतून चिनाब, झेलम व सिंधु अशा तीन नद्यांच्या एकांवर एक उंच असणाऱ्या दऱ्यांनीं तीन विभाग झालेले आहेत. अर्थात् संस्थानच्या खालच्या दरींतून चिनाब, मधलींतून झेलम व वरच्या दरींतून सिंधु नदी गेली आहे. या सर्व नद्या एकाच तऱ्हेनें वाहतात. हें संस्थान पर्वतमय आहे हें सांगावयास नकोच. अर्थात् त्यांत जंगलें, निबिड अरण्यें, मोठमोठे पहाड, घाट हीं सर्वत्र दिसतात. काश्मीरचे महाराज हिंवाळ्यांत जम्मूला राहतात. काश्मीरचें हवापाणी फार उत्तम आहे. इकडील हवेनें मनुष्याची प्रकृति लवकर सुधारते. या प्रांतांत मुसलमानांची लोकसंख्या सुमारें १३ ते १४ लक्ष आहे. पण हे हिंदूंचे बाटविलेले मुसलमान आहेत. हे सर्व आर्यवंशीय आहेत. येथील लोक मुख्यत्वें काश्मीरी भाषा बोलतात. ती संस्कृत व पर्शियन यांच्या मिश्रणानें झाली आहे. संस्थानांत राजमान्य भाषा ऊर्दू व पर्शियन ह्या आहेत. येथें शारदी नांवाची जुनी लिपी अद्याप चालू आहे. तिकडील लोक हुषार व उद्योगी आहेत, व स्वभावानें फार गोड व प्रेमळ आहेत. इकडील लोकांचा बांधा निकोप व सशक्त असून ते दिसण्यांत गौरवर्ण व तेजःपुंज दिसतात. इकडील स्त्रिया चांगल्या सुस्वरूप असतात. पण गोषाच्या चालीमुळें तशा सुस्वरूप स्त्रिया आमच्या पाहण्यांत आल्या नाहींत. तथापि कनिष्ठ वर्गाच्या स्त्रिया ज्या कांहीं रस्त्यांतून दिसतात त्यांवरून गोषांतील म्हणजे उच्च दर्जांतील स्त्रिया अत्यंत लावण्यसंपन्न असाव्या असें अनुमान करतां येतें, व इंग्रज प्रवाशांचें याबद्दल फार अनुकूल मत आहे. पुरुष अंगांत एक लांब पैरण घालतात व पायांत विजार घालतात. पण हिंदु लोकांच्या पैरणीच्या व विजारीच्या बाह्या अरुंद व लांब असतात. मुसलमान लोक तसाच पोषाख करतात, पण यांच्या पैरणीच्या व विजारीच्या

बाह्या फार रुंद असतात. काश्मीरी लोक चहापानाचे फार भोक्ते आहेत. पण मद्यास ते बिलकुल शिवत नाहींत. हिंदुस्थानांतील शेतकरी वर्गापेक्षां तिकडील शेतकरी वर्ग फार सुखी आहे. त्याला स्वतःचें लहानसें पण सुखकर घर असून त्यास विशेष आयास न पडतां भरपूर अन्नवस्त्र मिळतें. तिकडे हिंदूंची वस्ती अगदीं कमी आहे. जे आहेत ते आपणांस ब्राह्मण म्हणवितात. तिकडे आपल्या देशाप्रमाणें शिक्षणप्रसार झालेला नाहीं.

काश्मीर प्रांत हें निसर्गदेवतेचें माहेरघर आहे आणि त्याचप्रमाणें तें निसर्गसाधनांचें वसतिस्थान आहे. एका मिठावांचून त्या प्रांताच्या बहुतेक गरजा तेथल्या तेथेंच भागण्यासारख्या आहेत. आज तिकडे साखर, घासलेट, मीठ व कांहीं विदेशी जिन्नस रवाना होतात. तो प्रदेश प्रर्वतवलयांकित असल्यामुळें बाहेरच्या जगाशीं त्याचा अद्यापहि फारसा संबंध येत नाहीं. तिकडे नुकतेच जास्त जास्त लोक जाऊं येऊं लागले आहेत. एका काळीं तेथें शालींचा व्यापार फारच भरभराटींत होता. तेथें सुमारें २५ हजारांवर शाली विणणारे कारागीर असून सुमारें तीस लाखांच्या शाली बाहेर निर्गत होत. पण फ्रेंच व जर्मन नकली मालानें हा धंदा बसवून टाकला आहे. फळें, औषधें, कातडीं, तूप, इमारती लांकूड व कांहीं लोंकरी कपडा बाहेर रवाना होतो. श्रीनगरास कागदाच्या रांध्याचें अथवा पेपरमॅचीचें काम फारच सुबक होतें. या कामाची कल्पना करून द्यावयाची म्हणजे कित्येक खानदानी जुन्या घराण्यांत कांहीं कलमदानें त्या कारागिरीचीं कोठें कोठें पाहण्यांत येतात, तीं पाहिलीं असतां कांहींशी कल्पना येणारी आहे. कलमदानासारखे बारीक सारीक जिन्नस या रांध्याचे करतात, असें नसून त्याचीं चहा घेण्याचीं टेबलें, खुर्च्या, कपाटें, पेट्या, तबकें, खेळणीं इत्यादि सामानहि करतात. या प्रकारचें काम भिंतींवर व दिवाणखान्याच्या तक्तपोशीवरहि करितात. या कामास आपल्याकडे कलमदानी काम असेंहि म्हणतात. सोन्याचांदीवरील काश्मीरी नक्षीकाम व लांकडी खोदकाम सर्व हिंदुस्थानांत फार प्रसिद्ध आहे. हरि पर्वताजवळ तुरुंगामध्यें कागद थोडा फार तयार होतो. काश्मीरास गालिचे फार चांगले तयार होतात. एका युरोपियन कंपनीनें या संस्थानांत गालिचांचा कारखाना काढला आहे. रेशमाच्या कारखान्यासंबंधीं अगोदर विस्तृत विवेचन केलें

आहेच. येथील फळझाडें, फुलझाडें, मोठमोठे वृक्ष यांसंबंधीं मागें जागजागीं सांगण्यांत आलें आहे. इकडे तळीं व सरोवरें पुष्कळ असल्यामुळें त्यांत शिंगाडीं विपुल पिकतात. या प्रांतांत कस्तुरी मृग बरेच आहेत म्हणून समजलें; पण ते आमच्या दृष्टीस कोठें पडले नाहींत. इंग्लंडांत दिसणारे बहुतेक पक्षी, फळें व फुलें या प्रदेशांत दिसतात. काश्मीरच्या प्रदेशांत अनंत खनिज द्रव्यें सांपडण्यासारखीं आहेत. पण अद्याप तीं उपयोगांत आणण्याचा प्रयत्न झाला नाहीं. काश्मीर प्रांत प्रमुख पर्वताच्या पोटांत असल्यामुळें त्यास आजपर्यंत धरणीकंपाचे बरेच मोठे धक्के बसले आहेत. त्यामुळें तिकडील सृष्टींत निसर्गतः बरीच घडामोड झाली आहे.

मूळचे काश्मीरी लोक नागाची पूजा करणारे होते. काश्मीर प्रांतांत जे हजारों पाण्याचे झरे व प्रवाह पर्वतांतून उगम पावले आहेत ते पृथ्वीच्या तळापासून अर्थात् शेषापासून निघाले आहेत अशी समजूत आहे, म्हणून झऱ्यास नाग या संज्ञेनें संबोधितात; व त्या प्रत्येकाबद्दल कांहींतरी पूर्वीची कथा, उपकथा, दंतकथा सांगण्यांत येते. ख्रि. श. पूर्वीं साठाव्या शतकापर्यंत अशा स्थलांस नाग हें नांव देण्यांत येत असे. त्यावरून तेथील प्राचीन धर्माची पीठिका समजते. हे तक्षक पंजाबांत लांबपर्यंत खालीं उतरले. झेलम व सिंधु यांच्या दरम्यान अलेक्झँडरला जें तक्षशीला नांवाचें शहर लागलें तीं त्या कालीं पंजाबची राजधानीच होती. या आद्य हिंदू धर्मानंतर तेथें बौद्ध धर्माचा प्रसार झाला. पुन्हां हिंदुधर्म-प्रसार झाला. व त्यापुढें मुसलमानी धर्म जुलमानें लादण्यांत आला. तेथें पूर्वीं जातिभेद अथवा वर्णभेद अस्तित्वांत नव्हता. तेथील सर्वच रहिवासी ब्राह्मण होते. गुणकर्माप्राणें मागाहून विभाग झाले असा महाभारतांत उल्लेख आहे. कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांनीं आपल्या *Arctic Home in the Vedas* यांत सिद्ध केल्याप्रमाणें पूर्वींचे आर्य लोक उत्तर ध्रुवाजवळ राहत होते, व ते दक्षिणेकडे येतां येतां त्यांना प्रथम काश्मीर देश लागला, व तेथील सृष्टिसौंदर्य व हवा अप्रतिम असल्यामुळें तेथेंच कांहीं लोकांनीं वस्ती केली. त्यांचेच शुद्ध वंशज आज तेथें राहत आहेत. म्हणून तेथील हिंदूंमध्यें पोटजाती झालेल्या नाहींत. पुढें त्यांतील लोक दक्षिणेकडे खालीं खालीं जसे येऊं लागले तशी त्यांत पूर्वीच्या रहिवाशांची भेसळ झाली व पुढें गुणकर्मा-

प्रमाणें अनेक जाती व पोट-जाती झाल्या. आर्य लोक उत्तर ध्रुवाकडून खालीं दक्षिणेंत आले, इतकेंच नव्हे पण नर्मदेच्या दक्षिणेस हिंदुस्थानच्या टोंकास कन्याकुमारीपर्यंतहि ते पसरले, तरी पण अत्यंत रमणीय अशा हिंदुस्थानच्या उत्तर प्रदेशाबद्दल व हिमालयाबद्दल त्यांचें प्रेम व आदर कायम राहिला. जगांत जें निसर्गतः सर्वोत्कृष्ट त्या ठिकाणीं ईश्वराचें वास्तव्य असतें. अर्थात् हिमालय हा सर्व जगांतील सृष्टिसौंदर्यांत मेरुमण्याप्रमाणें श्रेष्ठ असल्यामुळें त्यास आपल्या कल्पनेनें या लोकांनीं देवाधिदेवाचें वसतिस्थान बनविलें यांत कांहींच आश्चर्य नाहीं. खरोखर हिमालय ही पृथ्वीवरील अद्वितीय चीज आहे. हिमालयाच्या पलीकडे देव, गंधर्व, यक्षादिकांचें मनुष्यापेक्षां श्रेष्ठ कोटीचें निवासस्थान आहे, ही त्यांनीं केलेली कल्पना स्वभावतः बरोबरच आहे. हिमालयाच्या पलीकडील मानस-सरोवर हें सौंदर्याचें, सर्व सुखविलासाचें व प्रेक्षणीय वस्तूंचें आगर आहे असें त्यांनीं केलेलें वर्णन हिमालयाचें प्रत्यक्ष दर्शन घेतलेल्यास अतिशयोक्तीचें वाटणार नाहीं. कविकुलगुरु कालिदास यानें ‘कुमारसंभव’ व ‘मेघदूत’ या काव्यांत मोठया बहारीचें मनोहर वर्णन दिलें आहे. तें हिमालयास व त्याच्या आसपासच्या प्रदेशास पूर्णपणें लागू आहे. तें कविकल्पना म्हणून कोणी अतिशयोक्ति मानील. परंतु हिमालय व त्याच्या आसमंतांतील हा काश्मीर इत्यादि प्रदेश ज्यास पाहण्याचें भाग्य लाभेल तो तें वर्णन अगदीं हुबेहुब असेंच आहे असें खात्रीनें समजेल. सृष्टिसौंदर्याचा चित्रपट काढावयाचा तर तो हिमालयांतील एखाद्या श्रेष्ठ स्थानाचाच काढावयाचा अशी जर एखाद्या चित्रकारानें महत्त्वाकांक्षा धरली, सृष्टिसौंदर्याचें नमुनेदार शब्दचित्र रंगवावयाचें ठरविलें, जर तें हिमालयांतील उच्च स्थानानेंच रंगवावयाचें अशी जर एखाद्या निसर्गप्रिय कवीनें इच्छा बाळगिली तर तें त्यास भूषणच आहे. ईश्वरचरणीं विलीन होण्याकरितां तपश्चर्या करण्यास हेंच स्थान योग्य आहे अशी भावना सात्त्विक वृत्तीच्या माणसास उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. काश्मीरच्या अनुपमेय सृष्टिसौंदर्याबद्दल सारभूत जर कांहीं सांगावयाचें तर एका पर्शियन कवीच्या कवितेचें इंग्रजी रूपांतर देणें इष्ट तें असें:—

“ Do not call it Kashmere, it is a rival of the celestial fairy land. It is a paradise on the face of the earth. ”

# परिशिष्ट द

श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव यांस शिरवळ तालुक्याचे अधिकार मिळाल्यानंतर मुंबई येथील श्रीवेंकटेश्वर प्रेसचे मॅनेजर यांनीं ता. ९-१२-१९१६ रोजीं दिलेलें मानपत्र—

श्रीरामचंद्रो विजयतेतराम

श्रीमंत–सरकार–महाराज–श्री १०८ श्री. शंकरराव पंडित पंतसचिव भोरसंस्थानाधिपतिकुमार श्रीरघुनाथरावस्य पंचशाखकोकनदे चंचरीकायताम्

अद्यतनं दिनं किल धन्यतरं यतः श्रीमंतभोरसंस्थानाधिपतेर्भूपतेः कुमारस्य युवराजस्य श्रीरघुनाथरावस्य दर्शनवार्तालापनसुखमनुभवन्तो वयं निजगृहान् तेन विभूषितानवलोकयामः। अत तदानन्दपरिपूर्णा वयं तस्यैव किंचित्स्तवनं कर्तुमुद्यता भवामस्तत्सहंतां सहजसरलस्वाभावाः सज्जनाग्रगण्याः सभासदः।

श्लोकाः–

दीनप्रजापोषणतोयशस्ते छात्रप्रपोषाद्भुवि सत्वरं हि।
गच्छत्प्रवृद्धिं नितरां भविष्यति चतुःसमुद्रीतटमध्यवर्ति ॥ १ ॥
यज्ञेश्वराज्ञां प्रतिपालयन्सदोद्यन्याति भूमौ रघुनाथचंद्रमाः।
प्रजाचकोरव्रजवत्तदा मुखं निमेषहीनैर्नयनैः पिबंति हि ॥ २ ॥
प्रयाति दूरं खलचक्रवाकीगणः प्रियौघं सततं विहाय।
तथैव संवर्धयते हृदिस्थान्मुदंकुरान्स्वीयकरैर्वरैर्हि ॥ ३ ॥
प्रतापभानौ तपति स्वराज्ये ह्यभूद्वयं ते रघुनाथराव॥
भात्युच्चकैर्भोः सुजनाबजखंडं तथेतरोलूकगणस्त्वधो वै ॥ ४ ॥
चिरायुरेतु प्रियपुत्रसौख्य आशास्महे श्रीरघुनाथराव॥
श्रीवेंकटेशस्य पदारविंदात्सदाशिवश्चापि भवादृशोऽयम् ॥ ५ ॥
नीतिज्ञाः सुविलक्षणाः कविवरा मान्या अमात्याः किल।
सौजन्यात् परिभूषयन्तु नितरां न्यायाच्च ते सत्सभाम्॥
श्रीमन्श्रीरघुनाथराव भवतो भूयात्स्मृतिः सर्वदा।
चास्माकं प्रियता च वर्द्धनवती याचे हरिं भूरिदम् ॥ ६ ॥
इत्थं वै क्षेमराजेन कृतेयं स्तुतिरुत्तमा।
भवतां वै प्रमोदाय राजवंशधरे त्वयि ॥ ७ ॥

मार्गशीर्ष शुक्ल १५ — श्रीमत्कृपाकांक्षी

संवत् १९७३. — **क्षेमराज श्रीकृष्णदास,**

**श्रीवेंकटेश्वर मुद्रणयन्त्रालयाध्यक्ष, मुंबई.**

# परिशिष्ट ध

श्रीमंत बाबासाहेब गादीवर येण्यापूर्वी सन १९०४ इ. पासून त्यांचे तैनातीस असलेल्या नोकरवर्गाचीं नांवें. यांचा श्रीमंत बाबासाहेबांना फार उपयोग झाला.

खासगीकडील

१ रा. रा. श्रीपाद केशव भिडे, बी. ए.
२ ,, श्रीधरशास्त्री विनायकशास्त्री गोखले, वैद्य
३ ,, महादेव नरसिंह दीक्षित
४ ,, चिंतामण गणेश जोशी
५ ,, पांडुरंग रामचंद्र पागे
६ ,, रामचंद्र सुब्राव पारखी
७ ,, महादेव रामचंद्र पुरंधरे
८ वे. शा. सं. मोरेश्वर शतानंद पारखी

श्रीमंत बाबासाहेबांना असिस्टंट कलेक्टरचे अधिकार सन १९१३ सालीं मिळाल्यानंतरचे स्टेटकडील नोकर.

१ रावसाहेब पुरुषोत्तम बापूजी ऊर्फ काकासाहेब फडके, पर्सनल असिस्टंट
२ रावसाहेब नारायण सखाराम काळे, पर्सनल असिस्टंट
३ रावसाहेब शामराव अनंत लाटकर, पर्सनल असिस्टंट
४ रा. रा. प्रल्हाद धोंडो कानिटकर, शिरस्तेदार (केव्हां केव्हां ॲक्टिंग पर्सनल असिस्टंट होते.)
५ रा. रा. नरहर गोपाळ आंबेकर, बी. ए., इंग्रजी क्लार्क
६ रा. रा. माधव राजाराम सुभेदार, ज्यु. कारकून
७ रा. रा. विनायक सुब्राव पारखी, बारनिशी कारकून